मराठींत या विषयावर अद्याप फारसें लिहिलें गेलेलें नाहीं. त्यामुळें कितीही सावधानता ठेवली तरीही या ग्रंथांत अनेक दृष्टींनीं अपूर्णता राहण्याची शक्यता जास्तच ! हें बालसाहित्याचें समालोचन केवळ इतिहासात्मक—म्हणजे पुस्तकांच्या याद्या व कालगणना एवढ्यापुरतेंच मर्यादित नाहीं, तर बालसाहित्याच्या गुणवत्तेला व ऊर्जितावस्थेला उचित ठरेल अशा दृष्टिकोनानें केलेलें रसग्रहणही त्यांत जागो-जाग आढळेल. त्यांत लेखनाचा गुणगौरव आहे व त्या गौरवाला अधुनमधून गालबोट लावणाऱ्या लेखनदोषांचेही प्रकटीकरण आहे; नव्या इष्ट वाङ्मयप्रथांची दखल घेतली आहे, तसेंच त्यांत नकळत घुसणाऱ्या कांहीं अनिष्टांचेंही सूचन केलेलें दिसेल. व्यक्तिशः कोणाला बोल लावण्याचा हेतू अर्थातच नाहीं, पण वाङ्मयीन समालोचन नेहमींच त्रयस्थ भूमिकेवरूनच करावें लागतें त्याला इलाज काय ? तसेंच बहुतांशीं सर्व नव्याजुन्या बालसाहित्यनिर्मितीचा यांत मी परामर्ष घेतला असला तरी नजरचुकीने कोणाचें उत्तम बाललेखन निर्देशित करण्याचें राहूनही गेलें असण्याची शक्यता आहे. या अपुरेपणाची मला जाणीव आहे. जाणूनबुजून कोणाला अन्याय करण्याची इच्छा नाहीं, तथापि अशा कांहीं उणीवा आढळल्या तर वाचकमित्र क्षमाबुद्धीनेंच तिकडे पहातील असें मी गृहीत धरतें.

या लेखनांत होतांहोईतो कालानुक्रम संभाळण्याचा मी मनःपूर्वक यत्न केला आहे. विशेषतः एकोणीसाव्या शतकाबाबत ही दक्षता अधिक संभाळली गेलेली दिसेल. आज घडीला एकाच दिवशी अनेक बालपुस्तकें प्रसिद्ध होणार, तेथें हा नियम मला कटाक्षानें पाळतां आला नाहीं यांत आश्चर्य नाहीं.

मोठें कार्य आरंभिलें की स्नेहीसुहृदाची मदत ही लागतेच. याही लेखन-कार्यात माझ्या व्यवसाय बंधूंचें वैचारिक साह्य मला लाभले आहे. श्री. वा. पु. कोल्हटकर ( पुणें मुक्तद्वार ग्रंथालयाचे ग्रंथपाल ) यानीं याबाबत मला योग्य तें मार्ग-दर्शन केलें आहे. तसेंच माझे आप्त श्री. य. गो. नित्सुरे आणि व्यवसाय मित्र श्री. भा. रा. भागवत, श्री. ना. गो. शुक्ल व श्री. मो. रा. वाळंबे यांनीं या पुस्तकांतील कांहीं आवश्यक बाबतींत मला उपयुक्त सूचना दिल्या. श्री. मधुकर अ. कुलकर्णी यांनीं बाल-कवितांबाबत मार्गदर्शन केलें. तसेंच श्री. गोपीनाथ तळवलकर यांची या विषयांतली रसज्ञता व अधिकार जाणून त्याना मी या ग्रंथाचा परिचय लिहिण्याची विनंती केली ती त्यांनीं विनाविलंब मानली. ह्या सर्वांचें ऋण केवळ औपचारिक आभाराने फिटणारें नव्हे. त्या ऋणांतच राहणें मला अधिक आवडेल !

आणखी एका बाबतींत मला आस्थापूर्वक मिळालेल्या सहाय्याचा उल्लेख करणें अवश्य आहे, तो म्हणजे माझे प्रकाशकमित्र, ग्रंथपाल व ग्रंथालयें.

यांच्याविना मी हे सारे संदर्भग्रंथ कोठे मिळवणार होते ! याबाबत मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, महाराष्ट्र प्रादेशिक ग्रंथालय (पुणे), नूतन मराठी प्रशाला (पुणे)चें वाचनालय, रत्नागिरीचें नगरवाचनालय, विलिंग्डन कॉलेज लायब्ररी सांगली, सांगली नगरवाचनालय व सांगलीतील शालेय ग्रंथालयें, मिरज येथील खरे वाचनमंदिर, या सर्व ठिकाणाहून मला चैपुल्यानें पुस्तकें मिळाली व माझें काम फार सुकर झालें. या सर्वांच्या चालकांचे मी मनःपूर्वक आभार मानतें.

आणि शेवटीं ज्यांच्या आश्वासनामुळेंच हें दीर्घ कालावधीचें काम मजकडून पार पडलें त्या मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या चालक मंडळीचाहि मला कृतज्ञतापूर्वक उल्लेख करावासा वाटतो. जुन्या लेखकांची छायाचित्रें मिळवणे हेहि एक अवघड काम–पण मनांत मात्र होतें कीं, ज्यांनी मराठी बालसाहित्याची मुहूर्तमेढ रोवली, त्यांचा निदान चित्ररूप परिचय तरी वाचकांना झाला तर बरें होईल. त्याही बाबतींतली जोखीम मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयानें पार पाडून मला उपकृत केलें आहे. तसेंच या संस्थेनें याच विषयावर श्री. गजेंद्रगडकर व्याख्यानमालेतर्फे माझी २१, २२ व २३ ऑगस्ट १९६२ रोजी तीन व्याख्यानें आयोजित केली व नंतर ग्रंथ प्रकाशनाची फार मोठी जबाबदारी स्वीकारून मला चिंतामुक्त केलें. त्याबद्दल संस्थेच्या चालकांचे किती आभार मानावे तेवढे थोडेच !

१–१२–१९६३
व्यासबाग,
कोल्हापूर.

सौ. मालती दांडेकर

# या पुस्तकांतील माहितीसाठीं उपयोगिलेले संदर्भग्रंथ


१ अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका .... (गं. वा. सरदार)

२ बालवाङ्मय .... .... .... (गोपीनाथ तळवलकर)
[अर्वाचीन मराठी साहित्य (संपादक नेने) यामधून]

३ आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति .... (म. भि. कुळकर्णी)

४ आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास .... (अ. वा. देशपांडे)

५ कोल्हटकर लेखसंग्रह .... .... (श्री. कृ. कोल्हटकर)

६ दादोबा पांडुरंग—आत्मचरित्र ....

७ बालवाङ्मय .... .... (देवीदास बागुल)

८ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार .... (दत्तो वामन पोतदार)

९ मराठी साहित्य समालोचन .... (सरवटे)

१० विविधज्ञानविस्तार—पुस्तक १० ....

११ साहित्याची रूपरेषा .... .... (वि. पां. दांडेकर)

# प्रस्तावना

एकाद्या महत्त्वाच्या घटनेमुळें आपल्या मनातील अनेक अपेक्षाचें सतर्पण होतें. निराशा नाहींशी होतें, अभिमान पोसला जातो, आणि काहीं नव्या उत्साहानें मन भरून जातें. सौ. मालतीबाई दाडेकर याच्या 'बालसाहित्याची रूपरेखा' या पुस्तकाला प्रस्तावना लिहिताना मला असाच विविध प्रकारचा आनद झाला आहे. आमच्या बालवाङ्मयाचें दालन उपेक्षित, त्यात रचना करायचा उत्साह फार थोड्याना मग या वाङ्मयगगेच्या गगोत्रीपर्यंत जाऊन आजवरचा समग्र इतिहास साक्षेपानें लिहून काढायचा हें काम कोण मनावर घेणार ? पण हें काम सौ. मालती बाईनी धीरानें अगावर घेतलें आणि तें उत्कृष्ट रीतीनें पार पाडलें. अनेक प्रसिद्ध बालवाङ्मयरत्नाना कोंदणें बसविली आणि विस्मृतप्राय झालेलीं अनेक ग्रथरत्नें उजेडात आणली बालवाङ्मयाच्या निरनिराळ्या शाखात झालेल्या प्रगतीचा आढावा घेतला आणि नवी दिशाहि ठिकठिकाणी दाखविली हें सर्व काम किती जिकीरीचें आणि जोखमीचें होतें याची कल्पना ग्रथ नुसता चाळला तरी सहज येईल.

सौ मालतीबाईचें काम अवघड होतें याला मुख्य कारण बालवाङ्मयाचा सलग इतिहास असा पूर्वी उपलब्ध नाहीं समीक्षण ग्रथात आलेला एकादा सुविस्तृत लेख किंवा एकादें दुसरें पुस्तक सोडलें तर बालवाङ्मयाची पद्धतशीर नोंद कुठें झाली नव्हती. आणि त्यात नवलहि नाहीं जेव्हा एकाद्या वाङ्मयात खूप मौलिक ग्रंथ तयार होतात आणि त्याचा कालखडहि खूप मोठा असतो तेव्हा त्याचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न होतो वाङ्मयेतिहास हा त्या वाङ्मयाच्या परिपक्वतेचा आणि सपन्नतेचा एक दाखलाच म्हणता येईल आधुनिक मराठीतले बालवाङमय हें अनु वाद आणि अनुकरण याच्या चौकटीतून अजूनहि पूर्णतया बाहेर पडलेलें नाहीं. प्रतिभासपन्न लेखकाना आणि विद्वानाना त्यात रस घेणें प्रतिष्ठेचें वाटत नाही ! मग त्याचा इतिहास लिहिण्याचा फार काय त्याची विस्तृत चर्चा करण्याचा मान तरी ते त्याला का देतील ? बालवाङ्मयावरील चर्चा, लेख किंवा आढावे उपलब्ध नसल्यानें मालतीबाईना मुळातून साधनें जमवावी लागलीं पण त्यानी कष्टात माघार घेतली नाहीं आणि साक्षेप सोडला नाहीं एक अवश्य पण आजवर इतक्या प्रमाणावर न झालेलें काम (आणि तेंहि आपल्या आवडत्या विषयासबधी)

आपल्या एका ऋणानुबंधी व्यक्तीनें यशस्वी रीतीनें पार पाडलें म्हणूनच *अभिमान, आनंद, उत्साह यांनीं अंतःकरण भरून येतें.*

संसारांतील आपल्या अनेक जबाबदाऱ्या सांभाळून मालतीबाईंनीं हें सर्व केलें हें तर विशेषच आश्चर्य आहे. बुधगांवसारख्या आडगांवीं राहून मालतीबाईंनीं मोठी वाङ्मयसाधना केली. वाचन आणि चिंतन यांनीं आपल्या जाणीवेस समर्थ आणि सुसंस्कृत केलें. निरनिराळ्या वाङ्मयशाखांत उदंड लेखन केलें. नव्या प्रेरणा समजावून घेतल्या. जुनीं उत्तम मूल्यें सोडली नाहींत. आणि हें सर्व करीत असतांना कसल्याहि प्रकारें आदळआपट केली नाहीं. आज अनेक वर्षें आम्हीं नेहमी भेटत आलो. पण क्रोध, कृपणता, किंवा कारुण्य यांची अस्पष्ट सावली सुद्धां त्यांच्या प्रसन्न मुद्रेवर पडलेली मला दिसली नाहीं. प्रस्तुत ग्रंथ वाचतांना ह्या त्यांच्या व्यक्तित्वाची जाणीव झाल्यावांचून रहात नाहीं. कारण यांत कष्ट दिसतात, पण कडवटपणा कुठेंहि आढळत नाहीं. स्पष्टता आहे आणि त्याच्या जोडीला सौजन्यहि आहे. *मुळांत मालतीबाई ललित लेखिका असल्यानें समालोचनांत नेहमी आढळून* येणारा रुक्षपणा यांत आलेला नाहीं. पुस्तकांच्या याद्या या केव्हाहि कंटाळवाण्याच आणि अशा पुस्तकांत त्या देणें अपरिहार्यच असतें. पण खेळकर टीकेचें मोहन घालून या रुक्ष माहितीला पुष्कळ रुचकर बनविण्याचा सुगरणपणा मालतीबाईंनी दाखविला आहे.

## चार कालखंड : छत्रे, दामले, ओक व आपटे

सुमारें दीडशें वर्षांपूर्वी तंजावर येथें मराठी बालवाङ्मयांतलें पहिलें पुस्तक छापलें गेलें. पण बालवाङ्मयाच्या या मुद्रित आरंभापूर्वी बालवाङ्मय होतें, आणि तें बालप्रियहि होतें. फक्त लिखित स्वरूपांत तें प्रकट झालें नव्हतें इतकेंच. पुराणकथा, इतिहासकथा, लोककथा, लोकगीतें हीं प्रचलित होतीं. पाठांतराच्या शिस्तीमुळें शतकानुशतकें वेदवाङ्मय जिवंत राहिलें तद्वत् आजीबाईंनी बालवाङ्मयाचा ओघ वाहता ठेवला. बालवाङ्मयाचें मुद्रण होऊं लागल्यानंतर प्रथम बराच काळ नीतिकथांचेंच प्राबल्य होतें. १९३० पर्यंतच्या *बालवाङ्मयाचे छत्रे, दामले, ओक आणि आपटे* असे चार कालखंड मानले तर रजकतेचें प्रमाण प्रत्येक कालखंडांत वाढत गेलें असें म्हणावें लागेल. मालतीबाईंनीं बालवाङ्मयावर प्रथमपासून पडलेल्या 'पंतोजी' बाण्याची उत्तम चर्चा केली आहे. तात्पर्याच्या टेकूशिवाय कुठलीहि कथा अनेक वर्षे उभीच राहत नसे. लहान मुलांकरितां पुस्तकें लिहायचीं तीं शाळांत लागलीं पाहिजेत म्हणून तीं बोधप्रद असावीं हें ठरल्यासारखें झालें. क्रमिक किंवा बक्षिसाचीं पुस्तकें रचणें, निवडणें, दुरुस्त करणें हें बहुतेक सारे विद्याखात्यांतील मंडळीच करीत. साहजिकच 'पंतोजी'पणानें साऱ्यांना झाकळून टाकलें.

ही परंपरा आजतागायत चालू होती. आणि अजूनहि ती समूळ लुप्त झालेली नाही. अलीकडे बोधाशी किंवा नीतिपाठाशीं दृष्टांतलेंहि नातें नाहीं असें वाङ्मय प्रसिद्ध होत आहे. निव्वळ वाङ्मयीन कसोटीवर घासून पाहिल्यास त्यांतलें कितीसें सुंदर ठरेल देव जाणे ! पण बालसाहित्यांत 'कलेसाठी कला' या तत्त्वाला चांगले दिवस येत आहेत यांत शंका नाही.

आजवरच्या बालवाङ्मयाची समीक्षा मालतीबाईंनीं आर्जवी पण निस्पृह वृत्तीनें केली आहे. बालसाहित्यांत वाङ्मयाचें तंत्र आढळलें तरी वाङ्मयाचें सत्त्व फार थोडें आढळतें. जोडाक्षरें मुळींच नसावींत, निदान कमी असावींत, वाक्यें सुटसुटीत असावींत; कथा—चर्चा यांत गुंतागुंत असूं नये; शक्य तोंवर ज्ञाताकडून अज्ञाताकडे जावें, पाल्हाळ कमी असावा, पण कांहीं शब्द, विचार, कल्पना यांची पुनरुक्ति जरूर व्हावी—या आणि अशा सूत्रांचें पालन आज प्रसिद्धच नव्हे तर नवोदित लेखकहि पुष्कळ प्रमाणांत करतात. पण ज्यामुळें साहित्याला जीवनाच्या तळापर्यंत प्रवेश मिळतो, भावविश्वाचा अरुणोदय होतो, आणि ज्याचे पडसाद अधिकाधिक स्पष्ट होत जातात असें बालवाङ्मय निर्माण होत नाहीं. याचें कारण काय ?— याचें कारण या क्षेत्रांत अव्वल प्रतिभेचीं माणसें सहसा उतरत नाहींत हें होय, असे मोठ्या खेदानें म्हणावें लागतें !

### या क्षेत्राची आबाळ !

बालसाहित्यांत मिळणारें यश आणि कीर्ति डोळे दिपविणारी नसते. त्यांना ललित वाङ्मयांत नांव मिळण्याइतका विश्वास नसतो ती मंडळी इकडे येतात. दुय्यम किंवा त्यांहून कमी दर्जाच्या शिक्षकांनीं करावयाचें हें काम आहे अशीच अजूनहि पुष्कळांची समजूत आहे ! ज्यांना प्रतिभेची देणगी चांगली लाभली आहे ती माणसें यांकडे क्वचित् वळलीच तर आम्ही हेंहि सहज लीलेनें करूं शकतो हें दाखविण्यापुरतीच. त्यांना यांत आस्था नसते ! हीं माणसें उल्लेखनीय रचना करतात, नाहीं असें नाहीं. पण ती बहुधा चमत्कृतिपूर्ण असते. बालवाङ्मय मुलांना रिझविण्यासाठीं किंवा त्यांचे उद्बोधन करण्यासाठीं निर्माण झालें पाहिजे; त्यांना दिपविण्यासाठीं किंवा चकित करण्यासाठीं नव्हे. अव्वल प्रतिभेचे वाग्भट मुलांशीं समरस होऊन जेव्हां लिहितात तेव्हां कसें आदर्श बालवाङ्मय निर्माण होतें हें दत्त, तांबे, बालकवि यांची अजोड शिशुगीतें दाखवितील. बालमुकुंदाची उपासना करण्याची अनन्यनिष्ठा आणि साहित्यनिर्मितीला लागणारी उत्तम प्रतिभा यांचा उत्तम सयोग झाला म्हणजेच अस्सल बालवाङ्मय तयार होतें.

बालवाङ्मय लिहिणारांना आणखी एका गोष्टीचे तारतम्य बाळगावें लागतें. आणि तें म्हणजे आपण कोणत्या वयाच्या गटाकरितां लिहीत आहो हें. " इयं इयं

असं रे मोरा," "पाखरांची शाळा," "तुझ्या गळा माझ्या गळा" ही तीन बालगीतेंच आहेत. पण पहिलें, अगदीं एकावयवी शब्द बोलणाऱ्या शिशूला रिझवील. दुसरें, आपली शाळा आणि सृष्टि यांतलें साम्य पाहूं शकणाऱ्या किशोराला कळेल, आणि तिसरें पति–पत्नीचें नातें कांहीं गूढरम्य आहे अशी पुसट जाणीव झालेल्या कुमार–कुमारीला आवडेल. 'एक होता राजा' या गोष्टीचे बालवाचक 'गलिव्हर्स ट्रॅव्हल्स'च्या बालवाचकापेक्षां खात्रीनें वेगळे असणार. 'बालरामायण' वाचणारे किशोर हे 'गड आला पण सिंह गेला' ही कादंबरी वाचणाऱ्या कुमाराच्या मानानें थोडे अल्पशच असणार. हा फरक पुष्कळांच्या लक्षांतच येत नाहीं. बालवाङ्मय हें एकजिनसी नाहीं. त्यांतहि गटाप्रमाणें सुबोधतेचें कोष्टक असूं शकतें हें लक्षांत न आल्यामुळें अनेक गफलती घडतात. केवळ भाषा सोपी असूनहि उपयोगी नाहीं तर तींत गोचर वर्णनपद्धति असली पाहिजे. जें वर्ण्य आहे तें मुलांच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें पाहिजे. केवळ जोडाक्षरें किंवा कठीण शब्द वगळले कीं हें ध्येय साध्य होईल असें नाहीं. श्री. वामनराव चोरघडे यांच्या 'चंपाराणी' या कथेंतला एक सुंदर उतारा देऊन मालतीबाईंनीं हें उत्तम रीतीनें सूचित केलें आहे (पृ. १०९). दर्शनी हा उतारा सोपा वाटणार नाहीं. पण त्यांतलें वर्णन मुलांच्या हृदयाला तात्काळ जाऊन भिडेल. आशय बिनगुंतागुंतीचा, सुस्पष्ट आणि कांहीं निश्चित आकार डोळ्यासमोर उभा करील असा असावा; आणि ज्या वयाच्या गटासाठीं आपण लिहित आहोत त्या वयाच्या आकलनशक्तीचा अंदाज नेमका घेतला जावा. तरच लेखक बालसाहित्य यशस्वी रीतीनें निर्माण करूं शकेल. या मुद्याचा उहापोह मालतीबाईंनीं निरनिराळ्या पुस्तकांचा परिचय देत असतां अप्रत्यक्षपणें कुठेंकुठें केला आहे. पण कुठें तरी विस्तारपूर्वक कांहीं पुस्तकांची छाननी करून आपलें म्हणणें त्यांनीं मांडलें असतें तर विवेचनाला अधिक धार आली असती. पण आपल्या योजनेंत त्याचा समावेश त्यांनीं केलेला नसावा.

### बालमासिकाची परवड

बालमासिकासंबंधीं मालतीबाईंनीं शक्य तितक्या विस्तारानें चर्चा केली आहे. त्यांना या त्यांच्या कामगिरीबद्दल खास धन्यवाद द्यावेसे वाटतात. विशेष म्हणजे या शाखेच्या व्यावहारिक बाजूचाहि त्यांनीं विचार केला आहे. बालमासिकाच्या वर्गणीची आवक वाढली तरच त्यांत सुधारणा करणें शक्य होईल. पण बहुसंख्य पालक मुलांसाठीं बालमासिकें घेण्याचें ठरवतील तेव्हांच हें घडून येईल. अधिक चित्रें देणें परवडत नाहीं म्हणून रोपनाई कमी आणि ती म्हणून खप कमी या दुष्ट चक्रांतून बालमासिकाचा संसार अजून बाहेर आलेला नाहीं. जेथें साधनांची विपुलता आहे तेथें भयानक कल्पनादारिद्य! मग रंगीत चित्रांची आणि कसल्यातरी

भुलभुलावण असलेल्या गोष्टींची रेलचेल आहे म्हणून बालवाचक तिकडे लोभावतात. पण करमणुकीशिवाय त्याच्या कांहींच पदरांत पडत नाहीं. जाणीवेला सपन्न करून नवीन पैलू पाडण्याचें सामर्थ्य असल्या आकर्षक पण सवंग साहित्यांत कोठून असणार ? मुलांसाठीं साताहिकें, पाक्षिकें, फार काय दैनिकेंहि निघावींत. या कामी लागणारें कौशल्य आपल्यात विपुल प्रमाणांत आहे. पण पालकांचें औदासीन्य आणि बालविकासाच्या कामीं आमची असलेली योजनाशून्यता यामुळेंच बालनियतकालिकांची शाखा फारशी पुष्ट होऊं शकत नाहीं.

एकंदर बालसाहित्याबद्दल थोड्याफार अंशीं हेंच म्हणतां येईल. बाल—नाट्याचाच प्रश्न घ्या. आज बालनाट्याची चळवळ मूळ धरूं लागली आहे. काहीं सरस नाटकें सुविद्य आणि कल्पक दिग्दर्शकांनीं रंगभूमीवर आणलीं आहेत. पण मुलांसाठीं एक स्वतंत्र रंगमंच बाळसें धरूं लागला आहे तेव्हां मुलांना त्याची ओळख करून द्याची अशी जाणीव फारच थोड्या पालकांत झालेली आढळते. बालनाट्याला भरपूर आश्रय मिळाला तर तें खूपच फोफावेल. त्यांत सर्व तऱ्हाच्या मुलाना शिक्षविणाऱ्या कलाकृती निर्माण होतील. आणि मग आजचे चित्रपट किंवा नाटकें पाहून मुलें बिघडतात असा आक्रोश करण्याची पाळी पालकांवर येणार नाहीं. बालनाट्याचे प्रकरण मालतीबाईंनीं विशेष काटेकोरपणानें लिहिलें आहे. या प्रकरणात मला विशेष कोणती गोष्ट आवडली तर ही कीं, नाट्यरचनेचा उहापोह मालतीबाईंनीं अधिकारवाणीनें केला असून त्रुटींचें माप सोदाहरण आणि सप्रमाण लेखकाच्या पदरांत घातलें आहे. हें प्रकरण बालनाट्याचे प्रयोग करणाऱ्या कलावंतांना आणि बाल—नाट्य—लेखकांना सारखेंच मार्गदर्शक होईल.

साहित्याचा कस लावताना तंत्राचा विचार अपरिहार्य असतो. नाट्य हें साहित्य आहे. त्याप्रमाणेंच त्याचे रंगभूमीवर प्रयोगहि होतात. म्हणजे अभिनय, नेपथ्य इत्यादि गोष्टी आल्याच. आज बालरंगभूमि बाल्यावस्थेंत आहे. निरनिराळे प्रयोग होत आहेत. बालकलाकार पुढें येत आहेत. अशा वेळीं नाट्याच्या प्रयोगासंबंधीं सविस्तर चर्चा होणें जरूर वाटते. तंत्रानें आशयाचा स्वाहा करू नये हा एकंदर साहित्याचा नियम नाट्य प्रयोगालाहि लागू पडतो. अद्‌भुततेची भुलावण प्रकाश आणि ध्वनि याचा वरचष्मा, भेसूर दृश्याचें प्राचुर्य इ. प्रकार बालनाट्यात सर्वत्र आढळतात. कथानक आणि आशय यात मुलें रंगून जातील असें झालें पाहिजे. नेपथ्याचा बडेजाव हा बालनाट्याच्या प्रसारालाहि मारक ठरतो. कारण त्यामुळें त्या नाट्याची प्रयोगसुलभता नष्ट होते हाहि एक विचार झाला पाहिजे.

सौ. मालतीबाईंच्या लेखणीचें लालित्य जर ग्रंथांत कुठें विशेष प्रगट झाले असेल तर ते पाश्चात्य बालवाङ्‌मयाची माहिती देतांना. प्रस्तुत ग्रंथांत या प्रकरणाची

जरुरीच काय होती असें कुणी जादा शंखेखोर विचारीलहि. पण मला वाटतें मराठी बालवाङमयाचा आढावा घेतांना जरा त्या चाकोरींतून दूर होऊन मालतीबाईनीं पाश्चात्य बालवाङ्मयांत केलेली सहल हें या ग्रंथाचें एक आवश्यक अंग ठरावें इतक्या महत्त्वाचे आहे. छायानगरी, क्रीडानगरी, परीसृष्टी यांचा कल्पनारम्य भूगोल मालतीबाई मोठ्या रसाळपणें सांगतात. मुलांच्या कल्पनाशक्तीला आणि संवेदनाक्षमतेला वेगवेगळ्या अवस्थेंत कोणतें साहित्य खतपाणी घालते याचें स्थूल दिग्दर्शन उद्यांच्या बालसाहित्यकाराला उद्बोधक ठरेल. एका स्वतंत्र ग्रंथाचा विषय एका प्रकरणांत संक्षिप्त पण सरस रीतीनें मालतीबाईनी मांडला आहे.

## बालगीतांचा फुलोरा

या ग्रंथांतल्या काव्याचा भाग मी मोठ्या उत्सुकतेनें अगदीं प्रथम वाचायला घेतला. काव्यांत आपणांला फार थोडें गम्य आहे असें मालतीबाई सांगतात. पण हें प्रकरण वाचल्यावर त्यांचें म्हणणें केवळ विनयाच्या पोटीं आहे असेंच कुणालाहि वाटेल.

मुलांना प्रथम कळू लागते ती लय. स्वराची जाणीव मग होऊं लागतें. या जाणीवेंतहि मधुर स्वरांवर त्यांची भक्ति मागून जडते. प्रथम त्यांना कांहींसे विचित्र सूरच आवडूं लागतात. बडबडगीतांकडे त्यामुळें त्यांचा ओढा असतो.

*बुलबुलाच्या स्वरांपेक्षां मुलांना केकारव अधिक पसंत पडेल. त्यांना व्यंगसंगीत* (Cartoon–Music) अधिक आवडतें. आणि सुराबरोबर नाचण्याबागडण्याचा हव्यास फार. मुलांची कलासक्ति ही शांतपणें रसग्रहण करण्यावरच थांबत नाहीं. *संगीताला, नृत्याला आपण स्वतः सक्रीय प्रतिसाद देणें, त्यांत सहभागी होणें याचें* मुलाना विलक्षण वेड असतें.

घनीं देखुनी मेघनीळास मोर
प्रमोदें करी नृत्यलीला समोर
तयासारखें नाचती तोक सारे
खुणावून अन्योन्य कीं, तो कसा रे!

हें वामन पंडितांनी केलेलें श्रीकृष्णाच्या संवगड्याचें वर्णन सर्वच मुलांना लागू पडेल. मुलांची अनुकरण प्रवृत्ति इतकी प्रबळ असते की कविता किंवा गाणें चालू *असतां नकळत सर्वजण गुणगुणूं लागतात, किंवा पायानें ताल देऊं लागतात. या* दृष्टीनें वृंदगीत हा अत्यंत बालप्रिय काव्यप्रकार ठरेल.

शिशुगीत आणि बालगीत यात मालतीबाईंनी फरक केला तो योग्यच आहे. भाषा सोपी आणि आशय प्रौढ अशा थाटाच्या बालगीतावर त्यांनीं सौम्य स्वरूपाची टीकाहि केली आहे. नवकाव्याचा जो परिणाम बालगीतावर होऊ पहात आहे त्याचाहि समाचार त्यांनी घेतला आहे. पण या विषयात आणखी उदाहरणें देऊन त्याचा भेसूरपणा स्पष्ट करणें योग्य झालें असते सफाई आणि तंत्र यामध्यें बालगीताची चांगली समृद्धि होत असली तरी बेफाट कल्पनाचा धुडगूसहि सुरू झाला आहे! दोन विक्षिप्त कल्पनात कुठलाच दुवा ठेवायचा नाहीं असा एक संप्रदाय रूढ होऊ पहात आहे. लोकसाहित्यात कित्येक बालगीतें अशा धर्तीचीं असतात नाहीं असें नाहीं. पण त्यात अनौचित्य किंवा कुरूपता नसते. अफाट कल्पनेनें नटलेल्या नव्या बालगीतात हे दोष भरपूर आढळतात! नव्हे हे दोष म्हणजेच यांचें वैशिष्ट्य असें या संप्रदायाच्या प्रवर्तकाना वाटतें. खोटी नाणीं बाजारात आलीं म्हणजे खरीं मागे पडतात हा सिद्धांत साहित्याच्या बाजारात तरी खरा ठरू नये.

सजावट हा बालसाहित्यात महत्त्वाचा भाग आहे. सजावटींत आकर्षकपणा पाहिजे. शब्दातला आशय रंगरेषानी अधिक लोभनीय व्हावा. शब्दातून मुलाच्या डोळ्यापुढें जें चित्र उभें राहायचें त्याच्या चित्रणाला चित्रानी मदत झाली पाहिजे. मुलाच्या कल्पनाशक्तीला चित्रामुळें चालना मिळणें जरूर आहे. व्यंगचित्रें असली तर उत्तमच. कारण मुलाना व्यंगगीताप्रमाणें व्यंगचित्रें खूप आवडतात. पण आज मुलाच्या पुस्तकात अवाच्य आणि गूढ अशीं चित्रें पुष्कळदा दिसतात! त्याबद्दल आणि काव्यपुस्तकाच्या किंमतीबद्दल मालतीबाईंनी झाडलेले ताशेरे गैरवाजवी नाहींत.

> "प्रकाशकाच्या सगळ्या अडचणी मान्य करूनहि या वाढत्या किंमतीचें संकट या सुंदर बालप्रकाशनाच्या प्रसाराला घातक ठरत आहे हें मुद्दाम उल्लेखित करावेंसें वाटतें. बालकाव्य अधिक सुंदर होत आहेत, देखण्या रूपात प्रकट होत आहेत, ही भाग्याची गोष्ट, पण त्याना बालहातापर्यंत पोंचायला यांच गोष्टींनी अडथळा व्हावा हें इष्ट कसें मानायचे?" (पृ. १७७)

### अक्षर वाङ्मयाशीं स्नेह

कथा हा बालसाहित्याचा फार मोठा विभाग आहे त्याची चर्चा मालती बाईंनीं खूपच विस्तृत केलेली आहे. लोककथेपासून विज्ञानकथेपर्यंत या विषयाचा प्रचंड विस्तार आहे. पण याहि क्षेत्रात अनेक त्रुटी जाणवतात. अद्भुत कथा कोणत्या वयात रुचते, साहसकथा कोणत्या वयात मोद पाडते, विज्ञानकथेचें

आकर्षण कोणत्या वयांत असतें, यांत लेखकांचा फार घोटाळा होतो! जगविख्यात ग्रंथांचीं कथानकें सरळ साध्या शब्दांत सांगणारीं पुस्तकें हा बालकादंबरीचा विभागच म्हणतां येईल. मात्र गाळायचें काय आणि ठेवायचें काय याचा कुशल विवेक झाला पाहिजे. पण ही निवड पुष्कळदां विचित्र होते. या कामीं झालेले कांही दोष मालतीबाईंनीं व्यक्तिमाहात्म्यानें बुजून न जातां स्पष्ट केले याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे.

बालवाङ्मयाचा प्रसार अधिक होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. पण त्याचबरोबर हेहि लक्षांत ठेवले पाहिजे की बालसाहित्याच्या क्षेत्रांतच मुलांनीं सतत गुंतून राहणें योग्य नाहीं. जगांतल्या अक्षर वाङ्मयाशीं त्यांचा ऋणानुबंध प्रथम-पासून जडला पाहिजे. आदर्श कलाकृतींचें बालसुबोध अनुवाद किंवा संक्षेप हा या ऋणानुबंधाचा एक भाग खरा; पण त्यांतहि धोके असतात. अनुवाद किंवा संक्षेप करणाऱ्या लेखकाची कुवत बेताची असेल तर मूळ ग्रंथांतलें सौंदर्य मुलांना समज-णार नाहीं. त्यापेक्षां थोड्या जाणत्या वयांत मूळ ग्रंथच मुलें वाचतील तर बरें. ज्या काळीं आजच्या इतकें बालवाङ्मय निघत नव्हतें तेव्हां प्रौढ वाङ्मयांतील प्रसिद्ध पुस्तकेंच बालवाचक वाचत. कांहीं समजे, कांहीं समजत नसे. पण कुठला तरी दिव्य स्पर्श हृदयाला होऊन गेल्याचा भास होई आणि तो संस्कार चिरकाल राही. हरिभाऊ किंवा नाथमाधव यांच्या सुरस कादंबऱ्या हेच तेव्हांचें लोकप्रिय 'बालवाङ्मय' होतें. आदर्श वाङ्मयांत पाणी घालून बेचव केलेलें बालवाङ्मय वाचण्यापेक्षां मूळ सरस प्रवाहांत उतरणें बरें. आदर्श वाङ्मयाशीं मुलांचा जिव्हा-ळ्याचा संबंध जडवून देणारी 'लँम्स् टेल्स्' किंवा वैद्यांची 'श्रीकृष्णचरित्र', 'श्रीरामचरित्र' यांसारखी उत्कृष्ट पुस्तकें केव्हांहि थोडींच. अनुवाद किंवा संक्षेप याचा डौल असा पाहिजे कीं मूळांतलें लावण्य मुलांना त्या योगें प्रतीत झालें पाहिजे.

विद्यार्थी–वाङ्मय, शास्त्रीय–वाङ्मय इत्यादि शाखांचा परामर्ष मालतीबाईंनीं समर्थपणें घेतला आहे. चरित्र–वाङ्मयाचा विस्तार पुष्कळ आहे, पण त्या मानानें खोली कमी. याहि सदरांत बालवाचकांच्या वयांप्रमाणें त्यांना पचेल आणि पुष्ट करील असे विविध प्रकारचें चरित्रवाङ्मय अपुरें पडतें. म्हणजे संख्या पुष्कळ आहे. परंतु कुणाला काय झेपेल याचा अंदाज पुष्कळ ठिकाणीं चुकलेला दिसतो. शालेय वाङ्मयासंबंधींहि मालतीबाईंनीं बहुमोल चर्चा केली आहे. अत्रे-घाटे या दोघा मान्यवर साहित्यिकांनीं क्रमिक पुस्तकांचा सारा नूर पालटून टाकला आणि शैक्षणिक वाङ्मयाला साहित्यसुगंधाची जोड दिली. पूर्वसूरींनीं रचिलेलें सुंदर सुंदर

साहित्य बालविद्यार्थ्यांच्या परिचयाचें होऊं लागलें. क्रमिक पुस्तकें मनोरंजक झालीं हें बालवाङमयाच्या दृष्टीनें फार चांगलें झालें यांत शंका नाहीं.

## आकाशवाणीवरील बालसाहित्य

बालवाङमयाची अलीकडील एक लोकप्रिय आणि विकसनशील शाखा म्हणजे आकाशवाणीवरील मुलांच्या कार्यक्रमांत ध्वनिक्षेपित होणारें साहित्य होय. बालवाङ्मयाचें सर्वसाधारण तंत्र यालाहि लागू आहे. पण या अत्याधुनिक माध्यमाचे कांहीं खास विशेष आहेत. आकाशवाणीच्या कार्यक्रमांत एकदां शब्द गेला कीं तो पुन: परत विचारतां येत नाहीं. बोलणारा माणूस समोर नसल्यानें अभिनयानें जें व्यक्त व्हायचें तें उणें पडतें. वाचतांना स्मृतीला उजळा देण्याकरितां मागलीं पानें आपण चाळतों तें येथें शक्य नाहीं. विरामचिन्हें, अवतरणचिन्हें, रेषा, जाड ठसा, परिच्छेद इ. साधनांनीं आशयाला उठाव आणण्याची सोय नसते. फक्त आवाज हें एकच माध्यम त्यांतून रसपरिपोष करावयाचा. सांगणाऱ्याच्या आवाजाचा धर्म, त्यांतलें नाट्य, आशयाची रंजकता यावरच कार्यक्रमाचें यश अवलंबून असतें. आवाजाचे चढउतार फार केले तर ते मुलांना हास्यास्पद वाटतात. एका सुरांत निवेदन केल्यानें मुलांना तें कंटाळवाणें होतें. साथीची जोड दिल्यास कथा, काव्य, नाट्य, हे अधिक परिणामकारक होतें खरें पण त्यांतहि आशय लुप्त किंवा दुर्बोध होण्याची भीति असते. नाट्यांत नेपथ्याचा फाजील दिमाख जसा रसापकर्षक होतो तद्वत् आकाशवाणीवरच्या कथा-कविता-नाट्यांत साथीचा वाजवीपेक्षा अधिक उपयोग कार्यक्रम निघडवून टाकतो. स्वरसाह्य थोडें दिलें तरच तें परिणामकारक होतें ( Effects are effective only when they are few ) हें एक स्वतंत्र वाङमय तंत्र आहे. प्रस्तुत ग्रंथांत मालतीबाईंनी याची खुलासेवार चर्चा करणें आवश्यक होतें कारण बालवाङमयांत कांही नवें करण्याची हिंमत बाळगणारांना हे एक मोठेंच क्षेत्र निर्माण झालें. मालतीबाईंनीं स्वतः हि या क्षेत्रांत कांहीं कार्यक्रम केले आहेत. माझी खात्री आहे कीं प्रस्तुत ग्रंथाच्या द्वितीयावृत्तीच्या वेळीं आकाशवाणीवरील बाल-वाङ्मय हें एक स्वतंत्र प्रकरण यांत समाविष्ट केलें जाईल.

पण क्वचित् कुठें मतभेद किंवा अपुरेपणा दाखविला असला तरी या ग्रंथाचें भरीवपण निःसंदिग्धपणें मान्य करण्यास मला आनंदच होत आहे. स्वतः मालती-बाईंनी उत्कृष्ट बालसाहित्य रचलें. त्याचा रसग्रहणात्मक परामर्श त्यांना यांत घेतां आला नाहीं ही उणीव रहाणारच. पण ती भूषणास्पद आहे. तिटीमुळें मुखमंडलाचें सौंदर्य जसें खुलतें त्याप्रमाणें या उणीवेमुळें या ग्रंथाची शोभा वाढली आहे. मराठी वाङमयाच्या अत्यंत महत्त्वाच्या पण बऱ्याचशा उपेक्षित दालनाचा हा इतिहास

कुणालाहि मनोवेधक वाटेल. मालतीबाईंच्या परिपक्व प्रज्ञेचा त्यांत प्रत्यय येतो. त्याप्रमाणें त्यांची बालवाङ्मयावरील माया पदोपदीं दिसून येते. श्रेय देण्यांत त्यांनीं कंजूषपणा केला नाहीं. विस्मृतीच्या गर्तेत पडलेल्या लेखकाच्या चांगल्या कृतीला त्यांनीं उजेडांत आणून स्तुतीचें कोंदण चढविलें. पण विख्यात व्यक्तींच्या साहित्यांतले दोषहि कुलवधूची मर्यादा पाळून स्पष्ट दाखविले. यांत समालोचन आहे तसें मार्गदर्शनहि आहे. स्नेहभावाचीं बंधनें क्षणभर मोकळीं करून मी तटस्थतेनें ही 'रूपरेखा' पाहिली आणि माझ्या तोंडून धन्योद्गार निघाले. त्यांत बालसाहित्याचे सारे अभ्यासक आपला सुसंवादी स्वर मिसळतील यांत मला यत्किंचित् शंका वाटत नाहीं.

—गोपीनाथ तळवलकर

नातूबाग, पुणें.
१३–१२–६३

# बालसाहित्याची रूपरेखा

अनुक्रमणिका | पृष्ठ


| | | |
|---|---|---|
| १ | बालसाहित्याचा उषःकाल ... ... ... | १ |
| | १ पुस्तकें ... ... ... | १ |
| | २ भाषाविचार ... ... ... | १२ |
| २ | विकसनकाल ... ... ... | २८ |
| ३ | बाल मासिकांचें क्षेत्र ... ... ... | ४२ |
| ४ | पाश्चात्यांची बालकथा व तिचे संस्कार ... ... | ५९ |
| ५ | शिशुसाहित्य ... ... ... | ७१ |
| ६ | बालसाहित्यातील कथाविभाग ... ... ... | ८८ |
| | प्राणिकथा ... ... ... | ८८ |
| | लोककथा ... ... ... | ९७ |
| | पौराणिककथा ... ... ... | १०९ |
| | इतिहासकथा ... ... ... | १२० |
| | वास्तवकथा ... ... ... | १२६ |
| | नाट्यकथा ... ... ... | १३४ |
| ७ | बालनाट्य .. ... ... | १४१ |
| ८ | शिशुगीत-बालगीत .. ... ... | १५८ |

पृष्ठ


| | | |
|---|---|---|
| ९ बालकादंबरी | ... ... ... | १७८ |
| ऐतिहासिक बालकादंबऱ्या | ... ... | १८० |
| अद्‌भुतरम्य आणि साहसी कादंबऱ्या | ... | १८६ |
| अनुवादित | ... ... ... | १९० |
| सामाजिक (व्यक्तिदर्शनपर) | ... .. | १९९ |
| सामाजिक कादंबरी (सर्वसाधारण) | ... | २०७ |
| संक्षिप्त कादंबऱ्या | ... .. ... | २१२ |
| १० चरित्रें | ... ... ... | २१६ |
| मुलांचे छंद व तत्संबंधी वाङ्मय | ... | २३० |
| हितगुजात्मक पुस्तकें | ... ... | २३१ |
| ११ विद्यार्थी वाङ्मय | ... ... ... | २४१ |
| भाषाशास्त्र | ... ... ... | २४२ |
| शरीरशास्त्र | ... ... ... | २४४ |
| भूगोलशास्त्र | ... ... ... | २४४ |
| खगोलशास्त्र | ... ... ... | २५१ |
| १२ सृष्टिज्ञान व प्राणीशास्त्र | ... .. ... | २५४ |
| १३ शास्त्रीय पुस्तकें | ... ... ... | २६० |
| १४ लेखकसूची | ... .. ... | २७१ |

या पुस्तकाच्या लेखिका सौ. मालतीबाई दाडेकर यांनी "बाल-वाङ्मयाची रूपरेखा" या विषयावरील तीन व्याख्याने दि. २१, २२ व २३ ऑगस्ट १९६२ रोजी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या श्रीगजेन्द्रगडकर व्याख्यानमालेत दिलीं. संस्थेच्या प्रथे-प्रमाणे आज ही व्याख्याने आम्ही पुस्तकरूपाने प्रसिद्ध करीत आहोत. व्याख्याने ग्रंथनिविष्ट करताना त्यावर योग्य ते संस्कार करून दिल्याबद्दल तसेच ग्रंथप्रकाशनाची संधि दिल्या-बद्दल संस्था सौ. मालतीबाईंची ऋणी आहे.

—प्रकाशक



मेजर टी. कँडी



श्री गोविन्द शंकर बापट



श्री कृष्णशास्त्री चिपळूणकर



श्री हरि पू

# बालसाहित्याचा उपःकाल

## १— पुस्तकें :

मराठी बालसाहित्याची सुरवात सुमारें सवाशें वर्षांपूर्वी म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पंचविशीत झालेली दिसते. कालाबरोबर मार्गेमार्गे दृष्टी नेऊन मराठी साहित्याच्या पहिल्या पाऊलवाटांकडे पाहिलें कीं, एक महत्त्वाची गोष्ट निदर्शनास येते, ती ही की, एकंदर सर्वच मराठी मुद्रित गद्य साहित्याला सुरुवात बालसाहित्यानें केली आहे. जीवनाला प्रारंभ बाल्य दशेने व्हावा हें निसर्गाचें सूत्रच जणूं मराठी वाङ्मयानेंहि स्वीकारलेलें दिसतें !

हीं पहिलीवहिलीं मुद्रित पुस्तकें अगदीं हातांबोटांवर मोजण्यासारखी अशीं होतीं. त्याचा प्रसारहि फारसा झालेला नव्हता. कारण मुद्रणसंस्थाहि अजून अभावानेंच दिसत होत्या. जेथें मुद्रणानेंच लेखनास सहाय्य नाहीं तेथें कोणी पुस्तकें लिहिली तरी प्रसिद्ध कशी व्हावी व त्यांचा प्रसार तरी कोणत्या तऱ्हेनें व्हावयाचा ! त्यांतून टपालव्यवस्थाहि आतांप्रमाणें शीघ्रगति नसल्यानें व वर्तमानपत्रांचीहि वानवाच असल्यानें या लेखनाची बातमीहि कोणास कळण्याची मुष्कील आणि बाहेर गांवीं त्याचा प्रसार होण्याची शक्यताहि जवळजवळ नसल्याप्रमाणेंच ! यंत्रयुगाच्या सुरुवातीला केवळ बालसाहित्याचीच नव्हे तर एकंदर वाङ्मयाचीच स्थिती अशी होती.

मुद्रणकलेच्या आगमनापूर्वी मराठीत गद्य साहित्य निर्माण होतच नव्हतें असें मात्र नाहीं. उलट अनेकविध प्रकारें तें आकारास येत होतें व त्याचा प्रसार व प्रचार जुन्या पद्धतीनुसार पाठांतरानें वा कथनपद्धतीनें होत होता. या गद्यरचनेचें स्वरूप बहुरंगी होतें. संस्कृतांतून प्राकृतांत आलेल्या कथा, कहाण्या, पुराणातील कथा, लोकसाहित्यातल्या गोष्टी, संतवाङ्मय, ऐतिहासिक वीरांच्या कथा इत्यादि निरनिराळ्या पाऊलवाटांनीं मराठी ललित गद्य लोकरंजन करीत होतेंच, परंतु त्याचा प्रसार

केवळ कथनपद्धतीनेंच होत असल्यानें सर्वार्थानें तें 'कथावाङ्मय' ठरणारें असे. अर्थात् तत्कालीन साहित्यप्रेमी लोकांना ग्रंथगत वाङ्मयाचें महत्त्व कळत नव्हतें असें म्हणतां येणार नाहीं. परंतु मूळप्रतीवरून हातीव नकला काढण्याचें काम अत्यंत त्रासाचें, खर्चाचें व त्यामुळेंच फक्त कांहीं थोड्या जणांपुरतेंच सीमित होऊन बसल्यानें त्याचा सार्वत्रिक प्रसार होणें मुष्कीलीचें असायचें. बहुधा ऐतिहासिक बखरी, कथानकें, पोथ्या यांच्या हातीव प्रतीहि काढल्या जात, परंतु त्या अल्पसंख्य असल्यानें त्यांची देवघेव व जतन मौलिक वस्तूंप्रमाणें होई. पण या महत्त्वाच्या ग्रंथांची बाब सोडली तर बालांसाठी मुद्दाम हातीव ग्रंथ लिहिणार कोण व त्याचा प्रसार तरी येवढ्या सायासानें करणार कोण ? अशा या अंधारलेल्या परिस्थितींतच मराठी गद्यसाहित्याची नवी पहांट अवतरण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. मुद्रणसंस्था याच सुमारास अस्तित्वांत आली व तिनें साहित्याच्या संकुचित कक्षा ओलांडून प्रसाराच्या दृष्टीनें मोठीच क्रांति करून टाकली ! मुद्रणाचें असें मौलिक साह्य लाभतांच लेखनकलेला जणूं नवें रूप, नवें चैतन्य प्राप्त झालें व साहित्याला एक प्रकारें नवा ऊर्जितकाळ आला.

यावेळीं प्रसिद्ध होणारी पहिलीवहिली बालपुस्तकें पाहिलीं तर आश्चर्य वाटण्याजोग्या कांहीं कांहीं गोष्टी नजरेंत भरतात. मराठी मुद्रित गद्याची सुरुवात इंग्रजीच्या अनुवादानें व्हावी हा एक विरोधाभासच म्हणावयाचा ! पण अशी परिस्थिती होती हें मान्य करावें लागतें. मराठी भाषेत छापून प्रसिद्ध होणारें पहिलें बालपुस्तक म्हणजे इंग्रजीवरून अनुवादित केलेलें 'इसापनीति' हें होतें. तंजावरचे राजे सरफोजी यांनी १८०६ सालीं सखलनपंडित नांवाच्या गृहस्थाकडून हें भाषांतरित करवून घेतलें. या भाषांतराचें नांव "बालबोध मुक्तावली" असें अलंकारिक व बालकल्पनेला न पेलणारें होतें. याचा प्रसार कितपत झाला हे सांगणें कठीण. कारण आज हें पुस्तक उपलब्ध नाहीं.[१]

यानंतर १८१५ सालीं वैजनाथशास्त्री नांवाच्या गृहस्थांनी पंचतंत्र व हितोपदेश यांचेंहि बंगालीवरून मराठींत अनुवाद केले होते आणि ही बालसाहित्याचीच केवळ नव्हे, एकंदर मराठी मुद्रित साहित्याचीदेखील सुरुवात. त्यामुळें हीं पुस्तकें व्याकरण, भाषा, मुद्रण इत्यादि सर्वच दृष्टींनी प्रथमावस्थेंतलीं असणें स्वाभाविकच. मराठी मूळची महाराष्ट्रीय भाषा खरी, पण तिच्या प्रकाशनाला मात्र महाराष्ट्राऐवजीं मद्रास व बंगाल प्रांतातर्फे सुरुवात व्हावी हें आश्चर्यच म्हटलें पाहिजे. आणखी ७-८ वर्षांतच या साहित्याला

---

१ य.ची एक प्रत ब्रिटिश म्युझियममध्यें ठेवलेली आहे व त्याची एक मायक्रोफिल्म आणवून त्यांतील कांहीं भाग 'मराठी संशोधन पत्रिका' या त्रैमासिकाच्या एका अंकांत (वर्ष १ लें, अंक ३ मध्यें) छापला गेला आहे.

एका वेगळ्या दिशेनें चालना व प्रेरणा मिळण्याचा योग आला. मराठी बालसाहित्याचा खरा उदयकाल पाहिला तर भारतावर इंग्रजी शासन सुरू झालें तोच म्हणावयास हवा. नवे राज्यकर्ते आले व नवें शिक्षण सर्व भारतीय बालप्रजेला धावयाचा संकल्प करून त्यांनीं प्रथम गावोगाव मराठी शाळा स्थापन केल्या. शाळा म्हटल्या कीं विद्यापातें हें अत्यावश्यक असतेंच. अशा प्रकारचें एक सरकारी विद्यापातें १८२२ सालीं ' मुंबई हैंद शिक्षण मंडळी ' या नावानें स्थापन झालें.

एका विद्येचा प्रसार करावयाचा म्हटला की नुसती विद्यालयें स्थापन करून भागत नाहीं, तर क्रमिक पुस्तकाचीहि योजना तेथें करावी लागते. पण या सुमारास एकदरीतच मराठी मुद्रित पुस्तकें अभावानें दिसावयाचा, तेथें बालयोग्य पुस्तकें कोठलीं ? शिक्षण समितीपुढें पुस्तकाची ही फार मोठी अडचण उपस्थित झाली होती. त्यावर उपाय म्हणून समितीतर्फेच नवी शालेय पुस्तकें लिहून घेण्याचें व प्रसिद्ध करण्याचें हैंद शिक्षण मंडळीनें ठरविलें. पण हें काम अधिकच अवघड झालें होतें आज अनेकानेक प्रकाशनसंस्था व मुद्रणसंस्था अस्तित्वात आलेल्या असल्या तरी एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं अशी स्थिति नव्हती. उलट मुद्रणसंस्थाहि हाताबोटावर मोजण्यासारख्या दोनचारच होत्या व त्याहि अगदीं नुकत्याच स्थापन झालेल्या. कलकत्त्याजवळ श्रीरामपूर येथें १८१५ सालीं डॉ. कॅरी नावाच्या गृहस्थानें एक छापखाना काढला होता व अमेरिकन मिशनचे एक दोन छापखाने अस्तित्वात आले होते तेवढेच. त्यामुळें मुद्रणाचीहि ती बाल्यावस्थाच होती. अशा स्थितींत पुस्तकें लिहवून घेतलीं तरी ती चटकन् मुद्रित होऊन प्रकाशित होणेंहि कठीणच हें जाणून १८२५ सालीं विद्यासंस्थेनें अवश्य ती शालेय पुस्तकें लेखका कडून मुद्दाम लिहवून घ्यावीं व त्वरेनें ती स्वतःच प्रसिद्धहि करावी असा निर्णय घेतला. ही पुस्तकें तयार होण्यास थोडाबहुत तरी कालावधि लागणार होताच. म्हणून तोंपर्यंत मराठी साहित्यात उपलब्ध होतीं तींच दोनतीन पुस्तकें या विद्या लयानें पाठ्य पुस्तकें म्हणून स्वीकारलीं व लगेच तीं शाळेंत लावूनहि टाकलीं ! या भाग्यशाली पुस्तकांत वैजनाथशास्त्र्याची सिंहासनबत्तिशी होती. पंचतंत्र करून मराठींत उतरलेलें पंचोपाख्यान होतें आणि विदुरनीति या नावाचें एक धर्म प्राण पुस्तकहि होतें !

अर्थात् ही तिन्ही पुस्तकें बालयोग्य नव्हतींच व त्या हेतूनें तीं लिहिलीं गेलेलींहि नव्हती. पण बालजीवनाशीं त्यांचा संबंध आला तो क्रमिक पाठ्यपुस्तकें म्हणूनच, आणि त्या दृष्टीनें या तीन पुस्तकाबद्दल थोडा साक्षेपानें विचार केला, तर असें दिसतें कीं, मूळ संस्कृत धर्मपर ग्रंथातूनच याची निवड झाली होती. कदाचित् नव्या शिक्षणाबद्दल व तदनुषंगानें नव्या राज्यकर्त्यांबद्दलहि लोकमत अधिक सहिष्णु व्हावें म्हणूनहि ही धार्मिक पुस्तकें क्रमिक म्हणून योजली गेलीं

असावीं. दुसरें असें कीं, ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या शाळा नव्यानें अस्तित्वांत येऊं लागल्या होत्या. त्यांतून धर्मपुस्तकांचाच वापर असे. त्याच धर्तीवर शालेय हिंदी धर्मपुस्तकें लोकांना अधिक मनास येतील ही एक कल्पना होतीच. शिवाय शाळा म्हटली की तेथें विद्यार्थ्यांना नीति व उपदेश यांचे पाठ देणें अत्यावश्यकच असतें, ही जी जनमनाची सर्वसाधारण अपेक्षा, त्या चौकटींत सिंहासनबत्तिशी कांहीं अंशानीं व विदुरनीति व पंचोपाख्यान सर्वांशानें बसणारें होतें! मात्र यांत नीति-पाठ आहेत एवढेंच पाहिलें गेलें; ते विद्यार्थ्यांना पेलणारे वा समजणारे आहेत कीं नाहींत, याची समितीनें मुळींच फिकीर केली नाहीं. यांतला उपदेश बालबोध नसून प्रौढबोध होता व भाषा संस्कृतनिष्ठ व अवघड होती. अर्थात् सुरवातीला अपरिहार्य-पणें हीं प्रौढ पुस्तकें शाळांतून लावलीं गेलीं ही गोष्ट क्षम्यहि मानतां येईल, पण नवीं शालेय पुस्तकें लिहवून घेतलीं गेलीं, तीं शाळांतून रुजूं झालीं तरी याच्या पुनरावृत्त्या निघतच राहिल्या व शाळांतून त्यांचें पाठांतर होतच राहिलें, याचें समर्थन कसें करावयाचें? समितीचा याकडे असणारा कांहींसा उपेक्षित दृष्टिकोन हेंच त्याचें मूळ कारण दिसतें. आश्चर्य असें कीं, पुनर्मुद्रणाचे सर्वाधिकार व साधन सामुग्री हाताशीं असूनहि शिक्षणमंडळीकडून यांतील भाषेमध्यें सोपेपणा व आशया-मध्यें बालग्रहणक्षमता आणण्याचा यत्न कटाक्षानें झाला नाहीं.

क्रमिकाच्या वाटेवरून मुलांपर्यंत येणारी ही पुस्तकत्रयी म्हणजे कांहीं खरें शालेय वाङ्मय नव्हेच; फक्त त्यांनीं बालबुद्धीला आकलन होऊं शकेल अशा नव्या शालेय पुस्तकांची आवश्यकता व उपयुक्तता सिद्ध करण्याचें कार्य केलें इतकेंच. याच सुमारास बालसाहित्याच्या नवनिर्मितीच्या दृष्टीनें आणखीहि एक चांगला व स्तुत्य उपक्रम सुरू झालेला दिसतो. ३ ते ८ वर्षांपर्यंतच्या मुलांसाठीं "बालगोष्टी" या नांवाचें एक पुस्तक टाउनसेंड नांवाच्या गृहस्थांनीं लिहिलें. हे लेखक युरोपियन असले तरी देवनागरी लिपींत व मराठी भाषेंत चांगल्या प्रकारें लिहूं शकणारे होते. दुर्दैवानें हें पुस्तक आज कोठें उपलब्ध नाहीं! लवकरच हैंद शिक्षण मंडळीनें नव्या क्रमिक पुस्तकांच्या योजनेची आखणी केली.

या समितीतर्फे मराठी शाळा गांवोगांव सुरू झाल्या तरी शालेय अभ्यास-पुस्तकांची मात्र नीटशी व्यवस्था अद्यापहि नव्हती. ती उणीव जाणवून १८२१ सालीं सरकारतर्फेच आवश्य तीं शालेय पुस्तकें लेखकांकडून मुद्दाम लिहवून घ्यावीं असें ठरलें व स्वतंत्र या अनुवादित बालपुस्तकें तयार करणारांना बक्षिसें देण्यानेंहि समितीनें ठरवलें. पूर्वी रमण्यांत पेशव्यांतर्फे विद्वानांना दक्षिणा देण्यांत येत असे. या रकमेंतून या नव्या मराठी पुस्तकांना हीं बक्षिसें देण्यांत यावयाचीं होतीं!

याच सुमारास बालवाचकांच्या सुदैवानें एक अपूर्व योग आला व समितीला सदाशिव काशिनाथ उर्फ बापू छत्रे या बालसाहित्यप्रेमी गृहस्थांची जोड लाभली.

ते १८२३ सालापासूनच वरील समितीचे व्यवस्थापक म्हणून नियुक्त झाले होते. त्याना दादोबा पांडुरंगानीं गद्यात्मक ग्रंथाचे जनक असे म्हटले आहे, तें सयुक्तिकच आहे. कारण मराठी गद्य सुबोध पुस्तकाची प्रथा त्यानीं सुरू केली. मात्र ही प्रथा इंग्रजीच्या अनुवादातून निर्माण झाली होती. त्याचा बाळमित्र व इसापनीती याच दोन अनुवादित पुस्तकाचें बोट धरून मुद्रित बालवाङ्मय मराठी साहित्याच्या दाल नात प्रवेशलें. ही दोन्हीं पुस्तकें क्रमिक म्हणून समितीतर्फे स्वीकारण्यात आलीं एव ढेंच नव्हे तर या दोन्ही पुस्तकास शिक्षणखात्यातर्फे अनुक्रमें एक हजार व दोन हजार रुपयाचें पारितोषिक मिळालें! बालपुस्तकासर मोठमोठीं बक्षिसें मिळवणारे छत्रे हेच पहिले भाग्यवान लेखक!

या पहिल्या दोन पुस्तकाकडे थोडे अगत्यानें पाहणें उचित ठरेल. थोडून चालून मराठी साहित्यात येणारे हे पहिलेच बाल-पाहुणें! म्हणायचे बाल, पण याची पृष्ठ संख्या मात्र बालत्वाला विशोभित होती इसापनीती तीनशें दहा पृष्ठाची तर बाळमित्र चारशेंवर पृष्ठाचा! मात्र आकारमानाकडे दुर्लक्ष केलें तर हीं दोन्हीं पुस्तकें विशेषत. बाळमित्र-साहित्यगुणानीं समृद्ध आहेत. खास बालासाठीच ही पुस्तकें असल्याची लेखकास पूर्ण जाणीव असल्यानें छत्र्याच्या भाषेत रजकता व सोपेपणा याचा योग्य मिलाफ झालेला दिसतो. ही रचना हेतुपूर्वकच केली असल्याचें प्रत्यतर बाळमित्राच्या प्रास्ताविकातूनहि लेखकानें पटवून दिलेलें आहे. छत्रे म्हणतात—

"ह्या ग्रंथकर्त्यानें दोन गोष्टी मनात आणून हा ग्रंथ केला आहे. एक तर मुलाचें रंजन आणि दुसरें त्यास सद्‌गुण सहज लागावे. सांप्रत त्याच्या (मुलाच्या) हातीं जे ग्रंथ पडतात ते त्याच्या बुद्धित भरायास अवघड आहेत. ते समजुतीस खोल, अभिरुचीस रुक्ष व उपदेशास कटु असे असल्यानें मुलाच्या चित्तात वाचनाविषयीं व्हावी तशी प्रीती उत्पन्न करणार नाहींत. ह्या ग्रंथात तसें नाहीं. तेथें त्याची भाषा, त्याचे खेळ, त्याचे उद्योग व त्याची अपेक्षितें हीं सागितल्यामुळें त्यास वाचता वाचता आवड उत्पन्न होऊन इकडे त्यास नकळत सहज चागलें गुण लागावे, म्हणून यास 'बाळमित्र' हें नाव दिलें आहे" (छत्रेकृत बाळमित्र, प्रस्तावना).

बालाना कोणत्या प्रकारचें वाङ्मय हवें याचें हें जुन्या काळचें स्पष्टीकरण आजहि जरूर मान्य होणारें आहे. शिवाय पूर्वीच्या 'शालेय' मानल्या जाणाऱ्या ग्रंथातील दोषावरहि छत्र्यानीं अचूक बोट ठेवलेलें दिसतें. हीं दोन्हीं पुस्तकें इंग्रजीवरून अनुवादित झालीं होतीं हें खरें पण या अनुवादासाठीं जी पुस्तकाची निवड झाली तीच मुळात फार योजकतेनें आणि योग्य अशी झाली होती. बर्क्विन नावाच्या जर्मन लेखकाचे 'द चिल्ड्रन्स फ्रेन्ड' (The childrens' friend)

नांवाचें एक सुंदर बालपुस्तक होतें त्याचा हा अनुवाद. यांतील गोष्टी खास मुलांसाठींच लिहिल्या गेल्या होत्या, तेव्हां आशय, अभिव्यक्ति व भाषा ही सर्वच सामुग्री बालवाचकांना योग्य ठरणारी – अर्थात् भाषांतरांतहि हे सर्व गुण नकळत उतरले. इसापच्या गोष्टी तर सदाफुलीच्या झाडासारख्या सदैव प्रसन्न. मुख्य मुद्दा असा कीं, समितीनें जरी हीं पुस्तकें खास शालेय उपयोगासाठीं लिहवून घेतलीं होतीं तरी त्यांचें स्वरूप अभ्यासू वा क्लिष्ट नव्हतें, तर तें रंजक गोष्टींचेंच होतें. शालेय पुस्तकें व रंजक बालवाङ्मय यांचा समन्वयच जणुं या दोन्ही पुस्तकांनीं घडवून आणला होता. आणि मुलांनाच नव्हे तर मोठ्यांनाहि बाळमित्र आवडलें. फार आवडलें. कारण मराठींत सुबोध भाषेंत रंजक पुस्तकें होतीच कोठें ? अर्थात् पहिलेपणाच्या कौतुकाचीं लेणीं यावर चढलीं होतीं हें निर्विवाद. पण समीक्षकाला जास्त चिकित्सेनें पाहावें लागतेंच, म्हणूनच अशा लोकप्रिय बाळमित्रांतहि कांहीं ठळक लेखनदोष राहिले आहेत ते दर्शवणें क्रमप्राप्त आहे; आणि हे दोष भाषेसंबंधींचेच आहेत.

कै. बापू छत्र्यांच्या बाळमित्राची त्याकाळीं बरीच वाहवा झाली असली तरी त्याची भाषा सर्वस्वी निर्दोष नव्हती. त्यावर आंग्लभाषेच्या वडाईचा बऱ्याच मोठ्या प्रमाणावर संस्कार झाला होता हें दृष्टीआड करतां येत नाहीं. छत्र्यांची इसापनीति हीहि बालवाङ्मय सुधारणेचें कांहीं बाबतींत योग्य सूचन करणारी होती. यांतील एक प्रमुख सुधारणा म्हणजे ह्यांत चित्रेंहि आलीं आहेत. हीं चित्रें अगदींच साधीं व नवशिक्या हातांतून रेखांकित झालेलीं दिसतात हें खरें, पण बालसाहित्य सचित्र असणें अगत्याचें आहे या कल्पनेचा तो पहिलाच आविष्कार असल्यानें त्याचेंहि महत्त्व आहे. या इसापनीतींत प्राणिकथा होत्या व पहिली पंचोपाख्यानाचीच परंपरा त्यानीं चालवली हें खरें, परंतु या कथा त्याहून निश्चित सोप्या होत्या. तात्पर्य असली तरी तीं 'बुद्धींत भरावयास अवघड' नव्हतीं; त्यामुळें ह्यांसहि लोकप्रियता लाभली.

छत्र्यांची लेखनपद्धति समितीलाहि लोकांप्रमाणेच विशेष आवडलेली दिसते. कारण वरील दोन पुस्तकांनंतर १८३० सालीं छत्र्यांचेंच 'वेताळपंचवीशी' हें पुस्तक सरकारतर्फे प्रसिद्ध झालें व इ. स. १८३८ मध्यें 'बोधकथा' या नांवाचें एक नवीन छोटेसें पुस्तकहि समितीनें त्यांजकडून लिहवून घेतलें. पैकीं वेताळपंचवीशी मूळ संस्कृतांत होती. तिचें मराठीकरण छत्र्यानीं केलें हें खरें, पण बालांसाठीं हा अनुवाद करायचा तर मूळ वर्ण्यविषयहि बालग्रहणक्षमच असायला हवा हें अवधान वेताळपंचविशीबाबत तरी संभाळलें गेलेलें नाहीं ! यांतले प्रणयपूर्ति, विवाहबाह्य प्रेमसंबंध, अनुचित स्त्रीचरित्र, भुतेंखेतें व प्रेतें इत्यादि विषय बालोपयोगी अगर

शालोपयोगी थोडेच होते ? दुसरी गोष्ट अशी कीं छत्र्यांनी आपल्या 'बाळमित्राच्या' प्रस्तावनेंत उल्लेखिलेले सारे लेखनदोष यांत असावेत हा केवढा विरोधाभास ! शिवाय मुद्दाम बालयोग्य पुस्तकें लिहवून घेण्याचा यावेळीं समितीचा यावेळचा उपक्रम असूनहि हें सदोष पुस्तक लिहवून घेतलें जावें, एवढेंच नव्हे तर तें शाळेंतहि क्रमिक म्हणून दाखल व्हावें ही आश्चर्याचीच गोष्ट वाटते !

छत्र्यांचें दुसरें पुस्तक 'बोधकथा' हें मात्र सुबोध व बालयोग्य कथाचें पुस्तक होतें. ताराचंद दत्त नावाच्या बंगाली गृहस्थानीं लिहिलेल्या Pleasing tales या पुस्तकांतील कांहीं गोष्टींचें हें रूपांतर होतें. हा अनुवाद बाळमित्रासारखा सरस उतरलेला नाहीं. शाळेंतील मुलांसाठीं आणखीहि गद्यपद्यरूप माहितीच्या वा गोष्टींच्या बहुसंख्य पुस्तकांची यावेळीं अत्यंत जरूरी भासत असल्यानें व त्याबाबत सरकारी धोरण उदार व पुरस्काराचें असल्यानें अशा प्रकारचीं पुस्तकें लिहिण्याकडे दुसऱ्याहि अनेक लेखकांचें लक्ष लागलें. १८३१ सालीं छत्र्यांनीं यापूर्वीच ज्या 'प्लीजिंग टेल्स' वरून बोधकथा लिहिल्या होत्या, त्याच पुस्तकावरून त्या कथाचा दुसरा भाग 'नीतिकथा' या नांवानें बाळशास्त्री जांभेकर यांनी लिहून प्रसिद्ध केला. जांभेकर शास्त्री हे तत्कालीन ख्यातनाम विद्वान् व सरकारी पुस्तकतपासनीस होते. लेखकाच्या गाढ विद्वत्तेची छाप या बालपुस्तकावरहि कांहीं अंशीं पडल्यासारखी वाटते. कारण प्रत्येक धड्याच्या आरंभीं सद्गुणदुर्गुणांची बरीचशी तात्त्विक चर्चा करून नंतर त्या चर्चेला पोषक अशा तऱ्हेनें कथा सांगितलेली आढळते. शिवाय विद्येचें महत्त्व दरेक गोष्टींत वर्णिलेलें आहे व प्रत्येकानें सदाचरणी व्हावें, हा मुद्दा तर वारंवार माडण्यांत आला आहे ! मूळ पुस्तक बंगाली होतें, तेव्हा यांतील राधानाथ वगैरे कांहीं नांवावरहि तीच छटा कायम राहिली आहे. प्रस्तावनेंत, "ह्या ग्रंथापासून मराठी शाळावर पढणाऱ्या मुलांस नीतिज्ञान व्हावें अशी आमची इच्छा आहे" असा लेखनहेतू स्पष्ट झाला आहे. जरी यास 'ग्रंथ' म्हटलें असले तरी हें छोटेंसें पुस्तक ७०–७२ पृष्ठांचेंच आहे व भाषांतरित असल्या तरीहि या सर्व एतद्देशीय गोष्टी आहेत.

यानंतर 'बाळमित्र' या रंजक पुस्तकाचा दुसरा भागहि समितीतर्फे १८३२ साली प्रसिद्ध करण्यांत आला. मात्र हा छत्र्यांनी लिहिला नसून, गेरफोर्ड नांवाच्या इंग्रज गृहस्थांनीं हा मराठी अनुवाद केला होता आणि असें असूनहि हें भाषांतर बरेंच सरस उतरलें आहे, याचें खरोखरच इतकें आश्चर्य वाटतें कीं, हें अनुवादाचें काम गेरफोर्ड साहेबानेंहि एकाद्या तत्कालीन मराठी शास्त्र्याकडून करवून घेतलें असावें असें म्हटलें जातें, त्यावर विश्वास बसतो ![1] यांतहि पहिल्या भागाप्रमाणें

[1] मराठी गद्याचा इंग्रजी अवतार–पृष्ठ ४९

मुळांतच सरस गोष्टी, सोपे संवाद व नाट्यप्रवेश व बालजगांतलीं कथानकें अशी सर्व बालांना रुचणारी सामुग्री आहे, आणि तिलाच शब्दशः मराठी रूप दिलें गेल्यानें पुस्तक सहजगत्या बालप्रिय ठरावें हें तर ठरलेलेंच होतें. फरक झालाच तर तो अनुवादांतील सरसनिरसतेचाच ! त्यांत मात्र पहिल्या व दुसऱ्या भागांत पुष्कळ अंतर दिसतें व तुलनेनें दुसरा भाग फिका वाटतो. या पुस्तकांतील भाषेचें वळण तर इंग्रजी आहेच; शिवाय ती नेटकीहि नाहीं; फार काय लेखकाच्या मूळ हस्तलिखितांतलीं अशुद्धेंहि यांत जशीच्या तशीं मुद्रित झालीं आहेत ! तथापि हें सर्व गृहीत धरूनहि हें एक चांगलें पुस्तक बालांच्या हातीं आलें, असेंच म्हटलें पाहिजे. कपडे मॊंगळ वा मळकट असले तरी देखण्या व्यक्तीचें मूळ सौंदर्य त्यांतूनहि नजरेंत भरावें तसें मूळ पुस्तकाचे गुणविशेष या सर्व दोषांतूनहि मान वर करून पहातांना दिसतात. पृष्ठसंख्या मात्र ३४५ इतकी म्हणजे बालपुस्तकाचे मानानें जास्त आढळते.

शालेय पुस्तकांतून केवळ गोष्टी असाव्यात हें समितीचें मत यानंतर थोडेसें बदललेलें दिसतें. रंजक गोष्टीबरोबरच इतरहि अनेक विषयांबद्दल ज्ञानवर्धक माहिती देणारीं पुस्तकें मुलांच्या हातात पडावी व त्यांतून त्यांना नीतिशिक्षणहि मिळावें, अशा उद्देशानें तशीं काहीं पुस्तकें मुद्दाम तयार केलीं गेलीं. त्यांतच विष्णुशास्त्री बापट यांनीं लिहिलेलें 'नीतिदर्पण' हें एक पुस्तक होतें. १८३६-३७ सालीं तें तयार झालें. मात्र हेंहि पुस्तक स्वतंत्र नव्हतेच. त्यावेळचे समितीचे चीफ सेक्रेटरी वॊथेन यांनीं अशीं काहीं पुस्तकें लिहवून घेतलीं होतीं. त्यांपैकींच एक नीतिदर्पण. [1] यांतून मुद्रणाचेंहि एक आगळें वैशिष्ट्य प्रकट झाले आहे. तें म्हणजे हें सर्व पुस्तकच मोडी लिपीत मुद्रित झाले आहे ! तत्कालिन मुद्रणाची मोडी लिपी हीच प्रथमावस्था होती असें दिसतें. कारण यावेळीं डॉ. कॅरेचा इंग्रजी-मराठी कोश छापला गेला तोहि मोडींतच. वैजनाथांची मूळ सिंहासनबत्तीशी मोडींतच छापली गेलेली, आणि यापूर्वीच्या पेशवाईंत तर हीच राजलिपी होती ! बखरी, पत्रव्यवहार, सारें मोडींतूनच चाले, त्याचेंच हें अवशिष्ट रूप. पुढील पुस्तकांतून मोडीची नागमोड कमी झाली, हें बालांचे सुदैवच ! विष्णुशास्त्र्यांचें हें पुस्तक नांवाला अनुसरून नीतीबोध देणारें होतें खरें, पण ही नीति सर्वसामान्य नसून 'राजनैतिक' स्वरुपाची होती; आणि या हेतूनें पुस्तक लिहिल्यामुळें रंजनप्रधान गोष्टींवर त्यांचा भर दिसण्याऐवजी मुलांचें ज्ञानवर्धन व्हावें अशीच अपेक्षा त्यांतून अधिक प्रकट दिसते. लेखक 'समापनेंत' म्हणतात—

"या ग्रंथांत सर्व लोकांचे मनास विशेष चमत्कार वाटण्याजोग्या कथा नाहींत. परंतु सांप्रतचे राज्यकारभाराची रीति समजून त्याप्रमाणें मुलांनीं लहानपणा-

१ आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति-पृष्ठ १६५

पासून राज्यकारभारात व इतर व्यवहारात सुनीतिनें आणि प्रामाणिकपणानें चालावें म्हणजे साहेब लोक त्याजवर प्रीति करितील आणि मोठे अधिकार देऊन त्याचें बरें करितील याच अभिप्रायानें यथामति दृष्टांतीक कथा लिहून ग्रंथाची समाप्ति केली आहे. "

अर्थात् या लेखनोद्देशानुसार यात नव्या राज्यासंबंधी सुप्रचाराचें तंत्र, पाटील आणि कुळकर्णी यांचा वृत्तांत, सावकार लोकांचा वृत्तांत इत्यादि प्रकरणें यांनी हें क्रमप्राप्तच हे सर्व धडे ज्ञानवर्धक असले, तरी हे एकंदर वृत्तांतच या पुस्तकात इतके बहुसंख्य आले आहेत कीं, यास 'वृत्तांतदर्पण' हेंच नाव देणें समुचित झालें असतें ! या पुस्तकातून काहीशी वेगळी अभ्यास दिशा दर्शवली गेली आहे, ती मात्र उल्लेखनीय आहे. लेखक हे पुणें पाठशाळेचे प्राचार्यच असल्यानें शालेय पुस्तकातून राज्यतंत्राची माहिती देणें त्यांना समयोजित व आवश्यक वाटलें असावें. तरें म्हणजे नीतिदर्पण हें आदर्श माहितीपर पुस्तक ठरण्याजोगें होतेंच, शिवाय त्याची उद्बोधकता वाढावी म्हणून हरेक धड्याचे शेवटी आठदहा ओळींत धड्याचें तात्पर्यहि देण्यात आलें आहे.

एकंदरात १८३७-३८ सालानें तत्कालीन बालसाहित्याला आणखी एक नवी व स्तुत्य दिशा दाखवली, ती म्हणजे बोधपर परंतु सोप्या व अगदीं छोट्या छोट्या गोष्टींचा एक जणु नवा प्रवाहच बालोपदेशकथा, नीतिकथा व बोधकथा या तीन पुस्तकांनीं निर्माण केला पैकीं बालोपदेशकथा हे विष्णुशास्त्र्यांनीच लिहिलें. मात्र त्यात नीतिदर्पणप्रमाणें अभ्यासजड मजकूर नसून फक्त रंजक कथाच होत्या बालसाहित्याच्या अभ्युदयाच्या दृष्टीनें पाहिलें तर यानंतरच्या दहा वर्षांत काहीं विशेष गोष्टी घडल्या. मराठी भाषेच्या गद्य मांडणीला आजपर्यंत कसलेहि निर्बंध नव्हते. परंतु १८३६ च्या आसपास दादोबा पांडुरंग या विद्वान गृहस्थानीं मराठी भाषेचें व्याकरण तयार करून भाषेला एक नवें प्रमाणबद्ध आखीव रूप दिलें. यापूर्वीची अनेक शालेय प्रकाशनें जशी व्याकरणदोषानीं व्याप्त दिसतात तशीं यापुढे फारशी दिसत नाहींत. कारण तीं नवीं पुस्तकें व्याकरणाच्या निकषावर तपासून शुद्धीकृत झालेलीं होतीं व केवळ बालसाहित्याच्याच नव्हे तर किंबहुना सर्वच मराठी गद्याच्या दृष्टीनेंहि व्याकरणशुद्ध भाषा ही गोष्ट महत्त्वपूर्णच म्हणावयास हवी

मुंबई हैंद शिक्षण समितीचें रूपहि यावेळीं बदललें १८२२ सालीं स्थापन झालेली ही शिक्षणमंडळी १८४० सालीं विसर्जन करण्यात आली व 'बोर्ड ऑफ एज्युकेशन' या नावानें सरकारी विद्याखात्यानें नवी संस्था स्थापन केली बक्षिसाची पद्धत यानंतर बंद करण्यात आली, पण नवीं पुस्तकें तयार करून घेण्याचें आणि पूर्वी

प्रसिद्ध झालेल्या पुस्तकाच्या पुनरावृत्त्या काढून त्या शाळेंत रुजूं करण्याचें काम मात्र चालू होतें व त्यानुसार १८४६ च्या सुमारास एज्युकेशन बोर्डानें हरी केशवजी पाठारे या नांवाच्या गृहस्थाकडून एक नवें पुस्तक लिहून घेतलें. त्यांचे नांव 'शालोपयोगी नीतिग्रंथ' असें होतें व तें 'मॉरल क्लास बुक' या एका इंग्रजी पुस्तकावरून रूपांतरित केलेलें होतें. हरी केशवजी हे याच संस्थेचे सदस्य होते व त्यांनीं इतरहि अभ्यासू पुस्तकें तयार केलीं होतीं. या नीतिग्रंथांत अनेकानेक विषय आले होते. हरक्युलिस वगैरे पाश्चात्य वीरांच्या कथा, सॉक्रेटीस, न्यूटन इत्यादींचीं चरित्रें मितव्यय, मिताहार इत्यादि विषयांवरील परिमित निबंध, कांहीं इसापकथा अशा सर्व वाङ्मय प्रकाराचें हे एक संकलनच होतें व ही संकलनपद्धत पूर्वीच्या बाळमित्रासारखीच शालोपयोगी होती. मात्र छन्यानंतर सुमारें वीस वर्षांनीं हें पुस्तक प्रसिद्ध झालें असूनहि परसंस्कारी भाषा व आंग्लघडाईचें व्याकरण यांत फारसा फरक दिसून येऊं नये याचें आश्चर्य वाटतें. बाळमित्रांतहि इंग्रजीचें अंधानुकरण व अंधानुवाद यांचीं उदाहरणें सांपडतात खरी, पण तुलनाच करायची झाली तर भाषेच्या सहजतेंत व परिणामकारकतेंत छन्यांनाच प्रथमांक द्यावा लागेल.

यानंतर आणखी एक महत्त्वाची घटना अशी घडली कीं, तिनें या पूर्वप्रकाशित शालेय पुस्तकांचें स्वरूप अनेक तऱ्हेनें बदलून टाकलें. ती म्हणजे समितीवर मेजर टी. कँडी या इंग्रजी गृहस्थांची सेक्रेटरी म्हणून नेमणूक झाली. ही निवड अत्यंत सुयोग्य होती. कारण यांना मराठी भाषा चांगली अवगत होती, एवढेंच नव्हे तर त्यांनीं एक इंग्रजी-मराठी कोशहि तयार केला होता! शालोपयोगी पुस्तकें तयार करवून घेण्याचें काम त्यांच्याकडे होतें, तसेंच प्रथम प्रसिद्ध झालेल्या शालेय पुस्तकांचें पुनर्शोधन करण्याचें व तीं दुरुस्त करून छापण्याचेंहि सर्वाधिकार त्यांजकडे होते. हें काम कँडींनें अतिशय मनःपूर्वक व चिकित्सेनें केलेलें दिसून येतें. प्रथमारंभींचीं शालेय प्रकाशनें हीच ललित बालसाहित्याचीहि कांहीं अंशीं सुरुवात नव्हती काय? या पूर्व बालसाहित्यांतले अनेकानेक व्याकरणविषयक, भाषाविषयक आणि रचनाविषयक दोष कँडींच्या सूक्ष्मावलोकनांत आले व त्यांनीं त्यांत दुरुस्त्याहि केल्या. या सर्व सुधारणांची साक्ष अजूनहि सरकारी विद्याखात्याच्या जुन्या अहवालांतून मिळू शकते!

या सर्व समालोचनांत शतकार्धाच्या अखेरीस प्रसिद्ध झालेल्या एका बालपुस्तकाचा उल्लेख करणें अवश्य आहे. इसवी सन १८४८ च्या सुमारास 'सदाचरणाच्या गोष्टी' या नांवानें तें प्रकाशित झालें आहे. खरें म्हणजे या पुस्तकाचें स्वरूप समितीच्या इतर बालपुस्तकांहून अगदींच वेगळ्या वाणाचें दिसतें. तीं सारीं पुस्तकें बालरंजक वा नीतिबोधात्मक अशीं, तर हें ख्रिस्तीधर्मप्रचाराचें धोरण प्रसृत करणारें होतें. तथापि हें समितीचें प्रकाशन नसून अमेरिकन

मिशनतर्फे प्रसिद्ध झालें होतें. बालसाहित्याच्या उदयकालीं परधर्मीयांनीं ह्याहि प्रांतांत आपल्या पाऊलवाटा रेखण्याचा जो प्रयत्न चालवला होता त्याचें हें पुस्तक उत्तम उदाहरण ठरेल. याच मिशनतर्फे प्रसिद्ध झालेल्या 'लेकराची पहिली पोथी – दुसरी पोथी' इत्यादि पोथ्यांतून व इतर पुस्तकांतूनहि ही धर्मप्रचारक प्रवृत्ति प्रकटलेली आहेच. या काळामध्यें मराठी बालसाहित्यावर हेंहि एक सावट धरूं लागलें होतें. याहि पुस्तकांत त्याची साक्ष पटते. या गोष्टींतून येशूच्या पुनरुत्थानाचे उल्लेख आहेत. प्रसंगदर्शन मुलांना न कळणारें व भाषा अत्यंत सदोष आहे. पण अशीहि पुस्तकें दोन दोन हजारांच्या आवृत्त्यांनीं खपत होतीं व शालेय अभ्यास-क्रमांतहि ती क्वचित प्रसंगीं समाविष्ट होऊं शकत होतीं, म्हणून त्याचा उल्लेख येथें प्रस्तुत आहे.[१] सुदैवानें समितीचे असे धर्मप्रचाराचे धोरण नव्हतें, ही एक इष्टच गोष्ट म्हणायला हवी. या प्रकाशनांवरून आणखीहि कांहीं गोष्टी स्पष्ट दिसतात. त्यावेळीं शालेय पुस्तक म्हटलें कीं त्यात नीतिपाठ व उपदेशाचे उपायन ही आवश्यकच बाब असली पाहिजे, असा जणुं लिखित वा अलिखित संकेतच झालेला दिसतो. आणि याला अनुलक्षून पुस्तकें लिहिलीं जात होतीं, म्हणून त्यावेळच्या अनेक पुस्तकांची नांवेंहि नीती, बोध, उपदेश इत्यादींचें सूचन करणारींच आहेत. बोधकथा, नीतिकथा, बालोपदेशकथा इ. पुस्तकें उदाहरणा-दाखल पाहावी. बोध व नीती हेंच जणुं या पहिल्यावहिल्या बालसाहित्याचे उपनेत्र होऊं पहात होतें. पण उपनेत्र असणें ही दृष्टी निर्दोष नसल्याचीच एक साक्ष नव्हे काय? यास अपवाद एकच, तो म्हणजे 'बाळमित्रा'चा. त्यांत मात्र गोष्टीरूप उपदेश आहे. परंतु तो कोठेहि रुक्ष वा गंभीरपणें प्रगट होत नाहीं; आणि त्याचें खरें श्रेय मूळ फ्रेंच लेखकालाच द्यावें लागेल!

आणखी एक रंजक बाजू या पहिल्या पंचविशीतल्या पुस्तकांबाबत उल्लेखनीय ठरेल, ती म्हणजे भाषादृष्ट्या यांची एकवार पाहणी करणें, ही होय. प्रथम जीं तीन पुस्तकें शालेय म्हणून नाइलाजानें विद्येच्या प्रांगणांत आमंत्रित केलीं गेलीं त्याच्या भाषेवर जी प्राच्य शिल्पासारखी जुनी छटा होती; तेथपासून दादोबा पांडुरंगांनी व्याकरणाचे नियम बांधून देईपर्यंतच्या कालांतले हे शालोपयोगी व बालोपयोगी वाङ्मय. त्यांत भाषाशैलीचे अनेक नमुने आहेत, व्याकरणपूर्व मराठीची आगळी घडण आहे तशाच मुद्रणाच्या प्रथमावस्थेतील अनेक मजेदार तऱ्हाही आहेत. ह्या सर्व दृष्टींनी पुढील प्रकरणांतच त्यांचा परामर्श घेणें अधिक इष्ट ठरेल.

---

१ आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति. (पृष्ट १७३)— १८४० मध्ये शालेय पुस्तकांची एक यादी सरकारी अहवालांत प्रसिद्ध झाली होती, त्यांत 'सदाचरणाच्या गोष्टी' या पुस्तकाचा समावेश आहे.

## २– भाषा विचार :

एकोणिसाव्या शतकाचा प्रारंभकाल हा मराठी गद्याचाहि एक प्रकारचा संक्रमणकाल मानला जातो. एकाद्या संथ नदीला अकस्मात वेग येऊन भिन्न वळणांनी तिच्या प्रवाहांनीं पुढें मार्ग शोधावा तद्वत मराठी भाषेचे आजवर पोथ्या-पुराणांतून दिसणारें मूळ रूप वेगळी गति घेऊं लागलें, त्यांतला ओंवीबद्ध मजकूर मराठी गद्यांत उतरूं लागला व ऐतिहासिक बखरींतून प्रकट होणाऱ्या भाषेलाहि एक नवा आकार येऊं लागला. अव्वल इंग्रजींत मुद्दाम छापवून घेतलेल्या पुस्तकांनीं या संक्रमणाला बराच हातभार लावला हें मान्य केलें पाहिजे. महत्त्वाची गोष्ट अशी कीं, मराठी मुद्रित गद्यानें प्रथम बालसाहित्याचाच आश्रय घेऊन या नव्या रूपाविष्कारास सुरवात केली होती. अर्थात् 'शालेय पुस्तकें' म्हणून मानली गेलेलीं यावेळचीं प्रकाशनें मराठीच्या कांहीं नव्या स्थित्यंतरांची ओळख करून देणारीं ठरतील व या दृष्टीनें त्यांचें समीक्षण करणें आवश्यक आहे.

बालांच्या हातांत पडणारीं पहिली तीन पाठ्यपुस्तकें म्हणजे सिंहासनबत्तिशी, पंचोपाख्यान व विदुरनीति हीं होतीं. अर्थात् हीं तिन्ही पुस्तकें बालयोग्य नव्हतीच व त्या हेतूनें तीं लिहिलीं गेलेलीहि नव्हतीं. तथापि क्रमिक पुस्तकें म्हणून वर्षानुवर्षे तत्कालीन विद्यार्थ्यांना यांचें पठण करावें लागलें. शिवाय यांतील भाषापद्धतीचा परिणाम पुढें नव्यानें जीं पाठ्यपुस्तकें वा बालपुस्तकें तयार झालीं त्यांवरहि थोडा-बहुत घडला असल्यानें याही पुस्तकांकडे भाषा, व्याकरण व रचना या दृष्टीनें अवधान पुरवणें रंजक ठरेल.

या तिन्ही पुस्तकांची भाषा वैशिष्ट्यपूर्ण अशीच दिसते. संस्कृतमधून प्राकृतांत हलकेच पदक्षेप करणारी मराठीची यावेळीं प्रकृति. अर्थात् संस्कृतांतूनच तिची उत्पत्ति असल्यानें थोडेबहुत मातृसंस्कार राहणें अपरिहार्यच असल्यानें या पुस्तकांतून संस्कृतप्रचुर, क्लिष्ट शब्दांचा वापर व्हावा हें साहजिकच असलें तरी तो वापर पुष्कळ अधिक वाटतो. दुसरें म्हणजे अनेक संस्कृत ग्रंथांचें मराठीकरण आज-वर ओंवीबद्ध पोथ्यांतून झालेलें तेव्हा पोथीय–पुराणीय भाषेचेहि अवशेष त्यांतून डोकावून बघतात.

सिंहासनबत्तिशीची पहिली आवृत्ति १८१४ सालीं वैजनाथशास्त्री नांवाच्या गृहस्थांनीं मराठींत रूपांतरित केली. क्रमिक छापील पुस्तकें दुसरीं नव्हतींच, म्हणून हेंच पुस्तक शाळेंत पाठ्यपुस्तक म्हणून लावणें समितीस भाग पडलें. पण या पहिल्या आवृत्तीची भाषा अत्यंत सदोष व मराठीचा नमुनाहि अशुद्धांकित होता,

शिवाय ही मोडींत छापलेली, तेव्हां १८२४ सालीं याची पुनर्मुद्रित कांहींशी शुद्ध केलेली व बाळबोध लिपींतील नवावृत्ति प्रसिद्ध झाली व ती शाळेंतून अभ्यासक्रमांत लावली गेली. पोथीय भाषेचे अवशेष या पहिल्या मराठी पुस्तकावर आत्यंतिक प्रमाणावर होते. उदाहरणार्थ —

"विक्रमराजा राज्य करीत असतां अवंतीचे ठायीं कोणीएक भद्रसेननामा सावकार मरण पावला. तेव्हां त्याचा पुत्र पुरंदरनामक विचार करता झाला कीं सर्व हे नाशवंत आहे. जी बापाची अवस्था झाली तशीच माझी होणार असे विच्यारून तो प्रपंच्यावर निस्पृह होऊन घरच्या सर्व संपत्ति ब्राह्मण दीन अंध इत्यादिकांस देता झाला."

ही पोथीपद्धतीची भाषा बालाच्या प्रथमच हातीं पडणाऱ्या पंचोपाख्यान व विदुरनीति या पुस्तकांतूनहि आढळते. पंचोपाख्यानात लघुपतननामा कावळा, कृपणशर्मा ब्राह्मण इत्यादि विशेषनामें, क्रिया करता जाहला, देता जाहला इत्यादि क्रियापदें, विदुरनीतीच्या आरंभीं '॥ श्री विदुरनीति प्रारंभ ॥' असें शीर्षक आणि या नीतीच्या हरेक प्रकरणाला दिलेलें 'अध्याय' हें उपनाम आणि एखादी गोष्ट सांगावयाची असेल तर गोष्ट न म्हणतां त्याविषयीं 'दृष्टांत' असा वैशिष्ट्यपूर्ण उल्लेख ही सर्वच पोथीवाङ्मयाशीं अगदीं जवळचें नातें दर्शवतात. विदुरनीतीचा शेवट तर पोथीप्रमाणेंच, "ही नीति नित्य वाचून किंवा ऐकून एकेएके गोष्टीचा जो अनुभव घेईल त्याचे सर्व दोष जातील" अशा तऱ्हेचा पौराणिक आहे!

अर्थात् तत्कालीन ओंवीबद्ध पोथ्यांची ही भाषा लोकप्रिय असल्यानें त्याची छाप या पहिल्या मराठीकरणावर दिसावी हें अस्वाभाविक नव्हे. पण आश्चर्य असे कीं, हे पोथीप्रणीत भाषेचें सावट याच तीन पुस्तकांपुरते मर्यादित राहिलें नाहीं तर इंग्रजीवरून प्रथम जीं बालपुस्तकें नव्यानें मराठींत रूपांतरित करवून घेतलीं गेलीं, त्यांतूनहि हे पुराणीय संस्कार कायमच राहिलेले दिसतात! उदा० जुन्या पद्यमराठीत आढळणारे तुवां, मियां, जंव, तंव, इत्यादि वैशिष्ट्यपूर्ण शब्द छब्यांच्या बाळमित्र मध्येंही आढळतात! वोझें, शिंगें, वोळखणें इत्यादि शब्द १८३८ च्या नीतिकथा बोधकथांतूनहि वाटचाल करतात. बालोपदेश नांवाच्या एका नवमुद्रित पुस्तकांतील भाषेची छपाई, घडाई, शीर्षकें, बोधचिन्हें या सर्वांवर ही पोथीय भाषेची छाप आढळत येते.[1] आश्चर्यातच नव्हे तर छपाईत देखील!

(१) रेव्हरंड हॉल यानीं याच सुमारास मिशनरी प्रेसतर्फे मुम्बमराठी काहीं पुस्तकें काढलीं होती. त्यांतहि पोथीप्रमाणें मजकुराच्या आगेमागे पूर्णविरामाऐवजी रेषा योजल्या होत्या व पुस्तकाची नांवेंहि 'टेकराची पहिली पोथी, दुसरी पोथी' अशीं दिली होती!

॥ प्रस्तावना ॥

॥ आवृत्ति तिसरी ॥

॥ बालकांस सदाचरणाचा उपदेश ॥

याप्रमाणें त्यांतील मजकूर छापलेला दिसेल.

या सर्व मुद्रितांकडे पाहिलें कीं नववधूनें माहेरचा मोह ठेवून तेथल्या कांहीं वस्तू हौसेनें सासरींहि जवळ बाळगल्याचा भास होतो. पोथ्यांतून गद्यावतार घेणाऱ्या मराठीवर कांहीं पूर्वरूप अवशेष राहणें क्रमप्राप्तच म्हणतां येईल. हळुहळु ही प्रथा पुढील पुस्तकांतून उणावत गेलेली आढळते हें तत्कालीन बालांचें सुदैवच !

पोथीय भाषेइतकाच या पुस्तकांना दुसरा उपसर्ग पोहोंचत होता तो संस्कृतनिष्ठ प्रौढ भाषेचा — खरें म्हणजे हीं पुस्तकें बालांसाठीं नसूनहि त्यांचा समावेश बालोपयोगी शालेय साहित्यांत करण्यांत आलेला, तेव्हां निदान कोणीतरी प्रथम त्यांतील जड भाषा आणि क्लिष्ट विवेचन काढून टाकून त्याचें पुनर्मुद्रण करवून घ्यावयास हवें होतें तेंहि घडलें नाहीं. विदुरनीतींतला हा छोटा उतारा भाषा व बोध दोन्ही दृष्टींनीं पाहाण्यासारखा आहे.

" हे राजा कामक्रोधादिक आहेत सुसर जीमध्यें श्रोत्र त्वक् चक्षु जिव्हा घ्राण हे पंचेंद्रियरूप जल आहे जीमध्यें, अशी जे संसारनदी, तिचे ठायीं धैर्यरूप नौका करून तरून जा. " — ( विदुरनीति : पृष्ठ ६४–६५ )

यांतील भाषा विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें आकलनीय वाटणारी आहे काय ? आणि यांतून ध्वनित झालेला पारमार्थिक उपदेश, मुलांच्या तर राहूंच द्या, पण संसारी मोठ्या मंडळींच्या तरी आटोक्यांतला आहे काय ? अर्थात् एक गोष्ट ध्यानांत घेणें जरूर आहे कीं, त्यावेळचे नव्यानें शाळांतून प्रवेश करणारे विद्यार्थी अगदींच कांहीं ६–७ वर्षांचे नव्हते. तर घरीं संस्कृताचें अध्ययन नित्य दिनक्रमात करणारे कुमार होते ते. त्यामुळेंहि हें पाठ्यपुस्तक त्यांपैकीं कित्येकांना भाषादृष्ट्या ग्रहणक्षम वाटलें असेल. पण हा वरील आशय मात्र कोवळ्या वयाला उचित नव्हता, यांत दुमत होणारें नाहीं !

या दोन्ही पुस्तकांचे मानानें पंचोपाख्यानांतील धडे व त्याची भाषा हीं अधिक सुबोध वाटतात. कारण जरी त्यांचीहि उत्पत्ति संस्कृतांतून असली तरी त्या साध्या प्राणिकथाच आहेत व त्यांचें तात्पर्य व्यवहार शिकवणारेंच असल्यानें रचनेवरहि साधेपणाचें आवरण चढलेलें दिसतें. पुढील पंचोपाख्यानामधील उतारा त्यानें प्रत्यंतर पटवील —

### कृपणशर्मा ब्राह्मण

"अयोध्या नगरींत चंद्रसेन राजाचे पुत्रास वानराशी खेळण्याचा बहुत छंद असे म्हणून त्यानें वानर बागेंत पाळून ठेवले होते. तेथें सैपाक्यासी व एडक्यासी दावा पडला तो पाहून एक चतुर वानर बोलला येथें कलह उत्पन्न जाहाला यास्तव हें स्थान सोडून अरण्यात जावे ते ऐकून सपूर्ण वानर म्हणाले, तु वृद्ध जाहालास यास्तव तुझी बुद्धी जाऊन तू नानाप्रकारचे कुतर्क करू लागलास. "

—(पंचोपाख्यान १८२३ ची आवृत्ति)

या पुस्तकानंतर भाषादृष्टीनें बालसाहित्यात वेगळा असा कालखंड नव्यानें सुरू केला तो कै. स. का. ऊर्फ बापू छत्र्यांच्या बाळमित्रानेंच! एकतर या पुस्तकाची रचना खास बालासाठींच झाली होती त्यामुळे विषय, आशय, मांडणी हीं सर्व बालोचित ठरणारीं होतीं आतापर्यंतच्या पोथीप्रणीत भाषेच्या वेष्टनातून हें नवें बालपुस्तक जन्याच अर्थी मुक्त झालें होतें. त्यातील वाक्याच्या मागेंमागें असलेल्या शिपायासारख्या उभ्या रेषा नष्ट झाल्या व त्यांनागीं योग्य विरामचिन्हें अस्तित्वात आली. आणि दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे आतापर्यंतच्या पुस्तकातून अपरिहार्यपणें आलेली संस्कृतप्रचुर, कठीण भाषा यानंतरच्या पुस्तकातून न राहता त्याजागीं खेळकर, सोपी बालभाषा आली! या सर्वच सुधारणा प्रशंसनीय व बालसाहित्यास हितकरच ठरणाऱ्या होत्या.

कै. छत्र्यांची बाळमित्र व इसापनीति हीं दोन्हीं अनुवादित पुस्तकें असलीं तरी एक फरक स्पष्ट होता, तो हा कीं, इसापनीतीच्या भाषेवर कांहीशी पूर्वीच्या गटातील (विदुरनीति वगैरेंची) छाया दिसते तर बाळमित्रावर आंग्ल भाषेचा ठसा अधिकाधिक आहे. इसापनीतीतील पुढील उतारा त्या दृष्टीनें पहाण्यासारखा आहे—

### दुखणाईत घार

"एका घारीचा पुत्र फार दिवस दुखणाईत पडून फार पीडला. त्यासमयीं तो आपलीं पूर्वकर्में आठवून मोठे भय पावला. तेव्हां तो मातेस म्हणतो, आई कांहींतरी व्रतें उपोषणें देवभक्ती करून देवापाशीं मला आरोग्य माग आई त्यास उत्तर करते, बाबा, देव तुला आरोग्य करील याचा भरवसा मला दिसत नाहीं. जो तूं, देवास अर्पण केलेले पदार्थांचे हरण करण्याविषयीं मागेंपुढें पाहिले नाहीं आणि त्या कर्मांचा तुला कधींही पश्चात्ताप झाला नाहीं, त्या तुझ्या आरोग्याविषयीं मी तरी देवाकडे कोणत्या तोंडानें प्रार्थना करूं!"

—(छत्रे-इसापनीति · १८५६ आवृत्ति-पृष्ठ ४४)

एकदरीत ही भाषा सुबोध व मुलांना चटकन् समजणारी आहे ह्यात शंका नाहीं बाळमित्राचीहि भाषा याच पद्धतीची आहे. छपाई शिळाप्रेसची असल्यानें

मजकुराचे हातीव वळण, फार फाय, बोरूनें लिहिल्यामुळें येणारे जाड हस्ताक्षर हे प्राथमिक मुद्रणविशेषहि या दोन्ही पुस्तकांत आहेत. इसापनीतींत आलेले लग्या (सलगीचा), मेंढकेपणा (धनगरपेशा), खरव्या (कोयता), रूख (वृक्ष), इत्यादि शब्द नाविन्यपूर्ण व त्यावेळचे भाषावैशिष्ट्य दर्शवणारे आहेत. बाळमित्रामध्यें तर या अनेक वेगळ्या शब्दांचा वापर वारंवार आलेला दिसतो. हें पुस्तक त्याकाळीं बाल व आबाल सर्वांच्याच विशेष मनास आले होते, त्यामुळें त्याची भाषा थोड्या चिकित्सक दृष्टीनें पहावीशी वाटते. या घडाईवर कालानुवर्ती जुनी छटा दिसणें क्रमप्राप्तच आहे. पुढील वाक्यें कशी आगळ्या शैलीची दिसतात —

"तें हिंडशे पांखरूं घेऊन भागिरथी खुशालली."
"तुझे कोणे गावचे हेंद्रें मुलशी जुगले म्हण."
"मला उमड येतो"
"मेंढरानें लाडीस पुष्कळ जावणें दिली."
"ते मनांत खोंचलें."
"त्यानें भिंतीवर वळष केली."
"तो भुकावला."

या वाक्यांप्रमाणेंच 'बाळमित्र' मधें भिन्नार्थी असे अनेक शब्द आहेत. मात्र ते अशुद्ध आहेत असें नाहीं. त्यावेळच्या भाषेंत ते रुळलेलेच दिसतात. उदाहरणार्थ, पुढील शब्द व अर्थ पहावे —

| | |
|---|---|
| सुसासनिसास (निश्वास) | तुके (टोमणे) |
| घौताल्या (हावरट) | डंखी (द्वेष करणारा) |
| हातेरें (हत्यार) | शेऊळ (शीळ) |
| दाष्ट (दुष्ट) | कानशा (कानोसा) |

अशा भाषेनें या पुस्तकाला वैशिष्ट्याचे नवे रंग चढले आहेत. आणि केवळ शब्दवाक्यसीमेशींच थबकणारें हे निराळेपण नव्हे. त्यावेळीं व्याकरणाचीं पुस्तकें नव्हती, तरीहि पूर्वीच्या सिंहासनबत्तिशी वगैरेंतील भाषेच्या मानानें यांत व्याकरणदृष्ट्या कांहीं सुधारणा अवश्य दिसतात. भाववाचक नामांसाठीं छत्र्यांनीं गृहस्थाई, दुष्टाई, लुचाई असे अर्थवाही शब्द वापरले आहेत. विरामचिन्हांचाहि मर्यादित वापर केला आहे. कुणबी स्त्रियांची विशेषनामें, साकराऊ, मानाऊ, सोशाऊ, अशी, तत्कालीन रूढ असलेलीं आहेत. शिवाय माझीं मित्रें, तीं गरिबें, एक मुलगें तो मूल, ही मूल, हें मनुष्य, इत्यादि व्याकरणपूर्व मराठीचा नमुना स्पष्ट करणाऱ्या शब्दांनीं बाळमित्राचा भाषीय परिवेष अगदीं वेगळा झाला आहे.

भाषेचे हे गुण मान्य केले तरी छऱ्याच्या पुस्तकावर प्राय आक्षेप घेण्यात येतात ते त्याच्या भाषेतील अध आग्ल अनुकरणाबद्दलच आहेत व ते साधार आणि योग्य आहेत हें मान्य करावें लागतें. हे इग्रजीचे सस्कार केवळ शाद्बिक या भाषिक असते तर एक्वेळ क्षम्यहि मानता आले असते पण वर्णित विषयानून ते आचार, विचार, प्रचार या तिन्ही दृष्टीनें यावे याचें सखेदाश्चर्य वाटतें. इग्रजी राज्यकर्ते आले व त्याच्यातर्फेच हीं बहुतेक मराठी पुस्तकें लिहून घेतलीं गेलीं, तींहि मूळ इग्रजी ग्रथावरूनच, म्हणून आग्ल भाषेचें व सस्कृतीचें अधानुकरण यावेळीं अशा सर्व पुस्तकातून येणें अपरिहार्यच होतें काय ? आणि तें किती प्रमाणात असावें यालाहि सीमा नको होती काय ? बाळमित्रातील भाषेच्या घडाईवर, वाक्यावाक्यावर, शद्बाशद्बातून ही इग्रजी तऱ्हा डोकावून बघताना दिसते. पुढील वाक्यें त्याची साक्ष देऊ शकतील.

" माझे जिवलगे, माझे नवे आई ! तू पहा आम्ही तुझे आज्ञेंत कशी वर्तू ती. " (पृष्ठ १३० )

" म्या तुला मला असे अनुभवले. " ( पृष्ठ १११ )

" तू आपल्ये उदार बापाची प्रतिमा आहेस म्हणून माझे अत्यत प्रीतिपात्र आहेस जसा तो मला गुरुस्थानी होता. "

" अगे माझे टोपले ! अरे माझे ल्हानगे धन्या, मी तुझी किती उपकारी झाले ! " ( पृष्ठ ११९ )

या वाक्यावरून या नव्या मराठीचें रूप कसें निशोभित झालें होतें याची स्पष्ट कल्पना येते. नुसती वाक्येंच अधुनमधून अशी होतीं असें नव्हे तर मोठमोठे परिच्छेद देखील असेच आढळतात.

" माझे लाडके मुलानो ! काय सुखाचा दिवस आजचा होता जर पोराचे द्वाड गुण याला विरजण नसते ! पण नाहीं. मला त्याचा खेद होऊ नये. ईश्वरानें मला तू हा एक दुसरा लेक दिला आहे. माझ्या गुणाच्या गोविंदा, तू पोटचा नाहींस खरा पण तुझा थोरपणा पाहून माझे मनानें तुला पोटच्याहून अधिक येते आहे. " ( बाळमित्र–भाग १-पृष्ठ ५६—१८४९ ची आवृत्ति )

आणि ही परकीयता येथेंच थाबली नाहीं, तर इकडील रीतिरिवाज पूर्णपणें विसमल्न इग्लीश आचारवर्गनेंहि जशीच्या तशीच या पुस्तकात अवतरलेली दिसतात. हें तर महदाश्चर्य म्हणावयास हवें ! उदा० पुढील वर्णन पहा —

" मोरू आईचे मुके घेऊ लागला. "

" आवडीनें आनदात निमग्न होऊन आईचे तोंडाचे, गालाचे, डोळ्याचे, उराचे, हाताचे, पुष्कळपणें मुके घेतले. "

आपल्या रहाणीस हें वर्णन विसंगत ठरणारें, पण अनवधानानें तेंहि अनुवादित झालें व त्यानें या मराठीकरणास चांगलेंच गौणत्व आणलें आहे. आणि याचमुळें छत्र्यांवर "स्वत्वाचें अधिष्ठान विसरल्याचा" जो गंभीर आक्षेप घेतला गेला आणि भाषेला त्यामुळें अवकळा प्राप्त झाल्याचेंहि कांहीं टीकाकारांनीं निदान केलें त्यांतील यथार्थता नाइलाजानें मान्य करावी लागते.[१]

छत्र्यांच्या लेखनाबद्दल अनुकूल आणि प्रतिकूल असे दोन्ही प्रकारचे विद्वानांचे *अभिप्राय आढळतात. मराठी गद्यांतले ते पहिले बालसाहित्यकार.* त्यामुळें त्यांच्या प्रकाशनाचें मूल्यमापन जनतेनें अधिक अगत्यानें व कौतुकानें करावें हें साहजिकच. व्याकरणकार दादोबा पांडुरंग यांनी त्यांच्या ग्रंथांबद्दल म्हटलें आहे—

"हे दोन्ही ग्रंथ फार सुरस झाले होते. तीं भाषांतरें आहेत असें कोणास वाटत नसे. मराठींत सरस रीतीनें फक्कीनें लिहिणारे हेच पहिले, त्यांच्यामागून आम्ही सर्व झालों."[२]

तर एका समीक्षकानें—

"ह्या दोन्ही पुस्तकाची भाषा इतकी गोड व स्वाभाविक आहे कीं त्यांना बालवाङ्मयांतील अमूल्य रत्नें म्हटल्यास अतिशयोक्तिचा दोष येणार नाहीं," असे गौरवोद्गार काढले आहेत. एके ठिकाणीं पुढील अभिप्राय व्यक्त झाला आहे— "छत्र्यांच्या साध्या, सरळ व सुबोध बाळमित्राकडे पाहिल्यावर त्याचा जन्म परदेशांत झाला असेल अशी शंका येणें कठीण. येथील वातावरणांत तर तो अगदीं घरगुती तऱ्हेनें वागतांना दिसतो."[३]

छत्र्यांच्या लेखनविषयक कामगिरीचें महत्त्व लक्षांत घेऊनहि वरील अभि*प्रायाशी सहमत होणें कठीण ! कारण नेमके वर वर्णिलेले गुणच त्यांत दोषरूप होऊन* बसलेले वाङ्मय अभ्यासूंना दिसतील. मेजर कँडीसारख्या परदेशी विद्वानालाहि हे दोष सहज उमगले व त्यानें पुढील आवृत्त्यांतून त्यांचें दुरीकरण केलें. मूळ भाषा निर्दोष असती तर या संस्करणाचें प्रयोजनच काय होतें ? तसेंच बाळमित्राला '*इकडील वातावरणांत* घरगुती तऱ्हेचा' म्हणावयाचें तर दर उद्धृत केलेल्या परक्या वाणाच्या पाश्चात्य आचाराच्या उदाहरणांची संगती कशी जुळायची ? आणि म्हणूनच की काय, कांहीं टीकाकारांच्या मतें त्यांची भाषा 'एकंदरींत रसाळ

१ आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास – प्रथम खंड

२ दादोबा पांडुरंग-आत्मचरित्र (पृष्ठ-२७)

३ अर्वाचीन मराठी साहित्य (नेने संपादित-पृष्ठ ३५)

पण संस्कारशुद्धतेचा अभाव व कमावलेलें कौशल्य व सफाई याचा मागमूसहि नसलेली ' अशी ठरली आहे. तीहि अभिप्राय उपेक्षणीय वाटत नाहीं.[1] प्रा. द. वा. पोतदारांनींहि या आंग्ल वळणाबद्दल लेखकास दोष दिलेला आहेच. आमच्या टीकाकारांनी त्याबद्दल सरोष मतें प्रगट केली असली तरी स्वत: लेखकानें मात्र ही गोष्ट जाणूनच केलेली दिसते. छत्र्यांना आंग्ल भाषेचें व वाङ्मयाचेंच महत्त्व स्वभाषेहून जास्त वाटत होतें, हें उचित! त्यांनीं ते एके ठिकाणीं उद्धृतहि केलें आहे.

“ (इंग्रजी व फ्रेंच भाषांचा विचार करता) ज्या भाषा आज शेंकडो वर्षें सुधारत आल्या आहेत, ज्यांत सर्व विषयांवर ग्रंथ आहेत, ज्यांत सर्व मनांतील अभिप्राय शब्दें करून दाखवता येतात, इतके शब्द आहेत, तर अशा भाषांत जो रस झाला आहे तो रस मराठी भाषेंत कसा होईल? ज्या भाषेंत आज दिवस पर्यंत व्याकरणकोश कोणी केलेच नाहात, जीत शब्दसंग्रह थोडा, जीची बोलवयाची शैली प्रौढ नव्हे ह्यावर आणि माझें भाषांतरहि यथामति आहे म्हणून सर्वांनी यांतील दोषांकडे लक्ष न देता गुणमात्र घेऊन माझी सेवा स्वीकारावी ”

(बाळमित्र भाग १-प्रस्तावना)

या अभिप्रायावर आणखी अभिप्राय काय द्यावयाचा? ज्या मुलुख महाराष्ट्रांत ज्ञानेश्वरांनीं भाषासौंदर्याचे सारे रसविलास व्यक्त केले तिला रसिकता नाहीं, तिच्यांत शब्दसंग्रह थोडा असल्याचा हा दावा! ज्या भाषेंत प्रभावी इतिहास लिहिले गेले ती बखरकारांनी आवेशपूर्ण भाषा पण 'तीत विद्वानांचें चित्त रमलेंच नाहीं,' असा शेरा आणि संत वाङ्मयाचें सारें परमार्थपर विवेचन ज्या समर्थ भाषेनें मुमुक्षूपर्यंत पोंचवलें त्या मराठीची 'बोलायची शैली प्रौढ' नव्हे हें लेखकाचें मत! कसें हें सारें ग्राह्य व उचित समजावयाचें? त्याबद्दल मौनव्रत पाळणें देखील अशक्यप्राय ठरेल! केवळ कोश व व्याकरण तयार झालेलें नाहीं म्हणून यावेळच्या मराठीवर थोडे काहीं आक्षेप घेता आले असते एवढेंच, पण इंग्रजी भाषेची स्तुति करताना परंपरागत मराठीला नसलेलें हीनपण चिकटविण्यांत यावें ही गोष्ट विचार करतांना शल्यासारखी खुपणारीच नव्हे काय?

इंग्रजी संस्कृतीच्या दर्शक अशा चालीरीती इकडील मराठी अनुवादांत अशा प्रकारें अत्यंत विसंगत दिसणाऱ्या. पण छत्र्यांसारख्या विद्वान व्यक्तींनीं त्यांचा अवलंब केला तेव्हां "बाळमित्र"च्या दुसऱ्या भागांतहि त्यांची उदाहरणें येण्यास हरकत कोठली! तसेंच भाषेच्या बाबत त्यांनीं मराठीला हा इंग्रजीचा परिवेष चढवला व तो सर्वमान्य, राजमान्यहि ठरला मग त्याचें अनुकरण इतरांनींहि कां करूं नये!

१ अर्वाचीन मराठी गद्याचा पूर्वपीठिका (सरदार कृत) - पृष्ठ २२

गेस्कोर्डकृत बाळमित्र भाग २ च्या रूपांतरित पुस्तकांतील पुढील वाक्यें या दृष्टीनें वाचनीय ठरणारी आहेत. उदाहरणार्थ—

(१) "मुली तुझें गोड भाषण ऐकून माझी दृष्टी तुजवर पडेल. ये. मला मुका दे. तुजमध्यें इतका समज आहे! आणि असे प्रौढ भाषण धैर्याचे करित्येस. येणेकरून मला फार आनंद होतो."

(२) "यावरून तुम्हांस माहीत व्हावें जे आपले वाईट खोटीमुळें आपण कसकसें संकटांत पडलो आणि मलाहि समजावे कीं माझें पत्र लिहिण्याचें सार्थक्य कसे होते."

मुद्दाम अनुवादित केलेल्या बालपुस्तकांत इंग्रजी वळणाची भाषा घालण्याचा हा संप्रदाय छत्र्यांनीं सुरू केला, कदाचित् कळून किंवा नकळून–पण त्याचें अनुकरण पुढीलांनीं मात्र निष्ठेनें केलेले दिसतें. हरी केशवजी पाठाऱ्यांच्या 'शालोपयोगी नीतिग्रंथ' या पुस्तकांतून अशीच धेडगुजरी वाक्यें आलीं आहेत. उदाहरणार्थ–

"या प्रकारें जो जीव त्याच्या ठायी विश्वास ठेवी असे यानें त्यास मनाविले."

"तुम्हातील कोणी म्हणतो ते मी ऐकतो असे मला भासतें कीं मनुष्यानें आपल्यास कांहीं फुरसत देऊं नये काय?" किती बोजड व शिथिल रचनेचीं हीं वाक्यें! याऐवजीं शुद्ध मराठी बाणाचीं वाक्यें कर्त्यास घालतांच आलीं नसतीं काय? पण एवढें बारकाईनें लक्ष पुरवणार कोण! मजकुराप्रमाणें शीर्षकांतूनसुद्धां हे परकीय वळण आढळतें. खालील शीर्षकें तशींच—

"स्वैछिक अपकार वर्जण्याविषयीं स्वानुभविकपणा."

"एका धन्याच्या आतले गाठीचे स्वभावाची निंदा."

"घरास अग्नि लागला असतां दोघी स्त्रियांनीं परस्परविरुद्ध असी वर्तणूक केली."

एखाद्या आगगाडीसारखी ही लांबलचक 'नांवें' नांवें ठेवण्याजोगीच क्लिष्ट वाटतात. ही शीर्षकाची लांबण इसापनीति व बाळमित्रांतूनदेखील आढळते—

इसापनीतिः—(१) बेडूक, ज्यांनीं राजा मिळविण्याविषयीं जुपिनराची प्रार्थना केली.

(२) मोर, जो आपल्या शब्द वाईट म्हणून खेद करीत असे.

बालमित्रः—(१) मुलें जी स्वतंत्र व्हावयास इच्छितात.

(२) धाकटी मुलगी जी कुल्टेविणीनें ठकविली.

आणि ही पद्धत इंग्रजीचें सहीसही रूपांतर नव्हे असें कोण म्हणेल? याऐवजीं सुटसुटीत नांवें योजण्याची लेखकांना बंदी थोडीच होती? यानंतर या शीर्षकलांबीकडे जाणत्यांचें लक्ष पोहोंचून त्याला संपादकीय कात्री लागलेली दिसते.

एकोणिसाव्या शतकाच्या प्रथमार्धात प्रसिद्ध झालेल्या अनेक बालपुस्तकावर हें पाश्चात्य वळणाचें व आंग्लभाषेच्या व्याकरणाचें सावट होतें.

तथापि हा आंग्लानुकरणाचा दोष बाजूस ठेवून पाहिलें तर गेस्फोर्डच्या या दुसऱ्या भागाची भाषा पुष्कळच साधीसुधी दिसते. उदाहरणार्थ, पुढील मजकूर पहावा–

" ती सावित्री एके दिवशीं समवयस्क मुली आपल्या बरोबरीचा त्यामध्यें खेळावयाकरता गेली तव त्या मुली वस्त्रालंकारेंकरून मंडित पाहून तिचे मनात खेद उत्पन्न झाला कीं मी याचे बरोबरीची असून मला असे वस्त्र असे अलंकार नाहींत तर याप्रमाणें मला असावे. मग खेळ टेकून घरी आल्यावर लागलीच आईकडे जाऊन आईला म्हणल्ये, आई मी रामराजाचे मुलीकडे गेल्ये होत्ये, मला वाटते तुझी त्याची ओळख असेल. " –बाळमित्र भाग २ (पृष्ठ १२८ १२९)

वरील उताऱ्यात फारसे भाषा दोष नाहींत पण कँडीनें हेंहि पुस्तक पुनर्शोधित केलें व पुढील आवृत्तीच्या प्रस्तावनेंत मुद्दाम " जाड शब्दाऐवजी सोपे घातल्याचें नमूदहि केलें आहे. तथापि सर्वच आवृत्त्यातून ' वस्त्रालंकारादी करून ' असे जाड शब्द नजर चुकून राहिले आहेतच ! पूर्ण विरामाखेरीज यात विरामचिन्हें नाहींत व अनुनासिकावर अनुस्वारहि नाहींत, शिवाय गेल्ये होत्ये, म्हणल्यें, वगिरेयेम इत्यादि कोंकणी वळणाचीं क्रियापदें व नामेंहि यात पुष्कळच आढळतात आणि हें कोंकणी भाषेचें संस्करण यावेळच्या अनेक बालपुस्तकातून प्रत्ययास येतें. कारण स्पष्टच आहे. यावेळचे अनेकानेक लेखक व अनुवादकार कोंकणस्थ असल्यानें कोंकणी वळणाची भाषा या सर्व पुस्तकातून निदर्शनास येते. छत्रे, चापट, श्रीकृष्णशास्त्री तळेकर (नीतिदर्पणकर्ते), "बाळमित्र"चा दुसरा भाग लिहिणारे ओक, सगळेच मूळचे कोंकण निवासी, तेव्हा अनेक कोंकणी वळणाचे शब्द व वाक्यें यात आढळतात यात नवल नाहीं

अगो, बयो, बया, चिरडी, चोपाळा, घाटी, अगोतल्या, बापुस, फडकी इत्यादि शब्द व लिहणें, ओरपणे, अबकुळणे, पापुरणे ही क्रिया होल्ये, करल्ये आणि पाहिल्येत, काढिल्येत इत्यादि क्रियापदाचा आढळ या बालपुस्तकातून वारंवार होतो सार्वत्रिक भाषादृष्टीनें ही गोष्ट काहींशी एकांगिना आणणारीच म्हटली पाहिजे व समितीलाहि हें जाणवलें होतें. कारण यातील काहीं पुस्तकाच्या पुनरावृत्त्या निघाल्या, तेव्हा नव्या आवृत्तीत तत्संबंधीं दुरुस्त्या केल्या गेल्या. १८४९च्या "बाळमित्र"च्या नव्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत कँडीनें म्हटलें आहे—

" छत्रे यानीं भाषांतर केलें हें फार चांगलें आहे. परंतु त्याच्या रचनेंत कोंकणी शब्द फार व कोठें कोठें दूरान्वय व कोठें कोठें विरामचिन्हाचीं अव्यवस्था व कित्येक ठिकाणीं व्याकरणाचे दोष होते त्यामुळें ही आवृत्ति शोधिली. "

यानंतर बालोपदेशकथा, बोधकथा व नीतिकथा हीं पुस्तकें लिहून घेतलीं गेलीं, पैकीं नीतिकथेची भाषा बरीच साधी सोपी अशी वाटते. भाषेचें वळण असे :—

लोभी

फार लोभानें सर्व जातें.

" कोणी एका गृहस्थाच्या बागेत एक सीताफळाचे झाड होतें. त्यास उत्तम फळे येत असत, त्यांतून कितीएक फळे प्रतिवर्षी तो गृहस्थ राजास नेऊन देत असे म्हणून त्या फळाची राजास फार प्रीती असे. एके दिवशी राजाने विचार केला कीं सिताफळाचे झाड आपल्या बागांत आणून लावावे म्हणजे त्याची सर्व फळे आपणास मिळतील असा विचार करून त्यागें तो वृक्ष तेथून काढून आपल्या बागेंत नेऊन लावताच मरून गेला."
—नीतिकथा १८३८ (पृष्ठ ११)

बाळशास्त्री जांभेकराच्या प्रसन्न भाषेचा या उताऱ्यातून प्रत्यय येतो. आणि याच प्रकारची भाषा छत्र्यांच्या बोधकथेंतूनहि आली आहे. मुख्य म्हणजे या पुस्तकांवर इंग्रजीची छाप मुळींच नाहीं व भाषेचें वळणही धडगुजरी झालेलें नाहीं. कदाचित मूळ लेखक ताराचंद दत्त यांनी या गोष्टी रूपांतरित करताना इंग्रजी वळणाऐवजी मराठीला अनुकूल अशीच भाषापद्धत योजली असण्याचीहि शक्यता आहे. यानंतरचें गाजलेलें पुस्तक हरी केशवजी पाठारे याचें 'बालोपयोगी नीतिग्रंथ' हें होय. समितीनें हें भाषेसंबंधीं खास सूचनादेऊन तयार करून घेतलें होतें. म्हणून याची भाषा विशेष अगत्यानें पाहणें जरूर आहे. हें मुद्दाम लिहून घेतलेलें पुस्तक असून पोथीपद्धत, शब्दवाक्याची मिसळण व कहाणी पद्धतीची "व्हावा तो पोशाक" इत्यादि शब्दयोजनाहि यांत दिसते. भाषा तत्कालीन घडाईची आहे. तिचा नमुना —

जायांची पिसे ल्यालेला डोमकावळा

" मला मोरासारिखे उत्तम पक्षी व्हावयास काही नलगे. त्याचा वेष मात्र पाहिजे असे मानायाच्या एका डोमकावळ्याने अभिमान केला. मग अश्या या शहाणपणाच्या अहंकाराने फुगून त्याने त्याची अत्यंत सुंदर पिच्छें पुरावयाजोगती घेऊन त्या पिच्छांनी आपले पाख नटविले. नंतर असा जायाचा आणलेला वेश घेऊन त्याने आपल्या मंडळीचा त्याग करून मोरांत खपण्याविषयी उद्योग केला."
—बालोपयोगी नीतिग्रंथ–१८४६ (पृष्ठ ६१)

अर्थात् हा उतारा सोप्या भाषेचा आहे. पण सर्व ठिकाणीं ही भाषा अशी साधी सोपी राहिली असती तर बरें झालें असतें! पण तसें झालें नाहीं. क्षितिजसम-सूत्र, अतिद्वेष्य, अनुपपत्ति, निष्कृत्रिम असे कित्येक संस्कृतप्रचुर व कठिण शब्द यांत लेखकाची व समितीची नजर चुकवून शिरलेले दिसून येतात. हें पुस्तक

मुद्दाम मुलासाठीं सोपें लिहावें अशी सूचना समितीनें दिलेली असूनहि या तऱ्हेची कठिणाई यात राहावी याचें नवल वाटतें.

आणखी एक गाल्बोट हरी केशवजीच्या या पुस्तकाला लागलें होतेंच. तें म्हणजे वाक्याच्या घडाईवर अधुनमधून इंग्रजी वळणाची छाप येऊन वाक्यें शिथिल रचनेची व बोजड झालीं होतीं त्याचीं उदाहरणें विषयानुरोधानें उध्दृत केलेलींच आहेत. पण मराठीला असा बोजड परकीय वेष चढवूनच हरी केशवजी थांबले नाहींत, तर उलट इन्याच्याहि पुढची एक पायरी त्यानीं गाठली, ती म्हणजे, त्यानीं मूळ इंग्रजी विशेषनामेंहि कायम ठेवलीं आहेत व तीहि अपभ्रष्ट रूपात ! उदाहरणार्थ, 'दीन रीचार्डोची वाक्यें,' 'ओगेनचा इन्नूस' इत्यादि शब्द भारतीय घरात एकादा परदेशी पाहुणा कायमचा हट्टानें राहायला यावा तसे परकेपरकेसे भासतात. बालमित्रमध्यें इंग्रजी नावाबद्दल हमीरराव, प्रतापराव, गगा इत्यादि एतद्देशीय नावें योजलीं आहेत. पण हरी केशवजींनीं ही दक्षता ठेवली नाहीं, त्यामुळें आकर्षणाची एक बाजू निस्तेज उणी झाली आहे. महादेवशास्त्री पुराणिक या नावाच्या एका तत्कालीन शिक्षण तज्ञानें त्याबद्दल प्रतिकूल अभिप्रायहि दिला आहे तो पुढीलप्रमाणें—

"इंग्रजी शिकणारास हें उपयुक्त धरलें तरी जे केवळ मराठी शिकणारे आहेत त्यासाठीं हें भाषातर सुयोग्य तऱ्हेनें झालेलें नाहीं." हा अभिप्राय शैक्षणिक अहवालातहि छापलेला आहे

तथापि असें असूनहि काही समीक्षकानीं त्याना खास 'भाषेबद्दल'च धन्यवाद दिलेले दिसतात. दादोबा पाडुरंगाना त्याबद्दल "ही भाषातराची अवघड कला हरी केशवजीच्या इतकी सुबक क्वचित थोड्यासच साधेल," असा अभिप्राय व्यक्त केला आहे. तर एका वाङ्मयसमालोचकानें म्हटलें आहे —

"(हरि केशवजी) याची हुबेहूब यथार्थ आणि बालबोध मराठी भाषातर करण्याविषयीं ख्याति असे. त्यात 'मॉरल क्लासबुक' या इंग्रजी ग्रथाचें 'शाला पयोगी नीतिग्रथ' या नावाचें भाषातर व 'पर्शियन टेल्स'पैकीं काहीं गोष्टीचे भाषातर हीं तर सर्वोत्कृष्टच उतरलीं आहेत" [१]

अर्थात् बालसाहित्यकाराच्या दुर्मिळतेच्या त्या काळात एकदर जनतेची त्याच्याकडे पहाण्याची दृष्टि अधिक कौतुकाची, सहानुभावाची व उत्तेजनपर असावी एवढेंच या अभिप्रायाबद्दल म्हणता येईल

या कालखडातील या सर्व बालपुस्तकाकडे पहाता मात्र एका गोष्टीचा इतकेंच वैशिष्ट्य आढळतें तें मुद्रणाचें. खरें म्हणजे १८१५ त पहिला छापखाना

---

१ विविधज्ञानविस्तार-पुस्तक १० अक ३ -पृष्ठ ५१

स्थापन झाला हें लक्ष्यांत घेतां छपाईचीहि ती प्रथमावस्थाच होती म्हटलें तरी चालेल–प्रथमतः यावेळच्या पुस्तकांना व्याकरणाचे निर्बंध फारसे नव्हते व दादोबांचें व्याकरण तयार झाल्यावर विरामचिन्हांचा वापर सुरू झाला हें वरील अनेक उदाहरणांतून दृष्टोत्पत्तीस आलें आहेच. मुद्रणांतील कांहीं प्राथमिक गोष्टींवरहि त्यांनीं प्रकाश पाडलेला दिसतो. पहिली गोष्ट म्हणजे शिळाप्रेसची छपाई असल्यानें मुद्रणप्रतींत मूळ लेखकाचे हस्ताक्षर तर तसेंच्या तसे राहीच, पण त्या हस्तलिखितांतले दोषहि तसेच मुद्रित होऊन 'अक्षर' बनून राहात. उदाहरणार्थ, 'सिंहासनबत्तिशी'तले दाहा (दाह), साहास, यक, येके; 'पंचोपाख्यान'मधील वेहेरी (विहिरी), नवति (नव्हती), सद्दो इत्यादि शब्द; 'विदुरनीति'मधील काहाढला (काढला), पेक्षे (पेक्षा) इत्यादि शब्द म्हणजे मूळ लेखनातील अशुद्धेंच होतीं, तीं जशीच्या तशीच छापील आवृत्तींतहि दाखल केलीं गेलीं होतीं. गेस्फोर्डच्या बाळमित्रांत तर जागोजाग हे शब्द आढळतात. उदाहरणार्थ–बाच्छाव (बादशाह), कश्री (कसची), नाशिव्ह (नाशीव), अगोधर (अगोदर) वगैरे. कदाचित् हे शब्द बोलींत असतीलहि असें जरी गृहीत धरलें तरी खालील चुकीच्या शब्दांचीहि उदाहरणें या गेस्फोर्ड–बाळमित्रांत वारंवार आढळतात, त्याचें स्पष्टीकरण कोणत्या आधारानें करावें ? त्यांतील अशुद्ध शब्द पहाण्याजोगेच आहेत.

| छापील पुस्तकांतील शब्द | खरा शब्द |
|---|---|
| अद्दल | अट्टल |
| त्याचे दारा | त्याचे द्वारा |
| ताद्दियची | तद्विषयी |
| अस्तो | असतो |

आणि हीं अशुद्धें लेखकाच्या हातून राहिली तरी मुद्रणद्दिलाईनेंहि कायम झाली असें म्हणणें प्राप्त आहे. समितीनें पुरस्कृत केलेल्या पाठांच्या 'शालोपयोगी नीतिग्रंथ'मध्येंहि ही अशुद्ध शब्दावली आहेच. बहीणभावांडे, आंडे, जाणूं काय, बहुत्येक, चुक्या इत्यादि. यांतले 'बहुत्येक' शब्द 'चुक्यांनीं' युक्तच दिसतात ! अशीं उदाहरणें उत्तरोत्तर कमी झालीं, तथापि इसापनीति, बाळमित्र भाग १ इत्यादि पुस्तकांतून अधुनमधून तीं दिसून येतातच. शब्दांप्रमाणेंच लिपीचें वळणहि त्यावेळीं बरेंच निराळें असावेंसें दिसतें. उदाहरणार्थ, गृहस्थ हा शब्द गृहस्त असा लिहिला जाई, पशू हा पश्रू असा लिहीत व बुद्धि, हृदय हे शब्द बुध्धी, ह्रदय असा वेगळ्या प्रकारें लिहिले जात. तसेच कांहीं अक्षरांबाबत ही पहिलीं बालमुद्रितें

आजच्याहून भिन्न दिसतात. या प्रथममुद्रित पुस्तकातले ऱ्हस्व व दीर्घ उकार किती तऱ्हांनीं मुद्रित होत होते हें पहाण्याजोगें आहे. उदाहरणार्थ,

| | | |
|---|---|---|
| ल्पाळू | (कृपाळू) | वू (तू) |
| होउन | (होऊन) | सुशील (सुशील) |
| घेउंन | (घेऊन) | वस्त (वस्तु) |
| उडून | (उडून) | तर्जमा (तर्जुमा) |

किती ही अनोखी छपाई! पण हे नवलपूर्ण उकार तत्कालीन बालपुस्तकांच्या प्रथमावृत्तींतूनच नव्हे तर पुनर्मुद्रणांतूनहि आले आहेत. बाळमित्रहि त्याला अपवाद नाहीं. कांहीं अवश्य अक्षरें गाळण्याचीहि पद्धत यावेळच्या लेखनात भागेत दिसते. उदाहरणार्थ, पुढील वाक्यांत अवश्य असलेला 'यकार' गाळूनच टाइपात आलेला दिसेल.

(१) या प्रकारचा लोकास डोंगराचा शिखरासारखे जाणाने.

(२) जशा साळीचा वाड्या धान्याचा भाराने लवून जमिनीस मिळतात.

(३) जाची वस्त त्यास दिली.

आणि या गाळलेल्या यकाराची भरपाईच करावी म्हणूनच की काय कांहीं ठिकाणीं अनावश्यक यकार जोडलेलेहि दिसतील. उदाहरणार्थ— चौघाच्ये कल्याणाच्ये कामींपुढे सराव " अशीं हीं मुद्रितें तत्कालीन सर्वच पुस्तकांतून कमीअधिक प्रमाणात दिसतात. एकतर मुद्रितांचें प्रथमरूप हेंच नियोजित झालेलें असावें किंवा छपाई शिळाप्रसची असल्यानें मूळ हातीच प्रतीवरूनच हें वैशिष्ट्य छापील प्रतीत दाखल होत असावें. तसेंच एक एक अक्षर सुटें सुटें छापण्याचेंहि 'तंत्र' त्यावेळीं छापणाऱ्यांनीं स्वीकारलेलें दिसतें. बालोपदेश व नीतिकथा ही बाळमित्रानंतर एका तपानें प्रसिद्ध झालेली पुस्तकें! पण त्यात ही नावीन्यपूर्ण पद्धत अनुसरलेली दिसेल ती पुढीलप्रमाणें .—

> " या प्र था पा सू न म रा ठी शा ळा व र प ठ णा ऱ्या मु ला स
> नी ति ज्ञा न व्हा वे अ शी आ म ची इ च्छा आ हे."

लहान मुलें श्रीगणेशा शिकतात ती अशा सुट्या अक्षरांनीच. मुद्रणकलाहि पणु मराठीची नवी अक्षरओळख करून घेताना ही पद्धत अनुसरत असावी!

सदाशिव पंडिताच्या पुस्तकानें १८०६ सालीं बालवाङ्मयाचा मुहूर्त केला, परतु १८२५ सालापासून या वाङ्मयाचा खरा प्रारंभ झाला हें आतापर्यंतच्या दोन्हीं

प्रकरणांतील विवेचनांत स्पष्ट झालें आहेच. १८२५ पासून १८५० पर्यंतच्या पंचवीस वर्षांतलीं हीं सारीं पुस्तकें–कांहीं अपरिहार्यतेनें बालांच्या हातीं आलेलीं तर कांहीं खास त्यांच्यासाठीं लिहून घेतलेलीं, कांहीं अनुवादित तर कांहीं रूपांतरित, क्वचित् एकाद्दुसरें स्वतंत्र निर्मितीचें अशा सर्व सरमिसळीनें साहित्यप्रांतांत समाविष्ट झालेलीं. आंग्ल राजेशाहींत यांनीं बाळसें धरलें व मराठीच्या प्रांगणांत केवळ बालसाहित्याचेंच नव्हे तर एकंदर गद्य कथासाहित्याचे नवे अंकुर रुजू केले.[१]

या सर्व पुस्तकांकडे साकल्यानें व चिकित्सक दृक्क्षेप टाकला तर गुणांबरोबर अनेक दोषार्ह गोष्टीहि लक्षांत येतात. पहिली गोष्ट म्हणजे हीं सारीं पुस्तकें नीतिपर उपदेश देणारीं होतीं व त्यांत रंजनाला अगदीं दुय्यम स्थान प्राप्त झालेलें दिसतें. ही गोष्ट प्रथमदर्शनीं खटकणारीच आहे. पण जरा शांतपणें विचार केला तर त्यांतहि फारसें नवल नाहीं असें वाटतें. कारण त्यावेळची लोकमताची घडणच वेगळी. बालवाङ्मय म्हणून एक स्वतंत्र साहित्यविभाग असतो, त्यालाहि कांहींएक स्वतंत्र दृष्टिकोन आहे आणि बालमनाचें विकसन वेगवेगळ्या वयांत विशिष्ट तऱ्हेनें होतें, त्याला अनुलक्षून हीं पुस्तकें असावींत, असा विचारखुद्दां तेव्हां कोणाच्या मनींमानसीं नव्हता! बालमानसशास्त्राचा उदयदेखील त्यानंतरच झाला नाहीं काय? अशा स्थितींत आपल्या वाडवडिलांनीं मुलांचें शिक्षण म्हणजे नीतिपाठ हेंच समीकरण योग्य मानलेलें दिसतें याबद्दल फारसा दोष देतां येत नाहीं. तसेंच मुद्रित पुस्तकें सुरू झालीं व त्यांचा प्रसार गांवोगांव होऊन या विषयांत शिक्षणखात्यानें विशेष लक्ष घातलें ही जरूर, वाङ्मयाच्या अभिवृद्धीचीच गोष्ट म्हणावयास हवी. तथापि समितीचे सदस्य व अधिकारी यांनीं अत्यंत कसोशीनें बालसुलभ साहित्यनिर्मितीचें धोरण नजरेसमोर ठेवलें असतांहि त्या सर्व ध्येयप्रयत्नांची नजर चुकवून यांतील कित्येक पुस्तकांतून गंभीर विषय व प्रौढ किंवा दुर्बोध भाषेचाहि वापर यांत केला गेला आहे, हें एक या बालसाहित्य–प्रगतीस मोठेंच गालबोट लागलें आहे.

आणखी एक विचार ही सर्व निर्मिती पाहून मनांत येतो. बालसाहित्याची ही प्रथम प्रकारनें शालेय दृष्टिकोनानेंच बव्हंशीं लिहिलीं गेलीं होतीं त्यामुळें साहित्याचे प्रमुख गुण लालित्य व सहजता याऐवजीं गरज व उपयुक्तता यांवरच अधिक भर दिला गेलेल्या अनेक पुस्तकांतून नजरेस येतो, त्यामुळें ही पहिली रचना निर्दोष वाटत नाहीं. अर्थात् बालसाहित्य सुरू झालें हीच आनंदाची गोष्ट! पण त्याला सुरवात इंग्रजांच्या प्रेरणेनें झाली व तीहि परकीय पुस्तकाच्या सदोष अनुकरणांतून! अर्थात् यामुळें या निर्मितीला एक प्रकारें गौणत्व आलें आहे. बालजन्माचा आनंद घरांत व मनांत मावत नाहीं इतका असतो हें खरें, पण हें तान्हें

१ (अ) कोलटकर लेखसंग्रह [ मराठी कथात्मक वाङ्मय ] पृष्ठ–६२८
(ब) सरवटे कृत मराठी साहित्य समालोचन–पृष्ठ ५५–५६

## विकसनकाल

एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्ध सुरू झाला व बालसाहित्याच्या निर्मितीस पंचवीस वर्षे उलटलीं. ऐन पंचविशींत माणूस अगदीं यौवनसंपन्न व समर्थ दिसूं लागतो. पण इतिहासगणनेंत कालाची पर्वेच्या पर्वे जलद उलटत असल्यानें त्यांत पंचविशीचें वय म्हणजे शैशवकाल सूचित करणारेंच म्हणावयाचें ! १८५० साल उजाडलें व बालसाहित्यानें शैशवाची सीमा ओलांडली.

शतकाच्या या उत्तरार्धानें बालसाहित्याच्या निर्मितीसंबंधी अनेक आशादायक फरक घडवून आणले म्हणून या पन्नास वर्षांच्या कालखंडाला 'विकसनकाल' हें नांव उचित ठरेल. हा विकास एज्युकेशन बोर्ड, इतर कांहीं प्रकाशन संस्था, नवे लेखक व मराठीचे अभिमानी असलेले कांहीं साहित्यिक यांच्या सहकार्यानें घडलेला दिसतो. अर्थात् या सर्वांत एज्युकेशन बोर्डाचें कार्य अधिक सातत्यानें चाललेलें दिसतें. शालेय पुस्तकांचें पुनर्मुद्रण तर या संस्थेतर्फे चालूच होतें, पण बोर्डानें वाङ्मयीन दृष्टीनें उपयुक्त असे आणखीहि कांहीं चांगले उपक्रम सुरू केले. त्यांतील एक हा कीं, पूर्वीची शालेय पुस्तकें अमर्याद पृष्ठांचीं होतीं, त्यांचें स्वरूप संक्षिप्त व सुटसुटीत करुन तीं पुन्हां बोर्डानें छापवून घेतलीं; तर कांहीं सारख्या मजकुराचीं लहानलहान दोन पुस्तकें एकत्रित करण्याचेंहि धोरण ठेवलें. या दोन्ही उपक्रमामुळें शालेय पुस्तकांचें रूप आटोपसर व बेतशीर होऊन त्यांतील रचनेस आंखीव स्वरूप आलें. उदाहरणार्थ, छत्र्यांची इसापनीति मुळांत ३१० पृष्ठांची, म्हणजे बालवयाला न झेपण्याएवढ्या व्याप्तीची होती, त्यांतील निवडक कथा घेऊन त्याची फक्त शंभर पृष्ठांची संक्षिप्त आवृत्ति १८५१ सालीं प्रसिद्ध करण्यांत आली. जणूं संक्षिप्तीकरणाचा नवसंप्रदाय ह्या नवीन इसापनीतीनें सुरू केला म्हणावयास हरकत नाहीं !

दुसऱ्या प्रयोगासाठीं बाळशास्त्री जांभेकरांचें 'नीतिकथा' व छत्र्यांचें 'बोधकथा' अशीं दोन छोटीं पुस्तकें निवडण्यांत आलीं. मूळ दोन्ही पुस्तकें ताराचंद दत्त

याच्या Pleasing Tales या पुस्तकाचींच रूपांतरें होतीं. त्यांचें एकीकरण करून तें 'नीतिबोधकथा' या नांवानें प्रसिद्ध करण्यात आलें. एकाच विषयावरील छोट्या पुस्तकांचें एकीकरण हाही एक चांगलाच उपक्रम होता. पण पुढें बोर्डातर्फे नवीं प्रकाशनें काढण्याचें किंवा मुद्दाम लेखकाकडून नवीन पुस्तकें लिहवून घेण्याचें कार्य हळुहळू स्थगित करण्यात आल्यामुळें या प्रथेला फारशी चालना मिळालेली दिसत नाहीं.

यापेक्षाहि अधिक महत्त्वाचें कार्य बोर्डानें हातीं घेऊन पार पाडलें तें म्हणजे पूर्वी जीं पुस्तकें शाळांतून अपरिहार्यतेनें किंवा मुद्दाम लिहवून घेऊनही रुजू करण्यात आलीं होतीं, तीं नीट तपासून त्यांतील भाषाव्याकरणाचे दोष दुरुस्त करून मग त्याच्या सशोधित पुनर्मुद्रित आवृत्त्या काढण्याचें. हें काम अति किचकट व वेळ खाणारेंच होतें. तथापि नुकतीच या कामावर मेजर टी. कँडीची नेमणूक झाली होती, त्याला या विषयाची अत्यंत आवड असल्यानें त्यानें हें काम विशेष काळजीपूर्वक व बारीक लक्ष घालून पार पाडलेलें दिसतें. यावेळचीं पुनर्मुद्रणें पाहिलीं तर जवळजवळ दरेक पुस्तकाच्या नवावृत्तींत सशोधित ऊर्फ Revised केल्याचा कँडीचा शेराहि मुद्रित झालेला दिसून येतो. कँडी हा वस्तुत परकीय भाषेचा पाश्चात्य गृहस्थ. पण त्यानें भाषिक सुधारणा केल्या त्या मात्र अगदीं देशी भाषेच्या अभिमान्याच्या वृत्तीनें !

उदाहरणार्थ छत्र्याची 'बोधकथा' व जाभेकराची 'नीतिकथा' हीं १८३७-३८ सालचीं प्रकाशनें. परत जेव्हा तीं एकत्रित करून छापण्यात आलीं, तेव्हा त्या दोन्हीहि पुस्तकाच्या प्रथमावृत्तीतील सदोष भाषेबद्दल मेजर कँडीनें जो अभिप्राय व्यक्त केला आहे, त्यांतील चिकित्सकपणाबद्दल व वाङ्मयीन परिशीलनाबाबत खरोखरच धन्योद्गार काढावेसे वाटतात ! त्यानें या नीतिबोधकथाच्या पुनर्मुद्रणाबाबत खास पत्रें पाठवून समितीला ज्या सूचना दिल्या आहेत, त्यात पुनरुक्ति, कठीण संस्कृत शब्दांचा भरणा, क्लिष्ट आर्या वा पद्यपंक्ति, पाल्हाळिक वर्णनें वगैरे पूर्वदोष दूर करण्याबद्दल कटाक्षानें लिहिलें होतें ! तदनुसार ही भाषा पूर्वपुस्तकापेक्षा पुष्कळच सुधारलेली दिसते. खालील एका छोट्या गोष्टींतील उतारा त्या दृष्टीनें पहाण्या सारखा ठरेल.

"दोन मुलगे भाऊभाऊ एका शाळेंत विद्याभ्यास करीत असत. तेव्हा एका व्यापाऱ्यानें शाळेंत जाऊन त्यास विचारिलें, तुम्ही कोणी मजजवळ चाकरीस राहाता ? त्यांतून वडिल मुलानें त्यास पुसलें, महिना काय द्याल ? व्यापारी बोलला पांच रुपये देईन कारण कीं काम फारसें नाहीं. माझ्याबरोबर जिनसाच्या यादी मात्र घेऊन फिरत असावें. मला तुमच्या लिहिण्यावाचण्याची काहीं गरज नाहीं मुलानें उत्तर केलें, बरें तर मी आपल्या भावाशी या गोष्टीचा विचार करून काय

तें तुम्हास कळवीन. नंतर तो मुलगा आपल्या धाकट्या भावाजवळ जाऊन त्यास विचारितो, रे, ऐकतोस !" (नीतिबोधकथा : १८५६ चें मुद्रण – पृष्ठ २६)

व्याकरणदृष्ट्या यांत पूर्णविराम, स्वल्पविराम व प्रश्नचिन्ह एवढ्यांनाच प्रवेश दिसतो, तथापि भाषेंत क्लिष्टता नाहीं हें मान्य केलें पाहिजे.

इसापच्या नीतिकथा व छत्र्यांचें बाळमित्र यांच्याहि पुनर्मुद्रित आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या होत्या, त्यातहि या तऱ्हेच्या सुधारणा आवर्जून करण्यांत आलेल्या आहेत. १८५४ सालच्या कॅंडीतर्फे संशोधित झालेल्या 'बाळमित्रां'तील सरकारी निवेदन या दृष्टीनें वाचनीय ठरेल.

"कोंकणी शब्द कोठेंकोठें होते ते काढून देशभाषेप्रमाणें, कोठें दूरान्वित शब्द होते, ते जेथील तेथे समीप केले. विरामचिन्हें म्हणजे कामा फुलस्ताप, इत्यादिक, याची व्यवस्था केली, व्याकरणदोष काढले, हिंदुस्थानी अशुद्ध भाषा नीट केली, मी या तृतीयांत शब्दावर अनुस्वार वा 'म्यां' असे शब्दरूप लिहीले. दुर्बोध शब्द होते तेथें प्रायः सुबोध घातले."

कॅंडीने या शतकार्धातील हीं नवीं बालमुद्रणें छापवून देतांना किती प्रकारचें अवधान राखलें होतें हें या निवेदनावरून सहज कळून यावें ! 'भाषाशुद्धी' हाच जणूं यावेळच्या बालग्रंथाचा नवा संकल्प होता. त्याला कळून न कळून परक्या देशाच्या लोकांचें असें सहाय्य होत होतें ! मात्र अनेक पहारे चुकवून चलाख कैदी निसटून जातात तद्वत् या अनेकविध तपासणींतूनहि काहीं पूर्वीचे भाषादोष नजर चुकवून वावरत राहिलेले आढळतात. उदाहरणार्थ, १८५५ मध्यें नीतिदर्पणाची पांचवी आवृत्ति पुनर्मुद्रित झाली, त्यांत गिराहिक (गिऱ्हाईक), जिलही (जिल्हई), साहा (सहा), स्नरत (सुरत) अशीं सदोष मुद्रणें तशीच पूर्वरूपांत कायम राहिलीं आहेत. १८५७ मध्यें छत्र्यांच्या बाळमित्राची नवावृत्ति प्रसिद्ध झाली त्यातहि लाहान, ब्राह्मणपणा असे शब्ददोष आढळतात आणि ओकाची संक्षिप्त इसापनीति १८५९ सालीं कॅंडीच्या सूचनानुसार जी छापली गेली होती त्यांतहि पुंटावी, आस्वल, असरा, गद्दस्थानें इत्यादि जुनीं मुद्रितें पूर्वीच्या अशुद्ध रूपातच आढळतात, येवढेंच नव्हे तर भाषेचें प्रादेशिक व सदोष वळणहि जशेंच्या तसेंच आढळावें हें आश्चर्यच म्हटलें पाहिजे. या नवमुद्रित इसापनीतींतील हा एक उतारा त्याची कल्पना देईल.

**दोन खेकडया**

"खेकड्यांचा स्वभाव असा आहे कीं वाकडे चालत असावे. कोणा एके दिवशी एक खेकडी आपल्या लेकीस रागे भरली कीं त्वां ही सृष्टीनिराळी चाल कोठून काढली ! ही ऐक. लेक म्हणते आई माझ्या बुद्धिप्रमाणें मला नीट दिसते ते मी

करिल्ये. तुझा मर्जीस जर ते येईना तर म्या कसे चालावें तें तू स्वयें चालून दावीत मग तें पाहून मीहि तशी चालेन." (नवीन इसापनीति–पृष्ठ ४२)

यामध्यें कँडीनें उल्लेखीत केलेले 'फुलस्ताप' असले तरी 'कामा' कोठेंहि नाहीं. अवतरणचिन्हें, अनुस्वार व इतर विरामचिन्हें याना विरामच आहे. काकणी शब्द काढले असल्याचें आश्वासन असलें तरीहि ते नजर चुकून 'करिल्ये म्हणल्ये' इत्यादि रूपातून प्रत्ययास येतात. पण या कोंकणी वळणाहूनहि अधिक दिमाखाने वावरत असलेला एक दोष अनेक पुनर्मुद्रणात आढळतो. तो म्हणजे आग्लभाषी व्याकरण व भाषारचना याचें या बालगद्यावर होणारें विशोभित सस्करण हा होय. या आग्लानुवादात मूळ मजकुराचें शब्दशः रूपातर करण्यानें नेहमीच्या शब्दसुदर मराठीला ओजडपणा, विसगति व सदोष वाक्यें, अशुद्ध शब्द इत्यादि ससर्गदोष घडून तिचें मूळचें सौंदर्य विरूप झालेलें दिसतें! अनेक भाषादोष दुरुस्त करणाऱ्या कँडीला हा प्रमुख दोष जाणवलाच नसावा, कारण कँडी इंग्लिशच असल्यानें हें आग्ल वळण त्याला परकीय वाटण्याची शक्यता नव्हतीच! कारण काहीहि असो, इतर भाषादोष दूर करण्याचे जसे कटाक्षानें व साक्षेपानें प्रयत्न झाले तसे विरूप व विसगत आग्लानुवादाबद्दलच्या दुरुस्त्याचे झालेले नाहींत हें खरें. उदाहरणार्थ १८३३ साली गेस्फोर्ड साहेबानें 'बाळमित्र'चा दुसरा भाग प्रसिद्ध केला होता त्यानतर सुमारें पन्नास वर्षांनीं विनायक कोंडदेव ओक यानी तेंच पुस्तक फिरून नीट लिहून प्रसिद्ध केलें. हें भाषातर या रूपातर इतर अनेक दृष्टींनीं सरस झालें असलें तरी त्यावरील इग्रजी वळणाची दाट छाप मुळींच दूर झालेली नव्हती!

एकतर हा इग्रजीचा अनुवाद, त्यातून मूळ इग्रज गृहस्थानींच लिहिलेली प्रथमावृत्ति ओकानी सशोधित केलेली, त्यामुळें यावर दुहेरी आग्ल सस्कार झालेले हें मान्य केलें तरी ओकासारख्या सिद्धहस्त लेखकाला त्यातूनहि कटाक्षानें शुद्ध मराठीकरण करणें अशक्य थोडेंच होतें? पण या औचित्याकडे लेखकाचे दुर्लक्ष झालें आहे. त्यामुळें महाराष्ट्रीय कुलवधूनें इग्रजी फॉक घालून जनालोकात वावरावें तशी यातली मराठी भाषा परकीपरकीशी व विसगत भासते पुढील वाक्यें त्याची साक्ष देऊ शकतील.

"माझें मनात तुला राग आणावा असें जर असतें तर मी क्षमा मागितली असती."

"असो, तुला समजावें कीं, मी जें सांगते तें काही चागलें कारण असतें म्हणून."

"ल्हानग्या धन्या. फार चागलें झालें कीं तू वाचलास."

"माउप्पर हे जर तुला खरें न भासले तर मग तू हा अन्याय करतेस"

अशा प्रकारचीं वाक्यें या बाळमित्रामध्यें अनेकानेक आढळतात. आणि केवळ वाक्यांवरच नव्हे तर शीर्षकांवरहि परसंस्करणाची छटा आहेच. उदाहरणार्थ, "एक लहान हरणी, तिचें नांव यमुना", "यमा मुलगी," "रामा मुलगा" हीं शीर्षकेंहि अशरशः अनुवादित वाटतात. हें अंध अनुवादाचें प्रकरण अनेक पुस्तकांतून यावेळीं आलेलें दिसतें. ओकांचा बाळमित्रहि सरकारतर्फेंच लिहून घेण्यांत आलेला आहे. आणि भाषेबाबत 'सरकारची सूचना' त्यांना पूर्वीच मिळालेल्या होत्या असें दिसतें. प्रस्तावनेंत लेखक म्हणतात—

"ह्याचें मूळचें मराठी भाषांतर चांगलें होतेंच. आणखी त्यांत फारसा फेरबदल करावयाचा नाहीं असा करार आहे, तरी त्यांत क्वचित् कोठें कमजास्त करून सध्यांच्या भाषापरिपाठास मिळे अशी ही प्रत मी शुद्ध केली आहे."

(बाळमित्र : प्रथमावृत्ति १८९०)

अर्थात् भाषाशुद्धीकरणाचें लेखकाला फारसें स्वातंत्र्य नव्हतें हें यावरून स्पष्ट होतें. तथापि वरील वाक्यांसारखी बोजड वाक्यें वा मजकूर काढणें लेखकाच्या स्वाधीनचें होतें, तिकडे लक्ष पुरवलें गेलें नाहीं, असा निष्कर्ष काढावा लागतो.

या जुन्या बालपुस्तकांचें पुनर्शोधित मुद्रण चालू असतांच बालसाहित्याच्या प्रगतीस अनुकूल व उपकारक अशी एक विशेष घटना घडली, ती म्हणजे मुलांच्या शाळांतून इयत्तावार क्रमिक पुस्तकें असावींत व तीं मुलांच्या ग्रहणशक्तीला पेलतील अशा सोप्या भाषेंत मुद्दाम तयार करवून घ्यावींत, या बोर्डाच्या कल्पनेला चालना मिळून १८५४–५५ सालीं ती कल्पना साकारहि झाली. समितीचेच एक सदस्य विनायक कोंडदेव ओक यांच्या सहकार्यानें हीं मराठी क्रमिक पुस्तकें समितीनें तयार करवून घेतलीं व लगेच तीं शालेय पाठ्यपुस्तकें म्हणून नेमलीं गेलीं.

शालेय पुस्तकें क्रमवार लिहून घेण्याचा या प्रथेचा एक हृद्य परिणाम म्हणजे *विदुरनीति, वेताळपंचविशी, सिंहासनबत्तिशी अशा अद्भुत व मुलांस अयोग्य* ठरणाऱ्या विषयावरील पुस्तकांतून शालेय विद्यार्थी मुक्त झाले! अर्थात् ही मुक्तता एकदम झाली नाहीं. प्रथम विदुरनीति व पंचोपाख्यान हीं शालेय क्रमांतून काढून टाकण्यांत आलीं व नतर कांहीं वर्षांनी सिंहासनबत्तिशी व वेताळपंचविशी यांचेंहि उच्चाटन झालें! एकपरीनें विद्यार्थ्यांवर हे बोर्डाचे मोठे उपकारच झाले!

येथून पुढें बालसाहित्यास एक वेगळी व प्रगतिपर दिशा लागली. शालेय पुस्तकें व ललित बालसाहित्य यांची दालनें स्वतंत्र व भिन्नरूप झालीं. पहिल्या पंचविशींत बालसाहित्याला क्रमिक शालेय पुस्तकाची चौकट आंखली गेली होती. ते निर्बंध आतां राहिले नाहींत ही केवढी समाधानाची गोष्ट! एखादें अनाथ मूल परक्या घरीं जसें उपेक्षेनें वाढत असावें, तद्वत् आजवर बालसाहित्याच्या नशिबी

शालेय प्रतिग्रंथाचा वनवास होता तो यापुढें संपला, परधार्जिणेपणाची सक्ति होती तीहि खलास झाली व स्वतंत्र पुस्तकें नव्या उमेदीनें प्रसिद्ध होऊं लागली. बाल-साहित्याच्या उर्जितकालाची ही पहिली निशाणी. बालवाचकाच्या दृष्टीनें यावेळीं आणखीही एक मोठी औचित्यपूर्ण सुधारणा बालपुस्तकांत घडवून आणण्यात आली. आजवर क्रमिक पुस्तकें म्हटलीं, कीं त्यांतून नीतिपाठ व बोधाचें बाळकडू देणें आवश्यकच, अशीं सर्वांचीच-प्रकाशक, जनता व वाचक यांची – समजूत असे. विद्याखात्याचीही मनोधारणा याला अपवाद नव्हती. त्या खात्यातील अधिकारी तर यासंबधीं मुद्दाम ठरावहि करीत असत. उदा. दामल्यांच्या नीतिबोधावर पुढील सरकारी ठराव ध्येयवाक्य म्हणून दिलेला आहे—

" उपदेशाच्या अथवा उदाहरणाच्या योगानें मुलांच्या वर्तनावर संस्कार होईल अशा प्रकारचीं पुस्तकें शाळांत चालविलीं असतां शिक्षकाविषयी मुलांची पूज्यबुद्धि वाढत जाऊन नीतीचा प्रसार अधिक होईल असा संभव आहे. "

अशा प्रकारचीं उपदेशप्रधान पुस्तकें मुलांच्या अभ्यासक्रमांत असावींत, हा शाळाखात्याचा आग्रहच असायचा. पण हे उपदेशाचें उपायन प्रमाणाधिक्यानें मुलांना नकोसें होणें स्वाभाविकच होतें. एकतर त्यानें रंजनालाहि रुक्षतेचा लेप चढतो व दुसरें, जिथें आधींच अभ्यास गणली गेलेली रंजक पुस्तकेंहि मुलांना नावडतीं होतात, तिथें हा पोरांना जागोजाग उभे करून दटावणारा वृद्धवृत्तीचा उपदेश असल्यावर त्या पुस्तकाकडे दृक्क्षेपहि नको, असें वाटणें सहजच. ही गोष्ट समितीच्या लवकरच ध्यानीं आली, हें त्याकालच्या विद्यार्थ्यांचे सुदैवच! हरी केशवजी पाठारे यांचेकडून पुस्तक लिहून घेतानाच समितीनें 'या पुस्तकांत केवळ नीतीची रुक्ष चर्चा नसावी' अशी सूचना दिलेली होतीच. हळुहळू समितीचें मत त्याबद्दल दृढ झालें व क्रमिक पुस्तकांतून अतीव नीतीपाठ देण्यानेंच मुलांना चांगलें नैतिक वळण लागतें, या समजुतींतील भ्रामकपणा विद्याखात्यास जाणवूं लागला. यापुढें नव्या शालेय पुस्तकांतून नीतीबोधाचें अतिरिक्त वर्णन येईनासें झालें! शतकाच्या शेवटीशेवटीं ही सुधारणा अस्तित्वांत आली व बालसाहित्याच्या मानेवर लादलें गेलेलें हें ओझें दूर झालें!

यावेळीं एज्युकेशन बोर्डाचें भाग्यहि बालपुस्तकांप्रमाणें उदयास येऊं लागलेलें दिसतें. कारण शतकाच्या पूर्वार्धांत ज्याप्रमाणें बापू छत्रे यांची अजोड जोड समितीला लाभली होती त्याचप्रमाणें या उत्तरार्धांतहि दोन निष्ठेचे बालसाहित्यकार या संस्थेच्या छत्राखालीं आले, ते म्हणजे हरि कृष्ण दामले आणि विनायक कोंडदेव ओक हे दोने होत. पैकीं ओक हे १८६१ ते १८९५ पर्यंत शिक्षणखात्यांत शिक्षक व असिस्टंट एज्युकेशनल इन्स्पेक्टर होते. या अवधींत क्रमिक पुस्तकांखेरीज त्यांनीं काहीं उत्तम अशीं बालपुस्तकेंहि कँडीच्या सूचनानुसार लिहिलीं. या पुस्तकांत

'हिंदुस्थान कथारस', 'हिंदुस्थानांतील योद्ध्यांच्या थोरवींच्या गोष्टी,' इत्यादि ऐतिहासिक पुस्तकें होतीं, 'मदनमणिमाला' इत्यादि चरित्रें होती, 'शिरस्तेदार,' 'मुलास उत्तम बक्षीस,' 'मुलाचें कल्याण,' 'मुलांस थोडासा बोध,' 'इसापनीति' इत्यादि त्यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. मराठी बालसाहित्यास त्यांनीं जवळजवळ पन्नास बालपुस्तकांची देणगी दिली, आणि मराठी बालमासिकाचा नवा संप्रदाय यांनीच सुरू केला. म्हणून बालसाहित्य–विकसनाच्या इतिहासांत ओकांचें नांव अविस्मरणीय होऊन राहिलें आहे.

दुसरे ओकांसारखेच निष्ठेचे बालसाहित्यकार हरि कृष्ण दामले. यांनींहि या काळांत बालपुस्तकें वैपुल्यानें लिहिलीं व त्यांत विविधता आणण्याचाहि यथामति प्रयत्न केला. मात्र या दोन्ही लेखकांचें लेखन पाहतां एक गोष्ट खटकतेच. नवीन पुस्तकें या दोघांनी *लिहिली खरी, पण तीं अशी भाषांतरितच कां ? आणि तें* भाषांतर इंग्रजी ग्रंथाचेंच काय म्हणून अधिकांश केलें ? संस्कृत, हिंदी ग्रंथांचें वा गोष्टींचें कां झालें नाहीं ? हा विचार वारंवार जाणवतो. पण त्याला योग्य उत्तर नाहीं. झालें नाहीं एवढें खरें !

बरें, हीं पुस्तकें भाषांतरित खरी, पण तींही नव्या कालानुसार नव्या निवडीनें पसंत केलेली तरी असायची होती ? तसेंही नाहीं. ओकांनीं परत पूर्वप्रकाशित इसापनीति व बाळमित्र हींच पुस्तकें पुनर्लेखनासाठीं योजिली तर दामल्यांनीं मॉरल क्लास बुक्चेंच आणखी एक रूपांतर 'नीतिबोध' या नांवानें प्रसिद्ध केलें. बहुधा या दोषाचा वाटा एज्युकेशन बोर्डाकडेच द्यावा लागेल, कारण त्यांच्यातर्फेच ही पुस्तकें प्रसिद्ध झालीं होतीं. परभाषिकपणाचा वारसाहि या नव्या नीतिबोधानें हरी केशवजीच्या शालोपयोगी नीतिग्रंथांतून जसाचा तसा उचलल्यासारखा वाटतो. त्यांतील मूळ गोष्टींचें भाषांतर यांत कायम आहेच पण नीतिबोधांत मूळ पुस्तकाखेरीजचे जे अनेक पाठ व गोष्टी घातल्याचें लेखकाने आवर्जून उल्लेखित केलें आहे, त्या सर्व गोष्टीही खास करून परदेशीयच आढळतात. मराठी भाषेच्या त्या वर्धनकालांत भाषांतराखेरीज इतरही ज्या गोष्टी लेखकाला यांत दाखल कराव्याशा वाटल्या त्यांतील बहुतांशकथा 'जॉर्ज ड्रमंड, मासिडोनियाचा राजा फिलिप, टॉमस क्लार्कसन इत्यादि व्यक्तींच्या व परदेशी बाणाच्याच कां असाव्यात ? इकडे काय नीतिकथांची वा थोर सत्पुरुषचरित्रांची वाण थोडीच होती ? पण हें वाचकांना जाणवून उपयोग काय ? खुद्द ग्रंथकाराला याबद्दल मुळीच कांहींएक वावगे नव्हतेसें दिसतें ! त्यांनीं तर या संभाव्य आक्षेपाला नीतिबोधाच्या प्रस्तावनेंत पुढीलप्रमाणें उत्तरही देऊन टाकलेलें आहे.

"आतां कोणी म्हणतील कीं, या सर्व गोष्टी आपलेकडच्या असत्या तर याहून चांगलें झालें असतें. पण मूळ ग्रंथकाराच्या देशांतील विद्याप्रसार, उद्योग,

ऐश्वर्य इत्यादिकाच्या योगानें पाहिजे त्या विषयावर हवी तितकी उदाहरणें जशी त्या ग्रंथात देता आलीं आहेत तशी इकडे सापडणें बरेंच कठीण झालें आहे. "

( नीतिबोध–मूळ प्रस्तावना )

लेखकाचें हें समर्थन विचारी लोकाना मान्य होण्यासारखें आहे काय ? इकडे भारत, भागवत व रामायण या धर्मग्रंथातून नीतिकथांचा वैपुल्यानें आढळ होत असता, आणि संतवाङ्मयातून तर खास नीतिबोधाचेंच सोदाहरण विवेचन कथारूपानें जनतेसमोर असताही लेखकास मात्र इकडे तशी उदाहरणें सापडणें 'बरेंच कठीण झालें !' याचा इत्यर्थ इतकाच कीं, या सर्व पुस्तकाचे प्रेरक, निर्माते व प्रकाशक हे सर्व परदेशीय लोकच होते व विद्यार्थीहि सर्वस्वी त्याच्याच अधिकारात असलेले, तेव्हा त्यांच्यातर्फे मुद्दाम लिहून घेतल्या जाणाऱ्या पुस्तकातून तद्देशीय कथांची भरती अधिकाश असावी हें क्रमप्राप्तच ! आणि असें पूर्णतया परकीय पुस्तक असूनहि त्याच्या १९१० सालापर्यंत सहा आवृत्त्या निघाव्या ही पुस्तकाच्या दुर्मिळतेचीच एक साक्ष म्हणावी कीं लोकप्रियतेची ?

पण ही एक बाब वगळून बोलावयाचें तर दामल्याची भाषा पुष्कळ सुबोध होती व बालसाहित्याची जी भाषांतरित शाखा पहिल्यापासून इकडे मूळ धरून वर्धित होत होती तिला दामल्यांनी चांगलेंच नावारूपास आणलें व अनेकानेक लहान मोठीं बालपुस्तकें रूपांतरित केलीं. त्या सर्वांचा विशेष हा कीं, त्यातले विषय बालसुलभ व अनेक प्रसंगी बालजीवनावर असलेलेच निवडल्यात आले होते. आणि या उत्कृष्ट निवडीबद्दल दामल्याना धन्यवाद द्यावेसे वाटतील एवढी हीं पुस्तकें बालोचित ठरलीं. त्यांचा बालवाङ्मयाबाबतचा दृष्टिकोन या छोट्या छोट्या पुस्तकाच्या निवेदनातून वारंवार प्रकट झालेला आहे, तोही लक्षणीय ठरेल. उदाहरणार्थ, 'नऊ रत्नें' या छोट्या पुस्तकातील निवेदनात लेखक म्हणतात–

" 'किंडरगार्टन् सिस्टीम' या नावाचा एक ग्रंथ नुकताच माझे पहाण्यात आला. या ग्रंथात वास्तविक व्यवहारोपयोगी जें शिक्षण, त्याची मुलास लहानपणापासून गोडी कशी लावावी हें फारच सुरेख रीतीनें सांगितलें आहे. ते धडे यथामति या पुस्तकात आपल्या इकडील पद्धतीस अनुसरून लिहिले आहेत. "

( प्रथमावृत्ति १८८९–प्रस्तावना )

हा दृष्टिकोन आज पाऊणशें वर्षें उलटलीं तरीहि बालसाहित्याला पोषकच ठरणारा नव्हे काय ? हरीपंत दामल्याच्या 'सुबोध गोष्टी' नावाच्या छोट्या रूपांतरित पुस्तिकाही अशाच सद्हेतुपूर्ण लिहिल्या गेल्या व त्यातही लेखकाचें मनोगत " मुलास बोध व करमणूक होऊन वाचनाची गोडी लागावी या उद्देशानें लिहिलें " या आगळ्या शब्दात प्रकट झालें आहे. या नवनिर्मितींत आणखी एक विशेष

उल्लेखनीय ठरेल, तो म्हणजे मुलांच्या प्रवृत्तीकडे व ग्रहणक्षमतेकडे आजवर कोणा लेखकाचें लक्ष पोहोंचलेलेंच नव्हतें, पण हीं छोटीं पुस्तकें लिहितांना तिकडे अवधान दिलें गेलेलें दिसतें. एवढें बिचाऱ्या बालवाचकांकडे आजवर सहानुभूतीनें पाहिलें होतें कोणी? 'सायंकाळची करमणूक' यांतील निवेदनांत लेखक म्हणतात—

"सायंकाळीं मुलें घरीं आलीं, त्यांजकडून यांतील एक एक धडा वडील माणसांनीं वाचवून त्यावर चर्चा करविली असतां फार चांगला उपयोग होण्यासारखा आहे व तसा तो झाल्याचें ऐकिल्यास मी माझ्या श्रमाचें साफल्य झालें असें समजेन."

आणि म्हणून या शतकार्धाचें शेवटचें दशक दामल्यांनीं संस्मरणीय केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

बालांसाठीं स्वतंत्र प्रज्ञेनें लिहिणारे लेखक अद्याप नव्हते. पहिल्या पंचविशी-नंतर विष्णुशास्त्री बापट हेच एकुलते एक स्वतंत्र बालपुस्तकाचे निर्माते, त्यांत या कालखंडांत थोडी सुधारणा झाल्याचें दिसतें. आणखीहि कांहीं लेखक स्वतंत्र पुस्तकें बालांसाठीं लिहूं लागले त्यांच्या या नव्या पावलांची चाहूल १८६० सालीं वाजूयाला लागली. रामजी बिन् गणोजी चौगुले नांवाच्या गृहस्थांनीं 'नारायणबोध' नांवाचें एक बालपुस्तक लिहिलें तें स्वतंत्र होतें. म्हणायचें बाल पण त्याचा आकार बृहत्कथेचा होता, म्हणजे साडेचारशें पृष्ठांचा! आकारमानांत ते जणूं पहिल्या बाळमित्राचे मित्रच होते!

या पुस्तकांत एका पित्यानें आपल्या नारायण नामक पुत्रास उपदेशात्मक गोष्टी सांगितल्या आहेत. उपदेश, बोध, नीति हें बालांचें प्रमुख उपायन ही समजूत पूर्वीपासूनच दृढावलेली. या पुस्तकांत तर ती कटाक्षानें अमलांत आणली आहे. कारण याचें नांवच मुळीं बोधात्मक नाहीं काय! पूर्वलेखनाची अनेक वैशिष्ट्यें यांतून प्रकटलेलीं आढळतात. दरेक धड्याच्या सुरुवातीला एकादा उद्‌बोधक श्लोक नाहींतर आर्या देण्याची पद्धत छत्र्यांच्या बोधकथेपासून सुरू झाली ती यांतही अवलंबिली आहे. भाषा शुद्ध मराठी अर्थात् पूर्वसूरींनीं घालून दिलेल्या वळणाचीच. तथापि त्यांत इंग्रजी शब्द बिल्कुल नाहींत हा एक गुणच म्हणावा लागेल. हें लेखन आटोपसर नाहीं, बालरंजकदेखील नाहीं, पण प्रथम प्रयत्नांतून असेच दोष आढळायचे! मुद्रणदोष तर अनेक आहेत. कांहीं सदोष शब्दही आढळतात पण त्याचें प्रमाण उषःकाल झाल्यावरहि कांहीं घरांतून अनवधानानें मिणमिणीत दिवे चुकून राहावे येवढेंच दिसतें!

स्वतंत्र लेखनांत गणेश महादेव गोडबोले यांच्या 'बोधकथा' याहि पुस्तकाचा उल्लेख अवश्य आहे. १८६७ सालीं हें छोटेंसें पुस्तक प्रसिद्ध झालें. छपाई शिळा-प्रेसची, तथापि मुद्रणदोष मात्र पूर्वीइतक्याच प्रभावानें वावरतांना दिसतात व

त्यामुळें वाचतांना मनात बराच प्रतिकूल भाव उत्पन्न होतो. हें स्वतंत्र पुस्तक, तेव्हां कॅंडीची भाषा–शुद्धीकरण योजना व्हायपयेन पोंचली नव्हती. त्यामुळें 'वादया, आतःकर्ण, मुशाफर, शेवक' असे सदोष शब्द तर राहिलेच; पण शुद्धलेखनाच्यादि चुका इतक्या राहिल्या आहेत कीं, त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंतूनहि दिसतील. उदाहरणार्थ—

"सुचना या पुस्तकांत बहुतकरून निती आणि बोधपर सर्व गोष्टी आहेत त्या लहान मुलांस आभ्यासाच्या फार उपयोगी आहेत" इत्यादि वाक्यें नमुन्यादाखल पुरेशी आहेत. त्यांतील गोष्टी इसापकथांवारल्याच (तात्पर्यांसुद्धां!) छोट्या रचलेल्या. पण आशय चांगला असूनही मांडणी योग्य नसल्यानें हें पुस्तक फारसें कीर्तिमान ठरूं शकलें नाहीं.

याच सुमारास 'बालकास हितोपदेशाच्या कथा' नांवाचें एक स्वतंत्र पुस्तक प्रसिद्ध झालें. त्याचा विशेष हा कीं तें मोडींत छापलें आहे! आधींच उपदेश अन् तोही मोडींतून! तेव्हां याही पुस्तकाचें नीटसें स्वागत मुलांनीं केलें नाहीं यांत नवल नाहीं. पण ग्रंथकर्त्यास त्याचें फारसे प्रयोजन नव्हतेंच, कारण पुस्तकाचे नावावरून जरी हा 'ग्रंथ बालकासाठीं असल्याचें ध्वनित केलें असलें तरी 'समापनेंत' लेखकानें "ह्या देशाचे लोकांची रीती सुधारावी आणि त्यास राज्यकारभारासंबंधीं व इतर व्यवहारासंबंधी नीतिज्ञान होऊन त्यांनीं प्रामाणिकपणानें चालावें" या अभिप्रायानेंच ग्रंथरचना केल्याचें नमूद केलें आहे. जवळजवळ पूर्वी नीतिदर्पण या पुस्तकांतून आलेल्या 'दृष्टांतिककथां'चीच परंपरा या पुस्तकानें चालविली आहे व एवढेंच केवळ नव्हे तर त्यांतील नांव बालांचें व लेखन प्रौढांचें हीहि प्रथा यांत नकळत अनुसरली गेली आहे! शिवाय हें स्वतंत्र पुस्तक असूनहि निवेदनांत लेखकाची जीं मतें स्पष्ट झालीं आहेत त्यावर परधार्जिणेपणाचा अगदीं ठळक पगडा दिसतो. एकंदरींत स्वतंत्र निर्मिती हाताबोटांवर मोजण्याएवढीच — फार काय अनामिका सार्थ ठरण्याइतकी अल्प दिसते या कालात. आणि तिचें स्वरूपही नितळ नव्हे! निर्दोष वा बालसुलभ भाषा नाहीं, बालयोग्य आशय नाहीं, रंजकतेकडे दुर्लक्ष व पुस्तकाची आकर्षता वाढवण्याची कथनशैली वा सजावट यांचा संपूर्ण अभाव, अशीच हीं स्वतंत्र प्रकाशनें होती, हें नाइलाजानें मान्य करावें लागतें. शिवाय बोजड उपदेशाचें ग्रहण या सर्व स्वयंनिर्मितीला लागलेलें! तेव्हां या पुस्तकाऐवजीं इंग्रजींतून रूपांतर होऊन मराठींत आलेल्या रंजक कथापुस्तकांचेंच त्यावेळच्या बालवाचकांना अधिक आकर्षण वाटावें यांत मुळीच नवल नाहीं.[१] फक्त आशादायी भाग एवढाच

---

१ अर्वाचीन मराठी साहित्य (नेने संपादित) पृष्ठ ३५
"उन्हापेक्षां वाळू अधिक तापावी त्याप्रमाणें पूर्वीच्या स्वतंत्र पौराणिक व धार्मिक पद्यमय मराठी कथेपेक्षां यावेळची भाषांतरीत गद्यकथाच अधिक चरकदार निघाली आहे."

कीं स्वतंत्र बालनिर्मिती सुरू झाली. एक नवी पाऊलवाट रेखाटली गेली व ती अभ्युदयाकडे नेणारी होती येवढेंच समाधान !

यानंतर हळुहळू इतर प्रकाशनसंस्था उदयास येऊं लागल्या व पुष्कळ लेखक स्वतंत्र तऱ्हेनेंहि पुस्तकें लिहूं लागले. त्यांत कांहीं बालपुस्तकेंहि अवश्य होतीं. मात्र स्वतंत्र पुस्तकें लिहिलीं गेलीं याचा अर्थ बोर्डाच्या आदेश वा प्रेरणेशिवाय, एवढाच. शिक्षणखात्याचें, इंग्रजीवरून मराठी बालपुस्तकें तयार करण्याचें धोरण होतें, त्यांत मात्र बदल नव्हता. उलट या इतर लेखकांनीं बालवाङ्मयाची ही रूपांतरित शाखाच अधिक निष्ठेनें संपन्न केलेली दिसते. १८७५ सालीं गोविंदशास्त्री बापट नांवाच्या गृहस्थांनीं 'सँडफोर्ड अँड मर्टन' या पुस्तकाचें मराठी रूपांतर 'हरी आणि त्रिंबक' या नांवानें लिहिलें. १८८१ सालीं 'ब्यूटी अँड द बीस्ट' या अद्भुतकथेचें रूपांतर 'सुंदरी आणि आस्वल' या नांवानें प्रसिद्ध झालें व नंतर अद्भुतकथांची आणखीहि रूपांतरें प्रकाशित झालीं. युरोपांतील वनदेवतेच्या गोष्टी, लावण्यलतिका अथवा कळसूत्री घोडा, बंगालदेशाच्या एका सुंदर राजकन्येची मनोरंजक गोष्ट, एव्हनो, हरी कृष्ण दामल्यांचे गलिव्हरचे वृत्तांत–४ भाग, पागनीसकृत गिलब्लास चरित्र व पॉल आणि व्हर्जिनीया हीं तर सरळ भाषांतरेंच शतकाचे शेवटीं–शेवटीं प्रसिद्ध झाली होतीं. अशी या कालखंडांतील पुस्तकांची कितीतरी नांवें सांगतां येतील. अर्थात् या सर्वांतील आज फारच थोडी उपलब्ध आहेत, पण जीं आहेत त्यावरून कांहीं महत्त्वाचे निष्कर्ष निघतात.

इंग्रजी भाषांतराची ही शाखा बालसाहित्यांत जोमानें वाढत चालली हें खरें, परंतु या सर्वच पुस्तकांच्या साकल्यानें विचार केला तर हीं सारीं भाषांतरें बालवाङ्मय या सदरांत येतात कीं नाहीं, याचाच निर्णय करणें अवघड ! गोष्टींचे विषय बालप्रिय ठरणारे. परंतु विस्तार, वर्णनें, भाषा, प्रसंग हीं 'प्रौढबोध' या सदरांत जमा होणारीं असाहि प्रकार या रूपांतरांतून वारंवार दृष्टीस येतो. पाश्चात्य लोककथा व इतर गोष्टी मराठी साहित्यांत रूपांतर करून येऊं लागल्याची ही प्रथमावस्थाच म्हटली पाहिजे.

हीं बहुसंख्य पुस्तकें स्वतंत्र प्रज्ञेऐवजीं परसंस्करणांतून निर्माण झालीं असल्यानें इंग्रजी भाषेच्या घडाईची व व्याकरणाची दाट छाप त्यावर होती हें मागें उद्धृत केलेंच आहे. पण इंग्रजीचेंच यांत केवळ अंधानुकरण होतें असें नव्हे तर त्या संसर्गानें मराठीचेंहि रूप पुष्कळच विसंगत, सौंदर्यहीन आणि धेडगुजरी होऊं लागलें होतें. यावेळच्या लेखकांनाहि या भाषिक उणीवा खपत होत्या असें दिसतें. कारण यावेळची जो बालसाहित्याची निर्मिती इकडील मराठी लोकांकडून झाली त्यांतल्या कित्येक पुस्तकांच्या प्रस्तावनांतून ग्रंथकर्त्यानें स्वतः भाषिक प्रगतीच्या

दृष्टीनेंही कांहीं विचार मुद्दाम नमूद केलेले आढळून येतातच. उदाहरणार्थ, कै. दामले 'नीतिबोध'च्या प्रस्तावनेंत म्हणतात--

"मॉरल क्लास बुकाचें एक भाषांतर पुष्कळ वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेलें आहे. परंतु तें केवळ शब्दशः केलेलें असून त्यावेळच्या व हल्लींच्या मराठी भाषेच्या स्थितीचा विचार केला असतां हल्लीं त्या पुस्तकाचा उपयोग मूळ इंग्रजी ग्रंथ शिकणाराशिवाय दुसऱ्यास फारसा होण्यासारखा नाहीं...."

पूर्वी ज्याची निर्दोष भाषांतराबाबत ख्याति, त्याच हरी केशवजीच्या भाषेबद्दल हा सुमारें पन्नास वर्षांनीं दिला गेलेला अभिप्राय. 'हरी आणि धाकट' (१८७१) या पुस्तकाच्या कर्त्यानें "भाषादृष्टीनें पुस्तक गोड वाटावें म्हणून मुळांतल्या इंग्लिश पुस्तकांतल्या लहानलहान गोष्टी काढून टाकल्या व कांहींचें रूपांतर केलें असल्याचाही" उल्लेख आवर्जून केलेला दिसून येतो. गोष्टींच्या व्याप्तीबद्दलच ही शुद्धीकरणाची मोहीम होती असें नव्हे, तर पहिल्या पन्नाशींत दरेक बाल पुस्तकांतील गोष्टींच्या माथीं मारली गेलेली तात्पर्येंहि फार रसहानिकारक असल्याची जाणीव लेखकांना होऊं लागली व त्यांतही योग्य ते फरक करण्यांत आले. विनायक कों. ओक आपल्या इसापनीतीच्या उपोद्घातांत म्हणतात—

"ज्या भाषांतरावरून कै स. का. छत्रे यांना हा ग्रंथ मराठींत उतरलेला आहे, त्यांत गोष्टींच्या खालीं मोठमोठीं तात्पर्यें असून तशींच तीं बहुधा मराठींत उतरलेलीं आहेत. हीं तात्पर्यें इतकीं लांबलचक किंवा मुळींच नसावींत, व फार झालें तर अगदीं थोडीं गोष्टींतल्या गोष्टींतच असावीं असें पुष्कळांचें मत आहे, त्यास अनुसरून नवीन धर्तीवर लिहिलेल्या या पुस्तकाचा पहिला भाग छापला."

"तात्पर्य" असें कीं, गोष्टींच्या मागें लागलेलें हें अनवश्यक व बोजड तात्पर्यांचें शेंपूट नष्ट होण्याचीं सुचिन्हें दिसूं लागलीं! बालवाङ्मयांतील ही एक इष्ट अशीच सुधारणा म्हटली पाहिजे व त्याला तत्कालीन एका लेखकानें चालना दिली हें विशेषच महत्त्वाचें!

हरीपंत दामल्याच्या गलिव्हरच्या वृत्तांताचा दुसरा भाग १८८९ सालीं प्रसिद्ध झाला. त्यांतील प्रस्तावनेंत भाषेसंबंधीं पुढील उल्लेख आढळतो—

"पहिले भागाचें भाषांतरांतील कित्येक शब्द व वाक्यें यासंबंधीनें कांहीं उपयुक्त सूचना, दाजीबा पांडुरंग शिक्षणखात्याचे मराठी ट्रान्स्लेटर यांनी मे. चॅटफील्डसाहेब बहादुर विद्याखात्याचे डायरेक्टर यांचेमार्फत केल्या होत्या. त्याबद्दल आभार मानून हा भाग तयार करतांना सदर्हू सूचनांकडे लक्ष दिलें आहे."

बहुधा दादोबा पांडुरंगांच्या नजरेमुळेंच या ग्रंथांची भाषा मान्यवर ठरली असें दिसतें.

अर्थात् या लेखकांचे विचार प्रगट झाले आहेत ते फक्त अनुवादित बालपुस्तकांच्या निवेदनांतूनच, त्यामुळें त्यांचें स्वरुप फक्त मराठी भाषांतर कसें असावें येवढ्यापुरतेंच पर्याप्त असावें हें साहजिकच – पण रूपांतर – भाषांतरावेरीज मराठीचीं जी साहित्यमूल्यें होतीं त्यांचा विचार त्यावेळच्या कांहीं नामवंत लोकांकडूनहि झालेला दिसून येतो.

भाषेच्या सरमिसळीचा व परकीय अनुकरणाचा प्रश्न विद्वानांना जाचीत होता, याचें आणखी एक ठळक प्रत्यंतर तत्कालीन एक भाषाप्रेमी पंडित विष्णु शास्त्री चिपळूणकर यांच्या लेखनांतून स्पष्ट झालें आहे. रासेलस हें त्यांनें रूपांतरित पुस्तक १८७६ साली प्रसिद्ध झालें. त्याच्या प्रस्तावनेंत विष्णुशास्त्री म्हणतात–

" मराठी भाषेच्या सरणीस इंग्रजी ग्रंथांतील विचार कसे उतरावे म्हणजे मुळांतील अर्थात् उणेंअधिक कोठें घालावें, कोणत्या ठिकाणीं कसा फेरफार करावा वगैरे ज्या नानाप्रकारच्या युक्त्या भाषांतरकारास प्रसंगवशात् लढवाव्या लागतात त्याची समजूत पुढील ग्रंथावरून बरीच पडेल असा भरवंसा आहे. तसेंच शब्दाचें व अर्थाचें सौष्ठव व स्वारस्य हींहि मराठी अभ्यास करणारास लक्षपूर्वक वाचनान्ती कळण्यासारखीं आहेत. "

भाषेचें सौष्ठव व स्वारस्य ! अगदींच नवे आणि मोलाचे अलंकार होते ते ! यावेळच्या परकीय वळणानें माखित बालसाहित्यसृष्टीला त्यांचें वावडेच होतें पण तिकडे या विद्वान गृहस्थांचें लक्ष गेलें हीच भाषेच्या उत्कर्षाची नवी निशाणी नव्हती काय ?

एकोणिसाव्या शतकाचा उत्तरार्ध बालसाहित्यवर्धनाच्या दृष्टीनें असा विकसनाच्या मार्गावर होता. या पन्नाशींत दोनचार घटना अशा घडल्या कीं त्यांनीं बालसाहित्याचें भवितव्य उज्ज्वल होण्याची ग्वाही दिली. पहिली म्हणजे शालेय पुस्तकें व बालसाहित्य यांच्या कक्षा भिन्न झाल्या व शिक्षणखात्यानें इतर बालप्रकारानें स्वतः काढणें वा लिहवून घेणें स्थगित केलें. दुसरी गोष्ट भाषांतराची शाखा समृद्ध झाली आणि त्यांत भाषिक सुधारणा घडवून आणण्याचे मनःपूर्वक प्रयत्न झाले, आणि थोडक्याशा कां होईना पण स्वतंत्र बाललेखन करणाऱ्या लेखकांचा उदय झाला हीहि कमी महत्त्वाची गोष्ट नव्हे. प्रज्ञावंत बालसाहित्यकारांच्या स्वतंत्र निर्मितीचीं पाउलवाटच तिनें रेखली असें म्हणावयास हरकत नाहीं.

पण या सर्वांत टळकपणें नजरेंत भरणारी अशी आणखीहि एक आशादायी घटना घडली व तिनें बालसाहित्यात एक नवी प्रसन्न व सफल शाखा निर्माण केली. ती म्हणजे बालवाचकाची वाढती गरज ओळखून या शतकार्धांत शेवटीं काहीं बाल मासिकांची निर्मिती झाली व त्यामुळें अनेक बाललेखनकर्त्यांच्या प्रतिभेला नवें आवाहन मिळालें एवढेंच नव्हे तर बालायोग्य लेखनाच्या अनेकानेक नावीन्यपूर्ण आणि चित्तवेधक प्रकाराचा उदय झाला. बालसाहित्यास मोहक भरदारपणा या नव्या घटनेनें प्राप्त होण्याची शक्यता दिसू लागली! तो सारा इतिहास स्वतंत्र प्रकरणातून पहाणेंच अधिक इष्ट ठरेल!

●●●

## बालमासिकांचें क्षेत्र

बालपुस्तकें प्रसिद्ध होऊं लागल्यानंतर आणखी एक महत्त्वाची जाणीव बाल-साहित्यप्रेमी जनतेस झाली. मोठ्या वाचकांसाठीं वर्तमानपत्रें व मासिकें निघालीं, पण बालोचित मासिक वा पाक्षिक एकहि नव्हतें, तें असावयास पाहिजे हें लक्षांत घेऊन कांहीं व्यक्तींनीं तें कार्य मनःपूर्वक स्वीकारलें त्यांतील कांहीं मासिकें आज-पर्यंत टिकून राहून 'रौप्यमहोत्सवाचा सोहळा' पहाण्याच्याहि मार्गावर आहेत. सगळ्याच बालमासिकांची एवढी ताकद नसल्यानें कांहीं दारिद्र्याच्या मनोरथांप्रमाणें उत्पन्न झालीं व इतिहासांत विलीन झालीं, हे खरें परंतु त्यांनीं आपल्या अस्तित्वानें बालवाचकांची एक नवी सोत्सुक पिढी निर्माण केली ही निर्विवाद गोष्ट. बालनियत-कालिकाची कल्पना सुंदरच होती; बालहितकर होती; पण मराठी बालमासिक काढण्याचा अग्रमान घेतला अमेरिकन मिशनने !

इंग्रजी अनुवादानें सुरू झालेल्या बालवाङ्मयाला ही घटनाहि साजेशी वे सुसंगतच म्हणावयाची ! या मासिकाचे नांव 'बालबोध मेवा' असें होतें. १८७२ सालीं तें सुरू झालें. प्रथम कोणी मिशनरी स्त्री तें चालवीत असे, पण परिस्थितीच्या झंझावातांत सांपडून १९१० सालीं तें बंद करण्यांत आलें. सुमारें १४ वर्षांनीं 'ट्रेझरचेस्ट' या मासिकाच्या वतीनें ते डॉ. एमिली बिसेल यांच्या संपादकत्वाखालीं परत सुरू झालें. याचा वाचकवर्ग बहुतांशीं खिस्ती मुलांमुलींचाच गृहीत धरला असल्याकारणानें खिस्ती धर्मविषयक गोष्टी त्यांत नेहमीच प्रामुख्यानें दिसाव्य, यांत नवल नाहीं. येशू खिस्ताच्या पुनरुत्थानासंबंधीं धडे व बायबलमधील सुभाषितें, उपदेश ही तर यांत नित्य असावयाचींच, पण आंतील मजकुरावरहि धार्मिक छटा अधिकाधिक गडद होत चाललेली दिसून येते. पुढील एक छोटा उतारा त्याचे प्रत्यंतर पटवील:—

" हे थोर प्रिय बापा ह्या नवीन वर्षाबद्दल आम्ही तुझी प्रजा आज तुझी स्तुती करतो. तू आम्हास नववर्ष देत आहेस यात तुझी सहनशीलता, तुझी क्षमा बुद्धि आणि आमच्या ठायी असणारी तुझी आशा ही आम्हास सुचविली जातात."

( बालबोध मेवा, जानेवारी १९०६ )

ही भाषा मराठी, पण मजकुराचा आशय व वळण सर्वस्वी इंग्रजी धर्तीचें, शिवाय त्यातली धार्मिक भावनाहि ठळकपणें उठून दिसणारी आहे. ह्या पद्धतीची सुटें, लेख व अवतरणें यांचेंच महत्व बालरंजनापेक्षा या मासिकानें अधिक मानलेले दिसतें. अर्थात् त्यामुळें अनेक तऱ्हेचे विसंगादित्व त्यात अभावितपणें निर्माण झालें आहे. उदा० ख्रिस्तजयंतीची गोष्ट सांगावयाची, पण त्यात नावें मात्र चिंनू, कमळा अशीं पूर्ण मराठी योजली गेलीं आहेत! तसेंच हे धार्मिक स्वरूपाचे लेख वा कविता बालांना सहज समजतील अशा सोप्या स्वरूपातहि दिलेले नाहीत असें असलें तरी बालांना आनंदणारा असा काही इतर मजकूरहि यात असायचा. एक कॉलम महत्त्वाच्या घडामोडीची थोडक्यात माहिती देणारा असे. याशिवाय माहितीलेखही असत मात्र या मजकुरात वा मुखपृष्ठावर चित्रें असत, ती बालकाची प्रसंगचित्रें असली, तरी ती युरोपियन मुलामुलींचीच असावी असा प्रथम तरी रिवाज पाळलेला दिसतो. त्यामुळें नाव मराठी पण स्वरूप पूर्णपणें पाश्चात्य संस्करणाचें असें हें बालमासिक होतें. १९२८ साली श्री दे. ना. टिळक हे संपादक झाल्यानंतर मात्र या धोरणात पुष्कळच बदल झाला, कारण नंतर त्यात बालरंजनाचेंच उद्दिष्ट अधिक प्रमुख झालें. पूर्वी फक्त ख्रिस्तधर्मप्रेमीच लोक यातून लिहीत पण नंतर बालकवि ठोंबरे, केशवसुत, कुसुमाग्रज अशा अनेक प्रतिथयश कविलेखकांचें लेखन बालबोधातून प्रसिद्ध होऊं लागलें. मुख्य फरक म्हणजे आंग्लसंस्कारित मराठी भाषेचें तें पहिलें जोडस्वरूप बदलून बालबोधमेव्याची भाषा नित्य प्रचारातली शुद्ध मराठी अशी झाली. या फरकाचें सगळें श्रेय संपादक श्री दे. ना. टिळकांनाच द्यावें लागेल. १९४२ साली युद्धजन्य परिस्थितीची झळ लागून हें मासिक बंद झालें.

बालबोधमेव्यानें बालमासिकाची नवी प्रथा सुरू केली होती, तिची उपयुक्तता पटून लवकरच इ. स. १८८१ सालीं दुसऱ्या एका बालमासिकाचा उदय झाला. याची प्रकृति संपूर्ण मराठी असल्यानें त्याचें महत्त्व या क्षेत्रात विशेष मानलें पाहिजे. या नव्या मासिकाचें नाव 'बालबोध' त्याचे संपादक बालपुस्तकें लिहिणारे एक तत्कालिन प्रसिद्ध लेखक विनायक कोंडदेव ओक हे होते.

बोलून चालून बालमासिक, त्याचा जीव लहानच असावयाचा. पण एखादें मूल अधिकच कृशांगी असावें तसें हें मासिक फारच अल्पव्याप्तीचें होतें. याची छोट्या अक्षरलिपीच्या निंबा पॉकेट बुकाच्या आकाराची अवघीं २४ पृष्ठें असत आणि वर्गणीहि ह्या बालरूपाला साजेशीच अत्यल्प म्हणजे वार्षिक फक्त ११ आणे होती!

मासिक काढण्याचा उद्देश प्रथमांकांत 'संपादकीय'मधून प्रसिद्ध झाला आहे; त्यावरून संपादकाचा दृष्टिकोन पुढीलप्रमाणें व्यक्त होतो—

" शाळेंत कळत नाहीं, पण तुम्हांस कळल्या तर पाहिजेत अशा लक्षावधि गोष्टी आहेत. त्यांतल्या थोडथोड्या आम्हीं दरखेपेस तुम्हांस अगदीं तुमच्या साध्या भाषेनें सांगूं. तुमच्या मनाला करमणूक व्हावी, तुमच्या अंगचे सद्गुण वाढावे यासाठीं हा आमचा प्रयत्न आहे. "

या उताऱ्यावरून बालरंजन ध्येयानेंच हे मासिक निर्माण झालें होतें हें स्पष्ट होतें व कांहीं अंशी हे ध्येय यांत पाळलेंहि गेलेलें दिसतें. यांतले माहितीलेख मोठ्या गहन विषयावर असूनहि सुबोध आहेत. त्यांतून विमान, पाणसुरुंग, सब्मरीन अशा यांत्रिक गोष्टींची, युरेनस, नेपचून इ. नव्या शोधांची, रबर, केरोसीन इ. दैनंदिन परिचित वस्तूंची वगैरे जी माहिती देण्यांत आलेली आहे ती बालांचें ज्ञानवर्धन करणारी असूनहि रंजक अशीच आहे. या शिवाय "लोक काय बोलतात !" या शीर्षकाखालीं, चुरचुरीत नव्या बातम्या व जगांतल्या नवल विशेषांचा अगदीं थोडक्यांत परिचय देणारेंहि एक सदर यांत होतें.

अर्थात् अशीं कांहीं सदरें बालोचित असली तरी या बालबोधाचें स्वरूप सर्वस्वी बाल नव्हतें. एकाद्या प्रौढ माणसाला प्रेमानें 'बाळ' म्हणून संबोधावें तसाच कांहींसा प्रकार येथेंहि झाला होता. नांव बालबोध पण अनेक विषयांची निवड, मांडणी व आशय ही सर्वच प्रौढबोध भासणारी ! उदा. थोरांची चरित्रें यांत पुष्कळच आलीं, त्यांतील भाषा अत्यंत प्रगल्भ वाटते. नमुन्यासाठीं वामनपंडित या चरित्रलेखांतील पुढील एक अवतरण पहाण्याजोगें आहे—

" शोधक पद्धतीच्या अवलंबनानें, नष्ट झालेल्या प्राचीन राष्ट्रांच्या ग्रंथांवरून व इतर अनेक अवशेषांवरून अनेक अपूर्व शोध झाले आहेत व होत आहेत. आणखी ज्ञानाचा संग्रह करण्याच्या कामी कविश्रेष्ठ असतात, म्हणजे स्वराष्ट्रांतल्या लौकिकाचें रक्षण सगळ्यात कवि उत्तम करतात, तेव्हां कवि हे राष्ट्राचे मोठे हितकर्ते होत. "

हा प्रस्ताव पाहिला कीं, चरित्रलेख बालसुलभ होण्याऐवजीं प्रौढांनाच पचणारा होता, याची साक्ष पटते. तसेंच सामाजिक सुधारणा प्रथम, शरीरशास्त्राच्या आधारानेंच बुद्धीचा शोध, गायनशास्त्रांतली कांहीं तत्त्वें इ. विषयांची केवळ शीर्षकें पाहिलीं तरीहि या लेखांचे प्रौढत्व मनावर ठसून राहणार आहे.

अर्थात् कांहीं विषय व त्यांतील भाषा याबद्दल असा आक्षेप घेण्यासारखा असला तरी बालमासिकांच्या त्या प्रभातकाली, बालबोधाचें स्वागत फारच मनःपूर्वक

झालें, यात नवल नाहीं. एकतर मुळात शुद्ध मराठी बालमासिकेंच नाहींत अशा साहित्य दुर्मिळतेचा तो काळ. शिवाय प्रथम प्रयत्नात सदोषता वा अपूर्णताहि अपरिहार्यच असते, हें गृहित धरूनच या मासिकाकडे पाहिलें पाहिजे. बालबोध मासिक ओकांनी चौतीस वर्षे अखंड चालविलें अन् तेही सर्वस्वी स्वतःच्या एकट्याच्या हिमतीवर व लेखनावरच त्यांनी टिकवून धरलें ! अनेक वर्षे बालमासिक चालवणे व त्यातील सर्वच लेखन स्वतःच करणे ही गोष्ट सामान्य नव्हे ! या मासिकातून एकंदर ४०० चरित्रें, ४०० निबंध व ८०० लेख प्रसिद्ध झाले व ही सर्व प्रचंड निर्मिती एकट्या संपादकाची होती ! या चिकाटीचें व वाङ्मयतपस्येचें कौतुक करावें तेवढें थोडेंच. 'बालबोध' मासिक संपादकाच्या मृत्यूबरोबरच म्हणजे १९१५ सालीं बंद झालें. असें होणें अपरिहार्यच होतें. कारण हा सर्वच एक खांबी तंबू होता. मनात मात्र येतें कीं, ओकांनीं इतर बालसाहित्यकारांचें साह्य घेतलें असतें, तर त्यांच्यानंतरहि हें मासिक चालू राहिलें नसतें काय ? पण तसें झाले नाहीं. त्यावेळी श्री. वासुदेव गो. आपटे हे एक नव्या दमाचें बालसाहित्यप्रेमी लेखक त्यांना लाभण्यासारखे असूनहि त्यांनीं त्यांचें सहकार्य स्वीकारलें नाहीं खरें ! 'बालबोध' मासिकाने मराठी वळणाच्या बालमासिकाची एक नवी प्रणाली सुरू केली व या दृष्टीनें ओकांचे कार्य महत्त्वाचें आहे.

बहुधा चांगली प्रथा असली कीं तिचें अनुकरणहि तत्परतेनें केलें जातें. बालमासिक काढण्याच्या कल्पनेला अतेंच महत्त्व मिळालें व 'आनंद' या बालमासिकाचा १९०६ सालीं जन्म झाला. याचे संपादक वासुदेव गोविंद आपटे हे होते. बालबोधच्या संपादकांचा आपट्यांशीं चांगला परिचय होता. घरातल्या एकुलत्या एक मुलाच्या वाट्णीस येणारें कोडकौतुक जरी बालबोधाला लाभलें असलें तरी बालमनाच्या दृष्टीनें काहीं उपयुक्त गोष्टींची वाण याहि मासिकात जरूर होती, हें आपट्यांच्या चिकित्सक दृष्टीला वारंवार जाणवू लागलें. एकतर वर्षानुवर्षे एकाच माणसानें सर्व मासिकाचें लेखन करणें, हें चिकाटीच्या व वाङ्मयसातत्याच्या दृष्टीने कौतुकास्पद असले तरी मासिकाच्या मजकुरात त्यामुळें तोचतोपणा येणें स्वाभाविकच होतें. त्यासाठींच इतर लेखकांचेहि लेख घ्यावे म्हणजे मासिकात विविधता व आकर्षकता येईल अशी आपट्यांनीं ओकांना सूचनाहि केली होती, पण ती ओकांना मान्य झाली नाहीं शिवाय बालबोधातील 'बालत्वाला' प्रौढत्व आलेलेंहि अनेक विषयांतून व भाषेतून आपट्यांना खुपत होतेंच. बालरंजनाचें जर मासिकाचें ध्येय, तर त्यातलें लेखन बालप्रिय व बालसुलभ असणंच योग्य, पण स्वतःच्या मासिकाबाबत हे इष्ट व आवश्यक फरकहि ओकांना रुचले नाहींत म्हणून अखेर आपट्यांनीं आपल्या सर्व नव्या कल्पना अमलात आणून स्वतः 'आनंद' सुरू केला.

आनंद या बालमासिकाचें स्वरूप बालबोधहून अगदींच निराळें. वडीलभाऊ पोक्त व गंभीर उपदेश करणारा, तर धाकटा गमतीच्या गोष्टी सांगणारा, हसून खेळून वागणारा असावा, तसा फरक! या मासिकांत इतर लेखकांचे लेख तर येतच पण स्वतः मुलांनाहि कांहीं लिहावेसें वाटलें तर आजपर्यंत कोठेंच संधि नव्हती. ती अडचण ओळखून मुलांचें लेखहि त्यांतून घ्यायला संपादकांनीं सुरुवात केली. चुटके, कोडी, कविता, गमती-जमती व इतर मजेदार गोष्टी ह्यांनीं बालमानस प्रसन्न होतें हें ओळखून आनंदानें, प्रामुख्यानें हेंच उपायन मुलांना द्यावयाचा उपक्रम सुरू केला, एवढेंच नव्हे तर खास शिशूंसाठीं देखील मोठमोठ्या अक्षरांत अगदीं छोट्या गोष्टी देण्यास आरंभ केला आणि हें उद्दिष्ट आनंदाच्या प्रथमांकांतून पुढीलप्रमाणें व्यक्त झालें आहे.

"तुम्हांला तुमचा मार्ग दाखवावा, वाट खडे वेचून साफ करावी, अडचणीचे जागीं तुम्हांस हात द्यावा व तुम्ही शहाणे होऊन आपल्या आईबापांना संतोष द्याल आणि आपापली कामें वेळचेवेळीं योग्य रीतीनें कराल अशा रीतीनें तुमच्या मनाला आनंदवीत *गमतीनें चार गोष्टी सांगाव्या म्हणून मी आलों आहे.*"

आणि हें ध्येय तेव्हांच नव्हे तर अद्यापहि आनंदानें दृष्टीसमोर ठेवलें आहे. अनेक नव्या प्रथा या मासिकाचेद्वारा आपट्यांनीं सुरू केल्या. मुलांना कथांचें जग विशेष प्रिय हे जाणून प्राणीकथा, परीकथा, पुराणकथा व सत्यकथा त्यांनीं सांगितल्या. यात 'आनंदाची फुलबाग' हें एक कवितांचेंहि नवेंच सदर होतें. एकंदरींत खेळकर भाषा व मुलांना रुचेल व पचेल असें साहित्य हे आनंदाचें विशेष. बालबोधाहूनहि आनंद बालप्रिय झाला तो या वैशिष्ट्यानेंच. आपट्यांनंतर तशाच वृत्तीचे गोपीनाथ तळवलकर हे एक बालप्रेमी बालसाहित्यकार आनंदास लाभले. त्यांनीं १९३० सालीं आनंदाचें संपादकत्व स्वीकारलें. आनंदाच्या मूळ धोरणांत बदल न करतां त्यांनीहि आधुनिक दृष्टिकोनानें मुलांना आवडतील अशा नव्या सुधारणा आनंदांत केल्या. 'मधाचे पोळे' ही स्त्रिया व प्रौढ मुलें यांना आवडणारी एक नवी पुरवणी देण्याचा उपक्रम त्यांनीं सुरू केला आणि चालू राजकीय घडामोडींचें मासिक समालोचन थोडक्यांत देण्यानें तर आनंदाची उपयुक्तता निश्चित वाढली आहे. आज आनंदाचें वाङ्मयीन वय पन्नाशी ओलांडून गेलें असलें तरी त्याच्या वृत्तीचें बाल्य अजूनहि टिकाव धरून आहे ही उल्लेखनीय बाब म्हटली पाहिजे.

आनंदाच्या बरोबरीचें दुसरें एक बालप्रिय मासिक म्हणजे चित्रशाळेतर्फे प्रसिद्ध होणारें 'शालापत्रक' हें होय. अनेक मासिकांचे बाबत रूपांतर, नामांतर, ध्येयांतर इत्यादी गोष्टी घडूं शकतात. त्याचें ठळक प्रत्यंतर याहि मासिकाच्या इतिहासांत मिळतें. १८६४ सालीं हें सुरू झालें. पण त्यावेळीं तें बाल मासिक नव्हतें.

मासिक म्हणण्यापेक्षा तत्कालीन शाळाखात्यातर्फे प्रसिद्ध होणारें ते एक शालेय मुखपत्रच होतें असें म्हटलें तरी चालेल. याचे नावहि तेशा तऱ्हेचेच म्हणजे "पुणें पाठशालापत्रक" ( Marathi School Paper, Poona ) असें होतें. पृष्ठें अवघीं २४, आकार छोट्या पुस्तकाचा व किंमत फक्त दोन आणे असे. शाळातील बदल्या, अभ्यासक्रम, जाहिराती इ. गोष्टींचीच प्रामुख्यानें यात माहिती असे त्यावेळीं.

१८६५ सालीं या मासिकाच्या सुदैवानें तत्कालिन एक नामवंत लेखक कै. कृष्ण शास्त्री चिपळूणकर याजकडे या मासिकाच्या संपादनाचें काम आलें. त्याची दृष्टि वाङ्मयाबाबत कितीतरी विवेचक. त्याना मासिकाच्या नावात व मजकुरात मोठीच विसंगति दिसू लागली! ती त्यांनी लगेचें लोकदृष्टीस आणून मासिकाचे नावात इष्ट तो बदल केला. एका रुपादकीय स्फुटात त्याचा खुलासा आलेला आहे.

"कोणतेहि पुस्तकास नाव देणें झाले तर त्या नावाशी व आतल्या विषयाशी काहींतरी एक प्रकारचा संबंध पाहिजे. आमचे या पत्रकात पुण्याचे पाठशाळेविषयी काहींच मजकूर नसतो, तेव्हा त्यास 'पुणे पाठशाळापत्रक' हें नाव कसे साजेल. या पत्रकात मराठी शाळातील पंतोजी लोक कडून आलेले मजकूर छापलेले असतात. ( मराठी शाळाचे संबधानें जाहिराती वगैरे दिलेल्या असतात ) यासाठीं या पत्रकास फक्त शाळापत्रक असें नाव असावे हें आम्हास बरें वाटते. आजपासून आम्ही याच नावाचा स्वीकार केला आहे." संपादक, कृष्णशास्त्री चिपळूणकर.
(पुणें पाठशाळापत्रक, ऑगष्ट १८६६.)

असें हे शाळेचे पत्रक बालमासिक म्हणून कसें समजता येणार? लोकाश्रयाअभावी प्रथम हे १८७८ मध्यें बंदहि करण्यात आले होते. पण तें नामशेष झाले नाहीं, जणु निद्रिस्त राहिले होतें! ते १५ वर्षांनीं पुन्हा जागृत झालें व त्यामध्यें चिपळूणकर पिता-पुत्रांचें लेखन येऊ लागलें. मराठी मोठ्या मासिकातून क्रमशः कादंबऱ्या देण्यास सुरुवात झाली होतीच. या मासिकानेंहि ती नवप्रथा स्वीकारली व 'रासेलस' ही रूपातरीत परंतु जोमदार मराठीनें सजलेली कादंबरी यातून येऊ लागली. मात्र असे थोडे बदल झालेले असले तरी शालापत्रकाचे 'शालेय संबंधित' स्वरूप अजूनहि टिकाव धरून होतेंच. त्यात रंजक विषयाची थोडीबहुत वाढ झाली होती, एवढाच काय तो फरक.

दिवस उलटत गेलें व १९२९ साली या मासिकात आणखी एक नवलाईचें स्थित्यंतर झालें, तें म्हणजे त्याचें शालेय माहितीपत्रकाचें स्वरूप बदललें व तें कुमारांचें व बालांचेंच खास मासिक झालें. त्याचा जणु कायापालट झाला एकदम! पुराणात च्यवन ऋषींनी धन्वंतरीची औषधी घेतल्यानें त्याना नवचैतन्य प्राप्त झाल्याची एक कथा आहे. त्याप्रमाणेंच ही घटना होती. यात मुलासाठीं लेख असले

तरी ते केवळ बालश्रेणी वा शिशुश्रेणीसाठीं नसून किशोरवयाला उपयुक्त असे असत. त्यांच्यासाठीं शास्त्रीय माहिती, प्रवासवर्णनें, कोडी, चुटके, कविता व तऱ्हेतऱ्हेच्या गोष्टी यांत प्रसिद्ध होत. तुलनाच करावयाची झाली तर शालापत्रक आज प्रामुख्यानें किशोरांना व कुमारांना रिझवतें आणि आनंद बाल व शिशुरंजन करतें, असें म्हणतां येईल. एक प्रकारचा दुसरा काल शालापत्रकाच्या आयुष्यांत आतां निर्माण झाला आहे. आनंद वयानें प्रौढ पण वृत्तीनें बालमासिक तर शालापत्रक (१९२९ पासूनचा पुनर्जन्म गृहीत धरून) वयानें लहान तर समजुतीने वडील असें मासिक झालें आहे. शिवाय 'चित्रशाळा' प्रकाशन हें नाव सार्थ होण्याइतकें चित्रालंकृत स्वरूपांत आज तें प्रसिद्ध होतें व उपयुक्ततेच्या, ज्ञानवर्धनाच्या दृष्टीनेंहि आज तें आघाडीवर आहे. मासिकांतून चांगल्या कादंबऱ्या क्रमशः देण्याची पूर्वसूरीची परंपरा अजूनहि शाळापत्रकानें कायम ठेवली आहे. सानेगुरुजींची प्रसिद्ध 'श्यामची आई' व इतरांच्याहि अनेक कादंबऱ्या शालापत्रकानें बालांना दिल्या आहेत. अर्थात् या सर्व इष्ट फरकाचे श्रेय आजचे संपादक श्री. दा. पा. रानडे यांच्याकडेच द्यावें लागतें.

विसाव्या शतकाच्या आरंभकालांत आणखीहि कांही वैशिष्ट्यपूर्ण बालमासिकें उदयास येऊं लागलीं. पैकीं बालोद्यान हें एक बालमासिक श्री. सहस्रबुद्धे नांवाच्या गृहस्थांनीं १९१९ सालांत सुरू केलें. याचें स्वरूप बालांना एकदम पसंत पडणारे होतें. टाईप खूप मोठा असे. विषयहि बालजगांत विशेष प्रिय असलेल्या प्राणीकथा व गमतीच्या आणि यक्षपऱ्यांच्या गोष्टी याचेच असत. भाषा अगदीं खेळकर, पहिल्या अंकापासून या भाषेच्या वेगळेपणाचें व सोपेपणाचें प्रत्यंतर मिळतें! प्रथमांकांतले संपादकीय स्फुट पुढीलप्रमाणें आहे.

"झालें. काम झालें. बालमित्रांनो, मला काळजी पडली होती की, तुम्हां सर्वांना आवडेल असें माझे पुस्तक कसें होईल? पण तो पाहिलात पुढील पानावरील मुलगा? माझे पुस्तक पाहिल्याबरोबर पाटीस लागून त्यानें ते मागून घेतलें. तो त्याच्या वाचनात इतका गर्क झाला कीं कोळ्यानें आपल्या पाठीवर जाळें केलें आहे हेहि त्याला समजलें नाहीं.

तुम्हांपैकीं कांहींजणांना खेळ आवडतो. कांहींजणांना गोष्टी आवडतात. चित्रें तर तुम्हां सर्वांनाच आवडतात. प्रत्येक मुलाला आवडेल असें कांहींतरी माझ्या पुस्तकांत आहेच. मग तर तुमची तक्रार नाहीं ना?"

मागें उद्धृत केलेली प्रथमांकांतली निवेदनें व हें बालोद्यानचें निवेदन यांतला फरक सहज जाणवणारा आहे. बालोद्यानचें ध्येय केवळ शिशु-बालरंजनाचें. त्यांत कांहींतरी शिकवण्याची सूचना अजिबातच नाहीं. संपादक स्वतःला प्रेमानें

'बालोद्यान काका' म्हणवून घेत. इग्रजीतील 'हिपो बॉईज् स्कूल' (Hippo Boys School) च्या पद्धतीच्या गोष्टी त्यांनी बालोद्यानामधून देण्यास सुरुवात केली व त्यामुळें प्राणिकथांना जणु एक नवा आकार लाभला. त्याची डोकेरे मास्तराची शाळा व त्यांतील विद्यार्थ्यांच्या गमती जमती वाचताना बाल्वाचकांना भूकतहान सुद्धा स्मरणें कठीण होई. याच्या जोडीला सुंदर व अनुरूप अशीं चित्रेंहि असत.

प्रथम निवेदनात संपादकांनीं ज्ञानवर्धनाचा हेतु नोंदून स्पष्ट केला नसला, तरी रंजनाबरोबर तेंहि उपायन बालोद्यानानें-बालांना पुरवलें. मात्र, आपले वाचक म्हणजे अगदीं छोटी मंडळी आहेत, याचा स्वतःला केव्हाहि विसर पडू दिलेला नाहीं. त्यामुळें छोट्या छोट्या बाबतींवर अगदीं ल्हान सहान व सोपे माहितीलेख लिहिण्याची त्याची अधिक पद्धत दिसते. उदाहरणार्थ — टाकाच्या टोकास चीर का? झाडाच्या कुंडीला तळात भोंक का? घोडा उभा राहूनच का झोपतो? इत्यादि प्रश्न त्यात दिले जात व त्याच्या उत्तरातून सोपी शास्त्रीय माहिती दिली जाई. प्रादेशिक कथांचेंहि यात एक खास दालन होतेंच.

मुलांना हें मासिक खूप आवडायचें, परंतु अवघ्या सहा वर्षांतच त्याचें चिमणें आयुष्य संपलें. बाल्वाचकांच्या दृष्टीनेंहि हें एक नुकसानच! १९२५ सालीं हें बंद झालें. तथापि त्याच्या पाठोपाठ नागपूरचें 'मुलांचें मासिक' व मुंबईच्या का. रा. पालवणकरांचें 'खेळगडी' हीं दोन बाल्मासिकें १९२७ सालीं उदयास आलीं व त्यांनी जणु बालोद्यानच्या विरहाधर आशेचें शीतल विलेपनच केलें!

या दोहोंपैकीं खेळगडी हे आनंदाचें जुळें भावंड शोभावें असेंच होतें. हा खेळगडी नावाप्रमाणेंच बालांचा खेळकर मित्र होता. त्यातहि बालरंजनार्थ बरेंच नवे उपायन असे दहा पंधरा चित्रें व त्याहून कमी वाक्यें योजून सांगितलेल्या प्रसंगकथा वा चित्रकथा, कोडीं, आकड्यांच्या गमती इ. त्याचीं आकर्षणें नाविन्यपूर्ण होतीं. शिवाय उपयुक्त माहिती, गमतीजमतीनें सांगण्याचेंहि कसब संपादकांना होतेंच. "आमचे मुके खेळगडी" या लेखमालेंतून काही अनोळखी प्राण्याची माहिती मुलांसाठीं देण्यात येई तर "फुरसतीच्या वेळात" या नव्या सदरातून कागद वगैरेंच्या हस्तव्याव सायिक छोट्या कृतींची माहिती असे. विशेष हें की, यात मुलांइतकाच मुलींचाहि विचार केला गेला आहे व तोहि प्रथमच! उदा० भरतकामाचे टाके, सोपें शिवण वगैरे लेख यात येत असत. मात्र खेळगडी हें नाव क्रीडासूचक असलें तरी त्याचें अवतार कार्य फक्त खेळापुरतेंच नसून त्यात शास्त्रीय लेखहि कधीमधी येत. आणखी एक चांगली प्रथा बालपत्रकाप्रमाणें या मासिकानेंहि निष्ठेनें चालू ठेवली ती म्हणजे बाल्कादंबऱ्याहि क्रमशः यातून देण्याची. ना. धों. ताम्हणकराचा सुप्रसिद्ध 'गोट्या' यातूनच प्रकाशित झाला व त्याच्या खडकावरचा अंकुर, चिंगी, इ. बालकादंबऱ्याचे

प्रसिद्धिस्थल हेंच. प्रकृति व प्रवृत्ति आनंदासारखीच असली तरी हें बालमासिक दीर्घायु ठरलें नाहीं. २३ वर्षानंतर १९५० सालीं तें बंद करण्यांत आलें. मध्यंतरीं के. भि. ढवळे या प्रकाशनसंस्थेतर्फे भा. रा. भागवत यांच्या संपादकत्वाखालीं एक वर्ष तें चालवण्यांत आलें होतें. परंतु जीवमान संपत आलेल्या व्यक्तीला औषधांनीं जगवतां येऊं नये, तसेंच हे पुनर्जीवनाचे प्रयत्न व्यर्थ ठरून बालांचा हा आवडता खेळगडी विराम पावला!

या सर्व बालमासिकांतून 'मुलांचे मासिक' आपल्या पृथगात्मतेनें उमटून दिसणारें ठरेल. आतांपर्यंतची त्यांच्या वाचक वर्गाची वय श्रेणी शिशुबालांची; पण मुलांच्या मासिकाचे वाचक प्रामुख्यानें विद्यार्थीच गृहीत धरले गेले आहेत. पुढील परिच्छेदांत मासिकाच्या निर्मितीचा हेतु व्यक्त झाला आहे.

"एकादें मासिक काढून विद्यार्थीवर्गाला योग्य असें वळण लावावें व तेणें-करून समाजसेवेंत अल्पशी तरी भर टाकावी असा आमचा मनोदय बरेंच दिवसा-पासून होता. आज परमेश्वराच्याकृपेनें तो सिद्धीस जाऊन छात्रसेवेची सुसंधि आम्हांस प्राप्त होत आहे, हें आम्हीं मोठें भाग्य समजतों.

दहापासून सत्रा वर्षांच्या मुलांना समजूं शकेल, म्हणजे इंग्रजी १ल्या इयत्तेपासून मॅट्रीक वर्गापर्यंतच्या अभ्यासक्रमाला साजेल असा विद्यार्थीवर्गाला उपयुक्त व आवश्यक मजकूर या मासिकांत येईल. तो कदाचित् अभ्यासक्रमाला अनुसरून नसेल, पण त्यामुळें मुलांच्या ज्ञानात उपयुक्त भर पडत असल्यानें तोहि मजकूर मुलांच्या मासिकात प्रसिद्ध होईल. विद्यार्थी हाच एकंदर आमच्या मासिकाचा आत्मा असून त्याची मनोरचना, त्याचे विचार व विचारसरणी, त्याचे ध्येय व तत्सिध्यर्थ लागणारी साधनें हे आमचे आवडते विषय आहेत.

(वर्ष पहिले, अंक पहिला. १९२७)

अशाप्रकारें, 'आत्माच' भिन्न असल्यानें, या मासिकांतले विषय व मांडणी हे देहविशेष अगदींच वेगळे भासावे हें क्रमप्राप्तच! या मासिकाला अर्थातच रंगीत सजावट, बालगमती, विनोदकथा, चुटके, यांचें वावडेच होतें. विद्यार्थीजनाला या गोष्टीची जरूरच काय? इतर बालमासिकें चित्रकथांनीं युक्त, तर हें अगदीं शब्दशः 'वि-चित्र' असें. आणि रंजनापेक्षांहि विद्यार्थ्यांच्या शालेय जीवनसमृद्धि-कडेच संपादकांनीं अधिक लक्ष पुरविल्यानें विषयांची निवडहि भिन्नरूप दिसावी यांत नवल नाहीं. सुटीचा उपयोग, अभ्यास कसा करावा, सिनेमा व मुलांचे शिक्षण, राष्ट्र म्हणजे काय! इ. शैक्षणिक विषय, यांत आवर्जून आलेले दिसतात. अर्थात खास विद्यार्थ्यांसाठीं असें कोठलेंहि मासिक अस्तित्वांत नसल्यानें व विदर्भात निघणारें असें हें एकच एक बालमासिक असल्यानें त्याला अधिक महत्त्व

होतेंहि, पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, हे वैशिष्ट्य टिकून राहू शकलें नाहीं! पूर्वींचे गांभिर्य सभाळून मासिक नीट चालणें कठीण आहे, हे ओळखूनच कीं काय त्याच्या धोरणांत व ध्येयात पुढें बदल करण्यात आला व फक्त विद्यार्थ्यांऐवजीं सर्वच बालवाचकाना ते उपयुक्त ठरेल असा मजकूर यात देण्यात येऊ लागला. चुटके, कोडीं, परीकथा, शिशुगीतें, छोट्या गोष्टी, मोठ्या टाईपातल्या बालकथा इ. सर्व बालरजक बाबतींचा समावेश मासिकाच्या या नव्या प्रपचात झालेला दिसून येतो.

१९५२ सालीं प्रसिद्ध झालेलें हें एक आवेदन त्याची नीट कल्पना देऊ शकेल—

" सर्वांच्या तोंडीं एकच भाषा.

आणि ती ही कीं—

मुलाचें मासिक हें नियमितपणें प्रसिद्ध होणारें स्वस्त, सुबक व सर्वांगसुदर मासिक आहे. मुलाच्या मासिकाच्या नित्यवाचनानें मुलाच्या शीलसवर्धनात व सामान्य-ज्ञानात निश्चितपणें भर पडते. मुलाचे मासिक हा मुलाचा उत्तम मित्र व मार्गदर्शक आहे. "

या आवेदनावरून प्रथमाकात प्रसिद्ध झालेल्या या मासिकाच्या ध्येय-वस्तूचाच कायापालट झालेला लक्ष्यात येतो. मासिकाच्या नावाशीं हा ध्येयवाद अधिक सुसगती राखीत असला व खपाच्या दृष्टीनें इष्ट (कदाचित् अपरिहार्यंहि) असला तरी विद्यार्थ्यांसाठीं निघणारें एकुलतें एक मासिक केवळ त्या हेतुप्रधानतेनें चालवणेंहि अशक्य व्हावें ही परिस्थिति उद्वेगजनकच म्हणावयास हवी!

याच सुमारास आणखी दोन मासिकें बालसाहित्यक्षितिजावर उदित झालीं. एक पडित अ. कुलकर्णी याच्या सपादकत्वाखालीं निघणारें 'किशोर' व दुसरें वीरेंद्र अढियानीं चालविलेलें कुमार. या किशोरचे स्वरुप आनद-शालापत्रका-प्रमाणेंच, पण काहींसे जाणत्या मुलासाठींच उपयुक्त होतें. आकर्षक, सचित्र व *मोठा असा बालमासिकाचा दिवाळी अंक काढण्याची मूळ कल्पना किशोरकर्त्यांचीच.*

या किशोरची मूळ प्रकृति बालरजनाचीच होती. पण ललित बालमासिक असूनहि हें तग धरूं शकलें नाही व अखेर आर्थिक झझावातात सापडून हें एक उमेदीचें मासिक अवघ्या २ वर्षांतच बद करावें लागलें! केवळ एका व्यक्तीची हौस, उमेद आणि सकल्पनयोजकता एवढ्यावरच मासिक चालू शकत नाहीं. त्याला 'अर्थपाया' असावा लागतो. हेच जणु जाता जाता किशोरनें स्पष्ट केलें नाहीं काय!

वीरेंद्र अढियाचें नवें 'कुमार' मासिक १९४७ च्या मार्च मध्यें सुरू झालें, तें काहींशा वेगळ्या घटनेंतून. मोठ्याची साहित्य समेलनें प्रतिवर्षी भरतात, तद्वत्

कुमारांचीहि असावींत, या कल्पनेनें पुण्याला १९४४ सालीं पहिलें 'कुमार साहित्य संमेलन' भरविण्यांत आलें. दोन चार वर्षें ही प्रथा चालू राहिली व एक 'कुमार संघटना' स्थापन होऊन तिचें मुखपत्र म्हणून हें मासिक प्रथम सुरू करण्यांत आलें.

हें मासिक खास कुमारांसाठींच होतें. त्यांत बाल व शिशूंना स्थान नव्हतेंच; तर प्रौढ व जाणत्या वयाच्या कुमारजीवनाचाच विचार यांत अभिप्रेत असे. संपादकांचे प्रथमांकांतील निवेदन त्यासंबंधीं कल्पना देईल.

"कुमार म्हणजे कुविचारांना मारणारा ! देवाचा दूत. कधीहि न कोमेजणारा शैशव व तारुण्य यांच्या सीमाप्रांतांत उमलणाऱ्या सुकुमार कलिकांना सत्प्रेरणा देणारें व जीवनाचें सत्यदर्शन घडवणारें साहित्य आज हवें आहे...अशा तेजस्वी साहित्य थोरांकडून मिळवून देण्यासाठीं व कुमारांकडून लिहवून घेण्यासाठीं 'कुमार' अहर्निश धडपड करील......

कुमारांमधलीं झांकलीं माणकें वेचून काढून जगापुढें आणण्याचा कुमार प्रयत्न करणार आहे. कोठें कलेची इवलीशी ठिणगी दिसली तर कुमार तेथें ज्योत निर्माण करणार आहे."

प्रथमांकांतील या निवेदित ध्येयानुसार बालकलाकाराची माहिती, प्रौढ व बाल देशसेवकांचीं चरित्रें यांत येत. राष्ट्रवीर, क्रांतिवीर, विशेषतः कुमारवीर यासंबंधीं उद्बोधक माहिती यांत आवर्जून दिली जाई. बालसाहित्यकारांचे विचार यांतून स्फुट स्वरूपांत येत व चालू बालवाङ्मयाचा परामर्षहि घेतला जाई.

या कुमाराचीं कांहीं वैशिष्ट्यें लक्षणीय ठरावीं. ही एक संघटना म्हणून असल्यानें प्रांतोप्रांतीं या कुमार साहित्य मंडळाच्या शाखा निघून त्यांच्या प्रयत्नाचेंहि पाठबळ 'कुमार' ला लाभलें होतें. त्यामुळें नवनव्या सभासद कुमारांचे लेखन हें याचें एक प्रधान अंग झालें होतें.

दुसरें अगत्याचें सदर म्हणजे साहित्य प्रांतांत वा कलाक्षेत्रांत कुमारहिताच्या दृष्टीनें कांहीं नव्या प्रथा वा नवे उपक्रम सुरू होणें अगत्याचें होतें. त्याबद्दल लेख लिहून जनजागृतिचेंहि कार्य करण्याचें मत 'कुमार'नें घेतलें होतें. खालील कांहीं लेखांचीं शीर्षकें त्याची कल्पना देतील. उदा० – '*विद्यार्थ्यांसाठीं भारतभ्रमणाचा* शिक्षणक्रम हवा. कुमारांसाठीं बोलपट संस्था सुरू करा.' वगैरे

पण असें हें उपयुक्त मासिकहि अवघ्या ३।४ वर्षांतच बंद करावें लागलें ! कारण एकतर यांतले लेख वैचारिक व गंभीर चर्चात्मक असत. त्यांची मौलिकता वादातीत असली तरी किशोरकुमारांनाहि रंजनप्रधान वाङ्मयच मनापासून अधिक आवडतें ! शिवाय चित्रें, सजावट, विनोदी, गमतीच्या गोष्टी, कथावाङ्मय आकर्षक

चहिरग ही सारी बालप्रिय साहित्यसामुग्री यांत अभावानेंच असल्यानें बालजगतांत त्याला नीटसा लोकाश्रय मिळाला नाहीं. दुसरें असें कीं, ' कुमार संघटना ' कितीहि भावनाप्रधान व उत्साही असली तरी तिलाहि आर्थिक पाठबळ नको का ? त्याविना तर सर्वच महत्कार्यें अडतात, थिटी पडतात ! अखेर अर्थकारणानेंच हें ध्येयशील व विशिष्ट वयाच्या वाचकांसाठीं निघणारें मासिक अस्तगत झालें.

खो खोच्या खेळांत एका भिडूला खो देतांच त्याच्या जागीं दुसरा येतो, त्याचा या क्षेत्रातहि अनुभव यावा हें किती नवल ! खेळगडी, कुमार, किशोर हीं मासिकें बंद झालीं, त्या जागीं त्याच सुमारास एक नव्या उमेदीचें बालमासिक हसत हसत प्रवेशलें ! एक नाणावलेले बालप्रिय बालसाहित्यकार, भा. रा. भागवत यानीं १९५१ सालीं ' बालमित्र ' या नावाचें मासिक सुरू केलें तेंच हें ! यांत भरपूर चित्रें, ठळक टाईप, मोहरेदार कागद व आकर्षक मुखपृष्ठ हीं बाह्यागें जशी वेधक होतीं, तशींच बालगीतें, रंजक चटकदार गोष्टी, विनोदी चुटके, प्राणीकथा, परभाषेंतील रूपांतरित सुंदर कथा इत्यादि अंतरंगहि विलोभनीयच होतें. 'बालरंजन ' हें प्रमुख धोरण व मग त्या माध्यमांतून मुलांना उपयुक्त माहिती देणें हें आनुषंगिक कार्य अशी बालमित्राची पद्धत असल्यानें बालमित्र ' बालानाम् प्रिय ' ठरल्यास नवल नाहीं. एके ठिकाणीं संपादकांनीं त्याची ओळख करून दिली आहे ती अशीः—

" योजनाबद्ध मांडणी, कुशल चित्रकाराची उत्कृष्ट चित्रें, लहान मुलें आवडीनें पाठ करतील अशीं बालगाणीं, सुंदर गोष्टी आणि विद्यार्थ्यांना विचार करायला लावणाऱ्या चटकदार कादंबऱ्या हीं बालमित्राची वैशिष्ट्यें.

तो कधीं निष्फळ गुळमट गोष्टी सांगत नाहीं. बालविद्यार्थ्यांना तो विचार करायला लावतो. त्यांना एक नवा शास्त्रीय दृष्टीकोन बालमित्रानें दिला आहे.

*आणि बालमित्राचा प्रत्येक अंक या निवेदनाशीं खरोखरच प्रामाणिक असलेला* दिसेल.

या मासिकाचें आणखी एक खास वैशिष्ट्य म्हणजे स्वतः संपादकांनीच लिहिलेल्या कादंबऱ्या यांतून क्रमशः येत व त्या सर्वच इंग्रजी नामांकित कादंबऱ्यांची सुंदर रूपांतरें असत. जाईची नवल कहाणी, चंद्रावर स्वारी, मायापूरचे रंगेल राक्षस, समुद्र सैतान, अदृश्य माणूस, झपाटलेला प्रवासी इ. कादंबऱ्या तिंनीं व आकर्षक कथनानें सजवून बालभेटीस ' बालमित्रानें ' आणल्या. त्या मुलांना येवढ्या आवडल्या कीं, अल्पावधींतच पुस्तकरूपानेंहि त्या प्रसिद्ध झाल्या आहेत. बहुधा शास्त्रीय शोधांच्या बैठकीवर आधारलेल्याच कथानकाची निवड केल्यानें मुलांच्या

विचाराला एक नवी चालना देण्याचा हेतुहि त्यांत साध्य झालेला दिसतो. रंजकता हें तर बालमित्राचें प्रधान कार्यच होतें.

परंतु, अशाहि बहुगुणी बालमासिकावर अवतार समाप्तीची वेळ यावी हा ध्येयवादी अशा संपादकावर केवढा मानसिक आघात! १९५६ डिसेंबरच्या शेवटच्या अंकांतल्या हा ' निरोप ' या दृष्टीनें विचार करावयाला लावणाराच ठरेल.

" ध्येयसाधना करणारालाहि कधीं कधी व्यवहारापुढें हात टेकावे लागतात. साडेसहा वर्षांच्या धडपडीनंतर आम्हीं तें सत्कर्म पार पाडीत आहों...

...बालमित्रामागें कोणतीहि संघटीत संस्था नाहीं किंवा मोठे थोरले आर्थिक पाठबळ नाहीं. या भांडवलशाही युगांत एकट्या दुकट्याला हा व्याप अखंड चालू ठेवणें मात्र शक्य नाहीं, हें आम्हांस पटूं लागलें होतें. तेव्हां त्या दृष्टीनें आम्ही प्रयत्न केला, तर बालमित्रासारख्या मासिकाला फार मोठें क्षेत्र आहे, अशी आमची खात्री होती, आज देखील आहे. पण कल्पनातीत आर्थिक नुकसान सोसल्यानंतर मासिकाचा हा व्याप एका हातीं संभाळणें आम्हांस अशक्य वाटतें, म्हणून आम्हीं वाचकांचा निरोप घेत आहोंत."

झालें, आणखी एक सुंदरसें बालमासिक, तत्त्वनिष्ठ व बालसाहित्यप्रेमी संपादकाची जोड असूनहि, द्रव्याभावी कालप्रवाहांत विलीन झालें !!

बालनियतकालिकांच्या या जगांत ज्यांच्या पाऊलांच्या अस्पष्ट खुणाहि आज पार पुसून गेल्या आहेत अशीं आणखी कांहीं नांवें आढळतील. सुमन, (संपादक– वा. कृ. भावे) हें नागपूरला निघणारें चिमुकलें मासिक घड बाळसें येण्यापूर्वींच विराम पावलें. मासिकांच्या तुलनेनें पाक्षिकें जवळ जवळ नव्हतीच; पण बालवसंत नांवाचें एक पाक्षिक श्री. भावे यांनीं १९२७ सालीं सुरू केलें होतें, त्याचेंहि बाल्यांतच विलयन झालें. प्रकाश मोहाडीकर व बाळठाकरे या संपादकाच्या नेतृत्वाखालीं ' श्याम ' नांवाचें एक पाक्षिक १९५५ सालीं सुरू झालें. '*सानेगुरुजी कथामालेचे मुखपत्र*' *असें याचें वर्णन मुखपृष्ठावर छापलेलें दिसतें.* अर्थातच सानेगुरुजींच्या मतप्रणालीचा व साने वाङ्मयाचा पुरस्कार करणे हेंच याचें ब्रीद होतें; त्यामुळें आंतरभारती पाठ, राष्ट्रसेवादलासंबंधीं लेख, गुरुजींच्या आठवणी असे वैशिष्ट्य मजकुरांत असणेंहि क्रमप्राप्तच पण राष्ट्रीय दृष्टीकोन असला तरी काय झालें ! श्याम हे आधीं ' बाल–पाक्षिक ' व नंतर ' प्रचार–पाक्षिक ' होतें. तेव्हां बालांना योग्य असा रंजक मजकूर यांत आधिक्यानें येणें आवश्यक नव्हतें काय ! अर्थात् हा बालरंजन हेतु दुय्यम झाल्यानें लोकाश्रय व बालाश्रय याला कमी मिळाला व पाक्षिक लवकरच बंद झालें.

बालमासिकांच्या या गगनेंत पाक्षिक असें आज घडीला तरी एकच

दाखवता येईल, तें म्हणजे बालसन्मित्र (पारूजी नारायण मिसाळ यानीं चालविलेले) होय. तें १९३५ सालीं सुरू झाले व अजूनहि चालू आहे. परतु याची आजची परिस्थिति भरभराटीची नाहीं. चित्रें, सजावट, आकर्षक छपाई, चागला कागद, याच्या अभावी हे डोळ्यात भरत नाहीं व याला लेखनसाह्यहि फारसें दिलें जात नसावेंसें वाटतें. तें अद्याप रूटुखटु चालत असलेलें दिसतें. आणखी दोन तीन नव्या बाल मासिकाचें साहित्य प्रागणात नवे पदार्पण झालें आहे. 'श्याम'च्या पद्धतीवर त्याच हेतूनें निघालेले 'मुलाचा श्याम' हें जमत—गमत (सपादक-दुर्गा भागवत) हे बालाचे व कुमार (सपादक – वि. वा. शिखाडकर) हे रीडर डायजेस्टच्या पद्धतीवर काढलेले प्रौढ मुलाचे मासिक. (वीरेंद्र अढियाच्या कुमारशीं याचा नाम साम्याखेरीज काहीं एक सबध नाहीं!) शिवाय गोकुळ हें (स.–अमरेंद्र गाडगीळ) मुलाना हिंदु-धर्म-सस्कृतीचें शिक्षण देणारें एक मासिक, अशीं दोन तीन नवीं मासिकें बालवाचकाच्या हातात आढळतात. पण एकतर तीं नुक्ती विकसूं लागलेली कमलें. त्याच्या रूपगधाबद्दल आणि विकासाबद्दल येवढ्यातच अभिप्राय देणें धाडसाचेंच ठरेल. आजचें त्याचें रूप तरी आशाजनक वाटतें येवढे खरें.

बालनियतकालिकाच्या या मोजक्या सख्येकडे व अल्पायुषी प्रयत्नाकडे पाहिलें कीं मन अतर्मुख होतें, आणि विचाराना नवी दिशा मिळते. बालवाङ्मयाची निपज आजकाल ज्या वर्धितवेगानें होते, त्यावरून बालसाहित्याचे प्रयोजन आज बालजगात अवश्य आहे हें स्पष्ट दिसतें. मात्र, जेथें बालपुस्तकाची दोन दोन हजाराची आवृत्ति चटकन् खपते तेथें बालमासिकाला नीटसा आश्रय का मिळू नये, हे समजत नाहीं. अढियाच्या कुमारासारखे ध्येयनिष्ठ मासिक चालू शकत नाहीं, किशोरसारखे रजक या बालमित्रसारखे नमुनेदार मासिकहि टिकू शकत नाहीं, व बालोद्यान व खेळगडीसारखीं बालमान्य मासिकेंहि आर्थिक आवर्तात सापडून पाचोळ्यासारखी नष्ट होतात. ही सर्व स्थिति बालसाहित्याचा उर्जितकाळ व्यक्तव णारी थोडीच आहे! पण अनेकाची जेथें अशीच दशा झाली तेथें कारणेंहि जबरदस्त व अनिवार्यच असलीं पाहिजेत, हें उघड आहे आणि, विचारवताला तीं दिसण्याजोगीं आहेतहि! पहिली गोष्ट लेखकाचें लेखनसहाय्य उणें पडतें आणि त्यावाचून कोणत्याहि मासिकाला समृद्धि व शाश्वति नाहीं! हें लेखन उणें पडण्याचें एक प्रमुख कारण, बालमासिकाच्या लेखकाना बहुशः लेखनमूल्य दिलें जात नाहीं आणि मोबदल्यावाचून निष्ठेनें व सातत्यानें लिहिणारे लेखक कितीसे आढळतील? त्याचाहि तो व्यवसायच असत नाहीं काय? अर्थात् हा मोबदला देण्यासारखी मासिकाची आर्थिक स्थिति नसते. कारण एक तर सघटित अर्थसस्था पाठीशी

नाहीं व लोकाश्रयहि पाहिजे त्या प्रमाणांत नाहीं! त्यांतून बालमासिकें आपली छोटुकलीं. त्यांची किंमत व वर्गणीहि जास्त ठेवतां येत नाहीं. शिवाय, वर्गणीदारांच्या संख्येवर तर बालमासिकांची शाश्वति अवलंबून असते; पण ही संख्या वर्धित होत नाहीं. आपलेकडे गांवनिहाय वाचनालयें नाहींत. जीं आहेत त्यांतूनहि मुलांचीं सर्व मासिकें घेतलीं जातातच असें नाहीं. बरें, सार्वजनिक बालवाचनालयाची गोष्ट क्षणभर बाजूस ठेवली तरी, *कुटुंबांतून तरी बालमासिकांना भरपूर वा नीटसा आश्रय* आहे काय ? तेथेंहि नन्नाचा पाढा ! दरेक घरांत लहान मुलांसाठीं कपडे, खेळ, खाऊ, वाढदिवस, ट्रिप्स, इत्यादिकांवर जो बराच खर्च होतो, त्यांत बालवाङ्मयावरहि आजकाल थोडासा व्यय होतो हें खरें, *पण आवर्जून घरटी बालमासिक घेतलें* जातेंच असें मात्र नाही ! मोठ्यांसाठीं सधन कुटुंबांतूनहि याप्रमाणें वर्गणीदारांची वाढ होत नसल्यानें मासिक अर्थदृष्ट्या शक्तिहीन होण्यास मदत होते. जाहिरातींचें उत्पन्नहि वर्गणीदारांच्या संख्येएवढेंच मासिकाच्या अभिवृद्धीस पोषक असतें; *अवश्यक तर असतेंच. पण इतर प्रौढ मासिकाएवढ्या जाहिरातीहि या मासिकांना* लाभत नाहींत. निदान बालसाहित्याच्या तरी जाहिराती यांत असाव्यात ? तेंहि नाहीं ! कारण खप कमी हे जाहिरातदार पहातातच. एकूण लोकाश्रय अत्यंत कमी, म्हणून खप नाहीं व खप नाही म्हणून जाहिरात नाहीं असें हे दुश्चक्र आहे !

आणखी एक संकट असें कीं, ज्यावर लगेच इलाज करणेंहि अशक्यप्रायच म्हटलें पाहिजे. तें म्हणजे या क्षेत्रांतील स्पर्धा ! व्यापारांत स्पर्धेचा अडसर ओलांडला तरच भाग्यचक्र फिरूं लागते. तीच परिस्थिति बालमासिकप्रकाशनाबाबतहि दिसून येईल. उदा.—आज अनेक हजारांनी ज्याचा खप आहे तें 'चांदोबा' मासिक *पहा. त्याचें रूप आकर्षक, किंमत बेताची, अंतरंग कथात्मक व रंजक आणि प्रसार* व्हीलर स्टॉल्सपासून बस स्टेशन पावेतो कोठेंहि, सर्वदूर ! या मद्रासी मासिकानें बालांना वेड लावलें आहे जणुं ! या समर्थ मासिकाशीं आमची द्रव्यहीन बालमासिकें स्पर्धेला टिकूं शकतील काय ? चांदोबाचें स्वरूप सर्वस्वी निराळें, केवळ कथात्मक असतें. एकाद दुसऱ्या कवितेचा व चुटक्यांचा काय तो अपवाद. या गोष्टी पौराणिक, सामाजिक, ऐतिहासिक अशा भिन्न कालांतल्या तर असतातच, पण इराण, ग्रीस अशा परदेशी गोष्टींनाहि यांत प्रमुखस्थान असतें. स्थलकालातीत अशा या कथांना प्रादेशिकतेचें आणखी एक वैचित्र्य लाभलेलें. केरळ, कर्नाटक यांतल्या कथा, उत्तरप्रांतीय गोष्टी, अद्‌भुतकथा, चातुर्यकथा, पिशाचकथा, साऱ्या कथाच कथा ! शिवाय या गोष्टींना सुंदर व रंगीत चित्रांची (चित्रांची पार्श्वभूमि मात्र मद्रदेशीय) जोड असतेच. आज या मासिकानें सर्व बालमासिकांना जिंकून विक्रीचा उच्चांक गांठला आहे. याची

कारणें दोनतीन दिसतात. एक तर याचें बाह्यरूप आकर्षक (रंगीत मुखपृष्ठ, सुंदर छपाई, कागद नीटनेटका, भरपूर चित्रें, इ.) असतें. दुसरें म्हणजे ध्येयवाद वगैरे बाजूस ठेवून फक्त बालरंजनाचें म्हणजे बहुतांशीं कथेचेंच माध्यम चांदोबानें स्वीकारलें आहे. उदाहरणार्थ, राजा विक्रमार्कांच्या व वेताळाच्या गोष्टी बालरंजक कोठें आहेत? पण त्या व तसल्या कथा क्रमशः यातून येतात. अत्यद्भुत कादंबऱ्याहि यात येतात. त्यात तर एवढे चमत्कार, असंभाव्य प्रकार आणि भयंकर गोष्टी येतात कीं, मुलें झोपेंतून दचकूनच उठावीं! अग्निदिप, जुळ्या बहिणी, काशाचा किल्ला, भयंकर देश, धुमकेतू इ. कादंबऱ्या चित्तथरारक पण विसंगतीच्या पायावर रचलेल्या, भीषण प्रसंगानीं भरलेल्या व उद्बोधनशून्यच आढळतात. तरीहि चांदोबाचा खप प्रचंड आहे व एकूण आठ भाषांत हें प्रसिद्ध होतें! या बाबीचें सर्वांत महत्त्वाचें कारण, फार मोठें आर्थिक सामर्थ्य याच्या पाठीशीं आहे व एक जबाबदार प्रकाशन संस्था याचे व्यवहार पहात असते हें होय. आज अनेक व्यवसायांत अशा संघटित संस्था आढळतात व प्रकाशन संस्थाहि त्या प्रमाणात अस्तित्वात येत आहेत. पण महाराष्ट्रीय बालमासिकांना मात्र त्यांचा समर्थ आश्रय मिळू शकत नाहीं! याचें कारण त्याचें महत्त्वच अजून आपल्या सधन मंडळींना पटत नाहीं. हें एक तरी असलें पाहिजे किंवा हाहि एक व्यवसायच आहे, तोहि आर्थिक भांडवलावर चालवावा लागतो याची निश्चित् जाणीव जनतेला झालेली नाहीं, हें असावें? चांदोबाच्या पाठीशीं जे निर्भय व भक्कम आर्थिक आश्वासन आहे, तसें आमच्या कितीशा बालमासिकांना प्राप्त झालेलें आहे?

बालमासिकाच्या एकंदरीत मर्यादित क्षेत्राकडे लक्ष गेलें कीं, आणखीहि दोन तीन शल्यें मनाला रुतणारीं, खुपणारीं वाटतात. हीं मासिकें हाताच्या बोटावर मोजण्याएवढी अल्पसंख्य. पाक्षिक एकादेंच, आणि साप्ताहिक वा बालदैनिक तर एकहि नाहीं! वार्षिक म्हटलें तर कांहीं मासिकें दिवाळी अंक म्हणून 'बालसाहित्यांक' काढतात (शिशुरंजन, साधना, बालवाडी, केसरी वगैरे) या पलिकडे वार्षिकेंहि नाहींतच. ही स्थिति कितीशी स्पृहणीय आहे? इंग्रजींत Childrens Paper नावाची साप्ताहिकें किती मोठ्या प्रमाणावर खपतात!

अशा ग्राम शिशूंची मासिकेंहि तिकडे चालू शकतात. सेव्हन्टीन हें सत्रा वर्षांच्या आतल्या मुलींसाठींच खास चालणारें अमेरिकन मासिक. कथाबहुलतेनें नटलेलीं हीं मासिकें. हीं सर्व समृद्धि पाहिली कीं, आपलें त्या बाबतींतलें औदासिन्य व कमतरता दोन्ही मनात घर करतात. वार्षिकांच्या बाबतींत तरी आशाजनक परिस्थिति आहे काय! केवळ मुलींसाठीं वा केवळ मुलांसाठीं निघणारीं 'गर्ल्स ॲन्युअल' वा 'बाइज् ॲन्युअल' सारखीं उपयुक्त गोष्टींनीं सजलेलीं व तेथील मुलामुलींना प्रिय होऊन बसलेलीं वार्षिकें हीं पाश्चात्य देशांत नित्य दिसणारी गोष्ट

आणि यांतहि वैविध्य किती ! मुलींच्या वार्षिकांत सगळ्या कन्याजीवनाच्याच पण रंजक गोष्टी, कलाकुसरीच्या वस्तु, भरतकाम-विणकामाचे प्रकार येतील. तसें साहसी मुलींचेंहि वर्णन येईल. तर मुलांच्या वार्षिकांत दर्यावरच्या गोष्टी, यांत्रिक गोष्टी येतील. क्रिकेट, पोलो, हॉकी, नेमबाजी, अश्वारोहण इ. खेळांनून गुंफलेली कथानकें सांपडतील. शोधकथा, साहसकथा, असतील ! अशा प्रकारचें मासिक तर राहूद्याच पण एकादें वार्षिक देखील काढणें इकडे अशक्य आहे काय ? पण अशीं वार्षिकें नांवाला देखील इकडे निघत नाहींत खरी.

आतांपर्यंत कालप्रवाहांत विलीन झालेल्या व परिस्थितीला तोंड देऊन टिकाव धरलेल्या या बालमासिकांच्या आढाव्यावरून असें दिसून येते कीं प्रत्येक संपादकाच्या बालमासिक चालवण्याच्या कांहीं अभिनव व अनुकरणीय अशा कल्पना होत्याच. त्या दृष्टीनें प्रत्येकानें बालवाङ्मयवृद्धीला थोडाबहुत हातभार लावलेला आहेच. या सर्व प्रयत्नांचा हा इतिहास नव्यानें बालमासिक काढणारांना निश्चित मार्गदर्शक ठरूं शकेल.

या सर्व कल्पना एकत्र करून व चांदोबासारखे अर्थबल प्राप्त करून घेऊन कोणी एकादें आदर्श बालमासिक काढील तर ते दीर्घायुष्यी होईल व लोकप्रियतेंतहि सर्वांना मागे टाकील. पण या सर्वांची युति जेवढी अवश्य तेवढींच अशक्य नाहीं काय !

●●●

# पाश्चात्यांची बालकथा व तिचे संस्कार

आजकालच्या मराठी साहित्यावर पाश्चात्य साहित्याचे संस्कार अनेक प्रकारें घडलेले दिसतात. बालसाहित्यहि त्याला अपवाद राहिलेलें नाहीं. तिकडच्या अनेकानेक इंग्रजी पुस्तकांचें भाषांतर साहित्यात येत होतेंच. बालसाहित्य तर त्याचा मिरासीचा प्रांत. येथेंहि अनेक कथा आल्या, त्या पाश्चात्य संस्कृतीचें लेणें लेऊनच. विशेषत परिकथा, यक्षकथा ह्या तर खास विलायती माल, जेवढा उपयुक्त तेवढाच वेधक. या गुणाचा प्रभाव पडून भाषांतर, रूपांतराच्या दरवाजा तून आलेल्या पाश्चात्य प्रकृतीच्या यक्षपऱ्यांनी व कथानकांनी इकडचें बालसाहित्य संपन्न सुशोभित केलें आहे.

ही रूपांतराची समृद्धता बाजूस ठेवून पाहिलें तर इतरहि काहीं प्रकारांनीं पाश्चात्य बालकथा पौर्वात्य बालसाहित्यावर भिन्न संस्कार करताना दिसेल. आज अनेक नव्या प्रथा बालकथांचें गुणसौंदर्य वाढवताना आढळतात. त्यातल्या कित्येक या पाश्चात्य संस्करणातूनच उदित झाल्या आहेत. म्हणून, पाश्चात्य बाल कथातील अशा नाविन्यपूर्ण सृष्टीचा व वेगळ्या वाणाच्या अद्‌भुतरम्यतेचा, येथें थोडा परिचय घडवणें अवश्य वाटतें. प्रथम परीकथाचा प्रांत पाहू.

पाश्चात्य परिकथा ही मूलत च अगदीं वेगळ्या घडाईची आढळते. परीकथा म्हटली की, परीची एक सुंदर पण ठराविक मूर्ति दृष्टीमापेक्ष होते. हिचे रूप शब्दातीत, मनोहर आहे, पण आकार अगदीं छोटासा – फुलपाखरा एवढाच – आहे पाश्चात्य परी ही छोटी असली तरी तिच्या व्यक्तिमत्त्वाचे उन्मेष लोभस आहेत, वैशिष्ट्यपूर्ण आहेत. तिचा पोशाख प्राय हिरव्या रंगाचा (बहुधा वनश्रीशीच नित्य साहचर्याचा निदर्शक) असतो कर्ण्याच्या आकाराच्या फुलाचा मुकुट ती घालते. तिला सुंदरसे पंख आहेत. तिचा स्वर मधमाशीच्या गुण

गुणण्यासारखा नाजूक ! दंवबिंदु हें तिचें पेय, फुलांतला मध हेंच तिचें अन्न. फुलें व वर्नश्री हें तिचें निवासस्थान. पाश्चात्य परीचें हें रूपविशेष पाहिलें कीं, तिचे मानवी या दैवी स्त्रीऐवजीं फुलपाखरांच्याच स्वभावधर्माशीं व संवयीशीं अधिक साम्य दिसतें !

या पऱ्यांचेंहि एक राज्य आहे. तेथें ही परीराणी व तिचे प्रजाजन राहतात. आश्चर्य असें कीं, कोठल्याहि नित्यपरिचित सामान्य वस्तूंशीं परिराज्यांतल्या या प्रजाजनांचें अस्तित्व निगडीत असतें ! एकाद्या मुलाला लिहितां लिहितां झोंप आली तर 'शाईपरी' दौतीवर उभी राहून बोलेल. पावसाच्या थेंबाथेंबांतून 'पाऊसपरी' नाच करील. मेणबत्तीच्या ज्योतींतून 'दीपपरी' हंसेल आणि कर्णेदार फुलांतून 'पुष्पपरी' बालकांशीं हितगुज करूं लागेल. या पऱ्यांना किती प्रकारचीं कामें ? स्वप्नें आपोआप पडतात असें आपण मानतो, पण बालकांना पडणाऱ्या स्वप्नांची निर्मिती तरी अशी कधींच स्वयंसिद्ध नसते, असे ही परीकथा सांगते ! एवढेंच नव्हे तर परीराणीचे प्रजाजनच ही स्वप्ननिर्मितीची कामगिरी रोज करीत असतात ! तऱ्हेतऱ्हेच्या स्वप्नपिशव्या विणून सर्व मुलांना झोपेंत त्या पोंचवण्याचें एक मोठें अखंड कार्य परिराज्यांत नित्य चाल्तें, ही कल्पनाच किती अभिनव ! यांतहि द्वाड मुलाला नेमकें भयंकर स्वप्न, व सद्गुणी किंवा आजारी मुलाला आनंददायक स्वप्नच कटाक्षानें पोंचवलें जातें ! याशिवाय लहानसान पक्ष्यांची विचारपूस करून काळजी घेणें, छोटया खारी, ससे इ.च्या शय्येतींत भाग घेणें, फुलाफुलांतून रात्रीं सुगंध भरणें व फुलपाखराच्या पंखांवर मनोहर चित्रें काढणें अशीं अनेक कामें पऱ्याच करीत असतात. अर्थात् ही सर्वच कामें निसर्गाशीं संवादित्व राखणारीं व सृष्टीला मदत करणारी अशींच असतात व त्यामुळें विधात्याचें कार्य अधिक सुकर होतें अशा कल्पनेवरच ही कार्यक्षमता आधारित असते. सारेच रंजक व कल्पित चित्र. पण त्यांतहि योजकता व सद्भाव आहे हें मान्य करावें लागेल.

आपल्याकडच्या बालसाहित्यांत ही पाश्चात्य परिकथांतली परी मराठी वेषभूषा करून वारंवार प्रकटत असली तरी तिचा आत्मा मुळींच बदललेला नाहीं ! तिची परकीय वृत्तिवैशिष्ट्यें कायमच राहिलीं आहेत. तिच्याच जोडीला हरतऱ्हेच्या यक्षांनींहि आपल्या बालकथासृष्टींत प्रवेश केलेला दिसतो. परीकथेप्रमाणेंच यक्षकथाहि अनेकानेक आहेत व या यक्षांचीहि पाश्चात्य जात चटकन् उमटून पडणारी अशीच !

इकडे काय यक्षपऱ्या नाहींतच ? अशी शंका हें विधान वाचून येण्यासारखी आहे. आहेत ना ! आपल्या पुराणांतूनहि परींच्या तुलनेला देवता आहेत व पाश्चात्य यक्षांच्या जोडीला यक्षकिन्नरादि लोक आहेतच ! पण या दोहोंच्या प्रकृतीधर्मांत

काहीं साम्य असलें तरी विरोधच फार दिसतो! पाश्चात्य परी व यक्ष हे भारतीय देवता व यक्षकिन्नराप्रमाणेंच अमानवी असतात, व त्यांना आपल्या देवयक्षाप्रमाणें अनेक प्रकारच्या सिद्धी असतात. वाटेल तेव्हा दृश्यादृश्य होण्याचें व वाटेल तें रूप घेण्याचें दैवी सामर्थ्य पौर्वात्याच्या देवतायक्षाइतकेंच पाश्चात्य यक्षपऱ्यानाहि असतें एवढेंच नव्हे तर गरीब व सद्गुणी माणसाना दैवी देणग्या देऊन त्याचें कोटकल्याण करणें व दुष्टाना विचित्र शाप देऊन शासन करणें हेंहि सामर्थ्य त्याना असतें.

पण हें साम्य वगळलें तर प्रकृतिधर्म व स्वभावविशेष या दोन्हीं दृष्टीनें भारतीय पुराणकथातली दैवी मडळी व पाश्चात्य यक्षपऱ्या यात फार मोठा फरकहि आढळतो. उदा. आपलेकडील यक्ष, देवता वगैरे स्वर्गलोकात राहतात अशी कल्पना आहे, तर ह्या पऱ्याचें राज्य पाताळातच असतें व यक्षहि जमिनी खालीं किंवा डोंगरपर्वताच्या गुहातून राहतात अशी वर्णनें आहेत. शब्दशः जमीन अस्मानचा फरक, नाहीं काय? आपल्याकडेहि अतिमानवी वा दैवी स्त्रीसृष्टि अस्तित्वातच नाहीं असें नाहीं! गरीब लोकाना कधीमधी भेटून त्याचें जन्माचें हित करणाऱ्या या दैवी स्त्रीचें दर्शन भारतीय लोककथातून तर कधीमधीं घडतेच, पण पौराणिक कथातून तर वारवार त्याची साक्ष मिळते. मात्र तेथें ही स्त्री परी या परीसदृश नसते, तर लक्ष्मी, सरस्वती आणि बहुधा पार्वतीच असते! या देवता अतीव रूपमनोहर, कोठेंहि प्रकट वा गुप्त होणाऱ्या असतात. वर अथवा शाप देण्याचें त्याना सामर्थ्य आहे. मात्र त्या गगनसचारी असल्या तरी त्याना पंख नसतात! तसेंच आपले यक्षकिन्नर व विद्याधर या सर्वांनाहि अशाच अतींद्रिय शक्ति असतात. पुराणातरीचे यक्ष रूपमनोहरही वर्णिलेले असतात. ह्या भारतीय यक्षाचें व्यक्तिमत्त्व सामर्थ्यसंपन्न, रुबाबदार, आदर्श असेंच कल्पिलेलें आहे. ते फार मोठे कलावत गणले जातात—विशेषतः सगीतकलेंत तर ते अत्यत पारगत! तसे विचारे पाश्चात्य यक्ष व्यक्तित्त्वसपन्न नसतात! उलट कुरूपच असतात, आणि ही कुरूपता तरी सर्वसामान्य थोडीच आहे? कोणाचे कानच मोठे तर कोणी बेढब डोक्याचा तर कोणी पँगळ्या पायाचा. इग्रजी जुन्या पुस्तकातून आलेलीं याचीं चित्रें पाहिलीं, तर ही तथाकथित कुरूपता त्यातूनही व्यक्त झालेली दिसते. आणि भारतीय यक्षाप्रमाणें हे श्रीमत तरी कोठें आहेत! पुराणातरीचा कुबेर यक्ष तर अलोट धनाचा मालक होता! तसे हे नाहींत. नित्य चाभाराचीं कामें करणारे, फाटका कोट वा मोडकी छत्री दुरुस्त करणारे, व प्रयत्नानें स्वतःचें घर बाधणारे असे कामकरी यक्षच पाश्चात्य बालकथेंतून वारवार दृष्टीस पडतात!

अर्थात् काहीं बाबतींत पाश्चात्य यक्षपऱ्याचें सामर्थ्य व व्यक्तित्व आपल्या देवता यक्षकिंनराहून असें तुलनेनें उणें व कमी प्रतीचे भासत असलें, तरी बाल-साहित्याच्या दृष्टीनें एक मोठा फरक लक्षणीय ठरेल व तो म्हणजे भारतीय यक्ष व

विद्याधर वगैरेंना लहान बालांसंबंधीं बिलकुल ओढ नाहीं, व देवताहि कधीं बालसृष्टींत साधेपणानें रमून त्यांना गमतीनें वर देणार नाहींत. उलट पाश्चात्य अद्भुत कथांचें दालन या यक्षपऱ्यांच्या बालसहवासांतल्या अनेक करामतींनीं सचेत झालेलें दिसेल ! या यक्षपऱ्यांना बालकें जिवाविशेष प्रिय वाटतात व त्यांच्या सहवासासाठीं मुद्दाम राहती जागा सोडून त्या बालकांच्या आसपास येतात, त्यांच्या खेळांत भाग घेतात, अडचणींत सहाय्य देतात ! हा लोभसपणा स्वभावधर्म आपल्या दैवी विभूतींत सापडणें मुष्कील ! कठीण तपश्चर्या केल्यावाचून देव भेटणार नाहीं हाच येथें दंडक ! अर्थात् कांहीं पुराणप्रसिद्ध मुलांना ध्रुव वगैरेंना देव भेटलेला आहे पण तो अत्यंत कडक तपाचरणानंतर, देहदंडनानंतर ! कांहीं गरीब मुलांमुलींना पार्वतीहि भेटली. पण त्यांत धार्मिकतेचा व भक्तीचाच अंश अधिक असलेला आढळतो. पण या देवता वा हे यक्ष एखाद्या छोट्याला वा चिंगीला क्षुद्र कारणांनीं भेटतील, तिचें क्षेम विचारुन, एकादी छोटी भेट देतील असा संभव फारच कमी. उलट, पाश्चात्य परीयक्षांचे बालजगताशींच जवळीकीचे लागेबांधे जास्त ! म्हणूनच आपल्या दैवतकथांतून मुलें आढळलीं तरी त्या कथांना गांभीर्य व भक्तीचें आवरण दिसतें. उलट, पाश्चात्य परीचे अस्तित्व बालकथेंत खेळकरपणा व अद्भुतरम्यता निर्माण करणारे असतें. असा हा मूलभूत फरक आहे.

या पाश्चात्य यक्षपरीची बालाशीं मैत्री तरी किती ! जरा एखाद्या मुलामुलीनें चांगलेसें काम केलें, अनाथ अपंगांना मदत केली किंवा पशुपक्ष्यावर दया केली, कीं परीराणी त्याला चटकन् एकादें छोटेसें बक्षीस देऊन टाकील ! मग तो कधीं न संपणारा रुपया असेल, किंवा सारे श्रम विसरायला लावणारी ती एकादी चिमुकली चकचकीत घंटा असेल ! लहान मुलेंच नव्हे तर त्यांचा चिमणा खेळण्यांचा संसारहि परीला फार आवडतो. खेळणीं रात्रीं सचेतन होतात हीहि एक पाश्चात्य कल्पना बालसाहित्यांत गृहीत धरलेली आहेच. तिला अनुसरुन या सचेत खेळण्याबरोबर परी रात्रींची खेळते व बाहुल्याबरोबर चहापान करून नृत्यहि करील अशा खेळकर स्वभावाची असते. पाश्चात्य यक्षाचीहि मनोवृत्ति या परीच्या स्वभावधर्माशीं जुळणारी व सहाय्यक अशीच दिसते. पऱ्यांप्रमाणेंच यांनाहि बालसृष्टी अतीव प्रिय आहे. सद्गुणी गुणी मुलें (व मोठी माणसें देखील !) त्यांना फार आवडतात, इतकेंच नव्हे तर यांना संधनृत्याचे वेड फार असतें. पाश्चात्य संस्कृतीतहि त्याचें विशेष महत्त्व असतें. त्याला धरूनच हें वर्णन आहे. या कलेत जर एखाद्या मानवी व्यक्तीनें नैपुण्य दाखवलें, तर यक्ष त्या कलेचा सन्मान करून त्या माणसाला सुंदर देणग्या बहाल करून टाकतात. अद्भुत पण दिसायला क्षुद्र ! हे कधीं कुणाला चमत्कारिक विद्या देतात. अशा कीं, त्या पेरल्यावर सबंध सजवलेले घरच्या घर वर यावें ! तर कधीं एकादा लाकडी चमचा — पण असा कीं पाहिजे

तो खाद्य पदार्थ उत्पन्न व्हावा ! या देणग्याचें स्वरूप परीराणीच्या देणग्याप्रमाणेंच असतें. परी व यक्ष या दोघाचाहि स्नेहभाव असतो. जणु एकाच अद्भुत कथेचे दोन महत्त्वाचे व सत्प्रवृत्त असे हे घटक असतात.

पाश्चात्य परिकथातून जसें परी हे एक महत्त्वपूर्ण कार्यकेंद्र असतें, यक्ष हें जसें त्यातील सहाय्यक स्थान असतें तद्वतच या दोघाना विरोधी अशीहि एक जबरदस्त सस्था अस्तित्वात आहे, ती म्हणजे चेटकीण ( Witch ) ही होय ! दरेक ठिकाणीं सुष्ट तसे दुष्ट असायचेच, या नियमाला परिकथाहि अपवाद नाही. ज्या राज्यात लोकाचें कल्याण करणाऱ्या सज्जन यक्षपऱ्या राहतात, तेथेंच इतराना विनाकारण छळणाऱ्या काही दुष्ट म्हाताऱ्या नायाहि असतात ! त्यानाच चेटकीणी म्हणतात !

परीप्रमाणें चेटकीणहि भारतीय लोककथेंत, दैवतकथेंत या बालकथेंत कधी अस्तित्वात नव्हती. तीहि सपूर्णपणें परकीय आतम्याचीच आहे. त्याऐवजी राक्षसीण मात्र कोठेंकोठें आढळते, पण तसें पाहिलें तर आपलेकडील सर्वच अद्भुत गोष्टींतून बहुधा राक्षसच चोहीकडे वावरत असतात ! त्यामुळेंच कीं काय, गोष्टीतल्या राक्षसिणी आपल्या थडपणें विश्राति घेत नसलेल्या असाव्यात असें वाटतें ! कसेंहि असो, चेटकीणीशी स्पर्धा करणाऱ्या दुष्ट व कठोर व्यक्तिमत्त्वाची स्त्री आपल्या बालसाहित्यातून फारशी प्रत्ययास येत नाहीं हे खरें !

परीप्रमाणेंच चेटकीचे रूपविशेष व व्यक्तिमत्त्व ही पाश्चात्य बालकथेंतून जसेंच्या तसें इकडील वाङ्मयात उतरलेलें दिसतें. परीच्या रूपाप्रमाणेंच चेटकिणीचेहि रूपगुणविशेष ठराविकाच्या चौकटींत बसणारेच आहेत. ती आकाशसचार करू शकते व राहते नेहमीं गुहेंतून ! या चेटकिणीला चेटूक, जादूमतर सुप येतात. तिचे वाहन लाकडाच्या झाडू, खराटा हें असतें. नाक टोकदार, डोळे दुष्टपणानें लुकलुकणारे, वय वार्धक्यात शिरलेलें, कपडे हिरवे. तिची जादूची रसायनें सिद्ध होतात तीं लहान मुलाचीं हाडें, वाघळाचे डोळे, राजकन्येचे केस इत्यादि भयानक सामुग्रीनीं. हिलाहि सिद्धी आहेत व मानवाला ही पशुपक्षी, बेडूक, हुडुप वगैरे काय वाटेल ते करणारी आहे. हिचा सबध लहान गोष्टींत येतो तो क्रौर्यता वाढवणारा व दुष्टाव्याचाच ! सत्प्रवृत्तीचें प्रतीक परी तर जगातल्या सगळ्या दुर्गुणाची सस्था चेटकी कल्पिली जाते. या दुष्टाव्यानें पऱ्याच्या मुक्ततेंत अनेक रग भरले जातात व कथानकास द्रुतता येते. असें असलें तरी या सर्वसिद्ध चेटकिणीलाहि मृत्यू आहे. ती वेड्याप्रमाणें आपलें चैतन्य पोपटात किंवा झाडात ठेवतें व शूर नायक हुडकून तें नष्ट करतो, किंवा परीचा विजय हाच तिचा विनाश. सुष्टतेन दुष्टाव्याला जिकता येतें हेंच महान् तत्त्व, पाश्चात्य परीकथेंतलें हे छोटेमोठे घटक सिद्ध करत असतात.

यक्षपरी व चेटकी यांनीं जसा बालसाहित्यांत रंजकतेचा एक आकर्षक प्रान्त निर्माण केला, तद्वत् पाश्चात्यांच्या आणखीहि कांहीं भिन्न साहित्यसामुग्रीनें बालकथेला नाविन्याची झिलई चढवली आहे. तिच्यांतील अद्भुत-रम्यतेला वेगळाच आकार दिला आहे. त्यांत जलकथा, नाताळकथा व खेळणीकथा यांची प्रामुख्यानें गणना करावी लागेल.

पैकीं जलकथा उर्फ समुद्रकथांचा भरणा आपल्याहि पौराणिक वाङ्मयांत कांहीं प्रमाणांत आहेच. बोलूनचालून वरुणाचेंच हें जलराज्य, पण वरुण ही पडली महान् देवता. ती अशी पोराबाळांच्या छोट्या आवाहनानें कुठली प्रसन्न होणार ? वरुणकथा मराठी साहित्यांत असल्याच तर त्या प्रौढ बोधरूपांत, व ऋषि, देव, दानव इत्यादि पुराणपुरुषांशींच संबंधित दिसतात. त्यांचा देहस्वभावच निराळा. उलट, पाश्चात्यांच्या बालकथांतून आढळणारे जलराज्य म्हणजे खरोखरच रंजनाचें आणि कल्पकतेचें समुद्रासारखेंच मोठें अथांग प्रलोभन वाटतें ! एक समुद्रकथा म्हटली तरी त्यांत जलचरकथा, जलकन्यांच्या ( Mermaids ) गोष्टी, कधीं एकादा मानव चुकून वा मुद्दाम समुद्रात गेल्यामुळें घडणाऱ्या अद्भुतरम्य साहसकथा, समुद्र राजाच्या वैभवकथा अशा अनंत तऱ्हांनीं ती नटलेली दिसेल. जलराज हाहि एक सामर्थ्यशाली देवच मानला गेलेला आहे; पण समुद्रस्वामी वरुणाहून त्याचें वर्णन फारच निराळें येतें. त्याचे केस समुद्राच्या लाटासारखेच गर्द निळे, कुरळे व कमरेइतके लांब असतात. त्यावर रत्नमुकुट असतो. आकारानें तो राक्षसाएवढा प्रचंड, पण वृत्तीनें मोठा सौम्य असतो. संगीत व नृत्य यांची यालाहि फार आवड ! ' साडको ' नांवाच्या रशियन कथेंत एका कोळ्याचें संगीत रोज ऐकून समुद्रदेवानें आपण होऊन वर येऊन एक रत्नपेटी त्याला बक्षीस दिल्याचें वर्णन आहे, तर दुसऱ्या एका गीतगायकाला समुद्रतळीं पाहुणा म्हणून नेऊन त्या संगीततालावर स्वतः राजानें नृत्य केलें व त्या नृत्यामुळेंच समुद्रांत लाटा उसळून भयंकर वादळ झाल्याचाहि उल्लेख आढळतो.

अशा या विलक्षण समुद्र देवाचें जलमंदिर उर्फ राजवाडा समुद्रतळाशीं असून हिरव्या रंगाचा असतो. त्याच्या भिंती पोवळ्याच्या, छत सुंदर मोतीं असलेल्या शिंपल्यांचें, बगीचा समुद्रवेली. पुष्पांचा आणि दिवे रत्नांचे असतात. रत्नाकराच्या या वाड्याचें वर्णन जेवढें आकर्षक तेवढेंच सत्याशीं जवळीक ठेवणारें वाटत नाहीं काय ? आणखी एक फरक आहेच. सरिता सागर हे पतिपत्नी मानण्याचा संकेत आपल्या वाङ्मयांत परंपरेनें चालत आलेला; पण या पाश्चात्य जलकथेंतून समुद्र हा पिता व नद्या या त्याच्या कन्या असेंच कल्पिलेलें आढळतें व हा पर्याय बालमनाला अधिक जवळचा वाटणें साहजिकच नाहीं काय ? एका कथेंत तर, समुद्रराजाला तीस नदीकन्या होत्या असें वर्णन होतें. त्यांतल्या सर्वांत लहान

नदीकन्येवर एक धरतीवरचा बालाडी फार प्रेम करायचा. त्याला या नदीची अनावरच ओढ वाटे. अखेर त्याला पाण्यात नेऊन त्या नदीनें स्वतः स्त्रीरूप घेऊन त्याच्याशी ससार थाटला असाहि कथाभाग आला आहे. यात या नदीचा वर्ण निळा (पाणी निळें दिसतेंच), नदीच्या सथ प्रवाहातून जाणवतो तसाच तिचा आवाजहि मजूळ व नील लहरींचाच लांब कुरळा केशपाश असें हें रूप वर्णिलेलें होतें हें सत्याधिष्ठित रूपक मोठें रम्य नव्हे काय? आणि या पद्धतीच्याच किती तरी गोष्टी! सागरीचे जलपुत्र वा जलकन्या पृथ्वीवरील मानवावर पुष्कळदा मोहित होऊन त्याच्याशी लग्न करू इच्छितात. या विजोड स्वयंवराच्या व विचित्र ससाराच्या हकिकतींची गोष्टी अवीट ठरणारीच, त्यातहि मुलाना आवडणाऱ्या वैचित्र्याचीहि याला जोड दिलेली असली म्हणजे तर या जलकथा फारच बालप्रिय होतात! एका नकाने (वास्तविक हा पाण्यात आल्यावर सुदर तरूण होत असे!) एका शेतकन्याच्या गरीब घोरीच्या रूपाला भुलून तिच्याशी लग्न केलें. त्याचा ससार अगदी वैभवपूर्ण होता. फार काय, त्याचे नोकर चाकर होते तेहि मगरू, मासोळी, सुसरू असलेच होते! एका छोट्या समुद्रकन्येनें पृथ्वीवरील दोन मुलाना मेजवानीला बोलावलें होतें, तेव्हा एक सपाट रुद पाठीच्या माशाचाच 'डायनिंग टेबल' म्हणून उपयोग केला होता. व मोठ्यामोठ्या रुद शिंपल्यातून खाद्यपदार्थ घालून या माशाच्या पाठीवर ठेवले की तो आपला हळूच पोहत पोहत पाहुण्यापुढें येऊन थांबायचा. किती गमतीचें चित्रण हे! हा छोटुकला 'ट्रे' छोटुकल्या वाचकाना किती मजेदार वाटत असेल याची कल्पना करा. आणखी काही मजेदार वर्णनें पहा. एका छोट्या राजकन्येचा रोजचा पाणरथ सात मोठेमोठे मासे ओढतात, व एखादा लालभडक खेकडा त्याचें 'सारथ्य' करताना दिसतो. फक्त शेवाळच गिळू शकणाऱ्या व दतरहित अशा एका प्रचड माशाच्या तोंडात शिजून काहीं मानवी मुलानीं जलप्रवास केला तेव्हा त्या माशाची जीभ गादीप्रमाणें मऊ वाटली इतकेंच नव्हे तर कानाच्या भोकातून हवा पण आत येत होती, अशी हीं सारी अद्भुत वर्णनें बालाना चित्तवेधक का वाटणार नाहींत? असा अजब रथ आणि अशी विचित्र 'मत्स्य केबिन' प्रत्यक्षात नसली तरी कल्पिताशतेंच तिचें रूप नित्य बालाकर्षकच ठरायचें! जलकथातून अशा कितीतरी नवनवीन व मजेदार कल्पनाचा आविष्कार झालेला दिसून येईल.

समुद्र हा बोलूनचालून रत्नाकर. त्याच्या ऐश्वर्याला सीमा कोठली? अँडरसनच्या एका गोष्टींत जलकन्येच्या शेपटावर चार मोठी मोत्यें चकाकत असल्याचें वर्णन आहे तर दुसरीकडे रत्नाच्या मूल्यवान कगव्यानें जलकन्या सोनेरी केस विचरीत बसल्याचें दृश्य दिसेल. काही ठिकाणी समुद्रतळाचीं घरें रत्नदीपानीं उजळलेली असल्याचेंहि सांगितलें आहे.

या सर्व समुद्रकन्यांचें आपल्याकडील नागकन्यांशीं बरेंच साम्य दिसतें! नागकन्या कमरेखालीं सर्परूप असतात तद्वत् याहि कन्या कमरेपर्यंत मानवरूपिणीच असल्या तरी कमरेखालीं मात्र पायाऐवजीं यांना माशासारखेंच एक सुंदर, डौलदार शेपूट असतें. कांहीं ठिकाणीं 'मरमेड' ही पूर्ण मानवी रूपाची वर्णिलेली आहे. मात्र ती सीलचें वा मत्स्याचें कातडें पांघरून नित्य पाण्यांत राहूं शकणारी अशी व्यक्ति आहे. या सर्व जलकन्या सुंदर गातातहि. बहुधा चांदण्यारात्रीं त्या समुद्रांतल्या खडकांवर येऊन बसतात, किंवा क्वचित् कातडें काढून ठेवून मानवरूपानें किनाऱ्यावरहि येतात व मग एखादा प्रेमवेडा मानव त्यांना पकडतो, तें कातडें कायमचेंच लपवून ठेवतो आणि मग त्यांना मानवांशीं पृथ्वीवरचा सामान्य संसार करावा लागतो, अशाहि अनेक कथा आहेत. मत्स्यकन्या ही नेहमीच अतीव सुंदर असते व तिच्या अस्तित्वानें अनेक विलक्षण जलकथांना नवें रंगरूप व सौंदर्य चढलेलें दिसतें.

या जलकथांत आणखी एका कल्पनेचा नाविन्यपूर्ण व वेगळा आविष्कार आढळतो. वृद्ध माणसें मृत्यू पावलीं कीं, जलदेवता त्यांना आपल्या जलराज्यांत नेऊन झोंपविते व परत त्यांना तान्हीं बाळें करून पृथ्वीवर पाठविते! पृथ्वीवरचीं लहान बाळें दुर्दैवानें मरण पावलीं तर मृत्यूनंतर याच जलदेवतेच्या राज्यांत तीं सजीव होऊन रहायला येतात, तेथें त्यांचे खेळहि चालतात किंवा छोटीं छोटीं कामेंहि तीं करतात व पुनर्जन्माच्या वेळीं येथूनच पृथ्वीवर येतात, अशा आशयाच्या गोष्टींचाहि पाश्चात्य जलकथांतून भरणा आढळून येतो. आपल्या हिंदु संस्कृतींत मृत जीव स्वर्गलोकांत वा यमपुरींत (तीहि आकाशांतच असते!) राहतो आणि पूर्व संचितानुसार पुनर्जन्म घेतो असें कल्पिलें आहे व त्यावर आधारलेल्या अनेक कथाहि आहेत; त्याचाच हा एक वेगळा नमुना. फरक एवढाच कीं, या कथा बहुधा मृत असूनहि 'जीवननिष्ठ' असलेल्या बालकांवरच आधारित असतात. (Sea Babies, Water Babies वगैरे) त्यामुळेंच त्यांना बालकथांत जागा देण्यांत आलेली असावी.

नाताळकथा हाहि परदेशी बालकथाचा आणखी एक वैशिष्ट्यपूर्ण प्रकार मानला पाहिजे. दिवाळीइतकाच महत्त्वाचा व बालांच्या आनंदाचें वर्धन करणारा हा नाताळसण. त्याचा संबंध बालांच्या खेळण्याशींच अधिक असतो. खिसमसमध्यें बालांना घरोघर खेळणीं दिलीं जातात, पण पूर्वसंकेतांना अनुसरून घरचीं माणसें या कृतीभोंवतीं मुद्दामच गूढ वातावरण निर्माण करतात. आदल्या रात्रीं झोंपतांना मुलांच्या उशाशीं एक मोठा मोजा ठेवला जातो. या मोज्यांत रातोरात खिसमस – फादर उर्फ नाताळबाबा खेळणीं भरून ठेवनील अशी मुलांची समजूत

करून दिली जाते. या बाबाचें वर्णन व रूपहि ठरविलें आहे. लालभडक डगला, लाल गोंड्याची टोपी, पांढरीशुभ्र दाढी, चर्या वृद्ध पण हसरी असे हे बाबा खेळण्यांचें एक भलेमोठें पोतें घेऊन घरोघर जातात आणि रात्रीं निजानीज झाल्यावर खेळणीं वाटतात.

या मजेदार संकेताला पाठिंबा देण्यासाठीं यावेळीं खेळण्या भरलेले जाळीदार कापडाचे मोजे आयते विकतहि मिळतात व वडील माणसें हे मोजे घेऊन रात्री मुलांचे बिछान्यात गुपचूप ठेऊन देतात. घरें शृंगारतात, रोषणाई केली जाते. नाताळांत घरोघरीं एक कृत्रिम शोभिवंत झाड केलें जातें, त्यांतून खेळणीं लटकत असतात आणि तऱ्हेतऱ्हेचे दिवे लुकलुकतात. अनेक बालकथांना या नाताळसणाची व संकेताची पार्श्वभूमि लाभलेली असते. खेळण्यांच्या कितीतरी कथांतून नाताळबाबाचा उल्लेख येतो. बाबाच्या पोत्यांतून निसटलेल्या द्वाड खेळण्यांच्या कथा किंवा नादुरूस्त व मोडकीं खेळणीं बाबाच्या स्पर्शानें परत दुरूस्त होतात अशाहि तऱ्हेनें नाताळकथा खेळवली जाते. नाताळबाबासारखे केवळ बालरंजन करणारे पुराणपुरुष आपल्याकडे आहेत कोठें ? या खिसमसकथांमध्यें अद्भुत चमत्कारांनाहि फार मोठें स्थान आहेच. उदा. एका यक्षकथेंत एका छोटुल्या यक्षानें एक रद्दी दिसणारें झुडूप एका उपकारी गरीब मुलाला दिलें. त्याला वर्षभर ना फूल ना कळी ! पण खिसमस इव्हला तें एकदम टवटवलें. त्याला मोठ्यामोठ्या टपोऱ्या कळ्या धरल्या व मुलांनी सहज उच्चारलेल्या नांवांचीं खेळणीं त्या कळ्यांतून भराभर प्रकटू लागलीं ! ओहो, तें तर नाताळबाबाचें खेळण्यांचें झाड होतें व तो यक्ष अशा अनेक झाडांची मशागत करणाराच होता ! पाहिलें तर सारीच कल्पनारम्य सृष्टि, पण बालांना किती आश्चर्य वाटणारी !

खेळण्यांच्या गोष्टी हाहि आणखी एक वैशिष्ट्यपूर्ण विभाग पाश्चात्य बाल कथांतून आढळतो. मुलांचीं खेळणीं हीहि मुलाएवढींच आश्चर्य असतात. तीं बहुविधतेनें नटलेलीं असतात. पत्रें, चिंध्या, धातू, माती, राधा, प्लॅस्टिक अशा भिन्न वस्तूंतून निर्माण झाल्यानें त्यांत वैचित्र्यहि फार असतें, शिवाय प्रकार तरी किती ! एक बाहुल्या म्हटल्या तरी त्या हसणाऱ्या, रडणाऱ्या, डोळे फिरवणाऱ्या आणि किल्ली दिल्यावर हालचाल करणाऱ्या... इतक्या तऱ्हेच्या कीं, मुलेंच नव्हे तर मोठीं माणसेंहि थक व्हावीत ! लोकरीचीं अस्वलें, लाकडी ठोकळे, मातीच्या मूर्ती यांत्रिक विमानें, मोटारी, बोटी वगैरे अनंत तऱ्हा ! पाश्चात्य घरांतून बहुधा छोट्या बालकांसाठीं एक स्वतंत्र खोली राखून ठेवलेली असते. तिला 'नर्सरी' म्हणतात. हीच सर्व खेळण्यांचीहि जागा. त्यामुळें या खेळण्यांच्या कथा – कवितांचा जो एक स्वतंत्र विभाग परदेशी वाङ्मयांत असतो त्यालाहि 'नर्सरी स्टोरीज' किंवा नर्सरी – ऱ्हाईम्स' अशीच संज्ञा दिली जाते.

या सर्व नर्सरी उर्फ शिशुवाङ्मयाकडे दृष्टि टाकली कीं अनेक वैशिष्ट्यें लक्षांत भरतात. त्यांत कांहीं अलिखित संकेतहि गृहित धरून हें लेखन झालेलें दिसतें. त्यांतील एक हा कीं, नर्सरी कथांतील शेकडा सत्तर गोष्टी स्वप्नकथा असतात. दिवसभर मुलें या खेळण्यांनींच खेळत असल्यामुळें त्यांना स्वप्नेंहि खेळण्यांचींच पडत असावींत हें क्रमप्राप्तच धरून या गोष्टींची रचना केली जाते. या स्वप्नकथांतहि ठराविक असा एक संकेत आहेच. रात्र होऊन सामसूम झाली कीं, दिवसभर अचेतन असलेलीं सारींच खेळणीं सजीव होतात, हंसू बोलूं लागतात. आपल्या जगाचे व्यवहार पाहतात. खोडकरपणा करतात, एकमेकांची थट्टामस्करी करतात व या सर्व क्रियाप्रक्रियांवर आधारलेल्या अनेकानेक बालकथा निर्माण होतात. बाल-सृष्टींतल्या शर्यती, संमेलनें, शाळा, प्रवास, भांडणें, वाद आणि खेळ इत्यादि गोष्टी खेळण्यांच्याहि अत्यंत आवडीच्याच दिसतात. या निशाचर खेळण्यांच्या क्रीडा मोठ्या अगत्यानें व रसिक वृत्तीनें पाश्चात्य बालसाहित्यांत वर्णिलेल्या असतात. आणि कल्पनाविलास, बालकांचे स्वभावधर्म व रंजकता याचा या गोष्टींत सुंदर मिलाफ आढळतो. अर्थात् या सर्वच गोष्टी अगदीं छोटुकल्यांसाठीं असतात. त्यामुळें ५ ते ७ वर्षांपर्यंतच्या बालश्रेणीसाठींच त्याचा उपयोग प्रामुख्यानें केला जातो.

मात्र या खेळण्यांच्या गोष्टींत भलतीच वाढ होऊन आतांशा १००–१०० पृष्ठांच्या कादंबऱ्या देखील 'टॉयलॅंडच्या गोष्टी' किंवा 'खेळनगराची सफर' अशा नांवानें प्रसिद्ध झालेल्या पाहण्यांत आहेत. एनिड ब्लायटन हिचें Tales of Toyland हें पुस्तक या दृष्टीनें नमुनेदार ठरावें. या पुस्तकांत खेळण्यांच्यासाठीं एक भुयारी रेल्वेदेखील आहे व सगळीं खेळणीं तेथील (खेळण्यांच्याच) आगगाडींत बसून प्रवासास निघालीं आहेत, असा हा कथाभाग! त्यांत स्टेशनेंहि आहेतच. पैकीं सगळे ससे गाजरपूरला उतरले, दूधवाडीला मनी-माऊशा उतरल्या व परीनगरला पंखवाली खेळणीं उतरलीं असें हे वर्णन. कल्पकता व नाविन्य दोन्हीं दृष्टीनें हें पुस्तक उल्लेखनीय आणि अनुवादायोग्य आहे. आपल्याकडे

असतात शाळेचीहि सावलीरूप इमारत, शिक्षकाचीहि छाया आणि गोड्या करण्यास उत्सुक अगर अभ्यासू मुलांच्याहि छायाच ! अशी या कल्पित सृष्टीची कल्पना आपणास अद्याप नवीनच आहे. यातील मजकुराहूनहि चित्रेंच अधिक बाल्की आढळतात

हिमकथांचा एक नाविन्यपूर्ण प्रांत पाश्चात्य कथांतून आढळतो बर्फांतून कित्येक महिने तेथे बर्फ पडत असतें व मुलें बर्फाचे शिराळशेट बनवून खेळतात बर्फावरून स्केटिंग करतात. अर्थात् बर्फमय वातावरणाच्या पार्श्वभूमीवर आधार लेल्या कितीतरी गोष्टी तेथल्या बालकांना अगदी नित्याच्या व म्हणून प्रिय असाव्यात यात नवल कसलें ? हिमराणी, हिमकन्या, हिमराज हेहि त्यांच्या कल्पितकथांतून आढळतात व बर्फाचे चकाकणारे राजवाडे, बर्फात लपलेले प्राणी यांच्याहि गोष्टी पुष्कळ आहेतच.

पण आपला भारत पडला उष्ण देश. इकडे काश्मीरखेरीज बर्फमय प्रांतच नाही. अर्थात् या बर्फकथा 'काश्मीर' वा हिमालयातील पहाडी बालकांना आवडण्यासारख्या आहेत व कदाचित् त्या प्रांतात तशा कथा प्रचलित असतीलहि ! पण महाराष्ट्रात मात्र त्याचें वावडेंच आहे म्हटलें तरी चालेल.

असंबद्ध कथांचाहि 'नॉन्सेन्स ऱ्हाइम्स' प्रमाणेंच पाश्चात्य बालकथादालनात प्रवेश झालेला दिसतो. आपल्याकडे तो अजून प्रचारात आलेला नाही. यातील वर्णनेंहि सर्व अशक्य कोटीतली, परंतु कटाक्षानें विनोदीच असतात अर्थात् या 'काहींच्या नाहींच' गोष्टींतून ग्रहणीय काहींच नसते हें उघड आहे, परंतु विरोधाभासात्मक प्रत्यय वाक्यावाक्यागणिक येतो व विशेष म्हणजे त्यातील अशक्यता, असंभाव्यता ही बालकानांहि पटण्याएवढी स्पष्ट व स्थूलरूप असते. त्यामुळें बालबुद्धीला नवें खाद्य मिळत.

खालील वर्णन असेंच पाहण्याजोगें आहे—

"सकाळी मी बाहेर पडलों, तेव्हा दुपारचे दोन वाजले होते सायंकाळचा सूर्य व पौर्णिमेचा चंद्र आकाशात जवळजवळच झगझगत होते समुद्रावर मी गेलों ता त्यावर सर्व गवतच वाढल्यानें तो हिरवा दिसत होता व घोडे चेंडुफळ्या खेळत होते. खदखदा हसणें ऐकू आलें म्हणून मागें पाहता तों नारळीच्या झाडाच्या शेंड्यावर बसून देवमासे हसत खिदळत होते."

यातील प्रत्येक गोष्ट अशक्यप्राय. तरीहि मुलें या गोष्टी वाचून खूष होतात त्यात चमत्कारिक चित्रेंहि असतात, आणि त्यामुळें तर हें वाचन अधिकच रोचक ठरतें

स्वप्नकथांचाहि विभाग पाश्चात्य शिशुकथेत समृद्धीनें आढळतो परंतु या कथा आपल्याकडेहि वैपुल्यानें आलेल्या आहेत, व त्या पद्धतीवर नव्यानें लिहिल्याहि

जात आहेत, तेव्हां उल्लेखाएवढेंच त्याला येथें स्थान; पण बाकीचे वर उद्‌धृत केलेले प्रकार आपल्या बालकथेंत येत आहेत ते कधीं महाराष्ट्रीय रूप घेऊन तर कधीं मूळ वेषभूषेंत !

अशी आहे ही पाश्चात्यांच्या बाल व शिशुसाहित्याची रूपरेखा ! त्यांत अनेक सौंदर्यविशेष आहेत. नवकल्पनांचाहि आढळ त्यांत वारंवार होतो. आपल्याकडील अनेक बालकथांचें मूलधन यांतून दृष्टीस येतें. अनुवादहि होण्यास हरकत नाहीं, पण भाषेचें व भाषांतराचें अवधान सांभाळलें गेलें नाहीं तर घेडगुजरी असें स्वरूप मूळ कथासौंदर्यास गालबोट लावतें. यासाठीं पाश्चात्य बालकथेची मूळ प्रकृति कशी आहे, तिचा आकार, रूप व सौंदर्य कसें असतें याचें हें साक्षेपानें वर्णन ! तौलनिक अभ्यासाला त्याचा चांगला उपयोग होऊं शकेल यांत संदेह नाहीं. ●●●

# शिशुसाहित्य

अलीकडच्या ३०–४० वर्षांतली, बालसाहित्यदृष्टीनें, आणखी एक विशेष सुधारणा म्हणजे त्याच्याकडे शिक्षणतज्ज्ञ व मानसशास्त्रज्ञ विशेष चिकित्सेनें पाहूं लागले ही होय. मराया मॉँटेसरीबाईचें बालशिक्षणाचें व शिशुशिक्षणाचें एक नवें स्वतंत्र तंत्र १९०० सालानंतर अस्तित्वात आलें त्याचा परिणाम घडून बालमंदिरें उर्फ शिशुशाळा मोठ्या शहरांतून सुरू झाल्या व त्यांत बालांना अगदी सोप्या गोष्टी, कृतिगीतें, गाणीं, संवाद हे शिकवले जाऊं लागले. नव्यानें प्रसिद्ध होणाऱ्या शिशुसाहित्यावर या घटनेचा थोडाबहुत परिणाम होणें अपरिहार्यच होतें. शिवाय अनेक पुस्तकांतून बालमानसशास्त्राबद्दलहि विवेचन येऊं लागलें.[१] शैशवापासून बालमनाची वाढ कसकशी होते, त्याच्या जाणीवेंत व साहित्यविषयक अभिरुचींत कसा फरक पडत जातो याचेंहि दिग्दर्शन या पुस्तकांतून थोडेंबहुत होत होतेंच. त्याचाहि परिणाम घडून शिशुसाठी स्वतंत्र रचना हवी असल्याची जाणीव लेखक, संपादक, प्रकाशक, पालक, शिक्षक या सर्वांना झाली व शिशुसाहित्यात प्रामुख्यानें कथा व गीतें [illegible][२] यांना या बालमनोरचनेच्या दृष्टीनें नवा आकार येऊं लागला.

अर्थात् त्यापूर्वी या अल्पवयाच्या बालांसाठी साहित्य नव्हतेंच असें मात्र नाहीं, त्याला बालमासिकांनीं शुभारंभ यापूर्वीच केला होता! 'आनंद' मासिकानें 'अगदीं लहान मुलांसाठीं' हें सदरच सुरू केलें होतें. त्यांतून छोट्या छोट्या सोप्या कथा मोठ्या अक्षरांतून येत असत. मग इतरहि [illegible] या पद्धतीच्या बाळगोष्टी येऊं लागल्या व त्या त्या संपादकांनीं [illegible]

नवी कल्पना अस्तित्वांत आणली. हळूहळू यांतलीं तत्त्वें स्पष्ट होत जाऊन वयवारी-नुसार भिन्न प्रकारचें *बालवाङ्मय असावें ही कल्पना प्रसृत झाली* व त्यानुसार शैशव साहित्याचीहि नवनिर्मिती होऊं लागली. आणि आतांपर्यंत शेंकडों शिशु-कथांचीं पुस्तकें बालांच्या हातीं आलीं आहेत. कथांइतकाच शिशुकाव्याचाहि प्रांत समृद्ध होत चालला आहे. त्याचे गुणधर्म भिन्न असल्यानें त्याचा विचार स्वतंत्रपणें करणें योग्य ठरेल.

छोट्या मुलांना बोलण्याचालण्याची नीट समजूत आल्यापासूनचें वय म्हणजे ३ ते ५ वर्षे. हें पूर्वप्राथमिक शिक्षणाचें वय कल्पिलें गेले आहे. या वयांत शिशु-मंदिरांतून प्रत्यक्ष वाचन घेतलें जात नसलें तरी सोपी गाणीं व अगदीं चिमुकल्या गोष्टी यांची ओळख त्याना कथन व पाठांतर या पद्धतीनीं करून दिली जाते. *यानंतरचें वय म्हणजे ५ ते ८ वर्षे. या वयाचीं मुलें हींच बालवाचकांची शिशुश्रेणी* मानली गेली आहे. या वयांत बालक अक्षरें लावून वाचायला शिकतें, गोष्टी ऐकतांना त्यात तपशील हवा म्हणून हट्ट करतें, जाणतेपणानें जरा विस्ताराच्या गोष्टीहि हळूहळू ग्रहण करूं शकतें व अभिनयदृष्टीनें छोटीं गाणीं आणि नाट्यात्मक वाक्यें याबद्दलहि रसिकतेनें आवड प्रकट करतें. म्हणून शिशु–साहित्यांत फक्त सोपीं गाणीं, लहानलहान, कमी व्याप्तीच्या गोष्टी व क्वचित् सोपी नाटुकली एवढ्याच विषयाचा अंतर्भाव होतो. या विषयांवर छोट्यांसाठी अनेकानेक पुस्तकें प्रसिद्ध होत असून त्यांचा सर्व दृष्टीनें या प्रकरणांत विचार करण्याचें योजिलें आहे.

शिशूंना आवडणारे साहित्यविषय कोणते बरें ? प्रामुख्यानें या विषयांवरचीं *पाश्चात्य वा पौर्वात्य पुस्तकें वरवर चाळून देखील या प्रश्नाचे उत्तर ध्यानीं येण्याजोगें* आहे. प्रायः मुलाना सोप्या प्राणिकथा – काऊचिऊच्या गोष्टी – प्रिय वाटतात. मुलांना खाण्याचेंहि वेड असल्यानें खाऊकथाहि मुलांना अतीव प्रिय होऊन बसलेल्या दिसतात. शैशवापासून आवडत्या असलेल्या खेळण्यांच्या कथाचीहि त्यांना फार गंमत वाटते. चांदूमामा, पाऊस, नदी, ढग, झाड, फूल इत्यादि नित्यदृश्य निसर्गाच्या कथाहि हीं मुलें मोठें लक्ष लावून ऐकतात. तशाच आई, बाबा, दादा, ताई, आजी, बाळ इत्यादि घरांतल्या माणसांच्या गोष्टीवरहि तीं खूष होतात. मात्र या वेळेला व्यवहारजीवनाची अगदी नुकतीच तोंड ओळख होत असल्यानें त्यांतील कांहीं स्थूल वर्णनें तेवढीं कळतात; पण व्यक्तिदर्शनाचे वा परिस्थितीचे बारकावे या वयांत त्याना समजणें मुष्कील ! भिकारी किंवा राजा असा फार मोठा फरक त्यांना उमजतो; पण चाळींतल्या गोदूबाईच्या गरिबीचें बारीकसारीक वर्णन कळणार नाहीं; मात्र आपल्या रामूची आई गरीब आहे हें त्यांना कळूं शकेल.

*मूल प्रथम जीवनातील स्थूल मतें ओळखण्यास शिकत असतें, तेव्हांचें हें वाङ्मय* असल्यामुळें त्यामध्यें तपशिलाऐवजीं घटना व त्याहि छोट्यांना परिचित स्वरूपाच्या

अशाच अधिक असाव्या हेंच संयुक्तिक. अर्थात् याहि नियमाला थोडा अपवाद आढळतोच. सूक्ष्म वर्णनांचे बारकावे कळत नसले तरी प्रसंगांचा सविस्तर तपशीलच कांहीं विशेष जाणत्या व बुद्धिनिष्ठ मुलांना हवा असल्याचाहि कधीं अनुभव येतो! उदाहरणार्थ, "मोठा पाऊस आला, कावळ्याचें घर वाहून गेलें," ही प्राचीन गोष्ट ऐकतांना कावळ्याच्या घराचें भवितव्य जाणून घेण्यापेक्षां, मोठा पाऊस आल्यावर मग दुसरें काय काय झालें, याचेंच वर्णन एखाद्या पांच वर्षांच्या कुशाग्र छोटूला हवें असतें! मग तो स्वतःच गोष्टीचा हा अज्ञात भाग वाढवून व रंगवून सांगूं लागतो तो याप्रमाणें :—

"मोठा पाऊस आला. छत्र्या घेऊन लोक इकडून तिकडे, तिकडून इकडे जाऊं लागले. टप्प् टप्प् थेंब आले. रस्त्यांत खळ खळ पाणी वाहात होतें. कड् कड् कड् कड् वीज चमकली. गड गड गड आवाज झाला—अन् त्यावेळीं कावळ्याचें घर वाहतच गेलें!"

वर्णनाची केवढी मोठी चौकट ही! शिवाय, यांतलें नादलालित्यहि पहाण्या-जोगेंच नाहीं काय? एक चलाख पोरगी 'ऊ जेवायला गेली' या वाक्यानंतर तिथें जेवायला काय काय होतें याचें वर्णन आपणच स्वेच्छेनें करायची. त्यांत या टूच्या ताटांत गोळ्या नि बिस्किटेंदेखील वाढलेलीं असत! खाऊचें वर्णन मुलांना किती प्रिय असतें याची ही जणूं एक साक्षच!

लिखित साहित्याबद्दलच्या स्वतंत्र आवडीनिवडी चारपांच वर्षांच्या चिमण्या वयांतहि उद्भवतात आणि येवढ्या छोट्या वयालाहि साहित्यांतून कांहीं विशिष्ट अपेक्षा बालकें करीत असतात. ही गोष्ट प्रथमदर्शनीं कोणाला खरीसुद्धां वाटायची नाहीं; पण प्रात्यक्षिकांनीं हें सत्य स्पष्ट केलें आहे. बालसृष्टींत रंगून गोष्टी सांगणाऱ्यांना त्याचे नित्य अनुभव येतात. उदाहरणार्थ, एका पांच वर्षांच्या मुलीला लालगुलाबची (रेड् राइडिंग हूडची) गोष्ट फार आवडे. पण ती ऐकतांना दरवेळीं ती आवर्जून सांगे, "अहो, माझाहि फ्रॉक तसाच लाल आहे. मीहि लाडू घेऊन मावशीच्या घरीं गेलें होतें. तो लांडगा माझ्याच बाबांनीं मारला!"

गोष्टींतील नायकत्व स्वतःकडे असावें या कल्पनेचा किती लहानपणापासूनच उद्गम हा! दुसऱ्या एका बाबूला 'हत्ती आणि शिंपी' या गोष्टींत शिंपी बाबूचाच बुशकोट शिवीत बसला होता, किंवा रंगाऱ्याच्या गोष्टींत तो बाबूचाच रुमाल रंगवीत होता, अशा दुरुस्त्या करून द्याव्या लागायच्या!

एका चिटुकल्या हुशार मुलीला चंद्राची गोष्ट आवडे. पण ती खास तिच्याच आवडीनुसार व कल्पनानुसार रचून करावी लागे. त्या चंद्रकथेंत, आकाशांतून प्रथम चंद्र त्या छोकरीला "मी घरीं येऊं कां?" म्हणून विचारी. छोकरी पण-

कान्यानें उत्तर देई, "ये पण कपडे स्वच्छ घालून ये, घाण कपडे मला मुळींच आवडत नाहींत." मग चंद्र छान छान कपडे करून दोन्हीं हातांत खेळ व खाऊ यांच्या टोपल्या घेऊन तिच्या दाराशीं यायचा, अशी ही सुखान्तिका असे !

छोट्या मुलांच्या साहित्यविषयक अपेक्षा व आवडी अशा प्रत्यहीं प्रकट होत असतात, त्या शैशवांतील वाङ्मयीन अभिरुचीचें क्षेत्र प्रकट करणाऱ्याच नाहींत काय ? विशेषतः शिशुमंदिरांतील अध्यापकांचे कथाकथनांतले अनुभव कोणी सापेक्षानें एकत्र केले तर त्यावरून कांहीं समानधर्मी अनुमानें बसवतां येतील व त्यानुसार शिशुकथेच्या निर्मितीला एक निश्चित पण वेगळें असें मार्गदर्शनहि लाभेल. घरोघरीं अशा वाङ्मयविषयक भिन्न बालप्रवृत्ति निदर्शनास येतात त्यांची नोंद घेऊनहि शिशुवाङ्मयाचे कांहीं स्थूल नियमहि आखण्याजोगे आहेत.

अगदीं बालांचें साहित्य केवळ अर्थानेंच नव्हे, तर वाचनदृष्टीनेंहि सोपें पाहिजे. मुलें प्रथमच वाचायला शिकत असलेलीं, त्यांना पुस्तकांतला बारीक टाईप, जोडाक्षरें, लांब लांब वाक्यें, कठीण शब्द, हीं सारींच रम्य उद्यानाच्या वाटेंत लागणाऱ्या कांट्याकुट्यांसारखीं संकटें वाटावीं यात नवल नाहीं. बालसाहित्याच्या उदयकालीं इकडे कोणाचें फारसें लक्षहि वळलें नव्हतें. आजघडीला बालवयाचा विचार करून सुबोध शिशुवाचनें निर्माण होतात व छोट्यांच्या धारणाशक्तीचा, ग्रहणक्षमतेचा थोडाबहुत अजमास घेऊनच या पुस्तकांतले धडे लिहिले जातात हें खरें !

शैशवांत पुस्तकांतील वर्ण्यविषयाइतकेंच रंगीत चित्रें व आकर्षक छपाई, सुंदर मुद्रण, मोठीं अक्षरें आणि पुस्तकाचा आकार, सुरेख मुखपृष्ठ, गोष्टींचीं मजेदार नांवें इत्यादि बाह्य सजावटीचेंहि मुलांना फार आकर्षण असतें. हें जाणून शिशुसाहित्यांत या प्रकारच्या कितीतरी नव्या सुधारणांचा अलिकडे प्रवेश झाला आहे.

प्रथम शिशु — पुस्तकांतील गोष्टींचीं शीर्षकेंच पहाना ! पूर्वीं छत्रे युगांत आगगाडीसारखीं लांबचलांब व नीरस नांवें गोष्टीच्या माथीं मारलीं जात होतीं. त्यांत सुधारणा झाली व आजघडीला कांहीं बालकथांचीं नांवें जरा लांब असलीं तरी तीं सोपेपणा व रसिकता याचीहि अवधानें संभाळणारीं दिसतात. उदाहरणार्थ— 'यशोधरे ! दार उघड ' किंवा ' बाजा विहिरींत पडला ' हा लांब नांवाप्रमाणेंच ' मोराचा पिसारा ' ' छान गोष्टी ' ' अवंती भवंती ' इत्यादि लहानशीं नांवेंहि नाविन्यपूर्ण व विषयसूचक आहेत. मुलांना खाऊ आवडतो म्हणून ' करवंदे ', ' मेवामिठाई ', ' पेढे ' अशींहि मधुर नांवें कांहीं गोष्टींच्या पुस्तकांना दिलीं गेलीं आहेत. कांहीं नांवें तर अधिकच समर्पक व अर्थवाही भासतात. ' आईच्या गोष्टी ' नांवाच्या एका छोट्या पुस्तिकेंत लेखकानें या नांवाचा खुलासा मोठ्या मनोज्ञपणें केला आहे तो असाः—

"ह्या गोष्टी आईनें मुलांना सांगाव्या तशा आहेत, म्हणून म्हटल्या तर या आईच्या आहेत नि म्हटल्या तर आ नि ई च्या पण आहेत"

या 'आ नि ई 'च्या गोष्टी बालवाचनाची प्रथमावस्थाच सूचित करणाऱ्याच असल्यानें हें नाव खरोखरच अन्वर्थक वाटतें !

शीर्षकाप्रमाणेंच शिशुसाहित्यातल्या अर्पण-पत्रिका आणि प्रस्तावना या दोन्हीं बाबती नाविन्याच्या दृष्टीनें जणु क्रांति करु पहाताहेत. पुस्तक बालांसाठींच असलें तरी ते बालानाच अर्पण करावें अशी कांहीं सक्ती किंवा सक्त नियम नसल्यानें सारीं छोटीं पुस्तकें छोट्यानाच अर्पण केली जातात असेंहि म्हणता येण्यासारखें नाहीं. पण अलीकडे हें औचित्य दाखवून बालपुस्तकें बालानाच अर्पण करण्याकडे लेखकाची बरीच प्रवृत्ति दिसते. त्यातील कांही अर्पण-पत्रिका तर खास शैशवसूचित करणाऱ्या विशिष्ट बालभाषेंतहि असतात उदाहरणार्थ, 'यो यो' या नावाच्या एका बालपुस्तकाची ही अर्पण-पत्रिका पहा—

"हॅलोऽऽबालमित्रानो तुमाला शुदल चित्लाचें पुस्तक हवें ना? हें घ्या मग यो यो!"

बडबड मामा या पुस्तकाची अर्पण-पत्रिका अशीच गमतीची आहे.

"हा बडबड मामा
बडबड्या चिंगीचा.'

किती आटोपसर अन् बालसुलभ आहे ही रीत !

'यशोधरे, दार उघड ' या पुस्तकाची पुढील अर्पण-पत्रिका तर खरोखरच बालाना प्रिय होणारी ठरेल.

"लाडक्या बाहुलीस
चौथ्या वाढदिवसाची भेट.'

अर्पण-पत्रिकेप्रमाणें शिशुपुस्तकाचें प्रास्ताविकहि वेगवेगळ्या वृत्तिविशेषाचें दर्शन होऊं लागलें आहे बहुधा ही पुस्तकें का लिहिलीं गेलीं, कशी लिहिलीं गेलीं व तीं कोणत्या दृष्टीनें उपयुक्त ठरतील हें सांगण्यासाठींच प्रस्तावना असतात. त्यातच मदतनीसाचे आभार व प्रकाशकाना धन्यवाद हेहि मिसळलेले अर्थातच लेखकाचें हें हितगुज बहुतांशी जाणत्यासाठींच असल्यानें छोट्या पुस्तकाच्या असल्या प्रस्तावना, एखाद्या लहान मुलाचें बोट धरुन त्याला बरोबर फिरायला नेणाऱ्या प्रौढेप्रमाणेंच भासतात ! पण अशा प्रौढपरिचयाचा संकेत बाजूस सारुन कांहीं लेखकाना यातहि, निरागसतेचा जपण्याचा प्रयत्न केलेला दिसतो, तो बाल पुस्तकाशीं अधिकच सुसंवादित्व राखणारा भासतो पुस्तकहि बालाचें व प्रस्तावनाहि

त्यांच्यासाठींच – 'करवंदे' या नांवाच्या बालपुस्तकाची ही प्रस्तावना तशाच पद्धतीची :—

"मुलांनो, हा पहा करवंदाचा घड. यांत एकोणीस करवंदे आहेत. खाऊन तर पहा किती रुचकर आहेत तीं. करवंदीला कांटे असतात. पण या घडाला जोडाक्षरांचे कांटे नाहींत बरं. बघा तरी हीं आवडतात कां !"

किती छान वाटते ही ओळख ! अगदीं अशीच एका बालपुस्तकांतील विषयाची ओळख 'वाघाची मावशी' या भालचंद्र वैद्य याच्या पुस्तकांत आढळते. तीहि मजेदार वाटेल.

"ओ हो ! हें कोण ? ही तर मनी मांजरी.
पाहा कशी डोळे मिटून दूध पिते आहे.
हीच ती वाघाची मावशी.
चला ती काय म्हणते तें ऐकूं या."

आणखी एक नमुना पहा. खरोखर मुलांच्या आवडत्या विषयांवर पुस्तक लिहिलें हें त्यांना सांगतांना 'खेळण्याची राणी' यांत केलें गेलेलें पुढील हितगुज पहा —

"बालमित्रांनो ! खेळणीं आणि खाऊ म्हणजे तुमच्या आवडत्या वस्तू – खेळण्यापुढें तहानभूकसुद्धां विसरून जातां तुम्ही. मग ही तर खेळण्याच्या जगांतीलच चित्रकथा ! या चित्रकथेंत कितीतरी खेळणीं भेटतील तुम्हाला !"

अशा खेळकर प्रस्तावना म्हणजे बालपुस्तकांचें एक नवें बालपसंत आकर्षणच म्हणावयाचें !

बालपुस्तकांच्या आकारांचें फारसें वैचित्र्य अजून आढळांत नाहीं. लहान व मोठा किंवा फार तर पोथीप्रमाणें आडवा आकार एवढीच त्यांची कक्षा दिसते. इंग्रजींत तळहाताएवढीं छोटुकल्यांचीं अनेक पुस्तकें असतात तशीं पुस्तकें "बाल-विहारमाला" या वा. गो. आपट्यांच्या छोट्या कथामालेला सुमारें तीस वर्षांपूर्वी वापरलीं गेलीं होतीं. मध्यंतरीं ढवळे प्रकाशनातर्फे मासा, ससा, अशीं कांहीं प्राणि-वर्णनपर पुस्तकें प्रसिद्ध झालीं होतीं व तीं मत्स्याकृति वा सशाच्या – सशाकृतीच्या आकारांत काढण्यांत आलीं होतीं – पण या वैचित्र्याचेंहि फारसें स्वागत झालें नसावें. कारण आकर्षकतेंत भर घालणारे हे पुस्तकाचे भिन्न आकार नंतर परत दिसले नाहींत.

आकार, अर्पणपत्रिका व प्रस्तावना यांच्या पायऱ्या ओलांडून गेल्यानंतर पुस्तकांतील मजकुराच्या मुख्य प्रांतांत मूल प्रवेश करतें आणि अगदीं चटकन् लक्षांत भरणारें एक वैशिष्ट्य त्याला मोहित करतें, तें म्हणजे या पुस्तकांत असलेलीं

रमणीय व वेधक अशीं पुष्कळशीं चित्रें! खरोखरच आजचें कोठलेंहि शिशुपुस्तक घ्या, तें वि-चित्र आढळणार नाहीं. शिशुकथा आणि चित्रें यांचा संबंध मन व शरीर यांच्यासारखाच अविभाज्य असल्यानें शिशुसाहित्यांत चित्रांनाच मजकुराहून पुष्कळदा अधिक महत्त्व दिलें जातें. एक प्रकारें अगदीं प्रारंभिक बालसाहित्य म्हणजे संपूर्ण चित्रकथाच असतात असेंहि म्हणतां येईल. एक मोठें प्रसंगचित्र व खालीं फक्त दोनतीन ओळींत चित्रओळख अशा पद्धतीचीं अनेक शिशुपुस्तकें आताशीं प्रसिद्ध होतात. पप्पू, मन्या, हीं अशीं नवीं प्रकाशनें या दृष्टीनें स्वागतार्ह आहेत. ३०-४० वर्षांपूर्वी बालग्रंथांत चित्रांचें अगदींच वावडें असायचें. त्या दृष्टीनें आजकाल शिशुवाङ्मय फार प्रगतिपथावर आहे. हीं चित्रें सुंदर व सार्थ असतात व त्यामुळें या छोट्या पुस्तकाची आकर्षकता अनेक पटीनें वृद्धिंगत झाली आहे. आज पाश्चात्यांचें सचित्र शिशुसाहित्य — विशेषतः चित्रकथा आज ज्या वेगानें व विविधतेनें प्रसिद्ध होत आहेत कीं आपल्याकडील शिशुसाहित्यानें अगत्यानें त्याचें अनुकरण केलें पाहिजे — चित्रें बोलकीं असतात व तीं शब्दावाचूनची कथा सांगतात, या सूत्राचा आविष्कार पाश्चात्य प्रकाशकांनीं अनंत प्रकारें केलेला दिसतो. उदाहरणार्थ, 'रेड राइडिंग हूड 'ची जगभर पसरलेली प्रसिद्ध गोष्ट घेऊ. या गोष्टींत चित्रें असायचीं हें तर ठरलेलेंच! पण एका इंग्रजी पुस्तकांत आगळी एक नाविन्यपूर्ण योजना होती. पुस्तक उघडतांच त्यांतलें घडी करून ठेवलेलें प्रसंगदृश्य पुस्तकाच्या मध्यावर उलगडून उभें राहात असे आणि रेड राइडिंगची लांडग्याशीं भेट हा सीन पूर्णपणें नजरेसमोर रंगत असे. काम झालें कीं घडी करून सारा देखावा मिटून पुस्तकांतच ठेवण्याची सोय! जणु वाटेल तेव्हां उघडतां मिटतां येणारा व लहानशा टिचभर जागेंत दडणारा घटीचा पगाच! पण एवढ्यानेंच कथा जणू चित्रांतून बालदर्शी बोलू लागते, लिखिताचा दृक्प्रत्यय आणू शकते!

याहि पुढची पायरी म्हणजे रेड राइडिंगची संपूर्ण चित्ररूप गोष्ट एका रंगीन खोक्यांत असते! पुस्तकविक्रेता तुम्हाला टेबलावर तीं चित्रें ओळीनें मांडून दाखवील. अगदीं नाटकासारखेच बदलते देखावे! पहिल्यांत लतावेलींचा सुशोभित व रंगीत मंडप व त्या पार्श्वभूमीवर लाल गुलाब व लांडगा यांची प्रथम भेट रंगेल, तर दुसऱ्या देखाव्यांत मावशीचें सुसज्ज घर व मावशीचें सोंग घेतलेला लांडगा - व बाहेर बंद दाराशीं गुलाब उभी असलेली दिसेल! तिसऱ्यांत लांडग्याला गुलाबचे बाबा मारताहेत व गुलाबला जवळ घेत आहेत हा रंगीत देखावा साकार होतो. झाली गोष्ट. पण लेखावाचूनची ही कथा इतक्या मनोहरपणें 'चित्रित' झाली आहे कीं बालकाच्या उड्याच पडाव्या! अशीं पुस्तकें या प्रसंगचित्रें तयार करण्यास खर्चहि जास्त येईल व त्यामुळें बालपुस्तकाच्या किंमती वाढवाव्या लागतील हेंहि खरें, पण निदान नाविन्य म्हणून तरी असे हे माफक मर्यादेत बसण्याजोगे कथाचित्रांचे नमुने

निर्माण करणें लेखक – प्रकाशकांना अशक्यच आहे असें नाही. शिशुपुस्तकांचें बहिरंग, सजावट, मांडणी, वाक्यजुळणी इत्यादि दृष्टीनें उपयुक्तता व आकर्षकता यांचें मोजमाप झाल्यानंतर शिशुसाहित्याच्या आशयाकडे–अर्थात् अंतरंगाकडे वळणें अत्यावश्यकच आहे.

शिशुवाचनांतील पहिली अडचण जोडाक्षरांची. कित्येक दिवस नववाचनात छोटी मंडळी या जोडाक्षराला ठेंचकाळून थांबत असतात. म्हणून बिनजोडाक्षरांच्याच गोष्टींनीं शिशुवाङ्मयाचें हें पहिलें दालन अधिकांश सजवलें गेलें आहे. जोडाक्षरविरहित गोष्टी अवश्य हव्या हें खरें पण तसें करतांना भाषेचा सुंदर घाट अनेकदा बदलून टाकला जातो; आणि त्यामुळें त्यानें फार विरस होतो. 'कावळा म्हणाला' याऐवजीं 'कावळा बोलला' हें रूप जोडाक्षरविरहित असूनहि कर्णकटु वाटते; कारण तें बोलभाषेला अपरिचित आहे. दुसऱ्या एका छोट्या पुस्तकांत 'रात्र झाली' याऐवजीं 'रात झाली' हा प्रयोग वापरला आहे. तर एका पुस्तकांत खुर्ची या शब्दाला 'खुरची' हा पर्याय ठेवून दिला आहे. 'त्यानें' व 'त्याला' हीं दोन नित्य येणारीं जोडाक्षरें टाळण्यासाठीं मूळ विशेषनामांचीच पुनरावृत्ति 'टिपू' या पुस्तकांत पुढीलप्रमाणें आली आहे—

"काळूला बघून मुलानें भाकरीचा तुकडा पुढें केला. काळूला फार भूक लागली होती. मुलानें यू यू करतांच काळू धांवला. मुलानें काळूला एक फटका दिला. काळू केकाटला आणि टिपूकडे धांवला. टिपूनें काळूला एक धपका दिला. एका घरासमोर एक मांजर बसलें होतें. तें काळूकडे पहात होतें. काळूला मांजराचा राग आला......"

या सर्व पुस्तकांत काळू व टिपू या विशेषनामाची दर वाक्यागणिक पुनरुक्ति होते, ती मोठी वैरस्यकारक वाटते ! नित्य प्रचारांत असलेल्या बोलभाषेंतील साध्या शब्दांतहि अनेक जोडाक्षरें येतात, तीं चुकवून लिहायचें असलें तरी भाषेंत अशी विसंगति येतां कामा नये. उदाहरणार्थ, "देवाच्या निळ्या निळ्या घरीं" असा शब्दप्रयोग बालगोष्टींतून सहजगत्या येतो त्याऐवजी 'देवाचे निळें निळें घर होतें तेथें' असा पर्याय रसहानीकारक व कानाला बोजड वाटणार नाही. पण एवढ्या अवधानानें लिहिलेल्या शिशुकथा फारच थोड्या. शब्दांना प्रत्यय लागून त्यांची सामान्यरूपें होताना जोडाक्षर येणें अपरिहार्यच नव्हे काय ? आणि क्रियापदांचेंहि जोडाक्षराविना पावलोपावलीं अडतेंच. हें चुकवण्याच्या दृष्टीनें जेव्हां सहेतुक शिशुलेख लिहिले जातात तेव्हां भाषेचें सहजसुंदर रूप बिघडून वरच्यासारखी शिथिल रचना करावी लागते; आणि याला उपाय एकच. अशीं सर्वनामें किंवा क्रियापदें शक्यतो टाळूनच गोष्ट रचतां आली पाहिजे. आणि तें फार अवघड

आहे असेंहि नाहीं! बालसाहित्यांत परंपरेनें चालत आलेली 'ऊ आणि टू' ही गोष्ट प्रत्येकाला शैशवात परिचित झालेली आहे. तिच्यात तर एकहि जोडाक्षर नाहीं. पण त्यामुळें गोष्टींत कुठेंहि विसंगत भाषा येतेसें वाटत नाहीं. क्रियापदाच्या फारसें वाटेलाच न जाण्याचें तंत्र त्यात अवलंबिलेलें दिसेल. आजकालच्या कांहीं शिशुकथा अशा पद्धतीनेंहि लिहिल्या जातात. उदाहरणार्थ — 'मोराचा पिसारा' या पुस्तकातील हा मजकूर पहा—

"एका शेतात एक टोपली होती. एकदा ती एका उंदराला दिसली. उंदराला वाटलें, आपलें घर असतें अंधारात! हें घर किती हवेशीर आहे? येथेंच आपण रहावें. मग तो टोपलीला विचारू लागला.

"धरा धरा, कोण रहाते येथें?"

टोपली कांहीं बोलेना"

या मजकुरात जोडाक्षरी क्रियापदें टाळलीं असूनही भाषा कृत्रिम झालेली नाहीं. अगदीं छोटीं छोटीं वाक्यें हा शिशुकथेचा आणखी एक गुणविशेष. शिवाय त्यामुळें जोडाक्षरी क्रियापदें चुकवता येतात ही मोठी इष्ट गोष्टच म्हटली पाहिजे. एका छोट्या पुस्तकातील हें सकाळवर्णन पहा —

"पहाट झाली. काळोख संपला. उजेड पडू लागला. पाखरें किलबिल करू लागली. माणसें निजून उठलीं. आपआपलें काम करू लागलीं."

ही वाक्यें चिमुकलीं खरी, पण पुनरुक्तीचा दोष चुकवूनहि यातील सकाळचें वर्णन किती बालसुलभ व सहजभाषी वाटतें! जोडाक्षरें न वापरता गोष्ट लिहायची तर भाषेला कृत्रिमता येणारच, असा जो आक्षेप अनेकदा घेतला जातो त्याला हा मजकूर वेगळेंच उत्तर देत नाहीं काय? आणि एकाद दुसरें जोडाक्षर आलें तरी गोष्टीचें स्वारस्य त्यामुळें बिघडून जातें असेंहि नाहीं. उदा० 'नीराचे ससे' या सुमति पायगावकराच्या एका चिमण्या गोष्टीचा मजकूरहि तसाच.

"एकदा सदोबानें ससे आणले
सुंदर सुंदर ससे. पांढरे पांढरे दुधासारखे.
लाल लाल डोळ्यांचे, गुलाबी ओंठांचे
नि लांब लांब कानांचे.
नीराला खूप गमत वाटली."

यात एकच जोडाक्षर दिसतें तें म्हणजे 'डोळ्यांचे'. पण तें डोळ्यात खुपणारें खास नाहीं!

छोट्यांना शैशवात समान व लयबद्ध शब्दांची जुळणी फार आवडते. त्यामुळें छोट्या छोट्या गद्य वाक्यातूनहि असे अनुप्रास वा यमक जुळवण्याचें ज्यांना साधलें, त्यांचीं पुस्तकें बालजगात एकदम प्रिय झालीं. उदाहरणार्थ पुढील मजकूर पहा—

" एक होती वाडी. तिथें होती माडी. माडी होती उघडी. माडीवर रहात होती धोंडी. आईचें नांव होतें कोंडी. धोंडीनें केली खोडी. आईनें दाखवली छडी. " इत्यादि इत्यादि. अशा मजकुराच्या गोष्टी तालबद्ध शब्दामुळेंच बालांच्या ओठीं खेळूं लागतात आणि हा सिद्धांत तसा नवा आहे असेंहि नाहीं. आजी-बाईच्या गोष्टी म्हणून ज्या शिशुकथा मुद्रणपूर्वकालापासून चालत आल्या आहेत त्यांतहि याचीं उदाहरणें सांपडतील. म्हातारीला मुलीकडे जातांना वाघ भेटला या गद्यकथेंतील कथावस्तुपेक्षांहि,

" म्हातारी कोतारी, आम्हांला नाहीं ठाऊक,
चल रे भोपळ्या टुणुक् टुणुक् ! "

—या शब्दसंहितेचीच मोहिनी बालमनावर विलक्षण पडते !

अशा गद्यपद्यमिश्र गोष्टींत एक प्रकारनें नादमाधुर्यहि साहजिक येतें. या प्रकारच्या शिशुलेखनांत एक जुने लेखक म. का. कारखानीस यांचें उदाहरण उद्धृत करण्याजोगें आहे. त्यांनीं लिहिलेल्या अद्भुत कथांतील अशा गद्यात्मक पद्यानें त्या कथांची रंजकता बालमनात अधिकच ठसली जाते. उदाहरणार्थ, "एका दुष्ट बैराग्याला शिक्षा करायला एक चिमणा निघाला होता. त्याला कुणी विचारलें, कोठें जातां ?" चिमणा मोठा रसिक व काव्यात्म दिसतो. त्यानें पद्यमय उत्तर दिलें —

काड्यांची मी केली गाडी
तिला जोडली बेडूकजोडी
चिमणा राजा वरी बैसला
हांकलून देइल बैराग्याला !

अगदी साध्या ओळी. पण त्यानीं रंजकतेत केवढी भर घातली आहे ! अर्थात् शिशुकथेंत पद्यात्मक भासणारी शब्दजुळणी असावी एवढेंच कांहीं हें शास्त्र नाहीं, तर त्या रचनेंत लालित्य व नादमाधुर्य आणि चटकदारपणाहि असणें अत्यंत जरूरीचें आहे – पण हे साफ विसरून कांही पुस्तकें आज लिहिलीं जातात – उदाहरणार्थ, ' ससोबा निघाले शिकारीला ' हें छोटेखानी पुस्तक खास एका चार वर्षांच्या मुलीसाठीं लिहिलें गेले. त्यांतील ही रचना पहा —

" आईनें कां मारली काठी
सांगु तुम्हांला मनुताई
दुधाची तुम्ही केली चोरी
आईनें लबाडी ओळखली. "

या पत्तींत रसहीन शब्दजुळणीवाचून काय आहे ! 'मधु नि माधुरी' या रामतनयाच्या पुस्तकात सहा वर्षांच्या मधूच्या तोंडीं असलेलें हें गद्य-पद्यहि तसेंच—

" पाहुणे आले — चाचा आले
बाई आली — मुलें आली
आटा दिला बाईला मुलाला
भाकरी मिळे पाहुण्याला — ढुम् ढुम् ढुम् !"

या नीरस ओळींत लालित्य, गोडवा याचा नावाला तरी आढळ होतो काय ? पण अशाहि रचनेचीं उदाहरणें शिशुरूयातून भरमसाट आढळू लागलीं आहेत, त्याला कोणीच विचारतापुसता नाही काय ?

शिशुकथेचें बहिरंग आकर्षक असतें व मजकुराची जुळणी लालित्य व नाद मधुरता यांचीं वसनें लेऊन गद्यपद्यसीमेवर उभी असलेली दिसते. ह्यासंबंधीचा विचार पाहिल्यानंतर तिच्या अंतरंगाकडेहि थोडें लक्ष पुरविणें अवश्य आहे.

शिशुकथेंत सचित्र गोष्टीच अधिक येतात. क्वचित् वर्णनदृश्यें व शब्दचित्रेंहि येतात. लाडकथा, खेळणींकथा, माहितीकथा, प्राणिकथा, निसर्गकथा व रोजच्या व्यवहारातल्या छोट्या छोट्या कथा येतात. सोपी भाषा हें त्यानें साधन व निरागस बालाचें रंजन हें त्याचें साध्य. थोडीशी गमतहि त्याना रुचते

कोठल्याहि साहित्यापेक्षा क्रीडासाहित्याशींच बालकाचा घनिष्ट संबंध अगदी शैशवापासून येतो. बेबीच्या हातात बाहुली व बाळाच्या हातात चेंडू दिसला नाही तरच आश्चर्य कल्पितात दंग होण्याची त्याची मनोवृत्ति या चिमण्या वयापासून खेळणीरूपानें प्रकटत असते. छोटी बेबी बाहुलीला खोटें खोटें दूध पाजील व थोपटीत बसेल तर बाळ बहिणीच्या खेळात कर्त्या पुरुषाचीं कामें स्वीकारील या आत्मीयतेमुळें खेळण्यासंबंधीच्या गोष्टीहि बालजगात फार प्रिय दिसतात. आपल्या कडील बालकथेंत खेळणींकथा आजवर फारशी विकसलेलीच नाहीं, पण पाश्चात्य शिशुसाहित्यात तिनें फार मोठी जागा व्यापली आहे. त्याहि गोष्टींचे अनुवाद मराठींत हल्के हल्के उतरू लागले आहेत. क्वचित् त्याच पद्धतीवर स्वतंत्र कथानकेंहि आजकाल थोड्याच प्रमाणात का होईना पण रचली जात आहेत. या दृष्टीनें श्री. राजा मंगळवेढेकर यांची 'खेळण्याची राणी, सौ. सुमति पायगावकर यांची 'लिली बाहुली,' सौ मालती दाडेकर यांचे 'खेळण्याचे खेळ' इत्यादि पुस्तकें स्वागतार्ह आहेत मात्र अजून या प्रकारचें विकसन होण्यास पुष्कळच वाव आहे.

खेळणीकथेप्रमाणेंच खाऊच्या गोष्टी हें तर शिशुसाहित्यातील एक मोठेंच आकर्षण ! इंग्रजी साहित्यात तर बालाची आवड ओळखून ब्रेडचें घर, त्याला चॉकलेटचें छप्पर व ऊसाचे खांब इत्यादि वर्णनांनी सजलेल्या गोष्टी कितीतरी

लिहिल्या जातात. आपल्या शिशुकथांतूनहि या गोड गोष्टींचीं वर्णनें येण्यास सुरवात झाली आहे. स्वप्नांत खाऊचे पुडे देणारी परी, किंवा बाबूला रोज खिसाभर बदाम देणारा राजा, राणीच्या ताटभर चिक्कीचें वर्णन असणारे नाट्यप्रसंग इत्यादि गोष्टी मुलांच्या गोडखाऊ वृत्तीला आवाहक म्हणूनच आवडत्या ठरल्यास आश्चर्य कोणतें! अनेक शिशुकथांतून आज लाडू, वड्या, चकल्या, शंकरपाळे, चिवडा इत्यादि खाद्यांनाहि रहायला 'ताटभर जागा' मिळूं लागली आहे. त्यामुळेंच कीं काय–

'लाडू लागला धूम पळायला!'
'फुगलेली पुरी'
'कणकेची बाहुली'
'ऊसनगरची सहल.'
'खादाड गोपू.'

इत्यादि खाद्यवर्णनपर गोष्टींची मेजवानी रसदार व्हावी किंवा परिचित गोष्टींतून नित्य येणारे एका कावळ्याचे "खाईन सांडगे कुडुम् कुडुम्" हे शब्द नाहींतर चोरट्या मांजराचे "मी खीर खाल्ली तर बुड घागरी" हे सूत्रमय शब्द बालमनांत शिरून बसावे यांत काय आश्चर्य! खाद्यवर्णनपर गोष्टी अशा बालप्रिय असल्यानें शिशुसाहित्यांत त्यांचें प्रमाण वाढत चाललें आहे. पण त्याबाबत आक्षेप एवढाच कीं, यांतलीं कांहीं पुस्तकें पाश्चात्य बालसाहित्याचीं भाषांतरें व रूपांतरेंच असतात. त्यांतून परदेशी मिठाईचीं वर्णनें जशीच्या तशींच मराठीच्या माजघरांत येतात! चॉकलेट, वाढदिवसाची केक इत्यादि बालपुस्तकांच्या नांवारूपावरूनहि ही गोष्ट स्पष्ट होईल. *वाढदिवसाची केक हा पाश्चात्य रिवाज आपल्याकडील (श्रीमंत* सुधारक घरें वगळलीं तर) दरेक घरांतून परिचित वा प्रचलित नसल्यानें ती केक, त्यावरील मेणबत्त्या, ती समारंभानें कापणें, सगळेंच वर्णन छोट्या मुलांना परकें-परकेंसें व गोंधळांत टाकणारेंच ठरतें! लेखकांनीं थोडीशी सावधगिरी ठेवून मराठी वातावरण निर्माण करण्याचे श्रम घेतले तर ही सुधारणा सहज होऊं शकेल. वाढदिवसालाहि केक ऐवजीं देशी परिचित बर्फी, वड्यासारखे नमूद करतां येणें अशक्य थोडेंच आहे? पण ही देशीय दृष्टि कटाक्षानें ठेवली गेली पाहिजे.

स्वप्नकथा हा प्रकार आपल्या शिशुसाहित्यांत नवा आहे. कारण तें मूळचें विलायती कलम; पण मराठी बालोद्यानांत तें आजकाल रुजूं लागलें आहे. अलिकडे कांहीं पुस्तकें याहि तऱ्हेचीं लिहिलीं जाऊं लागलीं आहेत. बहुधा खेळणी-कथा व स्वप्नकथा एकांत एक गुंफलेल्या आढळतात. बाळ झोपेंत खेळण्याशीं खेळतो, खेळणीं त्यावेळीं सचेतन होतात व जमतीगमती करतात आणि एकदम जाग येऊनच या स्वप्नाचे सोनेरी धागे तुटतात अशा ठराविकाची चौकट या स्वप्नकथांना अजून दिसते, त्यात मात्र बदल होणें आवश्यक आहे. शिशु-स्वप्नकथा लिहिणें

वाटतें तेवढें सोपें नाहीं. कारण, शिशूंना स्वतःचीं स्वप्नें कधीं जुळवून सांगतां येणारच नाहींत; मग लेखकाला मनानें शिशु होऊन हीं कथानकें कल्पावीं लागतात व तें नीट जमलें नाहीं तर स्वप्नकथा प्रौढरूप व नीरस होऊन बसते ! या दृष्टीनें पाहिलें तर श्री. नारायण गाडगीळ यांचें 'संजूचें स्वप्न'हि चांगलें रंगतदार झालें आहे. यांत संजूला तिची आवडती कल्पनासृष्टि साकारलेली दिसते. या स्वप्नांत तिला पंख प्राप्त झाले असून ती अंतराळांतून मजेनें जाऊं शकते, ससा, मोर, फुलवेलीं तिला दिसतात व परीहि भेटते ! चंद्राच्या जगात ती जाते व तिची मृत आईहि तिला दिसते ! आणि हें सर्व या छोटया मुलीचें दिवास्वप्न आहे. सारा कल्पनेचा खेळ; पण त्यांत बाल्मन उत्कृष्ट प्रतिबिंबित झालेलें दिसतें. असे प्रयत्न होतील तेवढे हवेच आहेत. परदेशांत *एनिड ब्लायटन् हिनें अशा बालमनोविश्लेषणावर आधारित* स्वप्नगोष्टी कितीतरी लिहिल्या आहेत व त्यांतलें शैशवाचें दर्शन तर अत्यंत वास्तव ठरणारें आहे. तसे प्रयत्न आपल्याकडे कोणी अगत्यानें व सातत्यानें करणें जरूर आहे. निदान त्या कथांचीं सरळ रूपांतरें झालीं तरीहि या अशा कथालेखनाला योग्य मार्गदर्शन झाल्यासारखं होईल.

सृष्टिनिर्मितीसंबंधीं त्यांतील सुसंगत घटना जाणून घेण्यासंबंधीं बालकें अत्यंत उत्सुक असतात हीहि गोष्ट अनुभवसिद्ध म्हटली पाहिजे. उदाहरणार्थ, बी जमिनीत पेरलें, येथपासून झाडाला फळ लागलें, येथपर्यंतची वर्णनकथा मुलें अगदी लय लावून ऐकतात. 'चिऊताईचें बाळ कसें व केव्हां आलें' ह्याची कथा *त्यांना* फार आवडते. "चिऊनें काड्या जमविल्या, कापूस चोंचींतून आणला, मऊ अंथरूण केलें, मग त्यांत पांढरं गुळगुळीत अंडें ठेविलें" इत्यादि तपशील बाल-जिवाला मोठा हृद्य वाटतो. पावसाची गोष्टहि अशीच. ढग जमतात तेव्हांपासून ती सुरूं केली कीं वर्षावर्णनापर्यंत मुलें तीं एकाग्रतेनें ऐकतात. ' अशीं विशिष्ट वर्णनपर पुस्तकें आपल्याकडे अगदींच कमी आहेत, पण तीं मात्र सुंदर आहेत. उदाहरणार्थ, नदीची गोष्ट ( श्रीमती ताराबाई मोडक ) या पुस्तकांत नदी स्वतःच्या जन्माची कथा किती सोप्या शब्दांत सांगत आहे पहा --

मी होतें डोंगरावर
डोंगराच्या पोटांत---
थेंबथेंब वहात होतें
काचेसारखी निर्मळ होतें
बर्फासारखी गार होतें
थेंबथेंब पडत होतें
लहान ओहळ वाहत होता
लोक म्हणत, हा पहा झरा, डोंगरी झरा.

अशा लिखाणाला मुलें कधीं कंटाळतील काय! 'पतंगाला ऐट चढली' (लीला भागवत) या पुस्तकांतहि अशा पद्धतीचे धडे आले आहेत. यांत घरबांधणी, कापसापासून सदरा होईतों वस्त्राचें स्थलांतर आणि शेतीची प्राथमिक माहिती हीं सुबोध व आकर्षक मार्गेत आलीं आहेत. 'केवढी मोठी गाई गाई' यांत अळी-पासून फुलपांखरूं बनेपर्यंतचें शब्दचित्रहि मुलांना आवडण्यासारखेंच आहे. 'लिली बाहुली' मध्येंहि "पानें आलीं, केळफूल आलें, लोंगर आला, मग लोंगर पिकला व बाळाला खायला मिळाला" असें सोपपत्तिक वर्णन आलें आहे. ही वैशिष्ट्यपूर्ण रचना बालांना अधिक आवडते.

प्राणिकथाहि बाळरूप घेऊन अगत्यानें शिशुरंजन करतांना आढळते. बालकें बोबड्या बोलांनीं जेव्हां काऊ, चिऊ, माऊ यांची ओळख करून घेतात त्यावेळीं तर वाचनाची वा गोष्टीची कल्पनासुद्धां दूर असते! तेव्हांपासूनचे हे शैशव — सहचर गोष्टींतून परत भेटले कीं बालकांना त्यांची एकदम जवळीक वाटणें स्वाभाविकच! बहुतेक बालकांना ऐकवली जाणारी पहिली प्राणिकथा, "एक होती चिमणी अन् एक होता कावळा, चिमणीचं घर होतं मेणाचं न् कावळ्याचं होतं शेणाचं," हीच आढळते. अर्थात् या दोन्हीं घरांत येवढा फरक कां याचा विचार हे चिमुकले श्रोते कशाला करतील? कावळा काळा, तो वाईट, तेव्हां त्याचं घर वाईटच असायचं एवढीच संगती त्यांना कळते व याच कथेनें बालरंजनांतील कथेच्या दालनाचें उद्घाटन केलें जातें!

प्राणिकथा तर शिशूंना आवडतेच, पण परिचित आप्त जर या गोष्टींतून प्रविष्ट झाले तर तिची मौल्किता बालदृष्टीनें एकदम अनेक पटीनें वर्धित होते! कथा सांगतांना, 'कोल्हा मावशीकडे गेला, कोंबडा बबीला उठवायला आला, मनीनं छोट्या बाळाचं दूध मागितलं,' इत्यादि मजकुराच्या कथा बाबा लोकांच्या विशेष पसंतीस येतात. तसेंच जो उपदेश घरांतून नित्य त्यांच्या कानीं येतो तोहि गोष्टींत इतरांना करतां आला तर अनेक मुलाना तो मनापासून प्रिय होतो. 'माऊनें आधाशीपणा केला, तिचं पोट दुखलं. फार गोड खाऊं नये असं!" किंवा 'कावळ्याला चिमणी म्हणाली— असा हट्ट करतोस म्हणून तुझं घर मोडतं. रोज हट्ट करूं नये बाबा.' इत्यादि गोष्टींत बालकें अगदीं समरस होतांना दिसतील. आणि ही समरसता जाणून कांहीं लेखकांनीं खास या शिशुश्रेणीसाठीं प्राणिकथा लिहिल्या. त्यांतील श्री. शं. ल. थोरात यांच्या 'बाळगोष्टी' सर्वांत मुलांच्या आवडत्या ठरतील. त्यांत ऊ आणि टू या प्रसिद्ध शिशुकथेपासून मुलांना माहीत असलेल्या बहुतेक छोट्या प्राणिकथा आल्या आहेत. भाषा सोपी, टाईप मोठा आणि भरपूर चित्रें यांचीहि जोड या पुस्तकाला आहे. सौ. कावेरी कर्वे यांची 'बाजा विहिरींत पडला' किंवा 'बिचारा कोकीळ' हीं किंवा श्री. ताराबाई मोडकांची 'वेडा कावळा' आणि

श्री. मा. के. काटदरे यांची 'पाजव्याचा पराक्रम' व 'बेनी कोकरू' हींहि अशींच शिशुरंजक प्राणिकथांची पुस्तकें आहेत.

प्राणिकथाच खरी, पण ती सांगण्याच्या पद्धतीहि किती विविध! या भिन्न कथनप्रकारांनी तर शिशूंना ती अधिकच रंजक वाटते. 'मोठ्या पाण्यात' या एका छोट्या कथेंत एका बाल्मासाचें स्वप्न वर्णिलें आहे तें मोठें रंजक आहे. मोठ्या समुद्रात जायला मिळावें, ही त्या छोट्या माशाची इच्छा, आपल्याला मोठ्या माणसासारखें वागायला मिळावें या बालकाच्या इच्छेसारखीच असल्यानें ती छोट्या मुलांना आवडावी यांत नवल नाहीं. काटदऱ्यांचें 'बेनी कोकरू'हि याच जातीचें आहे. तें आईला सोडून मैदानात जातें व संकटात सापडतें. मुलांना हाहि धडा समजतो–मानवतो. अशीं कितीतरी पुस्तकें प्रसिद्ध होत आहेत व त्यातून शिशुबोधाचें कार्य घडून येत आहे. अनाथ–विद्यार्थी – गृहाचीं अगदीं नुकतींच प्रसिद्ध झालेलीं 'कावळोबाच्या जमती,' उदीरमामाची कहाणी, हीं पुस्तकेंहि या दृष्टीनें सरस ठरतील. इसापनीतींतल्या छोट्या गोष्टींची किती जणांनीं चिमुकली आवृत्ति काढली त्याचा हिशेब सांगता येणार नाहीं. एकदरींत प्राणिकथेनें शैशवातलें बालरंजनक्षेत्र इतकें व्यापलें आहे कीं त्या सर्व कथालेखकांचा नामनिर्देश करणें अशक्यप्राय आहे.

ह्या सर्व चिटुकल्या प्राणिकथांतून निरनिराळ्या प्राण्यांचीं वैशिष्ट्येंहि प्रकट होतात. उदाहरणार्थ, एका उंदराला पैसा मिळाला, तो घरीं न्यायला राजानें उट देऊ केला तेव्हा उंदरानें 'लांनच मान लांनच मान' अशी तक्रार केली आणि हत्ती देऊ केला तेव्हा 'सुपाएवढे कान सुपाएवढे कान' अशीं नावें ठेवलीं. माहितीच्या माहिती अन् वर ती गोष्टीरूप! शिवाय द्विरुक्ति या पुनरुक्ति केल्यानें मुद्दा प्रबळ होतो हेंहि तत्त्व या शहाण्या उंदरास माहीत असावेंसे दिसतें! या द्विरुक्तीचा उपयोग शिशुसाहित्यात वारवार व आवर्जून केलेला आढळतो. उदाहरणार्थ, वाघाच्या गुहेंत लपून बसलेल्या एका सशानें, "मी आहे ससुल्गाडी, वाघाचे हातपाय मोडी, अस्वलाच्या झिंज्या तोडी, उंटाची मानच मोडी," इत्यादि पद्यात्मक मंत्र या गोष्टींत जवळ जवळ पाचसहावेळा म्हटलेला आहे. एका चिटुकल्या उंदराला टोपी शिवून न देणाऱ्या शिंप्याच्या गोष्टींतहि 'चार शिपाई लाऊंगा, तुमको मार देऊंगा, मैं तमाशा देखूंगा' हीच उक्ती अशीच वारवार उपयोगिली आहे! गोष्टींत ल्यबद्धता येण्यासाठीं अशा पुनरुक्त वाक्याचा चांगला उपयोग होतो हें मान्य. ही पुनरुक्तीची अतिशयोक्ति बालगोष्टींत किती प्रमाणात असणें इष्ट आहे याचा विचार नको का व्हावयाला? पण तो होत नाहीं. उदा. श्री. वि. स. गवाणकर यांच्या "चांदोबाच्या घरीं" या एका छोट्या शिशुकथेंत, "तू माझी ताई, मी तुझी ताई", हें एकच वाक्य जवळजवळ बारा वेळ आलें आहे! शिशूंना कथेची

आवड उत्पन्न होण्याऐवजीं असल्या अतिरिक्ततेनें कंटाळाच येण्याचा संभव जास्त! बालकें स्वतः तक्रार करूं शकत नाहींत म्हणून त्यांना कसलेंहि साहित्य दिलें तरी चालेल असेंच लेखकांनीं मानावें काय? आणि हें लालित्य मजकुराच्या शब्द-जुळणीप्रमाणें कथेचा आशय व परिणाम यांतहि नको कां?

पण त्याचाहि अभाव आज अनेक शिशुकथांतून जाणवतो. उदाहरणार्थ, गीता साने यांच्या 'चिमण्या गोष्टी' या ४ ते ८ वर्षांच्या मुलींसाठीं लिहिलेल्या गोष्टी पहाव्या. *"एका छोट्या पोरीनें तीन महिन्यांच्या भावाला नीट संभाळून* मांडीवर घेतलें." एवढीच ही गोष्ट वा प्रसंग! हें काय बालाकर्षक कथानक! छोट्या गोष्टींनाहि कथावस्तूचा छोटासा कां होईना कणा किंवा कण तरी असावा लागतो, ही कल्पनाच अशी अनेक ठिकाणीं डावलून दिलेली दिसते! आजीची लेखणी हेंहि एक सी. पटवर्धन यांचें "ल्हान मुलांमुलींसाठी गमतीदार गोष्टी" असें वर्णन शिरोभागीं धारण केलेलें पुस्तक. पण त्यातल्या गोष्टींत कोठेंच गंमत नाहीं कीं सांगण्याची शैलीहि चटकदार नव्हे! नीरसता हा शिशुसाहित्याला आज-काल एक नवा रोग जडूं पहात आहे. त्याची उदाहरणें अनेकानेक नव्याजुन्या पुस्तकांतून देतां येतील. श्री. व. का. भिसेकृत चॉकलेट मामा या नांवाच्या शिशु-पुस्तकांतला हा मजकूर पहा. (खरें म्हणजे नांवहि परकें परकेंसेंच वाटतें!) गोष्टमामा, चॉकलेटमामा, गांवमामा, गम्मतमामा इत्यादि सर्व मामांच्याच गोष्टी – गोष्टी म्हणण्यापेक्षां शब्दचित्रें येत आहेत. पण प्रसंगदर्शनांत यत्किंचित्‌हि उत्कटता नाहीं कीं कथनांत गोडवा नाही. शब्दचित्र म्हणावें तर व्यक्तिदर्शनाचें वैशिष्ट्यहि बालाकर्षक नाहीं! अशा नीरस, रटाळ पुस्तकांनीं बालसाहित्याला बाळसें चढत असल्याचा भास होत असला तरी त्यांत बेडौलपणा व विरस निर्माण करणाऱ्या वाढीचाच भाग अधिक सांपडेल!

आशयाच्या दृष्टीनें शिशुसाहित्याचा जसा विचार व्हावयास हवा, तसाच तो वस्तुनिष्ठतेच्या दृष्टीनेंहि अवश्य झाला पाहिजे – शिशुवाचक झाले तरी काय झालं! भलत्याच अशक्यप्राय गोष्टी त्यांना सांगणें हें नुसतें अनिष्टच नव्हे तर दिशाभूल करणारेंहि ठरेल! या संदर्भांत, श्री. वि. स. गवाणकर यांच्या "पिटुकलें चालले लढाईला", ह्या पुस्तकाचें उदाहरण देण्याजोगें आहे. यांत छोटीं वाक्यें व प्रासयुक्त भाषा आहे खरी, परंतु आशय किती असंभाव्य व अवास्तव आहे पहा. यांत एका *कोल्ह्यानें सिंहाला सांगितलें कीं,* "उंदराच्या पिटुकल्यानें हत्तीला मारलें, तें तुलाहि मारील." अन् हा निरोप ऐकूनच त्या शेळपट सिंहानें आपली गर्जनाहि सोडून दिली म्हणे!

याचसारखें दुसरें उदाहरण 'लिली नाहुली' मध्येंहि आढळतें. बाहुली राजाला म्हणाली, "राजा, मला मोराची दे गाडी – नाहींतर कर लढाई –" लिलीला राजा घाबरला (!) "गाडी देतो, गाडी देतो" म्हणाला

हा बलाढ्य राजा बहुतेक एकादा भुसा भरलेला जुना बाहुला असेलसें वाटतें. थोड्याशा अवधानानें हे दोष टाळता येण्याजोगे होते

नाविन्याची उणीव हाहि आजच्या शिशुकथेंत शिरू पाहणारा एक दोष आहे मुलांसाठीं इसापनीतींतल्या गोष्टीसारख्या एकाच ठशाच्या गोष्टी किती-जणानीं पुन पुन्हा लिहाव्या ? खेळणीकथांतहि तेच ते सकेत येतात. माऊ, भूभू, पोपट, चिऊ याच्या गोष्टींतल्या वर्णित घटना पाहिल्या कीं त्याचा सारखाच तोंड-वळा मनास खटकतो कुत्रा व माऊ भाडले, मुलानें हट्ट केला, आईनें खाऊ *दिला या पलीकडे हें वर्णनक्षेत्र जातच नाहींसें दिसतें, आणि अशा पसाऱ्यात जेव्हा* एकाद्या नवकल्पनेचा चमकदार आविष्कार दृष्टीस पडतो तेव्हा तो कौतुकास्पद वाटतो उदाहरणार्थ, श्री श्री बा. रानडे याच्या "तिंबूनानाचा रेडिओ" यातील एक गोष्ट पहा. यात मुलांसाठीं एका रबरी कुत्र्यावर डॉक्टर ऑपरेशन करतात व त्याच्या पोटातून रोग म्हणून खरोखरच छोटा बेडूक व छोटेंसें माजर हीं खेळणीं निघतात ! कारण तो रबरी कुत्रा म्हणजे खरोखरी एक पर्स असते आणि ही चमत्कृति मुलानाहि कळू शकते. ह्यातच खरी गंमत !

श्री. ह. रा पाटील याच्या 'इन्द्रधनुष्य' या छोटुकल्या कथेंतहि असाच कल्पकतेचा रम्य प्रत्यय येतो. स्वर्गातल्या देवानीं रगपचमीसाठीं रगाचे हौद भरले होते, त्यातून इन्द्रधनुष्य तयार झालें. नतर इतर पशुपक्ष्यानीं उरलेले रग घेतले व रगपचमीचा डाव माडला अर्थात्, या खेळामुळेंच पशुपक्ष्याचे रग भिन्नभिन्न झाले अशी ही मजेदार कल्पना, पण अशा कल्पकतेची उदाहरणें थोडींच.

आजचें शिशुसाहित्य बाह्यरूप दर्शनात मोठे आकर्षक झालें आहे, रगीत चित्रें, ठळक छपाई, सुदर मुखपृष्ठ इत्यादि रूपमनोहर सजावट अगदीं डोळे मिटून मान्य करावी लागेल. परतु या साहित्याच्या अतरगात अजून पुष्कळच सुधारणा व्हावयास हव्या आहेत, पूर्वीहून हलक्या फुलक्या, प्रसन्न भाषेनें तें नटताना दिसलें तरी हें उपायन नवकल्पनाच्या झळाळीनें तेजस्वी आणि शिशुवयाला उचित ठरणाऱ्या आशयानें अधिक सपन्न व्हावयास हवें ! तरच त्याची मौलिकता वाढेल !

●●●

# बालसाहित्यांतील कथा विभाग

बालकथांचा प्रांत हा बालसाहित्यांतला सर्वांत महत्त्वाचा व इतर वाङ्मयीन प्रकाराहून अधिक प्रसन्न व बहरलेला विभाग आहे. बालकथेनेंच बालसाहित्याचा मुहूर्त केला. जुन्या जमान्यांत, लेखनपूर्वकालीहि, ती बालाबरोबर हसली, खेळली आणि आजहि ती आपलें तें व्रत पुढें चालवीत आहे. मुद्रणकलेनंतर तिच्या स्वरूपांत अनेक तऱ्हेचे विशेष प्रकटूं लागले. आज तर या कथेंत किती तरी विविध प्रकारांचा आढळ होतो. 'लोककथा, परीकथा, प्राणिकथा, पुराणकथा, इतिहास-कथा, वास्तवकथा, साहसकथा, सान्या कथाच कथा! बालवाङ्मय म्हणजे केवळ कथात्मक वाङ्मय, असें पूर्वी म्हटलें जाई, त्याचे प्रत्यंतर या सर्व प्रकारांनीं आज पटवलें जात आहे.

हें सर्व एका कथेचेंच भिन्नरूप असले तरी या प्रत्येकाला इतिहास आहे, वेगळें अस्तित्व आहे, प्रगतीचें स्वतंत्र दालनहि आहे. जणुं एकाद्या संपन्न घराण्यांतील सुंदर गुणी बहिणी, वेगवेगळ्या घरीं संसार सजवतात, तसें हें वेगळेपण आणि तसेंच हें मूळ रंजक कथावस्तूचें साम्य भासतें.

बालसाहित्यांत वैभवानें चमकणाऱ्या या भिन्नरूपिणी कथांचा हा सांगोपांग परिचय या बालकथालेखन प्रकारांचें भिन्नत्व स्पष्ट करणारा आहे, तसाच प्रत्येक लेखनप्रकाराचा एक सुसंगत इतिहासहि नजरेसमोर प्रकट करणारा ठरेल.

## प्राणिकथा

बालकथेंतील फार मोठा भाग प्राणिकथांनीं व्यापलेला आहे. इसापच्या गोष्टींचीं पारायणें घरोघर होतात किंवा भारतभागवताहून अधिक उत्सुकतेनें बाल-वाचक पंचतंत्र हितोपदेशांतल्या गोष्टी वाचतात, याचें कारण त्यांतलीं तात्पर्यें किंवा उपदेश त्यांना मोह पाडतो हें खास नव्हे! तर त्या प्राणिकथा आहेत व हे

प्राणीहि शैशवकालापासूनचे खेळगडी मानले जाणारे. चिमणी, कावळा, गाय, मांजर, कुत्रा, पोपट इत्यादि नित्य परिचयाचे असेच, किंवा गोष्टींतून भेट देणारे वाघ, सिंह, कोल्हा, लांडगा असे अप्रत्यक्ष ओळखीचे असल्यानें प्राणिकथांबद्दल बालचाचकांना साहजिकच जवळीक वाटते हेंच त्याचें मुख्य कारण।

शिशुवाङ्मयात प्राणिकथेला किती महत्त्व होतें हें मागें स्पष्ट झालें आहेच. शिशूसाठी ज्या काऊचिऊ-गोष्टी सांगितल्या जातात त्यांची व्याप्ति फारतर सात आठ ओळींची व वर्णनें स्थूल घटना सांगणारीं, किरकोळ प्रसंगचित्रण व थोडी गमत एवढेंच त्यांचें कार्य. पण त्याच मांजामनीच्या, वाघसिंहाच्या चिमण्या गोष्टी हळूहळू जेव्हा वर्धित होतात, तेव्हा त्यांना नवा दीर्घकथेचा आकार येतो. तपशीलाचे रंग या कथेंत भरू लागतात, सूक्ष्म वर्णनांनी तिची प्रकृति नाळमेदार होते. राज्यचलन, व्यवहार-शिक्षण, नीतिबोध, यांचेंहि उपायन जनतेला देण्याचे सामर्थ्य या प्रबुद्ध प्राणिकथेला प्राप्त झालेलें दिसतें प्राणिकथा आजकालची नव्हे. तिचें रूप सनातनी आहे. वेदकालात, महाभारतात राजांना उपदेश करतांना ऋषी मुनींनी उदाहरणादाखल प्राणिकथाच सांगितल्या आहेत. पंचतंत्रातील प्राणिकथा पौराणिक काळाचा वारसा सांगणाऱ्या आहेत. हें पंचतंत्र मूळ संस्कृत भाषेंत दोन हजार वर्षांपूर्वी लिहिलें गेलें असें विद्वानांचें मत आहे. मराठीच्या अगदीं प्रथमावस्थेंत महानुभाव वाङ्मय निर्माण झालें, त्यांतील श्री चक्रधर स्वामी यांच्या लेखनातहि एक छोटी प्राणिकथा आली आहे।[1] इसापनीतीचें प्राचीनत्व तर विख्यातच आहे.[2]

जुन्या प्राणिकथेच्या या विवेचनात पंचतंत्राचा उल्लेख वारवार होत असला, तरी मूळ पंचतंत्र लिहिलें गेलें तें सर्व जनतेसाठी, केवळ कुमारांसाठीच नव्हेच. त्यामुळें यात प्राणिकथा असल्या तरी त्यांची व्याप्ति मोठमोठ्या गोष्टींएवढी असून त्यातली नांवेंहि, वज्रदंष्ट्र सिंह, क्रव्यमुख लांडगा, लघुपतनक कावळा, चित्रग्रीव कबुतर, अशी मोठी संस्कृतप्रचुर दिसतात. शिवाय या गोष्टींच्या माध्यमानें त्यातून जो उपदेश केला गेला आहे तो बहुजनसमाजासाठींच उपयुक्त ठरणारा आहे उदाहरणार्थ, यातला एक लघुपतनक नावाचा कावळा हिरण्यक नामक उंदराशी दुचेगिरीनें स्नेह करू पाहत होता. त्याबाबत झालेला उभयतांचा संवाद असा आहे —

---

१ ही जुन्या काळच्या प्राणिकथांची पद्धत फक्त भारतात अस्तित्वात होती असें नव्हे रोमन द रेनार्ड या नावाच्या एका धूर्त कोल्ह्याच्या हकिकतीवर तीस हजार ओळींचें काव्य इंग्लिश व फ्रेंच भाषेंत सुमारें ५०० वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालें होतें पंचतंत्राप्रमाणें या कोल्ह्याच्याहि कथेनें दशदिशांत प्रवास केला आहे आपल्याकडेहि ह्या कथेचें रूपांतर 'राणा कोल्हा' या नावानें तीस वर्षांपूर्वी झालेलें आहे

" हिरण्यक — अरे, मी माझ्या शत्रूशीं कशी मैत्री करूं ? घट्ट संबंध असले तरीहि शत्रूबरोबर मैत्री करूं नये. पाणी कितीहि तापलें तरी तें विस्तवाला विझवूनच टाकणार !

लघुपतनक — अरे, आपली दृष्टभेट सुद्धां झाली नाहीं, मग वैर कुठलें ?

हिरण्यक — वैर दोन प्रकारचें. एक सहजवैर, दुसरें कांहीं कारणानें उत्पन्न झालेलें. सहजवैर मरणानेंच संपतें आणि आपलें सहजवैर आहे. स्वाभाविक वैर कधींहि नाहींसे होत नाहीं. साप-मुंगुस, पाणी-अग्नि, देव-दैत्य, मूर्ख - पंडित, सवती-सवती, गरीब-श्रीमंत, यांपैकीं कोणी कोणाला मारलेलें नसतें, पण प्राण जाईपर्यंत ते परस्परांचें वैर करतात. "

ही वैरमीमांसा कितीहि खरी व उपयुक्त असली तरी ती बालमनोरंजक म्हणतां येईल काय ? आणि म्हणूनच या पंचतंत्रांतूनच रंजक प्राणिकथा निवडून त्या बालांसाठीं सोप्या सुटसुटीत भाषेंत देण्याचा उपक्रम सुरू झाला, तोच बालदृष्टीनें अधिक महत्वाचा ठरेल. तसें पाहिलें तर, इसापनीति व पंचोपाख्यान या प्राणिकथांनींच मुद्रित बालसाहित्याची मुहूर्तमेढ रोवलेली दिसेल. मात्र पंचोपाख्याना-हून अगर पंचतंत्राहून इसापनीतींतहि तात्पर्यें आहेत व तीं मोठ्यांसाठींच आहेत हें खरें पण गोष्टी मात्र आटोपसर; शिवाय संस्कृत कठीण नांवांची कटकट त्यांत त्यात मुळींच नव्हती म्हणून त्या बालांना फार आवडल्या. हा फरक दृष्टीआड करण्यासारखा नाहीं.

इसापनीतीचें प्रथम भाषांतर १८२८ सालीं छत्र्यांनीं केलें होतें. आणि १८९५ मध्यें वि. धों. ओकांनीं 'नवीन इसापनीति' या नावानें परत एकवार लिहून तें प्रसिद्ध केलें. बालांच्यासाठीं लिहिलेल्या ह्या पहिल्या प्राणिकथा. त्यांनीं प्राण्यांच्या सोप्या गोष्टींची एक नवी पायवाट पाडली; आणि मग त्या बालोपयोगी दृष्टीनें जुन्या प्राणिकथाकडेहि बालसाहित्यकारांचें लक्ष वेधलें.

पंचतंत्रांतलें भारूड काढून टाकून त्याहि गोष्टी सोप्या करून लिहिल्या तर मुलांना उपयुक्त ठरतील हें सूत्र ओळखून तसे प्रयत्न करण्यांत आले. वा. गो. आपट्यांनीं "बालमनोरंजन" नांवाचें एक छोटें पुस्तक १९१०-१२ च्या सुमारास प्रसिद्ध केलें. त्यांत हितोपदेशांतील गोष्टी अगदीं सोप्या भाषेंत छापल्या होत्या. त्यानंतर या गोष्टींचीं अनेक सोपीं रूपांतरें छोटया छोटया स्वरूपांत प्रसिद्ध झालीं व प्राणिकथेला त्यांतून प्रोत्साहनपर व प्रगत दिशा लागली.

चित्रें हा तर या प्राणिकथेचा अविभाज्य घटक. प्राणिकथेला आज चित्रांनीं विशेष उठाव व सौंदर्य प्राप्त करून दिलेलें आहे. 'वॉल्ट डिस्ने'च्या चित्राचा 'मिकी माऊस' हा चित्रपट प्रसिद्ध झाल्यानतर तर पाश्चात्य प्राणिकथातून प्राण्याची तशीच व्यगचित्रें घालण्याचा एक अलिखित सकेतच होऊन बसला, एवढेंच नव्हे तर व्यगरूप चित्रें, प्लॅस्टिक वा रबरी खेळण्याच्या रूपात, बाजारातूनहि प्रवेशलीं व त्याची लोकप्रियता वाढत गेली. मिकी माऊसप्रमाणेंच ससा, डुकर, उंदीर, कुत्रा इत्यादींचीं व्यगचित्रें साहित्यातहि तयार होऊ लागलीं, आणि निरनिराळ्या हावभावाच्या, भावदर्शनाच्या छटा त्या चित्रातून व्यक्त होऊन गोष्टींतील प्रसगवर्णनास एक वेगळेंच चैतन्य आणू लागल्या. आज चित्रावाचूनची प्राणिकथा म्हणजे निनवासाच्या फुलासारखी फिकी समजली जाते! आपल्याकडे प्राणिकथेंत चित्रें असतात पण त्याची विविधता या दृष्टीनें कमी पडत असें म्हणावें लागतें.

प्राणिजीवन सागण्यासाठीं कथेचें माध्यम खरोखरच उपयोगी ठरतें. त्यात घटनेबरोबर तपशीलालाहि वाव असतो. व प्राण्याच्या हालचालींचीं वर्णनेंहि खुमासदार व विस्तृत देता येतात. या दृष्टीनें ह. म. वाघोलीकर याची 'दादू आणि तादूच्या गोष्टी' ही दीर्घकथा उल्लेखनीय आहे. दादू व तादू हीं दोन खट्याळ अन् धाडसी अशी उदराची पिटुकलीं, त्यानीं केलेला 'दक्षिणचा प्रवास' व त्यात त्याना आलेले मजेदार अनुभव याच्या हकिकतींनीं हें पुस्तक फार रजक झालें आहे. लेखकानें माध्यम घेतलें आहे प्रवासकथेचें, पण वर्णनें मात्र प्राणिसृष्टीच्या क्रीडा जीवनाशींच अधिक सुसगत ठरणारीं! भाषाहि बालाना समजावी अशी व उंदराच्या स्वाभाविक सवयी व्यक्तविणारी दिसून येते. उदाहरणार्थ, हा परिच्छेद पहा —

"दादू उदीर जरा लवडला होता. झोंप लागली होती त्याला. इतक्यात, सळ्ळ् चर्रर! एक वाळलें पान दादूच्या डोक्यावर पडून त्याचें नाक खाजवून खालीं पडलें. दादूच्या मिशा फिसकारल्या गेल्या. एका मुडपत्या कानाला उडवीत व एक डोळा किंचित् किलकिला करीत दादू म्हणाला, 'अरे राम. वाळलें पान! म्हणजे आलीच म्हणायची थंडी!' एक सुस्कारा टाकून त्यानें डोळा मिटला आणि पाय ताणले."

उदराबरोबर साळू, चिचुद्री, बेडूक इत्यादि इतर प्राण्याच्याहि सूक्ष्म हालचालींचीं वर्णनें यात जागोजाग आलीं आहेत. ही सर्वच कथा एकदर मानवी व्यवहारापासून दूर आहे. पण एकदाच ही अलिप्तता भगते. साळू मावशीला मोठमोठे काटे असतात व ते इतराना बोंचतात म्हणून, सुतारपक्ष्याकडून 'घोका– जपून' अशी पाटी लिहून घेऊन, दादू तादू ती साळूमावशीच्या पाठीवर बसवतात

या प्रसंगानें. पण येवढें गालबोट वगळलें तर एक सहजसुंदर प्राणिकथा म्हणून ही गोष्ट ध्यानांत राहील. राणा कोल्हा तर चोख्न चाल्न सनातनी काळांतला. त्यावर आधुनिक मानवी राहणीचे संस्कार अगदींच कमी आहेत. या राण्याविरुद्ध रानसभा होतात हें खरें; पण त्यांत ठराव, अनुमोदन, भाषणें इत्यादि प्रकार नाहींत. त्याचें जेवण वर्णिलें आहे त्यांतहि ताटेवाट्या वगैरे आधुनिक बाह्य साधनें वर्ज्य आहेत. कोल्ह्याचें क्रौर्य, दुष्टावा, लबाडी व धूर्तता याच्याच प्रमुख वर्णनकथा यांत आहेत. फक्त वनराजा सिंह कोल्ह्याला फाशीची शिक्षा देतो एवढाच काय तो उल्लेख मानवी राहणीचा सूचक. (खरें म्हणजे तेंहि सहज टाळतां येण्यासारखें होतें; कारण 'उग्रदंत' सिंहाकडेच जेथें राजपद तेथें क्षुद्र कोल्ह्याला मारायला वेगळा 'फास' कशाला हवा !) पण एवढी बाब वगळली तर राणा कोल्हा हीहि कथा पशुजीवनाशीं पुष्कळच प्रामाणिक वाटते. आशा भालेराव यांची 'लंबदूम' ही वानरकथाहि अशीच. नागरजीवनापासून आणि मानवी शिष्टाचारापासून ती दूर ठेवली गेली असूनहि सरस उतरली आहे. यात दुमकट कोल्ह्याच्या मदतीनें लंबदूमनें एकजुटीनें रानचे शत्रू, अजगर व लांडगा यांना ठार केल्याचें वर्णन वाचून मनात येते कीं केवळ निसर्गवर्णन व पशुसृष्टीचें निरीक्षण यावरहि उत्तम प्राणिकथा लिहितां येणें शक्य आहे. राजा ससा आणि त्याच्या गोष्टीमधील राजा ससाहि असाच स्वाभाविक वर्तनाचा आहे. फक्त बाधीव घरापलीकडे मानवी जीवनाचा त्यानें कुठें स्वीकार केलेला नाहीं. (या पुस्तकांतील चित्रातून मात्र ही दक्षता राखली गेलेली नाहीं ! तेथें कपडे घातलेले प्राणी दर्शवले गेले आहेत, आणि ही विसंगति जाणवते.) राणा कोल्ह्याप्रमाणें राजा ससाहि बालप्रिय झालेला आहे.

कांहीं ठिकाणीं प्राण्यांचें एक संपूर्ण गावच कल्पून तेथल्या हकिकती दिल्या जातात व नाविन्यानें त्याहि वेधक ठरतात. उदाहरणार्थ, गलिव्हरचे जे प्रसिद्ध प्रवास आहेत, त्यात तो एका सफरींत 'राजे हुं हु हूं' याच्या देशांत गेल्याचें वर्णनचित्र फारच मजेदार तऱ्हेनें व्यक्त झालें आहे. 'राजे हुं हुं हूं' म्हणजे अश्वराजा. त्याचा देश म्हणजे घोड्यांचें राज्य. तेथें तर सगळेच घोडे होते ! मानव कसा असतो तें त्यांना माहीतच नव्हतें. व त्यामुळें त्याला ते प्रथम वानराचाच कोणी बेडौल जातभाई समजत होते ! किती चमत्कृतिपूर्ण कल्पना, नाहीं काय ? या वर्णनानें गलिव्हरच्या या सफरीला काही वेगळीच खुमारी चढली आहे. या अश्व राज्यांत शिस्त होती, सन्मान्य वर्तणूक होती व तेवढ्यापुरती मानवराज्य पद्धति त्यांनीं स्वीकारलेली दिसते हें खरें, पण तेथें मानवी शिष्टाचार नव्हते आणि त्यामुळें यांत पशुजीवनाचा एकसूत्रीपणा कायम राहिला आहे. गलिव्हरच्या या कथेचें अनुकरण नंतर अनेक कथांतून होऊं लागलें व मानवी व्यवहाराशीं पशुजीवनाची मर्यादित सांगड घालण्याचीहि पद्धत त्यांतून प्रचारांत येऊं लागली. आणि त्यांत

फारसें नवलहि नाहीं. अगदीं पहिल्यावहिल्या पंचतंत्रातील प्राणिकथांनीच हा किस्ता घालून दिलेला नाहीं काय? उदाहरणार्थ, पंचतंत्रातील एका गोष्टींत एक बगळा एका खेकड्याला सांगतो —

"आता बारा वर्षे दुष्काळ पडणार आहे, कारण आता शनि रोहिणी नक्षत्रात जाणार आहे. वराहमिहीर म्हणतो कीं, जेव्हां सूर्यपुत्र शनि रोहिणी नक्षत्रा तून जातो तेव्हां इंद्र बारा वर्षे पाऊस पाडीत नाहीं."

केवढा विद्वान हा बगळा! याला तर वराहमिहीराचेंहि ज्ञान आहे आणि पुराण–देवता व नक्षत्रें हेंहि सारें माहीत आहे! पंचतंत्रात अशी मानवत पशुपक्ष्यांचीं उदाहरणें पुष्कळ सापडतील. अर्थात् ही मानवी बुद्धीहि कमी पडूनच की काय या पंचतंत्रातील जाणत्या प्राण्यांना सरळ मानवी रूप देऊन याच कथा सुबुद्ध सांगण्याचाहि प्रयत्न दा. वि. फणे यांच्या 'राणीचा बाग' या कादंबरीत झालेला दिसतो. मुळातील हंस व कासव हे प्राणी 'या बागेंत' लाला हसराज व कूर्मसिंग नावाचे मानवच बनले आहेत. प्राणिकथेचें हें अगदीं वेगळेंच परिवर्तन म्हणायला हवें, आणि मग ही प्राणिकथाच राहू शकत नाहीं एवढाच आमचा आक्षेप!

प्राणिकथा आज नव्याण्णव टक्के मानवकथा होऊनच बालवाङ्मयात प्रवेशू लागली आहे. आणि किती अतिरिक्ततेनें? उदाहरणेंच पाहण्याजोगीं आहेत. व्य. रा. गडाळीकर कृत 'उंदराची सभा' या प्राणिकथेंत अध्यक्षाची निवडणूक आहे, ठराव आहे, अध्यक्षीय भाषणहि आहे, तेंहि पन्नास ओळींचें व संस्कृतनिष्ठ भाषेंतून! फार काय अध्यक्षाची उंदरानी केलेली भरमसाट स्तुति, व स्वतः कारण नसता अध्यक्षानीं केलेली आत्मस्तुति, हे सगळे मानवी सभेचे दोषहि या उंदरानी आत्मसात करावे हें नाहीं का नवल! उषा आपटे यांच्या 'प्राणीगावच्या मौजा' मध्यें छोट्या प्राण्यांच्या बाळाच्या गमती दिसतात, पण यात कावळेबुवाची गायन शाळा आहे, डुकरोजी घराला रंग लावीत असतात. टिपोनी हा गावाचा शिपाई, फक्त नावें व व्यक्तिचित्रणें बदलली तर ही शुद्ध मानवीकथाच होईल. प्राणीपणा त्यात फारसा नाहीं कोल्हीताईंचा कुई या अलिकडच्या सौ. सुमति पायगावकरांच्या पुस्तकात तर याचा कळस आला आहे! या कोल्हीताईनें भाऊबीजेला भ्रीखंड केलें होतें व तिला भाऊ जरीची साडीहि देणार होता!! मानवी स्त्रिया जरीच्या साड्या घेतात. कोल्हीताईला का नको मग? मानवाप्रमाणें उंदराचेंहि सुटाबुटा बांधूनच लग्न हवें का? पण तें 'उंदिरमामाचें लग्न' या कथेंत आहे. अर्थात् विचारशील प्रौढ माणसाना जरी यात विसंगती वाटत असली तरी बालवाचकाना मात्र प्राणिकथेंतले हे मानवसदृश व्यवहार वाचून आपण काहीं वेगळेंच वाचतो आहोंत असेंहि वाटत नसावें! कारण शैशवापासूनच उंदराला चिंधी सापडली व

त्यानें एक टोपी शिवली, चिमणीनें मेणाचें घर बांधलें, इत्यादि कथानकांनीं सुरू होणारी प्राणिकथा पाहिली तर मुक्या प्राण्यांचें दैनंदिन जीवन माणसासारखेंच कल्पिलेलें दिसतें. इंग्रजी साहित्यांत प्राणिकथा लिहिण्याची हीच पद्धत अधिकाधिक बालप्रिय होत आहे. मानवाप्रमाणें पशुजीवनांतहि लहानांचें जीवन अधिक भावपूर्ण असतें. अशा कल्पनेवर आधारलेल्या कित्येक गोष्टी पाश्चात्यांत आढळतात. एलिफंट द बाबर ( ले. एनिड ब्लायटन ) या पुस्तकांत एका चिमुकल्या हत्तीचें जीवन वर्णिलें आहे. छोटा बाबर हत्ती जोंवर जंगलांत होता तोंवर त्याचें जीवन सहजसुंदर होतें. पण त्याला शहराची हवा लागली मात्र, तो एकदम मोठा सुधारकच झाला !! एका दिवसांतच त्यानें शिंप्याच्या दुकानांत जाऊन कपडे शिवून घेतले, फोटोग्राफरकडून फोटो काढून घेतला व टेबलाशीं खुर्चीवर बसून खुशाल कांटेचमच्यानें जेवणहि केलें ! ही गोष्ट वाचतांना बाबर हा एक ' हत्तीबाळ ' आहे ही प्रमुख गोष्टच वाचक विसरून गेल्यास आश्चर्य नाहीं, इतकी ती मानवी झाली आहे. पण या पुस्तकाचेंहि पाश्चात्य बालसृष्टींत अगत्यानें स्वागत झालें. कारण यांतील हत्तीचें भावदर्शन फारच चांगलें जमलें आहे. या प्रकारें प्राणिकथेचें नवें रूप मानवतावादाचें होत आहेसें दिसतें. पण मानवी व्यवहार वा मानवसदृश जीवन या कथांतून कोठपर्यंत यावें याला कांहीं मर्यादा नकोच कां ? लीलाधर हेगड्यांची ' पांचूचें बेट ' ही एक वस्तुतः उत्तम प्राणिकथा होती आणि जातीय ऐक्यावर तिची रूपकात्मक रचना होती. सूचकतेनें हें स्पष्ट झालें होतेंच, पण ही सूचकता पुरेशी न वाटून लेखकानें प्राण्यांना घोषणा करायला लावलें !

> " बेट पांचूचें सर्वांचें ।
> नाहीं कोणा एकाचें—!
> सारे जग हो सर्वांचें ।
> नाहीं कोणा एकाचें !

यांतले मर्म राजकारण वाचणाऱ्यांना उलगडून दाखवायला नकोच ! या प्राणिकथेंत मानव आला, विमान आलें, बॉंबस्फोट झाला. तिची एकता मोडली ! खुद्द सिंह मानवाबद्दल काय म्हणतो तें पहा—

" म्हणजे एकीकडे शांतीचा जयजयकार करायचा आणि दुसरीकडे हे असले प्रचंड स्फोट करायचे–भोंदू लेकाचे ! "

ही प्राणिकथा याप्रमाणें प्रचारासाठीं राबवली गेली व रूपक उलगडून सांगितल्यानें त्यांतली चवहि गेली. अशाच प्रकारच्या " बेडूकवाडी " कथेंत मात्र बेडूकजीवनचं वर्णिलेलें दिसेल. व श्री. ना. ग. गोऱ्यांच्या मजेदार शैलीनें त्याला रंग चढला आहे. यांत कामकरी मुंग्या खेडूतभाषा बोलतात व बेडूक पोरें बालभाषा

बोलतात, येथवर वर्णनाचे बारकावे आढळतात. या कथेंत बेडकाचीं नावें चेंब्या, आबा, खुशालराव, पिटुक इत्यादि मानवी पद्धतीचीं असलीं तरी आडनावें मात्र मडुके, ढेरे, गटाणे, लाल्फराटे, दुर्दुरे इत्यादि मङ्कजातिसूचक आहेत. परंतु नावें वजा केलीं तर जीवन वर्णिलें आहे तें मात्र बेडकाचेंच. त्याची पाण्यातली राहणी, जीवनकलह, शत्रु इत्यादि सारें सूचित झालें आहे. या सर्वाला आकर्षक वर्णनाची साथ. पुढील उतारा त्याची साक्ष देईल—

—" तिकडून वडाची दोनचार वाळलेलीं पानें सडसड करीत धावत आलीं. त्याच्या पाठोपाठ कडब्याच्या काड्या कोलाम्या घेत आल्या. त्याना शोधीत पाढऱ्या धुप्प केसाची एक म्हातारी आली. सगळींच घाईत दिसलीं. आपले बटबटीत डोळे त्याच्यावर रोखून खुशालरावानीं प्रश्न केला, काय रे, शिवाशिवी खेळताय् कीं काय भर उन्हाचे ? आणि काबू तुम्ही सुद्धा ? "

" नाहीं रे बाळ ! किनई मोठ्ठ वादळ येतय् मागन ! त्याची खबर सगळ्याना द्यायला निघालोंय आम्ही ! बर, जातो. तू समाळून अस ! "

खुशाल्राव नाकतोंडे विचारात पडले. —"

प्राण्याच्या स्वभावसिद्ध सवयींचा श्री. ना. ग. गोऱ्यानीं यात असा समर्पक उपयोग करून घेतला आहे.

माणसें आत्मवृत्त सागतात, मग प्राण्यानीहि तो प्रघात का पाडू नये ? या कल्पनेनें प्राणिकथातहि या प्रकारचे प्रयत्न केले गेले आहेत. उदाहरणार्थ, श्री. ग. म. वैद्याच्या 'आमची गान्हाणीं' या छोटुकल्या पुस्तकात मोत्या कुत्रा व पवळ्या बैल यानीं आत्मनिवेदनपर करुणकथा सागितलेल्या दिसतात. मूक प्राण्याच्या *भावनेला शब्दाकार देण्याचा हा प्रयत्न छोम्या लेखापुरताच आढळतो असेंहि नाहीं.* बालाकुरानें जसें वृक्षरूप घ्यावें तद्वत् या आत्मनिवेदनाची कक्षाहि कथा, दीर्घकथा, कादबरी या मार्गानें पुढेंपुढें धाव घेत आहे. 'एका कोल्होबाची रोजनिशी' *(ले. श्री. ल. गो. परांजपे) या छोट्या पुस्तिकेंत लेखकानें एका कोल्ह्याची हुलसत* घेतलेली दर्शविली आहे. तीहि सवादरूप नसून आत्मनिवेदनपरच आढळते. कारण या हुशार कोल्होबानें आपली दैनंदिनीच लिहिली व ती लेखकाला वाचूनहि दाखवली ! हा सुशिक्षित व डायरी ठेवण्याएवढा व्यवस्थित कोल्हा प्राणिराज्यात मोठ्या अलौकिक कर्तृत्वाचाच ठरण्यास हरकत नाहीं ! खरें म्हटलें तर ह्यातहि *अवस्त्वारोप येतोच, परतु प्राण्याच्या मनोभूमिकेचा विचार करून लिहिलेल्या* अशा पुस्तकात सत्यकथनापेक्षाहि निवेदनाचीच एक नवी पद्धत साकार होते इकडे अधिक लक्ष द्यावें लागेल. 'चादणी' या पुस्तकात एका घोडीचें आत्मवृत्त रजकतेनें व सविस्तर देण्यात आलें आहे. आधींच प्राण्याचें आत्मचरित्र हीच

कल्पना अभिनव, त्यांत लेखनशैलीहि अशी वेधक असेल तर पुस्तकाचें आकर्षकत्व एकदम वर्धित होतें.

प्राणिकथांत आत्मकथनपर साहित्य येणें इष्ट कीं अनिष्ट याबद्दल मतभेद आहेत. अशा साहित्यानें बालकें फाजील हळुवार बनतात व अशा कल्पनारम्यतेनें खरा व्यावहारिक व शास्त्रीय दृष्टिकोन त्यांना पारखा होतो असा एक आक्षेपहि याबद्दल घेतला गेला आहे. परंतु बालकांना प्राणिकथा बाल्यापासूनच प्रिय असतात. शिवाय प्राणिजीवनातील कृत्रिमतेचा भागहि त्यांना बालपणींच परिचयाचा झालेला. मांजर खीर करते, उ पैसा देऊन भाजी आणते या हकिकतींत प्राणि सहजता कुठेशी आहे ? तरी या मानवसदृश व्यवहाराच्या गोष्टी मुलांनीं आत्मसात् केलेल्या असतात; तेव्हां मूक प्राण्याच्या आत्मचरित्रानेंच काय बाध येणार आहे त्यांत मोठासा ? वाढत्या वयात या परिचित गोष्टींनीं मुलांच्या मनावर विकृत परिणाम होणें अशक्यच वाटतें. तेव्हा एक नाविन्यपूर्ण लेखनप्रकार म्हणून या आत्मवृत्तांचें स्वागत करणेंच इष्ट ठरेल.

प्राणिकथा जी बालप्रिय होते ती मुख्यतः त्या त्या प्राण्याचा मानवाशीं असलेल्या सहवासानें. चांदणीनें आत्मवृत्तात जें मानवी जग वर्णिलें त्यांत बालाच्या ओळखीचेंच सारें विश्व आहे. चरित्र सांगतां सागतां चांदणीनें माणसाची पाळीव प्राण्याशीं किती निर्दयतेची वागणूक असते यावर उत्तम प्रकाश पाडला आहे. एका गाढवाचें आत्मवृत्त हेंहि छोटेंसे पुस्तक याच सदरांत घवूं शकणारें आहे. समाजांतील उच्चवर्णीयाचे अनुभव निराळे व पददलितांचे अगदीं निराळे ! तोच फरक चांदणी घोडी व गाढव यांच्या आत्मवृत्तातून आढळतो. चांदणी दिमाखदार जातिवंत घोडी, मोठमोठ्या जाणकार श्रीमंत माणसांचा तिला सहवास, त्यामुळें तिच्या करुण जीवनांतहि अनेक सुलक्षण अवतरले. उलट गाढव हा अपमानित दर्जाचा क्षुद्र प्राणी. त्याच्या जीवनांत सोसाळूपणा व कष्ट यावांचून काय असणार ? प्राणिजीवनाचे निमित्तानें मानवी जगातील विषमता व अन्याय यांनाच जणूं या दोन्ही आत्मचरित्रांतून प्रकट रूप दिलें गेलेले दिसतें.

प्राणिकथेच्यीं अनेकानेक अशीं स्थित्यंतरें आहेत. तिच्यांतला फार मोठा भाग शिशु व बालरंजनाचाच असतो व त्यांसाठी या विषयावर अनंत पुस्तकें निघालेलीं नजरेसहि येतात. प्रश्न येतो तो कुमार – किशोरवयीन मुलांना या गोष्टी कितपत आवडतील याचाच; कारण कल्पनेचें राज्य नावडतें होण्याचें त्यांचें हेंच वय ! त्यांना यांतील रूपकात्मक गोष्टी फारतर आवडतील, पण मानवी जीवनाचा सर्वथैव अंगिकार केलेल्या प्राणिकथा मनास येणें कठीणच !

बालसाहित्यांतील प्राणिकथेची कक्षा आज रुंदावत चालली आहे. आणि काव्य, निबंध, आत्मचरित्र, हितगूज, कादंबरी, नाट्य अशा अनेक लेखन प्रकारांनीं तिला नव पैंर पडूं लागले आहेत, हें मान्य केलें पाहिजे.

ही प्राणिकथेचीं स्थित्यंतरें विकसनशील आहेत कीं अस्वाभाविकतेकडे त्यांची प्रवृत्ति आहे हें सांगणें कठीण आहे. लेखनाच्या अनेक प्रकारांना त्यांनीं जन्म दिला आहे, अनेक बालसाहित्यकारांच्या प्रतिभेला वाव दिला आहे व वैचित्र्याचें एक वेगळें विश्व त्यांनीं साकार केलें आहे हें खरें. तथापि हें मान्य करूनहि प्राणिकथाहि प्रथम प्राणिकथाच असावी व अपरिहार्यतेनें येईल तेवढीच मानवता तिच्यांत पार्श्वभूमिदाखल योजावी, तरच ती अधिक सुसंगत व स्वाभाविक दिसेल, हें परत एकदां निःसंदिग्धपणें सांगणें अवश्य वाटतें!

## लोककथा

एकंदर बालसाहित्यांत कथाप्रांत अधिकच बहरलेला, त्यांतहि अद्‌भुतरम्य कथांचा विभाग तर अगदीं वैपुल्यानें नटलेला दिसतो. मुलांचे आवडते उपायन म्हणजे गोष्टी. त्यांतूनहि बालांना अधिक आवडत असतील तर त्या राजाराणीच्या, पक्षपऱ्यांच्या, राजकन्या – राक्षसांच्या गोष्टी आणि अद्‌भुत चमत्कारांचीं कथानकें! आणि ही त्यांची हौस लोककथा हौसेनें पुरी करते. बालपणापासूनच तिचा त्यांना परिचय! या गोष्टीची खरी आवड मुलांना लावली कोणी? घरांतल्या वृद्ध माणसांनींच! नातवंडें जवळ घेऊन राजाराणीच्या गोष्टी सांगणाऱ्या आजीबाई आजहि घरोघरीं दिसतात आणि म्हणूनच या कथांना प्रायः आजीबाईच्या गोष्टी म्हटलें जातें. आज केवळ मुलांसाठीं करण्यांत आलेले अशा गोष्टींचे संग्रह पाहिले तर त्या त्या लेखकांनीहि या सर्व गोष्टी अशा तऱ्हेनें लहानपणीं ऐकलेल्याच होत्या असें दिसतें.

आपल्या प्रमाणेंच देशोदेशीं लोककथा आहेत. त्यांचें कथासूत्र प्रायः नीतिबोध शिकवणारेंच असल्यानें व त्यात रंजकताहि भरपूर असल्यानें त्या बालप्रिय होण्यास अडचण पडत नाहीं व म्हणूनच आपल्या साहित्यांत परदेशीय लोककथा वैपुल्यानें आल्या व प्रत्यहीं येत राहिल्या, एवढेंच नव्हे तर त्याच धर्तीची स्वतंत्र रचना करूनहि अशा गोष्टी मुलांच्या हातीं देण्याची लेखकांची नवी प्रवृत्ति दिसूं लागली आहे. या आधिक्यामुळेंच या सर्वांचा बालरंजनक्षमतेच्या उपयुक्ततेच्या दृष्टीनें विचार होणें अवश्य झालें आहे.

लोककथेवर नेहमींच एक आक्षेप घेतला जातो. लोककथा हे बालांचें उपायन नव्हेच, बालसाहित्य प्रांतांत बसूं शकणारा हा वाङ्मय प्रकारच नव्हे; कारण त्यांतलीं कथानकें मोठ्यांची वा मोठ्या लोकांनाच उपयुक्त ठरणारीं अशींच असतात असें अनेक टीकाकार म्हणतात; आणि त्यांचा हा आक्षेप खरा ठरण्यासारख्या विचित्र लोककथाहि प्रसृत झालेल्या असतात. जुन्या वेताळ पंचविशी, ठकसेन राजपुत्राच्या गोष्टी, कोकिळा पस्तिशी इ. अनेक पुस्तकांतल्या लोककथा वृत्तीनें

प्रौढ, विचारांनीं कामोत्कट आणि वर्णनांनीं स्त्रीपुरुषसंबंधाशींच अधिक संबंधित असलेल्या आढळतात. एवढेंच नव्हे तर कांहीं प्रचलित चांगल्या लोककथांतूनहि ही सामुग्री विशेषत्त्वानें नजरेंत भरावी अशी उत्तान स्वरूपाची असते हेंहि खरें, तथापि या अशा भागावर भर दिला गेला नाहीं तर तीच कथा सौम्यरूपिणी व बालसुलभ होऊं शकते. उदाहरणार्थ, आवडती नावडतीच्या हजारों बालमित्र गोष्टी घ्या. नावडती राणी राजाला कां आवडेनाशी झाली ? त्यांचा दंपत्यकलह किंवा आपसांतल्या प्रेमजीवनांत व्यत्यय येण्याजोगे उभयतांचे स्वभावदोष, किंवा त्या दोघांपैकीं एकाचें अनीतीचें वर्तन, हे विषय लघुकथेलाच नव्हे तर कादंबरीलाहि कथानकें पुरवूं शकतील एवढ्या गुंतागुंतीचे, गहन मनोविश्लेषणाचे !

पण या ' खोल पाण्यांत ' लोककथा मुळीं शिरत नाहीं आणि बालांनाहि राणी नावडती कां झाली, कशानें झाली या पूर्व-इतिहासाची मुळींच ओढ वाटत नाहीं ! राणी नावडती आहे ना, बस्स्, पुढें तिचें न् तिच्या हुशार मुलाचें काय झालें तें कळू द्या अशी त्याची वृत्ति आणि येथेंच लोककथा सूक्ष्मातिसूक्ष्म वर्णनांची पाऊलवाट सोडून स्थूल-स्वभाव – चित्रणाचा धोपटमार्ग स्वीकारते. तें धोरण बालांना रुचतें व मानवतेंहि ! जणुं येथें तिचें विशिष्ट यौवनरूप गोष्टींतल्या एकाद्या छोट्या परीप्रमाणेंच निरागस बालरूप घेतें आणि मग हें प्रौढांचें उपायन सौम्यरूपी होऊन बालयोग्य ठरतें ! कोठेंहि पाहा, या कथावर्णनांतून इतक्या रूपवती राजकन्या राक्षसांच्या तडाक्यात सांपडून त्याच्या किल्ल्यांत, बुरुजात, महालात, पाताळांत कैदी म्हणून राहत असल्या तरी राक्षसानें राजकन्येवर जुलूम केला, वा बलात्कार केला असें लोककथा कधींच सांगत नाही कीं त्या अत्याचाराचें रिकामें फाजील वा अतिरंजित वर्णनहि करीत बसत नाहीं !! फार तर तो राक्षस तिला पत्नी होण्याबद्दल रोज धाक घालतो व फारच दुष्ट असला तर लग्नाचीहि तयारी करू लागतो... आणि बस्स ! येथपर्यंतच त्याच्या त्या दुष्टाव्याची मजल ! पुढलीं अत्याचाराची शृंगारिक वर्णनें लोककथेंत येत नाहींत आणि ही तिची मर्यादा – प्रकृति मुलांना जरूर मानवते. निदान राक्षसाचा दुष्टपणा मुलांना कळतो तरी, पण स्त्रीपुरुषसंबंधाच्या गोष्टी तर अगदींच अनाकलनीय, धुक्यांतून दूरचें क्षितिज अंधुक दिसावें तशा ! पण तेथेंहि लोककथेंतून परंपरेनें एक औचित्य पाळलें गेलेलें दिसतें. असे प्रसंग गोष्टींतून अपरिहार्यतेनें आलेच तर तेथेंहि " राजकन्येच्या महालांत राजपुत्र गुप्त रूपानें रोज येई. कांहीं दिवसांनीं राजकन्येला सुंदर बाळ झालं " या पलीकडे ही वर्णनक्षमता गेलेली आढळत नाहीं.

अशा नको त्या प्रसंगांना आपण होऊनच काटछाट दिल्यानें लोककथा बालसाहित्यांत येते तीच मुळीं बालरंजनाचें मोदक रूप घेऊन आणि अशाच कथांचा विचार येथें प्रस्तुत आहे. तिच्यांतील हा शृंगारिक भाग बाजूस ठेवून

पाहिलें तर लोककथेंत बालरंजन विभागाची सामुग्री कितीतरी प्रकारांनीं समृद्ध आढळते!

मुलांना कळूं लागतें न लागतें तेव्हांपासूनच या गोष्टी त्याना घरांतल्या आजीबाई या वडिलधाऱ्या व्यक्ति सांगत आल्या, तें काय केवळ विचित्र गोष्टींचा मनावर ठसा कोरावा आणि कांहींतरी अतिरंजित गोष्टींची त्यांना माहिती व्हावी म्हणूनच? छे! छे! *विचारी वार्धक्य उमलत्या बाल्यापुढें हें जें उपायन ठेवीत* असतें त्याला दुसरा व अधिक दूरदर्शी असा चांगला हेतू आहे. तो म्हणजे या कथांतून अद्‌भुताएवढेंच नीतिचेंहि उद्‌बोधन असतें. हाच लोककथांचा सर्वांत अधिक दृष्ट परिणाम म्हटला पाहिजे! "दुष्ट राक्षसांचा विजय झाला अगर सद्‌गुणी निरपराध राजकन्या त्या निर्दय राक्षसाचीच पत्नी झाली किंवा सद्‌गुणी शूर नायक उगीच मारला गेला" असें लोककथा कधींच सांगत नाहीं. दुष्ट कृत्यें करणारा जादुगार व लोकांचा उगीच छळ करणारी दुष्ट चेटकी, शेवटीं, सद्‌गुणी व ज्ञानवंत लोकांकडून विनाश पावायची, हाच या कथांचा ठराविक संकेत.

बहुधा लोककथा ही सद्‌गुणांचें विकसन करतांनाच दिसेल. क्षुद्र कीडमुंगी-वर, झाडांवर, मुक्या प्राण्यांवर, दीनांवर, सहजीं परोपकार करणाऱ्या व्यक्तीला शेवटीं त्या परोपकाराचें फळ मिळतेंच, अशा आशयाच्याहि कित्येक संकेतबद्ध लोककथा देशी व परदेशी भाषेंत आहेत. उदा. कै. साने गुरुजींच्या 'आवडती नावडतींच्या' गोष्टींत नावडतीनें खुरटलेल्या झाडाला पाणी घातलें व गाईचा गोठा साफ केला, या साध्या दयाळु कृत्यांनाहि पुढें योग्य बक्षीस मिळालें आहे. कितीतरी गोष्टी अशा नीतितत्त्वांचा विजय सांगणाऱ्याच आहेत.

वागावें कसें याबद्दलच्याहि कांहीं संकेताचे संदेश लोककथा जरूर देते. हॅन्स अंडरसनच्या एका गोष्टींत नेहमीं कठोर बोलणाऱ्या एका मुलीच्या तोंडून बोलल्या-बरोबर घाणेरडें बेडूक बाहेर पडत असल्याचें वर्णन आहे! दुसऱ्यांची पर्वा न करणारी एक उद्दाम आवडती राणी एका तलावांत स्नान करतांच कुरूप झाल्याचें एक लोककथा सांगेल, तर एका कथेंत श्रीमंती आल्याबरोबर आईवडिलांशीहि उद्धटपणें वागणाऱ्या मुलीला कठोर शिक्षा झाल्याचें वर्णन येईल. जणुं व्यवहारां-तलेच सुजनतेचे वा दुर्जनतेचे दाखले – पण ते कथारूप होऊन मुलांना अनेक गोष्टी सोदाहरण शिकवतात – सद्‌वर्तनाचें चांगुलपण बालमनावर ठसवण्याचें कार्य लोककथांनीं आजवर चांगल्या प्रकारें केलें आहे.

पण या सर्व कथा 'बालानाम् प्रिय' ठरतात त्या केवळ या बोधप्रदतेनें खास नव्हे; तर ८ ते १२ या वयाला मुलांचा मनोधर्मच कल्पितांत व अद्‌भुतरम्यतेंत गुंग होण्याचा आहे म्हणून! यांतले अद्‌भुत चमत्कार त्यांना जणु वेडे करून

टाकतात. सत्यसृष्टींत मानवी रूप सोडून कोणी अमानुष रूप सहजी घेतल्याचें उदाहरण आहे काय? पण लोककथेच्या राज्यांतले संकेतच वेगळे न् विचित्र. येथें माणसें सहज पक्षी होतील! मंतरलेलें पाणी टाकलें कीं मनुष्य एकदम वाटेल तें रूप घेऊं शकेल! याच तऱ्हेनें त्यांची मानवता त्यांना परत मिळते एवढें तरी भाग्यच म्हणायचे! बोटाएवढा माणूस, फुलपाखराएवढी मुलगी असले विलक्षण देह घेणारेहि लोक यांत आढळतील आणि प्रचंड राक्षसांनाहि येथें मज्जाव नाहीं!!

या चमत्कारिक घटना एवढेंच अद्‌भुत वस्तूंचेंहि वैपुल्य या कथांतून आढळून येतें. किती विलक्षण जादू घडवणाऱ्या एकेक वस्तु! एकादी काठी हलवली कीं रुपये पडूं लागतात आपले! वर बसलें कीं एकादी सतरंजी उडून आकाशांतून वाटेल तिकडे घेऊन जाते! एकादी साधी टोपीहि अशी अद्‌भुत कीं ती घालतांच मनुष्य अदृश्य होतो! आपल्या पुराणांत पाहिजे तेवढें अन्न देणारी द्रौपदीची स्थाली होती, तिला मागें सारणारे हातरुमाल यांत सांपडतील! ते सुग्रास ताटें वाढून देतात! कोठलेंहि कांहीं अद्‌भुत ऐकलें वाचलें कीं वृत्ति मोहराव्या, मनें पुलकीत व्हावी, हा तर मानवी स्वभावधर्मच. मुलें त्याला अपवाद नाहीत!

या कथा वैभवशालीहि असतात. सोन्यारुप्याला येथें मुळीच वाण नाहीं! एका रात्रींत बांधून होणारे सोन्याचे राजवाडे, सोन्याची भांडीं व पशुपक्षी देखील! (सोनेरी घोडा, सुवर्णपक्षी वगैरे कथा पाहव्या.) रत्नसिंहासनें, मोत्यांच्या वस्तु अशी वैभवाची येथें लयलूट दिसते. प्राचीनकाळीं भारताला सुवर्णभारत म्हणत असत त्याचीच ही साक्ष असेल कदाचित्! एका अद्‌भुत झाडाची हकीकत अनेकदां लोककथांतून आढळते. या दिव्य झाडाचे खोड सोन्याचे, पानें पांचूची, फांद्या माणकाच्या व फुलें रत्नांचीं होतीं! कुबेराच्या घरीं तरी हा मूल्यवान् वृक्ष असूं शकेल काय? पण लोककथांतून तो अगदी सहजी, पाहतां पाहतां तयार होतो! नेत्रदीपक वैभवाचें हें काल्पनिक वर्णन. मुलांना फार पसंतीस येतें. जादूचें वैयर्थ्य आणि अद्‌भुताची काल्पनिकता जाणणाऱ्या मोठ्या मंडळींनाहि जेथें ह्या वर्णनांची मोहिनी पडते तेथें बाल्यसृष्टीला त्याचें अतीव आकर्षण वाटावें हा अन्याय थोडाच आहे? मात्र या बाल्यांतून कौमारावस्था फुलूं लागेपर्यंतच लोककथेची एकंदर रंजनसीमा आढळते. कारण कुमारावस्थेंत मुलें या स्वप्नरंजनाचा व मोहमयी कथासृष्टीचा निरोप घेऊन वास्तवाकडे वळतात.

लोककथेच्या क्षेत्रांत पुष्कळ पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. बालाची लोककथेची ही उत्कट आवड जाणून अनेक लेखकांनीं अशा गोष्टी लिहिल्या. इंग्रजींतील 'ब्यूटि ॲन्ड द बीस्ट' या गोष्टीचें रूपांतर 'सुंदरी आणि आस्वल' या नांवानें

१८७१ सालीं करण्यांत आलें ती या प्रकाराची सुरुवात. त्यानंतर खऱ्या अर्थानें बालांसाठीं लोककथा व अद्‌भुत कथा सुबोध भाषेंत रूपांतरित केल्या त्या कै. वा. गो. आपट्यांनीं. त्यांनीं १९११ सालीं कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या सुप्रसिद्ध 'अरेबियन नाईट्स 'मधून कांहीं गोष्टी निवडून काढून त्या संक्षिप्त केल्या व चित्त-रंजन या नांवानें दोन भागांत प्रसिद्ध केल्या. मुलांसाठीं कशा तऱ्हेनें अद्‌भुतरम्य गोष्टी लिहाव्या याचा एक उत्तम नमुनाच त्यांनीं निर्माण केला म्हणायला हरकत नाहीं. अशा अद्‌भुतरम्य कथेंत अतिरंजितता, स्त्रीचरित्र विपरीत दर्शविणाऱ्या गोष्टी इत्यादि असणारच व अरेबियन नाइट्‌समध्येंहि त्या वैपुल्यानें होत्या ! तथापि त्यांत बालरंजन सामुग्रीहि पुष्कळच होती हें जाणून 'चित्तरंजन' लिहितांना आपट्यांनीं एक विशिष्ट दृष्टीकोन ठेवला होता व तो प्रस्तावनेंत त्यांनीं पुढीलप्रमाणें उद्‌धृत केला आहे —

"तथापि त्यांतल्या कित्येक गोष्टी स्त्रीजातीची निष्कारण नालस्ती करणाऱ्या आणि मुलांच्या ऐकण्यांत, वाचण्यांत येऊं नयेत अशा आहेत. अशा गोष्टी सोडून देऊन ज्यांत नैतिक किंवा व्यावहारिक बोध सांठवला आहे किंवा ज्या अंगचे धाडस, जिज्ञासा, सत्याभिमान इत्यादि गुणांस विकसित करणाऱ्या आहेत, तेवढ्याच घेऊन अगदी सोप्या शब्दांनीं मुलांच्या भाषेंत व थोडक्यांत चटकदार रीतीनें सांगितल्या आहेत."

प्रौढ लोककथांचें वा चमत्कारपूर्ण गोष्टीचें बालगोष्टींत रूपांतर करतांना किती प्रकारें विचार करावा लागतो याचेंच जणुं हें थोडक्यांत विवेचन.

परकीय अद्‌भुत कथांची आणखीहि कांहीं रूपांतरें यावेळीं प्रसिद्ध होऊं लागलेलीं होतीं. हॅन्स ॲन्ड अंडरसन व ग्रिम्स बंधूंच्या गोष्टींपैकीं कांहींचें रूपांतर करून याच सुमाराला श्री. विष्णु धों. कर्वे यांचा "लहान मुलांकरितां गोष्टी" या नांवाचा एक छोटा संग्रह १९१६ सालीं प्रसिद्ध झाला. हें पुस्तक मनोरंजन पुस्तकमालेतर्फे प्रसिद्ध झालेलें होतें. मात्र या पुस्तकाला रंगीत मुखपृष्ठ, आकर्षक चित्रें, ठसठशीत छपाई इत्यादि आकर्षणांची जोड मुळींच नव्हती. तरीहि यांतल्या गोष्टी सुबोध व रंजकतेनें लिहिण्यांत आलेल्या अशाच होत्या. यानंतर श्री. म. का. कारखानीस यांनीं १९२७ मध्यें लिहिलेलीं 'अद्‌भुतकथा' भाग १-२-३ हीं अनुवादित गोष्टींचीं सुंदर पुस्तकें नमूद करण्यासारखीं आहेत. सुरेख चित्रें व नेत्रसुंदर छपाई, यांनीं हीं अलंकृत होतीं. शिवाय यांतल्या गोष्टी हॅन्स अंडरसन व ग्रिम्सबंधु यांच्याच गोष्टींतून निवडून घेतलेल्या होत्या. अग्ली डक्‌लिंग, टॉम थंब, सिंडरेला इत्यादि गोष्टींची बालप्रियता आधींच अतीव ठरलेली. त्यांनाच राजहंस, ठिंगुजी, मखमली जोडा इत्यादि मजेदार शीर्षकें देऊन कारखानीसांनीं त्या प्रसिद्ध केल्या. या परकीय सुंदर कथांवर सुंदर मराठीचा साज चढतांच बालवाचकांच्या उड्या त्यांवर पडाव्या यांत

काय नवल? कारखानीसांची भाषा बालोचित होती. वर्णनांतहि बालवयाला न झेपणारा प्रौढपणा कोठें नव्हता. शिवाय त्यांत सोप्या अशा दोनचार ओळींच्या छोट्या कवनांचा वापरहि नव्यानेंच करण्यांत आला होता. ही एक प्रथाच कारखानीस यांनी निर्माण केली, तीहि मुलांना एकदम आवडणारी होती. उदाहरणार्थ, गडबडमामा या Rumple Still Skin च्या भाषांतरांतील मूळ कविता अशी दिसेल —

That Rumple Still Skin is my name
shall never guess the Silly Jame

याचें रूपांतर कारखानीसांनी किती सोप्या व बालांना रुचणाऱ्या शब्दांत केलें आहे तें पाहण्याजोगें आहे—

नाव असे मम गमतीचें
गडबडमामा हें साचें
ठाऊक नाहीं कोणाला
कळेल कैसें राणीला?

अशीं बालओठांवर खेळणारीं कितीक कवनें या अद्‌भुत कथांतून आहेत व त्यामुळें या कथांना एक नवें वेधकत्त्व प्राप्त झालें आहे!

अद्‌भुतकथांचीं सुरुवातीचीं कांहीं पुस्तकें परदेशीय लोककथाचीं रूपांतरें होतीं हें खरें, पण सुदैवानें लवकरच देशी लोककथाहि एकत्र करण्याचें, लेखगत करण्याचें काम सुरू झालें व त्यांतून बालसुलभ कथा निवडून काढून त्यांचेहि संग्रह खास बालांसाठीं म्हणून प्रसिद्ध होऊं लागले. आपल्या पुराणग्रंथात या कथा-वाङ्मयांत लोकविलक्षण वा अद्‌भुत कथाचा कांही तुटवडा नाहीं! कथासरित्सागर, पुराणकथा, दंतकथा, कहाण्या, संतकथा, दैवतकथा या सर्वच साहित्यांतून कित्येक लोककथांना सामुग्री मिळण्याजोगी आहे हें लक्ष्यांत घेऊन अनेक लेखकांनीं ही लोककथाची वेल फुलवली आहे व त्यांतले काही प्रयत्न तर अत्यंत यशस्वी झालेले दिसतात. उदाहरणार्थ, श्री. वामन चोरघडे यांची 'प्रभावती' ही गोष्ट आदितवारच्या कहाणीवर आधारलेली असूनहि बालरंजन क्षेत्रांत कोठल्याहि दृष्टीनें मागें नाहीं! शुक्रवारची गरीब बहिणीची कहाणी ही लोककथेंत अत्यंत मनोरंजक रूपानें वारंवार वावरतांना आढळेल. कहाणींतला व्रतोपचार व धार्मिक वर्णनांचा विभाग वगळला तर त्या छोट्या बोधकथाच होतात. मात्र त्यांत अद्‌भुताची लोककथेएवढी सामुग्री नसल्यानें त्या रंजनक्षेत्रांत मागासलेल्या दिसतात एवढेंच.

आपल्याकडील लोककथेंत अद्‌भुतकथा, बोधकथा, नीतिकथा इत्यादि हर-तऱ्हेची सामुग्री असतेच हें खरें, परंतु या रंजनविभागांतली खास बालप्रिय दालनें म्हणजे विनोदकथा व चातुर्यकथांचीच ठरतील! लोककथेंत जेवढ्या जांवईकथा

आहेत त्या सगळ्या विनोदी ! सांगणाऱ्यांच्या दंतपंक्ति मजेनें प्रकटाव्या व ऐकणारांच्या गालाला खळ्या पडाव्या असा हा विनोद खुसखुशीत व प्रसंगनिष्ठ असतो. अंधारांत अंगावर काकवी ओतून घेणारा जांवई सगळ्यांना हंसवतो, खुलवतो. 'रुपयाला शेरभर केशर मिळते' म्हणणारा व्यवहारशून्य जांवई पूर्वीपासून बालांना हंसवीत आहे; आतां त्याचें रूपांतर कथनांतून लेखनांतहि झालें आहे एवढेंच. "जांवई बापू" हें कावेरी कर्वे यांचें पुस्तक अगदीं छोटें व त्यांतल्या जांवयांच्या गोष्टी अवघ्या दोन दोन पानांच्याच पण त्यांतून या जांवयांचा अप्रयोजकपणा उमटून पडून बालकांच्या हास्यकळ्या खुलवतोच.

विनोदासारखीच मुलांना चातुर्यकथांचीहि आवड फार व हें त्यांचें इप्सित लोककथांतून बरेंच समाधानकारक तन्हेनें पुरें होतें. भोजराजा कालिदास, बिरबल बादशहा यांच्या गोष्टी माहीत नसलेलीं मुलें विरळाच ! दक्षिणेकडे बिरबलासारख्याच अष्टपैलू चातुर्याचा अप्पाजी हा एक प्रधान आणि तिन्नालीराम हा एक चतुर माणूस प्रसिद्ध होता, त्याच्याहि कथा परंपरेनें चालत आल्या आहेत. त्यांतील कूटें गमतीचीं असायचीं. रहस्यें व उकल आणि समस्यापूर्ति यांचीहि यांत योजना असे व सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं वेताळपंचविशीप्रमाणें या कथांतून गहन प्रश्नोत्तरें नसून हीं कूट प्रश्नोत्तरें बालसुलभच असत. या सर्व कथा आतां लेखगत झालेल्याच आहेत. राजा बिरबल (लेखक श्री. बा. वा. फाटक), बादशहा आणि बिरबल (लेखिका श्री. ताराबाई मोडक), बिरबलाच्या गोष्टी (श्री. वि. स. सुखटणकर) भोजराज कालिदास (श्री. वि. स. सुखटणकर,) शहाणपण पंचविशी (श्री. ग. म. वैद्य), नानांचें चातुर्य अशीं पुष्कळ पुस्तकें आतां मुलांच्या हातीं खेळतांना दिसतात व त्यांत दिवसेंदिवस वाढच होत आहे.

लेखनपूर्व कालापासून समाजांत खेडोपाडीं ज्या कित्येक रंजक कथा परंपरेनें चालत आल्या त्यांचेंहि संशोधन व संकलन कित्येक लेखक अगत्यानें करीत आहेत व त्यांतील बऱ्याचशा कथा कुमारासाठींहि लिहिल्या जात आहेत. या संकलकांत साने गुरुजींचें नांव अग्रमान देण्यासारखें महत्त्वाचें ठरतें. त्यांच्या गोड गोष्टींतून कित्येक प्रचलित लोककथांचा पुनर्जन्म झाला. गुरुजींची भाषा अत्यंत चटकदार व कथनांत गोडवा फार, तेव्हां या गोष्टींचीं पारायणें बालवाचकांनीं करावीं यांत नवल नाहीं. महादेवशास्त्री जोशीं यांचेंहि नांव या संदर्भात घेणें अवश्य ठरेल. त्यांनीं मुलांसाठीं लोककथाकुंज ही माला सुरू केली आहे. त्यांचीहि भाषा रसाळ व कथनपद्धत वेधक आहे. श्री. शं. रा. देवळे व श्री. रं. म. जोशी यांचे साहसकथा, सौ. चारुशीला गुप्ते यांच्या झुमकी व झाजिमा या कथा, श्रीमती सरोजिनी बाबर, शारदिनी बाबर यांनीं समाजशिक्षण मालेंतून दिलेल्या लोककथा, सौ. मालती दांडेकर यांच्या माईच्या गोष्टी, श्री. वामन चोरघडे यांच्या प्रभावती — चंपाराणी या कथा

अशीं कित्येक लोककथांचीं पुस्तकें प्रकाशित झालेलीं आहेत. एकंदरीत हाहि बालयोग्य कथाप्रकार दिवसेंदिवस ऊर्जितावस्थेला येत आहे.

या प्रांतांत आणखीहि एका दिशेनें भर पडत आहे. भारतांतील इतर प्रांतीय गोष्टी देखील रूपांतर – भाषांतराच्या मार्गानें या दालनांत पाहुण्या म्हणून येत आहेत. त्यांत दुर्गा भागवत कृत तामीळनाडच्या लोककथा व दख्खनच्या लोककथा यांचा आवर्जून प्रथम उल्लेख केला पाहिजे. दख्खनच्या लोककथा मूळ इंग्रजी भाषेंत Old Deccan days या नांवानें १८६८ सालीं प्रसिद्ध झाल्या होत्या. या कथा ॲना लिबर्टो या नांवाच्या खिस्ती स्त्रीनें जमवल्या होत्या. त्यांचें सुंदर मराठीकरण १९५६ सालीं दुर्गाबाईंनीं केलें. त्यांच्या तामीळनाडच्या लोककथाहि अशाच रूपांतरित असून मूळच्या त्या नटेश्वरशास्त्री यांनीं लिहिल्या होत्या. हे प्रादेशिक लोककथांचे नमुनेदार संग्रह आहेत. त्याचप्रमाणें सरकारी प्रकाशनखात्यातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या भारतीय लोककथा, श्री. शि. वा. जोशी याच्या चंद्रपुरी लोककथा अशा अनंत स्वरूपांत प्रांतीय कथा इकडे आहेत व त्या बव्हंशीं बालांसाठींच प्रसिद्धिल्या जात आहेत. पुष्कळदां काश्मीर. बंगाल, बुंदेलखंड इत्यादि प्रांतातल्या कथा आधी इंग्रजींत प्रसिद्ध होतात व मग मुंगीच्या पावलानें तीं रूपांतरें मराठींत येतात. पण त्यांनीहि या प्रांताचा एक कोपरा उजळला आहेच, हें मान्य करावें लागेल.

या भारतीय लोककथाप्रमाणेच भारतेतर देशांतहि अनेकानेक लोककथा प्रचलित आहेत. त्यांचेंहि मराठीकरण होऊन काहीं पुस्तकें बालसाहित्यांत दाखल झालेलीं आढळतात. या दृष्टीनें सौ. मालती दांडेकरांचें 'चिनी गुलाब' श्री. बा. मो. कानिटकर याचे 'शेजारच्या बाळाच्या गोष्टी', तसेंच विदेशी लोककथा हें सरकारी प्रकाशन, प्रभावती जोशी यांचे 'जगांतील शिशुकथा', श्री. शि. स. शिरके यांचे 'अद्‌भुतरम्यकथा' अशीं कित्येक पुस्तकें पहाण्यासारखीं आहेत. या कथा परकीय देशाच्या खऱ्या, पण अद्‌भुतरम्यतेंत त्या कोठल्याहि दृष्टीनें हिंदी कथांहून हिणकस नाहींत! उलट परक्याची राहणी, भिन्न कल्पनाक्षेत्र, देशवैचित्र्य, धर्मतत्त्वाची ओळख अशा अनेक प्रकारांची भिन्नता हीहि मुलांना अधिकच नाविन्यपूर्ण आणि रंजकच वाटेल! प्रादेशिकतेची एक मनोहर झिलई या सर्व गोष्टींना असते ती कथावस्तूची रम्यता वाढविणारीच. उदाहरणार्थ, 'विदेशी लोककथा' यांतील हें वर्णन पहाण्यालायक आहे.

"तिबेटांतल्या खम प्रांतांत छैवांग नांवाचा एक सालस मुलगा आपल्या सावत्र आईबरोबर राही. स्वतःला चांगलं गोडधोड खाणं करून ती घेई आणि सावत्र मुलाला मात्र बटमाषांचं (जाड उडिदाचं) पीठ मिळे. त्याला काम मात्र चोपून मिळे. लांकडें तोडणें, चूल पेटवणें, दुयारा दूध काढणें व यॅक चारायला नेणें

त्यामुळें तो सदैव दुःखी असे. एकदां त्याचें केविल्वाणें रडणें न्येपींच्या कानीं गेलें: न्येपी म्हणजे "जलदेवतेच्या संपत्तीचा कारभारी."

यांत मुलांचीं नांवेंहि निराळीं, कामेंहि निराळीं; खाणें निराळें व देवहि वेगळे ! या वेगळेपणानें या गोष्टींना वास्तववर्णनाबरोबरच एक आकर्षकता आली आहे. पण अशी परदेशीय लोककथांची मराठी रूपांतरें असावीं तेवढ्या वैपुल्यानें नाहींत. इंग्रजींत ब्राइट स्टोरी रीडर्स ही एक प्रसिद्ध पुस्तकमाला आहे. तिच्यांतून दरेक देशाच्या लोककथा वैपुल्यानें प्रसिद्ध झालेल्या आहेत. पाश्चात्यांनीं प्रयत्नपूर्वक मलाया, कोरिया, इराण, सयाम, इत्यादि पौर्वात्य देशाच्या प्रसिद्ध गोष्टी मिळवाव्या व एक पद्धतशीर माला गुंफून त्या बालकांना द्याव्या, आणि आम्हाला मात्र हेच श्रम फार मोठ्या प्रमाणांत आमच्या बालांसाठीं घेतां येऊं नयेत काय ! या दृष्टीनें हिंदींतहि जवळजवळ २०–२५ पुस्तकांची एक लोककथामाला आहे व शिवसहाय चतुर्वेदी या हिंदी लेखकानें "हमारी लोककथाएँ" हें संकलन प्रसिद्ध केलें आहे. मराठींत अशी माला बालांसाठीं अद्याप कोणी गुंफलेली नाहीं. एकंदरीत आपणांकडील लोककथा बालपुस्तकांत ग्रंथित होत असल्या तरी अजूनहि या क्षेत्रांत तुलनेनें पुष्कळ त्रुटी आढळतात.

भारतीय वा परकीय लोककथा वर उल्लेखित केल्याप्रमाणें अनेकांनीं बालांसाठीं लिहिल्या, त्यांच्याच एक वेगळा विभागहि हळूहळू आकारास येऊं लागला, तो म्हणजे लोककथेला दीर्घकथा वा लघुकादंबरीचें रूप देण्याचा. अर्थात् लोककथेवर आधारलेल्या बालकादंबऱ्या किंवा दीर्घकथा इतर बालकादंबऱ्यांचे मानानें अल्पसंख्यच आहेत. कारण मुलांना यावेळीं लोककथेऐवजीं वास्तवकथाच प्रिय भासूं लागलेल्या असतात हें एक, व दुसरें महत्त्वाचें कारण बहुतेक लोककथा कथारूप होऊन मुलांच्या हातीं केव्हांच आलेल्या असल्यानें कथानकाचेंहि नाविन्य उरत नाहीं. आणखी एक आहे. लोककथेचें मूळ कथासूत्र आटोपसर बांध्याचें असतें. त्यांची वाढ करायची म्हणजे संवाद, प्रसंगनिर्मिती व वर्णनें यांनींच कीं नाहीं ! कथावस्तूंत तर फारशी अदलाबदल करतां येत नाहीं. मग एखादी छोटी स्वतंत्रच कादंबरी या सर्व लेखकप्रणीत सामुग्रीत होऊं शकेल व त्यांत नाविन्य तरी राहील असाहि हिशेब लेखकाच्या मनांत येणे क्रमप्राप्तच; आणि म्हणूनच लोककथे-एवढा लोककादंबरीचा प्रचार बालवाङ्मयांत आढळत नाहीं. तथापि या विभागांत कांहीं चांगल्या दीर्घकथा प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्यांत भारतीय कथानकें आहेत तशींच परकीयहि आहेत; व परदेशी लोककथांना संपूर्ण भारतीय साज चढवलेली अशीहि कांहीं आढळतील. हॅन्स अँडरसन आणि ग्रिम्स बंधु यांच्या अनेक कथा इकडे आल्या त्या पूर्ण हिंदी बनूनच. भाषेचें लेणें चढवून त्यांतल्या कित्येक मराठी दीर्घकथाहि बनलेल्या दिसतात. उदाहरणार्थ— शांता शेळके यांची

' मीनाक्षी ', श्री. स. अ. शुक्लांची ' मंगल ', श्री. अमरेंद्र गाडगीळांची ' कलावती ' श्री. यशवंतांची ' अनंगवासंती व अमलांगी ' इत्यादि कथा मुलांना अत्यंत आवडतील अशा शैलीनें लिहिण्यांत आल्या आहेत. त्याचप्रमाणें संपूर्ण भारतीय देहबंधाच्याहि कांहीं लोककथांना अगर लोककथेच्या सदरांत येणाऱ्या स्वतंत्र कथानाहि कांहीं लेखकांनीं अभिव्यक्ति दिलेली आहे. अशा निर्मितींत श्री. प्रभाकर इनामदारकृत ' विद्यालंकार ', श्री. बा. गो. नाईक यांचें ' निळें कमळ ', श्री. डॉ. रा. देवळे यांची ' जलवंती ', श्री. नारखेड्यांचे 'तारकापुष्प' इत्यादि पुस्तकें आढळतात. या सर्व दीर्घकथा केवळ कथानक सांगण्यापुरत्याच मर्यादित स्वरूपाच्या नसतात, तर लेखकाची वर्णनशैली, संवादरचना, प्रसंगचित्रण, मानवी स्वभावाचे पैलू दर्शवणारी भाषा, रंगत वाढवणारीं छोटीं कवनें या सर्वांनीं तिचें सौंदर्य व व्याप्ति हीं वाढवलेलीं असतात आणि म्हणून लोककथेचें स्थूल रूपवर्णन आतां-पर्यंतच्या विभागांत आलें त्याहून दीर्घकथेंत अधिकच सूक्ष्मतर मनोविश्लेषणाचा व भाषासौष्ठवाचा आढळ होतो. या सर्व कथांना लघुकादंबरीचें वा दीर्घकथांचें रूप देतांना प्रत्येक लेखकानें एकेका वेगवेगळ्या साहित्यगुणाचा प्रत्यय घडवलेला दिसतो. उदाहरणार्थ, ' मरमेड ' नांवाच्या प्रसिद्ध कथेचें रूपांतर शांता शेळके यांनीं ' मीनाक्षी ' या नांवानें केलें. त्यांत त्यांनीं कांहीं नवे शब्द व नवीं कवनें यांचा वापर केला आहे. त्यांचा ' मीनमानव ' हा शब्द ' मर्‌मेड 'ची जात योग्य प्रकारें सूचित करणाराच. शिवाय छोट्या स्वतंत्र कवनांनीं त्यांनीं या लोककथेला आकर्षकतेचीहि जोड दिली. उदाहरणार्थ, मीनाक्षीमधील मुली आपल्या जलविलासाचें शब्दचित्र असें रेखतांना दिसतील.

निळ्या जलांतून खालीं खालीं
या हो अमुच्यासह पाताळीं
भंवती निळसर हिरव्या लहरी
तेथें अमुची शोभे नगरी
बाग बहरली बाहिर सुंदर
नीलपाचुचे खुलती मोहर
महाल अमुचा आंत झगमगे
चला चला त्या स्थानीं वेगे !

या रचनेंत काव्यगुणहि असल्यानें कथेला एकदम नवी झिलई चढली आहे. यशवंतांनीं आपल्या ' अमलांगी ' व ' अनंतवासंती ' मध्येंहि अशीं पद्यें घातलीं आहेत व त्यामुळें कथेची रंगत वाढलेली आहे. भाषेच्या दृष्टीनें उत्कृष्ट रूपांतरित दीर्घकथा म्हणून शुक्लांच्या मंगलेकडे बोट दाखवतां येईल. त्यांनीं पाश्चात्य ' सिंडरेला 'ला केवळ हिंदीच नव्हे तर अस्सल मराठी मंगला बनवलें आहे हें

विशेष ! उदाहरणार्थ, आपल्या दोघी कुरूप मुली नटून सजून राजवाड्यांत मेजवानीला निघाल्या हें पाहून माईसाहेबांना ( मंगलेच्या सावत्र आईला ) काय वाटलें याचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे —

" पोरींनो, माझीच बाई द्रिष्ट लागायची तुम्हांला एकादे वेळीं. किती किती सुंदर दिसताय् तुम्ही ! राजकुमारच काय पण स्वर्गातले इंद्र चंद्र देखील दिपून जातील तुम्हांला बघून. थांबा, मी द्रिष्टच काढतें तुमची ! " असें म्हणून माईसाहेबांनीं आपल्या लाडक्या लेकींची खरोखरीच मीठमोहऱ्यांनीं दृष्ट काढली, इतक्यांत पैठणी नेसून मंगला तेथें आली.

हें सारें वातावरण शुद्ध महाराष्ट्रीयच वाटत नाहीं काय ! आणि लेखकानेंहि प्रस्तावनेंतून मंगलेबद्दल सांगतांना, " ही आहे मूळची साताससमुद्रापलीकडची – परदेशांतली ! हिला आपली चालरीत नि भाषा शिकवून मगच तुमच्या भेटीला आणलें आहे, " असा कुमारमित्रांना निर्वाळा दिला आहेच. कवि यशवंतांनीं अनंगवासंती मूळ परकीय कथासूत्रांतूनच निर्माण केली. पण तिच्या परकीयतेचा संशयहि येऊं नये असें वर्णनरूप तिला बहाल केलें आहे. यांत देवेन्द्राचा दरबार, अप्सरा मेनका, देवाचा शाप, स्वर्गवर्णन इत्यादि आल्यानें ती जणुं जन्मानेंहि इकडचीच वाटण्याएवढी भारतीय झाली आहे.

कलावती हीहि एक परकीय लोककथेवर आधारलेली मराठी दीर्घकथा, पण लेखकानें यांतील प्रसंगरचना करतांना एकदम मराठी मनाला पटेल अशी नवी कल्पकता दर्शवली आहे. मुळांत एक ग्रीक देवता एका छोट्या मुलीला समक्ष येऊन भेटते व कलेचें वरदान देते असा प्रसंग होता. लेखक अमरेंद्र गाडगीळ यांनीं या ग्रीक देवतेऐवजीं विद्यादेवता शारदा योजिली आहे व छोटी कलावती शारदेच्या पाषाणमूर्तीला भक्तीनें वश करून घेऊन प्रत्यक्ष बोलायला लावते असा हा प्रसंग रंगवला आहे. छोट्या नामदेवानेंहि हट्ट करून विठ्ठलमूर्तीला जेवूं घातलें होतें, ह्या दंतकथेचा येथें साम्यरूपानें किती सुंदर उपयोग करून घेतला आहे व त्यामुळें या कथेंतलें मराठीकरण फार औचित्यपूर्ण व इकडच्या संस्कृतीशी सुसंगत झालें आहे.

परंतु इकडील वेष चढवतांना दरवेळी येवढी सुसंगति राखली जातेच असें नाहीं. मराठीकरण अवश्य होतें, पण मूळ कथानकाचे वेगळ्या संस्कृतीचे तपशील कोठेंतरी उमटून पडून विरस करतांना कोठेंकोठें दिसतात. उदाहरणार्थ, शंभु आणि शारी ( ले. श्री. द. के. बर्वे ) या पुस्तकांत प्रत्यक्ष वायुदेवाला – ज्याला संचारार्थ कोठलेंहि वाहनसाधन लागत नाहीं त्या वायूला दोन पंख कल्पिले आहेत ! तसेंच देवता या आपल्याकडे त्रिभुवनसंचारी मानल्या जातात, पण या कथेंत जलदेवतेलाहि पंख आहेत ! यक्ष चेटकिणी ड्रॅगन्स हे सारे पाश्चात्य लोककथेचे प्रमुख घटक खरे,

पण ते संपूर्ण परकीय रूपाचे व संस्कृतीचे आहेत. त्यांना भारतीय अनवावयाचें असेल तर कुशलतेनें इकडचा परिवेष देणें जरूर नाहीं काय? पण ही पाश्चात्य छटा अनेक रूपांतरांतून डोकावून पाहतांना दिसते. श्री. के. नारखेडे यांच्या तारकापुष्प नांवाच्या एका अद्‌भुतरम्य कादंबरीची रचना भारतीय भासत असली तरी आत्मा मात्र परकीय भासतो; कारण, यांत एक चेटकीण आहे– जी आपल्या कथा वातावरणाला अगदीं अनोळखीच असते अशी! अर्थात् यांतील भाषा व प्रसंगवर्णनें मात्र खरोखरच फार सुंदर आहेत.

लोककथेचीच सामुग्री वापरून आजकाल अनेक लेखक नव्याहि गोष्टी लिहितात. जणु त्या लोककथेच्या सावत्रबहिणीच. त्यांचे रूपरंग, वर्णनक्षेत्र सारे लोककथेचेच; फक्त या कथांना जुनी परंपरा व इतिहास नसतो एवढेंच; पण ती कांहीं मोठीशी आक्षित बाब नव्हे. या धर्तीवर शुद्ध भारतीय देहबंधांच्याहि कांहीं चांगल्या अद्‌भुतकथा निर्माण होत आहेत. श्री. प्रभाकर इनामदार यांची विद्यालंकार ही त्यापैकींच एक गोष्ट. रचनाहि चांगली आहे व पवनवेग घोडा, पुरोगम शस्त्र आदि लोककथेचेच मूळचे दुवे यांत जोडले गेल्यानें गुंफण आकर्षक झाली आहे. पण हा भाषेचा प्रश्न बाजूस ठेवून पाहिलें, तरी आशयाच्या दृष्टीनेंहि थोडाफार विचार करणें अवश्य वाटतें. अशा कथेंतून भव्यतेचें वा दिव्यतेचें दर्शन घडवतांना कोठल्या टोकाला जावयाचें याचें कांहीं बंधन या कथांना असतें तर बरें झालें असतें. *उदाहरणार्थ, यांतील नायिकेनें धरलेला, आकाशीचा तारा धनुष्यानें छेदणाराच* पति हवा, हा आग्रहहि अवघड आणि हा पणहि असंभाव्य कोटींतलाच नव्हे काय? पण जेथें लोककथेंतून सूर्यचंद्र – लोकांतहि वाडे बांधणारे वीर आहेत तेथें ही बाब अशक्य कोण मानणार म्हणा! मात्र नव्यानें लोककथासारख्या कथा निर्माण करणाऱ्यांनीं आपल्या वाचकांची वाढती वयें व त्यांतून उद्‌भवणारी चिकित्सक बुद्धिमत्ता याचाहि विचार करायला हवा एवढीच अपेक्षा. 'निळें कमळ' हीहि अशीच एक भारतीय वळणाची कल्पित अद्‌भुतकथा. एका छोटुकल्या मत्स्यकन्या नायिकेनें घराण्याच्या प्राचीन शापमुक्तीसाठीं केलेल्या धडपडीची ही गोष्ट. परंतु शापांत अडकलेल्या मृतांच्या देहांचा प्रचंड पर्वत व्हावा व त्याचें टोंक या छोट्या नायिकेनें हृदयांत खुपसून घेतलें तरच शापांतून मुक्ति मिळावी, ही कल्पना कितीहि उदात्त व भव्य असली, तरी नायिकेचें वैचारिक वय पाहतां, ती त्या पर्वताएवढीच उत्तुंग व अनाकलनीय भासूं लागते.

मात्र संपूर्ण भारतीय असलेल्या व गुणसंपन्नतेंतहि श्रेष्ठ ठरणाऱ्या लोककथा आणि त्यांची बरोबरी करणाऱ्या स्वतंत्र अद्‌भुतकथा या बालसाहित्यांतच नाहींत असें नव्हे. *'गुलछबू' ही कथा श्री. बर्व्यांनीं बालांना आवडेल अशा प्रकारें* लिहिली आहे. श्री. नारखेड्यांची 'जलवंती' तर विशेष उल्लेखनीय अशी एक

सुरेख कथा ठरेल. यांतील ' जलकन्या ' ही कल्पना कांहींशी परकीय भासली तरी सर्व गोष्टीची रचना पूर्ण हिंदी आहे. मुख्य म्हणजे यांत नायिकेच्या मनोविश्लेषणाचा भाग फार मनोज्ञतेनें व सुसंगत रंगवला गेला आहे. जलकन्या या माशांप्रमाणेंच भावनारहित असायच्या ! त्यांना मानवी सुखदुःखें, भावाविभाव यांची मुळांत कल्पनाहि नसते, भावनात्मकतेला त्यांच्या सृष्टींत स्थानच नसतें ! पण ही जलवंती मानवीसृष्टींत आल्यावर मात्र या सर्वांचा तिला परिचय घडतो व त्यानें तिच्या वृत्तीचें उदात्तीकरण होतें हा भाग विशेषच आकर्षक उतरला आहे. श्री. वामन चोरघडे यांची ' चंपाराणी ' बाह्यरूपाप्रमाणें अंतरंगानेंहि आकर्षक ठरावी अशी आहे. श्री. चोरघड्यासारख्या सिद्धहस्त लेखकानें तिला भाषासौष्ठव व वर्णनशैली यांचीहि देणगी दिली आहे. उदाहरणार्थ, पुढील मजकूर पहावा —

" चंपाराणीच्या आयुष्याची नदी सुखाच्या गंगाजळानें दुथडी भरून वाहूं लागली. सर्व सुखें तिच्या राज्यांत राहयला आली. सर्व सुंदर पक्षी तिच्या बागेंत आले. सूर्य आपलीं किरणें कोवळीं करूं लागला. जमीन पिकानें श्यामल होऊं लागलीं. काळे काळे ढग तिच्या राजवाड्याच्या गच्चीवरून जातांना तिला म्हणत— " राणी, राणी, आमच्याकडे पाहा. आम्ही तुझ्या राज्यांत पाणी भरतों. नद्या भरतील, तळीं भरतील, तुझी बाग फुलांनीं फुलेल. तुझा राजा तुझ्यावर भुलेल. अग राणी पाहा, आमच्याकडे तर पाहा!" राणीच्या डोळ्यांत त्यांची श्यामल दीप्ति पडे व ते काळेभोर दिसत ! "

हें वर्णन कांहींसें प्रौढभाषी असूनहि कुमारांना दुर्बोध वाटणारें नाहीं. उलट बालवाचकांना सृष्टीसंबंधीं एक प्रकारें आपुलकीची दृष्टि शिकविणारेंच ठरेल. लोककथेच्या दीर्घकथा बनवतांना श्री. चोरघड्याप्रमाणेंच कै. साने गुरुजींनीहि आकर्षक शैलीचा वैशिष्ट्यपूर्ण नमुना साकार केला आहे. उदाहरणार्थ, ' करुणादेवी ' ही एक दीर्घकथा पाहा. ही मूळची चीनची कथावस्तु. नुसती पौर्वात्य नव्हे तर अतिपूर्वेकडील आहे. पण सान्यांनीं तिला किती सोज्वळ आर्य स्त्री बनविली आहे ! असें रूपदर्शन घडवणें किती कुशल हाताचें काम आहे !

अशी आहे बालरंजक लोककथेची प्रकृति ! तिच्यांत कांहीं प्रकृति दोष अवश्य आहेत; परंतु तिचा मनोधर्म बालांचें हंसतखेळत रंजन करणें व त्यांच्या कल्पकतेचा विकास हाच आहे.

## पौराणिक कथा

साहित्याच्या प्रत्येक विभागांत बालकांसाठीं एक राखीव दालन असतेंच. पुराणसाहित्यहि त्याला अपवाद नाहीं. भारत, भागवत, रामायण इत्यादि सर्व ग्रंथ धार्मिक असले तरी अत्यंत लालित्यपूर्ण आहेत. त्यांत अनेकविध कथानेंक

रंगलीं आहेत. धर्मभावनेबरोबरच नैतिक सद्गुणांची वाढ करणाऱ्या व मानवी स्वभावदर्शन घडवणाऱ्या हजारों रंजक कथाहि त्यांत समाविष्ट झालेल्या आहेत. या पुराणांतहि किती प्रकार! वरील तीन प्रमुख ग्रंथांखेरीज विष्णुपुराण, गरुडपुराण, मत्स्यपुराण इत्यादि अठरा पुराणें. शिवाय भिन्न भिन्न दैवतें व त्यांच्या भक्तिकथा तर इतक्या आहेत कीं पानोपानीं फळ लागणाऱ्या अमृतवृक्षाचीच उपमा त्यांना शोभेल. या दैवतांचे स्वतंत्र महात्म्य वर्णन करणारीं अनेक चरित्रेंहि आहेत. त्यांत गुरुचरित्र, शिवलीलामृत, नवनाथकथा, कार्तिकमहात्म्य अशीं कितीतरी स्वतंत्र प्रकरणें! या सर्वांतून उपकथानकें असतात आणि प्रसंगानुसार दृष्टांत म्हणून प्राणिकथा, समरकथा, भावकथा, व्यवहारकथा अशा अनंत तऱ्हेच्या गोष्टी येतात. असें हें भारतीय पौराणिक वाङ्मय म्हणजे जणूं विविध कथांचा प्रचंड महासागरच! कितीहि पाणी त्यांतून ओंजळीनें भरा तेथें समृद्धीला उणीव नाहीं! मोठ्याप्रमाणेंच बालांसाठींहि यांतल्या गोष्टी पूर्वीपासून लिहिल्या गेल्या आहेत. आणि अलीकडे तर त्यांना नवी भरतीच आलेली दिसते.

भारत भागवतादि पुराणग्रंथ मूळ संस्कृतांत होते. नंतर या महाकाव्यांचे रूपांतर सामान्यजनांसाठीं प्राकृतांत आणि ओंवीबद्ध रूपांत करण्यांत आलें. पेशवाईनंतर ओवी मागें पडून मराठी गद्यांत ही ग्रंथरचना झाली आणि हळूहळू त्यांतली प्रौढता, उपदेश वगैरेवर यथायोग्य संस्करण होऊन लालित्यपूर्ण सोप्या भाषेंत आजकाल पुराणकथा बालांसमोर येऊं लागल्या आहेत. अर्थात् हें बालसुलभ नवें रूप स्वीकारतांना पुराणकथा आशय, भाषा व मांडणी या सर्व दृष्टींनें बालसुलभ आणि चित्रलेण्यांनीं मोहक होतें हें स्पष्टच आहे. मुलांना भारतीय संस्कृति व धर्मग्रंथ दोहोंचीहि ओळख बाल्यदेशांतच घडवण्याचें कार्य या कथांकडून विनायास होत असतें!

खास मुलांसाठीं सुबोध भाषेंत पौराणिक गोष्टी लिहिण्याचा उपक्रम वासुदेव गो. आपटे, यांनीं सुमारें तीस वर्षांपूर्वी केला. त्यांनीं "महर्षींचा प्रसाद" या नांवानें कांहीं कथा प्रसिद्ध केल्या. हेंच पुराणकथांचें पहिलें आकर्षक बालोपायन! छोट्या बोधप्रद गोष्टींचे हे पुराणकालीन द्रोण मुलांना फार प्रिय झाले. कारण आपट्यांची लेखनशैली बालमनाला मोह घालणारीच होती. पुढील मजकूर प्रास्ताविक म्हणून एका गोष्टीला जोडलेला आहे तो नमुन्यादाखल पाहण्याजोगा आहे.

"सूर्याला शिक्षा."

हे शब्द ऐकतांच तुमच्यापैकीं पुष्कळांना आनंद वाटेल. उन्हाळ्याचे दिवसांत तरी तो पुष्कळांना फारच छळतो. उत्तर हिंदुस्थानांत बहुतेक ठिकाणीं सकाळीं नऊ वाजल्यापासून सायंकाळीं सहा वाजेपर्यंत तो कोणास तोंड काढूं देत

नाहीं. कांहीं ठिकाणीं तर ऊन लागून माणसें पटापट मरतातहि ! कोण हा सूर्याचा दुष्टपणा ! या दिवसांत लोकांचा इतका छळ करण्यांत त्याला काय मौज वाटते कोणास ठाऊक ! अशा दुष्ट सूर्याला शिक्षा करणारेहि जबरदस्त भेटले होते हेंच मी तुम्हांला आज सांगणार आहे !"

अशी हल्की फुल्की भाषा अन् पुराणांतली अतिशयोक्ति वा फाफटपसारा वगळून घेतलेलीं निवडक पण रंजक कथानकें हीच सामुग्री घेऊन आपट्यांनीं महाभारतांतील सोप्या गोष्टी, तेवीस गोष्टी, बालरामायण, बालभागवत व बालभारत इत्यादि पुराणकथांचे संग्रह प्रसिद्ध केले. त्यानंतर बालकथेची ही नवी शाखा समृद्ध होत चालली. या संदर्भात दोन नामवंत प्रकाशनसंस्थांचा अगत्यानें उल्लेख करावा लागेल. मुंबईचे के. भि. ढवळे आणि पुण्याची चित्रशाळा यांच्यातर्फे पुराणकथांचे छोटे मोठे संग्रह बहुसंख्येनें प्रसिद्ध होऊं लागले व पुराणकथांच्या मूळच्या आकर्षकतेंत सुंदर छपाई, मोठा टाईप, छानदार चित्रें, आकर्षक मुखपृष्ठ, बेताची किंमत इत्यादि आकर्षणांची भर पडून घरोघर या कथांचा प्रवेश झाला. ढवळे कंपनीनें दुष्यंत–शकुंतला, प्रल्हाद, कर्ण, मालतीमाधव अशीं कितीतरी लहान-मोठीं सुंदर पुस्तकें अल्पमोलांत बालकांना दिलीं. त्यांत अगदीं शिशूंसाठीं गोष्टी आहेत तशा जाणत्या मुलांसाठींहि आहेत. चित्रशाळेनेंहि मोठा टाईप पण लहान-लहान गोष्टी असें धोरण ठेवून श्रीकृष्णाची गोष्ट, देवाचे दहा अवतार, पांडवांची कथा इत्यादि अनेक भारतभागवतांतील कथा केवळ बालश्रेणीसाठींच प्रसिद्ध केल्या. मात्र हा उपक्रम स्तुत्य असला तरी या गोष्टी सांगण्याचीहि एक आकर्षक व बाल-प्रिय शैली असते ती या लेखनांत आढळत नाहीं.

या चित्रशाळेतर्फेच कुमार वाचकांसाठींहि बऱ्याच पौराणिक कथा प्रसिद्ध झाल्या आहेत. पैकीं एक माला गो. वि. चिपळूणकर यांनीं लिहिली होती. त्यांतून त्यागमूर्ति दधीचि, बालवीर चंद्रहास, गरुडाची गोष्ट, वीर अभिमन्यू अशीं पुराणांतील अविस्मरणीय व्यक्तींचीं गोष्टीरूप चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. भाषा-दृष्टीनें हीं सर्वच पुस्तकें बालसुलभतेऐवजीं प्रौढतेकडे झुकलेलीं भासतात. तथापि सांस्कृतिक महापुरुषांची ओळख बालांना करून देणाऱ्या चिपळूणकरांचा प्रथम प्रयत्न त्या दुर्मिळतेच्या काळांत स्तुत्यच ठरावा !

पुराणांतील बालकथांचें हें दालन आज नवनव्या लेखनशैलीनें व आकर्षकतेनें प्रसन्न दिसूं लागलें आहे. श्री. देवळे यांच्या पुराणांतील गोष्टी, श्री. नी. शं. नवरे यांची रघुवंशकथा इत्यादि प्रकाशनें बालांना आवडण्यासारखीं आहेत. डॉ. के. ना. वाटवे यांनीं भागवतांतील कथा दहा भागांत लिहिल्या आहेत त्याहि मुलांना माहिती व कथा दोन्हींनीं आवडतील अशा आहेत. रामतनय यांनीं किशोरभारत हे ४–५ भागांत प्रसिद्ध केलेलें पुस्तक छोट्या विद्यार्थ्यांना मेजवानीसारखें वाटेल.

श्री. महेश यांनीं राजा दक्ष, अंबरीष, भीम, हरिश्चंद्र, अशीं ८-१० छोटीं पुस्तकें लिहिलीं तीहि चांगलीं आहेत; पण अशीं नांवें किती लिहिणार ? पुराणकथेची सामुग्री सिद्ध असते त्यामुळें सोप्या व सुंदर भाषेचें उपायन एवढेंच या कथा लिहितांना पडणारे श्रम. त्यामुळेंच ही भरती आलेली असावी.

पुराणकथांतच बुद्ध कथांचाहि समावेश होतो. पुराणें व इतिहास यांच्या सीमा रेषेवर गौतमबुद्धाचा जन्म असल्यानें त्याच्यासंबंधीच्या गोष्टी जेवढ्या पुराणीय तेवढ्याच ऐतिहासिकादीहि नातें सांगणाऱ्या मानल्या जातात. बुद्धाच्या कथांना जातककथा म्हणतात. अशा सुंदर कथांचा एक संग्रह श्रीमती दुर्गाबाई भागवत यांनी केला आहे. यांत बुद्धाच्या पूर्वजन्माच्या गोष्टीरूप हकिकती दिलेल्या आहेत. श्री. गो. नी. दांडेकर ह्यांनीं मुलांसाठीं निरनिराळ्या सद्गुणांचें महत्त्व ठसवणाऱ्या गोष्टी लिहून त्या "आईची देणगी" या नांवानें दहा भागांत प्रसिद्ध केल्या. त्यांतूनहि उद्दालक, कृष्ण, ध्रुव इत्यादिकांच्या काहीं कथा आल्या आहेत त्याहि उद्बोधक ठरतील.

पौराणिक कथांच्या मराठीकरणांत बालवाचकांची आठवण ठेवून आणखीहि पुष्कळ छोटीमोठीं पुस्तकें प्रसिद्ध होत आहेत. श्री. देवळे यांच्या नुकतेंच व्होरा आणि कंपनीनें संस्कृतांतील वाङ्मयकर्तांचें कथासार अगदीं थोडक्या पृष्ठांत देण्याचें ठरवून आटोपशीर छोट्या कथांचे एक संच निर्माण केले आहेत. आणि ही पद्धत मोठी स्वागतार्ह आहे. 'संस्कृत साहित्य सरिता' हें यांतल्या एका मालेचें नांवहि अन्वर्थकच. कारण यांत संस्कृत साहित्यांतील प्रमुख अशा ३०-३२ रंजक कथांचे प्रवाह दाखल झालेले दिसतात. श्री. अमरेंद्र गाडगीळ, सौ. निर्मला देशपांडे, इत्यादि अनेक लेखकांनी या कथासरितेस नवजीवन दिलें. कालिदास, विशाखदत्त भवभूती, शूद्रक इत्यादि अनेक पुराणकालीन, पण अतिप्रसिद्ध अशा महाकवि व नाटककारांच्या विख्यात वाङ्मयकृतींचा परिचय या लेखकांनी अगदीं थोडक्यांत कथारूपानें दिलेला आहे.

हीं पुस्तकें विद्यार्थ्यांचे वा कुमारांचें संस्कृत साहित्याबद्दलचें ज्ञान निश्चित वाढवणारींच आहेत. तरीपण मनांत येतें तें हें कीं हा संच बनवताना फार मोठ-मोठ्या कथानकांना अगदींच संक्षिप्त रूप द्यावें लागलें आहे, तें कुमारवयाला तरी आज अत्यंत त्रुटित आणि अपुऱ्या स्वरूपाचें वाटणारें आहे खास! मोठें शेरानें पातेलें भरून श्रीखंड समोर असून, कोणी तरी एक चमचाभर मुलांच्या हातांवर टेवावें तसाच हा प्रकार! शिवाय असें आत्यंतिक संक्षेप करतांना मुळांतला फक्त कथेचा धागाच तेवढा सुरक्षित राहतो. पण मूळ कवीचें उपमासौंदर्य, व्यक्तिदर्शन, निसर्गवर्णनें या सर्वच साहित्यमूल्यांना, जागा नाहीं म्हणून, निरोप द्यावा लागतो तेंहि इष्ट नव्हे. अशाच प्रकारचा कुमारोपायन अशी गंगा लावण्याजोगा संस्कृत



श्री. विनायक कोंडदेव ओक



श्री. वासुदेव गोविंद आपटे



श्री. नारायण वामन टिळक



श्री. सानेगुरुजी

साहित्य सरितेचा आणखी एक निराळा पण समृद्ध संच प्रकाशकांनीं प्रसिद्ध करावा व ह्या सरिता, गंगा, ब्रह्मपुत्रा या नद्यांप्रमाणेंच संपन्न व वाङ्मयतृष्णा भागवण्यास समर्थ असाव्या असें कुमारांच्या मनांत येणें स्वाभाविकच नव्हे काय? देवादिकांच्या गोष्टी ह्याहि एक बारा पुस्तकांचा श्री. अमरेंद्र गाडगीळ यांनीं लिहिलेला आणखी एक संच प्रसिद्ध झाला आहे व त्यांत रामनवमी, गोकुळाष्टमी इत्यादि सणांचे व उत्सवांचें महत्त्व वर्णिलेलें आहे. हा संच मात्र बालांयोग्य कथांचा दिसतो. दुसरेहि असे सांघिक पुस्तकमालेचे प्रयत्न या क्षेत्रांत आवर्जून होत आहेत. अनाथविद्यार्थी-गृहातर्फे अशीच एक ' भारतीय सण व उत्सव ' ही सांस्कृतिक पुस्तकमाला प्रसिद्ध झाली. त्यांतून सौ. कुमुदिनी प्रभावळकर यांनीं चैत्र, वैशाख इत्यादि बारा सणांनी पौराणिक, सांस्कृतिक अशी सर्व प्रकारची रंजक माहिती दिली आहे. महाराष्ट्र-ग्रंथ भांडारची ' आमचे सण ' म्हणून एक माला आहे, त्यांत सणांच्या देवकथा आल्या आहेत. श्री. प्र. शं. जोशी यांनींहि महाकवि गुणाढ्य, शापभ्रष्ट श्रीदर्शन, बाहुशाली भीमभट्ट इत्यादि आठ दहा धर्मकथांची एक माला गुंफली आहे, तीहि चांगली आहे.

बालोचित पुराणकथांच्या संदर्भात आजकाल अनेक समर्थ व प्रतिभासंपन्न लेखकांचा अवश्य उल्लेख करावा लागेल. श्री. वि. कृ. श्रोत्रिय, पंडित महादेवशास्त्री जोशी, श्री. नी. शं. नवरे, डॉ. के. ना. वाटवे, श्री. ग. म. वैद्य, श्री. दा. न. शिखरे, श्री. गो. नी. दांडेकर, श्री. देवळे, रामतनय, अशा कित्येक लेखकांनीं बाल-साहित्याची ही नवी शाखा समृद्ध बनविली आहे. अर्थात् या प्रत्येकाची शैली व मांडणी भिन्न प्रकारची व विवेचनाला घेतलेला कालखंड वा क्षेत्रहि अगदीच निर-निराळ्या तऱ्हेचें; त्यामुळें यांतून विविधतेचाहि आढळ होतोच. उदाहरणार्थ, श्री. वि. कृ. श्रोत्रिय यांनीं महाभारतापूर्वीचाहि वेदकाल घेतला खरा, पण त्यांतील रंजनकथा तेवढ्या निवडून घेतांना त्यांनीं अनेक अवधानें पाळलेलीं दिसतात. प्रस्तावनेंत ते म्हणतात :—

" बालांना आवडतील अशाच अद्‌भुतकथा यांत आहेत. यज्ञसंस्था आतां नामशेष झाल्यामुळें तो भाग निरुपयोगी समजून त्याच्या अनुषंगानें आलेल्या कथा ह्यावरच भर देणें योग्य होय. या दृष्टीनें आतांपर्यंत बहुतांशीं दुर्लक्षित अशा वेदवाङ्‌मयांतील कथाभाग निवडून साफसूफ करून, जुळवून, क्वचित्, कमजास्ती करून, सरळ भाषेंत सांगण्याचा हा प्रयत्न. ऋग्वेदादि संहिता, ब्राह्मणें, अरण्यकें, उपनिषदें यांवर या कथा आधारलेल्या आहेत. मात्र प्राचीन कथांचा अध्यात्मपर किंवा सृष्टिविषयक गूढार्थ लावण्याच्या खटाटोपांतून ' वेदांतील गोष्टी ' हेतुपुरस्सर अलिप्त ठेवल्या आहेत. "

प्रौढ, उपदेशप्रधान पुराणग्रंथांतून बालोचित मजकूर कसा निवडावा याबद्दलचें हें हृद्गत पुष्कळच मार्गदर्शक ठरणारें नव्हे काय? वेदांतील गोष्टींप्रमाणेंच 'पुराणांतील कथा' ही श्री. दा. न. शिखरे यांची पुस्तकमाला लेखनशैलीच्या दृष्टीनें इतकी रंजक व वेधक झाली आहे कीं, लहानांनाच काय मोठ्यांनाहि तिचा मोह पडेल! श्री. शिखरे यांनी पुराणकथांना नवा सुटसुटीत वेष चढवला.

शिखऱ्यांचें हें कथाकथन खरोखरच नमुनेदार भाषेनें सजलें आहे. त्याला पुराणिकाच्या पाल्हाळाचा स्पर्शहि नाहीं. उलट आटोपसरपणा हा त्याचा एक विशेषच. संवादहि मोठे सुंदर सांधलेले. उदाहरणार्थ, मार्कंडेय पुराणांतील समीरण ऋषि व सुतेज यांचा हा एक संवाद त्यांच्या भाषेची घडण स्पष्ट करील.

"समीरण — अहो, मला तुमच्या या शहराची माहिती कशी असणार? इथं येऊन मला एक घटकादेखील झाली नाहीं. आज दुपारीं मी हिमालयावरील बद्रीकेदाराची पूजा करीत होतों अन सकाळीं तर कन्याकुमारीला गंधपुष्पें वाहात होतों.

सुतेज — काय म्हणता? सकाळीं कन्याकुमारी नि दुपारी बद्रीकेदार अन् आतां संध्याकाळीं इथं! तीन प्रहरांत अवघा भारतवर्ष आपण पालथा घातला? अन् तो कसा? कोणत्या यक्ष-गंधर्वांनं विमान दिलं कीं काय?

समीरण — अहो, गंधर्वाचं विमान कशाला? तें फार मंदगतीचं. त्याला मागें टाकील अशी माझी गति आहे. माझ्या गतीस तुलना नाहीं. वायुगतीनं—नव्हे मनोगतीनं मी जातों येतों.

सुतेज — नवलच म्हणायचं हें! पण महाराज, आपण हा सारा प्रवास पायींच करतां कीं पख लावून? आपल्याला प्रवासाचे प्रयासहि झालेले दिसत नाहींत. आहे काय हें गौडबंगाल? ही कसली जादू?

समीरण — अहो, यांत जादूबिदू कांहीं नाहीं. मी मंत्रविद्या जाणतो. तशीच आयुर्विद्याहि जाणतों. कोणत्या वनस्पतीचा काय प्रभाव आहे हें मी अचूक ओळखतों. त्यांतील एका वनस्पतीचा लेप मी पायाला लावला मात्र, क्षणार्धांत मी गरूडासारखं आकाशांत उड्डाण करूं लागलों, वरवर गेलों अन् हां हां म्हणतां सारी पृथ्वी-प्रदक्षिणा करून आलों!

सुनेज — पृथ्वी-प्रदक्षिणा ! अहाहा ! आपल्याला किती पवित्र तीर्थे दिसलीं असतील ? किती रम्य स्थळ आढळलीं असतील ? मी मात्र या अरुणास्पद नगरीत वरुणा नदीच्या काठीं करुणास्पद स्थितीत तेंच तें जिणें कंठीत आहे. ”

वास्तविक 'अठरा पुराणें' ही सर्व सामान्य दृष्टीजनापासून काहींशी दूरच असलेली, पण त्यात देखील इतक्या रंजक कथा आहेत हाच एक नवा शोध. त्यातून अशा भाषेची व सुरेख संवादाची त्याला जोड, म्हणजे सतेज सुरेख कोंदण नसल्यासारखेंच !

प. महादेवशास्त्री जोशी यांनीहि या विभागात नमूद करण्याजोगी कामगिरी केली आहे. त्यांनीं बालासाठी 'प्राचीन सुरस गोष्टी' ही दहा पौराणिक कथांची माला प्रसिद्ध केली. कथनशैली रसाळ व उपमांनीं नटलेली असूनहि मुलाना सहज समजावी अशी असल्यानें हीं पुस्तकें एकदम बालप्रिय ठरावीं यात कांहीं आश्चर्य नाहीं. या मालेंतून महीपाल, सुदर्शन, राजा उत्तम इत्यादि अनेक सुंदर पण मुलाना माहीत नसलेल्या कथांचा परिचय आला आहे. भाषाहि ओघवती आहे.

कांहीं पौराणिक कथा बालसाहित्यात अशा उतरलेल्या आहेत कीं, त्याना कथा म्हणावें कीं कादंबरी याचा उलगडा होणें कठीण. उदाहरणार्थ दहा धाडसी कुमार आणि वत्सराज ही श्री. श्रोत्रियांचीं पुस्तकें किंवा श्री. नवरे यांची खुवशकथा, डॉ. वाटव्यांची कादंबरीकथा इत्यादि कथा पाहाव्या. म्हणावयाचें कथा, पण व्याप्ति क्षेत्र आहे कादंबरीचें, आणि अंतरंग आहे प्रसंगबहुलतेनें नटलेलें ! या तऱ्हेच्या दीर्घकथाहि या पुराणकथा-विभागात आजकाल वैपुल्यानें दृष्टीस पडतात. डॉ. के. ना. वाटव्यांची मेघदूतकथा, किरातार्जुनीयकथा, कुमारसंभवकथा इत्यादि रचना, राजारामशास्त्री भाटेकरांचे सम्राट रघु, श्री. भा. श्री. पराजपे यांचे नऊ नाथ, श्री. नी. श. नवरे यांची खुवशकथा व कादंबरीकथा, श्री. मा. के. काटदरे यांचे शककर्ता शालिवाहन अशीं कितीतरी पुस्तकें याच प्रकारात येतील.

संस्कृतमधील कादंबरी वाङ्मय प्राकृतात व सुबोध मराठींत आणताना बहुधा त्याची ओळख दोन तऱ्हेनें करून दिली जाते. एक पक्त मूळचें कथासूत्र घेऊन तें लेखकानें आपल्या भाषेनें, वर्णनानें आणि संवादानीं स्वतंत्रपणें सजवणें आपटे, श्री जोशी, श्री. श्रोत्रिय पराजपे, श्री. गो. नी. दांडेकर इत्यादिकांचीं पुस्तकें त्या सदरात येतात. दुसरा प्रकार असा कीं, संस्कृत कथेचा सरळ सरळ मराठी अनुवाद करावयाचा. त्यात पदरचें कांही घालावयाचें नाहीं की बदल करावयाचा नाहीं. अर्थात् केवळ मुलासाठींच हा अनुवाद असल्यास भाषा व मांडणी सोपी करावयाची एवढीच यात लेखकाची जोखीम राहते या दुसऱ्या विभागात श्री नी. श. नवरे डॉ. के. ना.

बाटवे, श्री. वि. के. श्रोत्रिय, चारुमती भागवत इत्यादि अनेक लेखकांचीं पुस्तकें येतील. संस्कृतच्या शब्दशः मराठी अनुवादाचा एक एक फायदा असा कीं, मूळ कवीची प्रतिभा कथनशैली दोहोंचीहि तथातथ्य ओळख मराठी वाचकांना—विशेषतः संस्कृत न जाणणाऱ्यांना—चांगल्या प्रकारें होते. आजच्या कुमारवाचकांतहि जे संस्कृत शिकलेले नाहींत अशाची संख्या बरीच मोठी सांपडेल. त्यांना या वाङ्मयांतील रस-सौंदर्य मराठी माध्यमानें उपलब्ध करून देण्यानेंहि पुराणसाहित्याची मौलिकता वाढतेच. उदाहरणार्थ, रघुवंश हा ग्रंथ महाकवि कालिदासनिर्मित असल्यानें भाषा, वर्णनें व उपमांचें सौंदर्य मूळरूपांतच अधिक वेधक व उत्कट ठरावें हें अगदीं स्वाभाविकच. तथापि ह्यातहि कांहीं अनुवादक संक्षेपानें लिहितात व कांहीं संपूर्णतेनें लिहितात हा फरक राहतोच. उदाहरणार्थ, राजमशास्त्री नाटेकर यांचे सम्राट रघु हें पुस्तक खास मुलांसाठींच तयार करून घेतलेलें, त्यांतील पुढील वर्णन पहाण्याजोगें आहे—

" विजयी रघु नंतर समुद्रकिऱ्यानेंच नारळीपोफळींच्या बागांतून खालीं दक्षिणेंत उतरला. कावेरी नदी ओलांडून त्यानें केरळ देश काबीज केला. नंतर पांड्य देशांत घुसून व तेथील राजाशीं युद्ध करून रघूनें त्याचा पराभव केला. पांड्य राजानें तह करून त्याला मोत्याच्या राशी अर्पण केल्या.

वेलचीच्या वेलींचे सुवासिक मळे पायाखालीं तुडवीत रघूच्या सैन्यानें जवळच असलेल्या मलयपर्वतावर आरोहण केलें. तेथें चंदनवृक्षाच्या झाडींत यथेच्छ विहार करून रघु खालीं उतरला. " ( सम्राट रघु –पृष्ठ २७ )

या वर्णनांत एक प्रकारें इतिहासासारखी रूक्षता भासते, परन्तु हेंच वर्णन श्री. नी. शं. नवरे याच्या मराठी रघुवंशकथेंत किती साक्षेपानें आलें आहे तेंहि तुलनेनें पाहण्याजोगें आहे.

" तदनंतर रघु दक्षिणेकडे वळला आणि समुद्रकांठानें पोफळींच्या आगरांतून जात जात अखेरीस चंदनवृक्षांचें आगरच अशा मलयपर्वताच्या आसमंतात त्यानें तळ दिला. त्याची सेना इतकी अवाढव्य होती कीं, तीमुळें कोसच्या कोस प्रदेश व्यापला जाई. तेथें वेलदोड्यांचे वेल घोड्यांच्या खुरांनीं तुडविले गेल्यामुळें वेलचीच्या दाण्यांचे कण हवेंत उडून आपल्यासारख्याच सुगंधि असलेल्या हत्तींच्या मदस्रावी गंडस्थलांवर चिकटून बसत. सूर्य दक्षिण दिशेकडे असतां त्याचें तेज मंद असतें, पण रघूचें तेज मात्र वृद्धिंगत होऊन पाड्य राजाना तें सहन करतां आलें नाहीं. त्यांनीं रघूपुढें विनम्र होऊन ताम्रपर्णी नदीजवळील सागरातून काढलेली पाणीदार व टपोरीं मोत्यें रघूला समर्पण केलीं व त्याबरोबरच फार दिवसांचें आपलें संचित यशच जणुं त्याग देऊन टाकलें. " ( रघुवंशकथा—पृष्ठ २५ )

मुलांच्या दृष्टीनें ही भाषा समजायला थोडीशी कठीण झाली असूनहि कालिदास ' समजण्याच्या दृष्टीनें मात्र मोठी वेधक व परिपूर्ण वाटतें.

या पौराणिक दीर्घकथांतून आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी आढळते कीं, तिजकडे दुर्लक्ष करतां येणार नाहीं. मूळ लेखकांनीं या कवींनी ह्या काव्यकथा मुलांसाठीं थोड्याच लिहिल्या होत्या ! त्या होत्या सर्वांसाठीं ! म्हणून यात प्रौढ भाषा असावी हें तर क्रमप्राप्तच. परंतु कामवासना आणि प्रेमप्रकरणें याची वर्णनेंहि त्यात साक्षेपानें केलेली आढळावीत यांत आश्चर्य नाहीं; आणि कथानकांच्या धाग्यांतच ती गुफली गेलेली, त्यामुळें त्याना अलग करणेंहि मुश्कील ! पण मुलांसाठीं या पुस्तकांचें पुनर्लेखन करतांना ती कुशलतेनें काढून टाकण्याचें कसब लेखकास हवेंच असें मनात येतें. परंतु तें सर्वांना साधतेंच असें नाहीं. उदाहरणार्थ, मूळ दशकुमार चरित्रांत याचीं वर्णनें आहेतच; परन्तु मुलांसाठीं लिहिलेल्या 'दहा धाडसी कुमार' या पुस्तकांतून तीं संक्षेपानें आलीं असतीं तर बरें झालें असतें. पण तसें होऊ शकलें नाहीं. उदाहरणार्थ, यांतील काममंजिरीनर्तकी मरिची नांवाच्या ऋषीला ' काम महात्म्य ' समजूत देतांना म्हणते—

" काम म्हणजे विशेषतः स्त्रीपुरुषांच्या सहवासाचं सुख...हें सुख अत्यत आल्हादकारक असून त्याला कसलीहि उपमा नाहीं. त्याचा अनुभवच घ्यायला हवा. त्याशिवाय त्याची कल्पना येणं शक्य नाहीं. या सुखाच्या मागें सर्व लोक लागलेले आहेत. त्याच्यासाठीं लोक कष्टमय तप करतात. मोठमोठीं दानं करतात. भयंकर युद्ध करतात; आणि समुद्रपर्यटनासारखीं अचाट कामं करतात. "

( दहा धाडसी कुमार—४२ )

पुढील वर्णनहि तसेंच:—

" मित्रा जसजशी रात्र होते तसतसा मदनाचा अमल जास्त होऊन कामवासना वाढते. ताज्या फुलांच्या शय्येनें, चंद्रकिरणांनी, शरीराच्या प्रत्येक अवयवाला चंदनाची उटी लावल्यानें, कश्शाकश्शानें ह्या कामविकाराचा मानसिक त्रास नाहींसा होत नाहीं. हा त्रास फक्त त्या स्वर्गीय सुंदरीच्या मीलनानेंच नाहींसा होईल. "

( चारुमती भाग विक्रमोर्वशीय—२९ )

मूळ कादंबरीच्या सदर्भाला हें वर्णन शोभत असलें तरी बालोपयोगी कादंबरी लिहितांना तें अतीव संक्षेपाने उद्धृत करणेंच योग्य ठरेल.

दुसराहि एक आक्षेप या सर्वच संस्कृतनिष्ठ दीर्घकथांबाबत घेतां येण्यासारखा आहे. तो म्हणजे या बहुतेक सर्वच कथानकावर संस्कृतप्रचुर कठीण भाषेची अधिकांश छाप आहे व त्यामुळें कौमारावस्था ओलांडलेल्या मुलांना जरी ती आकर्षक व

अलंकारिक वाटली तरी सर्वसामान्य कुमाराला ती अवघड, अनाकलनीयच वाटते. अर्थात्, मुलांतली कथाच अशा प्रगल्भ भाषेत असल्यानें शब्दशः अनुवादांतहि ती प्रगल्भता उतरावी हें क्रमप्राप्तच आहे. तरीहि मुलांसाठीं जर हे अनुवाद केले जात असतील तर लेखकानें भाषेचा मूळचा प्रौढपणा, आशय व कथन या दोन्ही दृष्टींनीं थोडातरी सोपा करणें जरूर आहे हे कोणीहि मान्य करील. पण तसें होत नाहीं. मुलांसाठीं अनुवाद म्हणजे फक्त लहान स्वरूपाचें पुस्तक; तें सचित्र व चांगल्या छपाईचें असलें कीं झालें अशीच अनेक लेखकांची समजूत दिसते. पण भाषेचा अवघडपणा मुलांच्या वाचनांत वाटेतल्या कांटेरी रानाप्रमाणें अडथळे आणतो, ही गोष्ट लेखकांच्या लक्षांत येत नाहीं. उदाहरणार्थ, पुढील विवेचन पाहा. डॉ. वाटव्यांच्या कादंबरीकथेतील महाश्वेता पुंडरीकाच्या वियोगानें आत्महत्या करायला निघाली होती, तेव्हां चंद्रापीड तिला उपदेश करीत आहे, असा हा प्रसंग. तो म्हणतो—

" मृताचा विरह आपल्यास सोसवत नाहीं, म्हणूनच हें मरण पत्करायचें कीं नाहीं ? पण त्याचा मृताला काय उपयोग ? बरें, अशा मरणाच्या मार्गानें तो मृत पुन्हां जिवंत होतो किंवा निदान आपली त्याची परलोकांत तरी गांठ पडते म्हणावें तरी तेंहि अशक्यच. मृत आपल्या कर्माप्रमाणें कोठेंतरी गेलेला असतो व त्याच्या-मागून मरणाराच्या कर्मांत आत्महत्येच्या पातकाची भर पडून तोहि आणखीच कोठेंतरी जातो. याच्या उलट, माणूस मृताच्या मागें जिवंत राहिला तर निदान श्राद्धादि धार्मिक कृत्यें करून मृताच्या कांहीं उपयोगी तरी पडेल. पण अविचारानें मुद्दाम मरण पत्करणाऱ्याला धड ना स्वार्थ ना परमार्थ. "

किती अवघड भाषण हें ! सोप्या शब्दांत हा सर्व कठीण आशय व्यक्त केला गेला असता तर त्यांतली रुक्षता अशी उमटून पडली असती काय ?

अर्थात्, संस्कृत कथा मराठींत उतरतांना मूळच्या प्रौढ, सुंदर व अलंकारिक भाषेला सोप्या पण चटकदार शब्दाभरणानें सजवणें वाटतें तेवढें सोपें नाही. ती एक प्रयत्नसाध्य कला आहे व या दृष्टीनें श्रीगुरुचरित्रांतल्या गोष्टी, अकरा महर्षी, नऊ-नाथ इत्यादि पुस्तकांची भाषा बालसुलभ व आशय सोपा अशी रचना आहे ती उल्लेखनीय वाटते. श्री. श्रोत्रिय यांच्या ' वत्सराज ' पुस्तकांतील पुढील वर्णन किती सुरेख झालें आहे पाहा.

" दिवस मध्यावर आला होता. कांही कोस दौडत गेल्यावर एका झाडाखालीं सांवलींत एक काळाभोर हत्ती दिसला. वत्सराज हर्षानें ओरडला, ' वा ! हा तर चक्रवर्ती हत्ती. आमचें भाग्य थोर म्हणून हा दिव्य गज आमच्या दृष्टीस पडला ! ' झटकन् घोड्यावरून स्वारी खालीं उतरली. वीणा हातांत घेतली व तिच्यांतून सुरेल ध्वनि काढीत तो त्या हत्तीजवळ जाऊं लागला. पण हा काय चमत्कार ! हत्तीचे

पोट एकाद्या दारासारखें उघडलें, आंतून समशेरी उगारून कित्येक वीर पटापट उड्या टाकीत खालीं उतरले व वत्सराजावर चाल्द्न आले. हत्ती लांकडाचा होता. महासेनाचें कपट होतें तें !"
(वत्सराज—पृष्ठ १०)

पण अशी वेधक भाषा थोड्यांचीच. पुराणकथेच्या वर्णनक्षेत्रांतहि कांहीं फार सुरेख नमुने आढळतात. उदाहरणार्थ, पं. महादेवशास्त्री जोशी यांच्या 'वरदान'मधील हें आकाशवर्णन पहा—

"सूर्य थरथरत खालीं जात होता. आजूबाजूला ढगांचा कापूस पिंजून विखुरला होता. पाहतां पाहतां त्यापैकीं एका ढगाचा एक लहानसा धागा सूर्यावर आला आणि त्यामुळें बिंब तडकलेल्या मडक्यासारखं दिसूं लागलं. ऋतुध्वजाला तें दृश्य अशुभसूचक वाटलं. नैऋत्येच्या बाजूला महामृगाच्या आकाराचा एक ढग वाऱ्याबरोबर पुढेंपुढें सरकत होता. त्याला पाहून ऋतुध्वज म्हणाला कीं, हें रविबिंब त्या पक्षाचं अंडं शोभण्यासारखं आहे."
(वरदान—पृष्ठ ७)

या वर्णनांत गांभीर्य असूनहि नाविन्य नाही काय ! अशा विविध शैलीनें या पुराणकथांतहि नवा रसाळपणा भरला जातो व हें प्रमाण कमी असलें तरी त्याचें महत्त्व कमी नाहीं !

अशी आहे ही पौराणिक कथानकांची गंगोत्री. अर्थात् सर्वच पुराणकथा सरस आहेत असें म्हणतां येणार नाहीं हें खरें. पण तसा निर्भेळ चांगुलपणाचा निर्वाळा आजच्या एकंदर मराठी साहित्याबद्दल–निदान आजच्या कथाकादंबरीबद्दल–तरी देतां येईल काय ? बाजारात सर्वच तऱ्हेचा माल येतो. त्यांतून सरसनिरसतेची पारख करणें हें जाणकाराचें काम आहे. त्यातले गंगोत्रीतून अनेक प्रवाह निघाले, ते महाराष्ट्रभर पसरले व त्यातले कांहीं खरोखरच जीवनदायी होते व आहेत. पण कांहीं समीक्षकांनीं त्या सर्वांनाच एकदम 'बालवाङ्मयाचे' गुणधर्म अभावानेंच जाणवत असल्याचा प्रतिकूल अभिप्राय द्यावा याचें आश्चर्य वाटतें.[1] चांगल्या लेखनाचे अनेक पैलू मला याहि विभागांत आढळले आहेत, त्याचें कांहीसें दिग्दर्शन वरील विवेचनांत आलें आहेच.

(१) देवीदास बागूल—बालवाङ्मय (पृष्ठ २६)

## इतिहास कथा

बालकथांचा आणखी एक रंजक प्रकार आहे तो म्हणजे इतिहासकथांचा. शालेय अभ्यासक्रमांत इतिहास–पुस्तकें अभ्यासावीं लागतात. त्यामुळेंच कीं काय, इतिहास म्हटला कीं एक रुक्ष विषय, असें एक समीकरणच होऊन बसलेलें आहे. आणि ही रुक्षता वर्धित व्हावी अशाच प्रकारें हे इतिहास लिहिले जातात. त्यांत सनावळ्या व लढाया यांची जंत्रीच दिली जाते व वर्णनांची बाजू बहुतांशीं अदृश्य असते. पण कथाप्रांतांत येऊन जेव्हां इतिहास लहानाशा लहान होऊन ललित भाषेनें एकेक घडलेल्या हकिकती सांगूं लागतो तेव्हां त्यांत रंजन, बोध, अद्भुतता, वीरश्री हे सारे कथागुण आणि रसाळपणा, आत्मीयता, अभिमान हे कथनगुणहि प्रकट होतात.

अर्थात्, असें असलें तरी हे प्रयत्न फारसे झालेले नाहीत व बालवाङ्मयाच्या इतर दालनांच्या तुलनेनें तर ते हातांबोटांवर मोजण्याएवढेच अल्पसंख्यांक आढळतील. कारण इतिहासांत चरित्राचा भरणा फार असतो. त्या चरित्रनायकांच्या हकिकती घडल्या तशाच दिल्या तर तो परत इतिहासच ठरतो, ‘ कथा ’ नव्हे. मग त्यांत लालित्य उरत नाहीं ! तरीहि यांसच ‘ कथा ’ संबोधून कांहीं पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं दिसतात. उदाहरणार्थ, ‘ ऐतिहासिक गुजगोष्टी ’ (श्री. भा. द. खेर), ‘ मोठ्या माणसांच्या गोष्टी ’ (श्री. गोपाळराव कुलकर्णी), ‘ थोरांच्या गोष्टी ’ (श्री. ग. म. वैद्य), ‘ मोठी माणसें ’ (श्री. के. ह. सहस्रबुद्धे) इत्यादि पुस्तकें पाहावींत. अगदीं लहान मुलांनाहि इतिहास विसरलेला नाहीं. बालासाठींहि इतिहासाचीं अनेक पृष्ठें गोष्टीरूपानें परत सजीव झालीं.

अगदीं लहानांना आवडेल असेंच भाषामाध्यम ह्या पुस्तकांतून सांपडेल. उदाहरणार्थ, गौतमबुद्ध वनांत गेला व त्याचा तो निरोप सांगायला नोकर वाड्यांत आला, ही घटना खास बालशब्दांत एका पुस्तकांत अशी वर्णिलेली दिसेल —

“नोकर रडत रडत राजवाड्यांत आला. राजाला सांगितलें, राणीला सांगितलें, सिद्धार्त निघून गेला. मला नेलें गावाबाहेर. दागिने काढले भराभर, कपडे उतरले झराझर आणि म्हणाला, ‘ सारे दागिने घे, सारे कपडे घे, राजाकडे नेऊन दे. ’ आपण निघून गेला. राजाला फार वाईट वाटलें. राणीला फार वाईट वाटलें. सगळ्यांनाच फार वाईट वाटलें. राजानें दवंडी पिटली. ‘ ऐका रे ऐका, राजपुत्र रात्रीं निघून गेला. सगळे त्याला शोधायला चला ’. सगळे लोक राजपुत्राला शोधायला निघाले.”

ही अनुप्रासयुक्त व पुनरुक्तिपूर्ण भाषा शिशूंना आवडणारी आहे खरी, पण इतिहासांतील गोष्टींना हा कहाणीचा साज शोभत नाहीं, त्यानें गांभीर्य

त्यामुळें पळून जातें! त्यापेक्षा या विभागात चित्रशाळेनें एक चागला उपक्रम केलेला आहे तोच अधिक स्तुत्य ठरेल. "ऐतिहासिक कथामाला" (ले. विश्वेश्वर) नावाच्या एका मालेंत, शहाजी ते शाहू हीं पाच पुस्तकें व बाळाजी बाजीराव ते सवाई माधवराव हीं पाच पुस्तकें या सस्थेतर्फे प्रसिद्ध करण्यात आलीं. टाईप मोठा व चित्रें भरपूर असल्यानें या मालेचें दर्शनी रूप तर आकर्षक होतेंच, परतु अत रगातहि रुक्ष हकिकतीऐवजी रजक वर्णनें होती शिवाय प्रसगरचनेंत आवश्यक तेथें छोटेछोटे सवादहि होते त्यामुळें या कथा चरित्रात्मक न वाटता गोष्टीच वाटतात. एक विशेष असा का, या गोष्टी अगदीं लहान मुलासाठीच मुद्दाम लिहिल्या गेल्यानें वेताचा विस्तार व सोपेपणा याचाहि अवलब यात केला गेला आहे. उदाहरणार्थ, माधवराव पेशव्याचा स्वभाव दर्शवणारा एक प्रसग पाहण्याजोगा आहे.—

"एकदा (माधवराव) पेशवे फितुरीचे कागद फाडीत होते. सखारामबापू बोकील हा राघोबादादाच्या पक्षाचा कारभारी पेशव्याला म्हणाला— 'श्रीमत, हे कागद महत्त्वाचे असतात फाडू नयेत.' श्रीमत माधवरावानीं लगेच सखाराम बापूनेच केलेल्या फितुरीच्या कागदाचें पुडकें काढलें, बापूपुढें ठेवलें आणि म्हटलें— 'बापू, हे कागद ठेवू कीं फाडू हें तुम्हीच सागा'. बापूनें पुडकें उघडताच त्याला स्वत. लिहिलेलीं फितुरीचीं पत्रें सापडलीं व तो विरमला. पेशव्याच्या या चतुराईनें सखारामबापू दिपून गेला." — थोरल्या माधवरावाची कथा (पृष्ठ १७)

केवळ शिशुरजनाचें ध्येय न ठेवता जाणत्या मुलासाठी चित्रशाळेतर्फे दोन भागात प्रसिद्ध झालेलें 'ऐतिहासिक दतकथा व गोष्टी' हेंहि पुस्तक या दृष्टीनें नमुनेदार ठरेल. लेखक श्री. द. वि. आपटे यानीं यात बालवाचकाचे दृष्टीनें विशेष उद्बोधक विचार माडले आहेत. प्रस्तावनेंत आपटे म्हणतात —

"प्रत्यक्ष ऐतिहासिक प्रसगाची माहिती व वर्णन इतिहासात दिलेली असतात परतु ज्या गोष्टी ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाच्या नाहीत व ज्याचा खरेपणा पुराव्यानें सिद्ध होत नसेल त्या ऐतिहासिक व्यक्ति व त्याचे मुख्य गुण लक्षात येण्यास आख्यायिका व दतकथा हीं उत्तम साधनें असतात. मुलाना गोष्टी सागत इतिहासा कडे वळवण्याचा प्रयत्न करण्यास ज्या प्रकारची माहिती आईबाप व शिक्षक याच्यापुढें पाहिजे तशी पुरवणें हा या पुस्तकाचा हेतु आहे.

आणि हा हेतु या पुस्तकात पुष्कळसा साध्य झालेला दिसतो यातल्या गोष्टीची नावेंहि 'नहिरे कि नहिरी,' 'छोटी नवरी,' 'फकिराचा वजीर' अशी आकर्षक योजलेली दिसतील नानाच्या चातुर्याच्या, शिवाजीच्या युक्तिबाजपणाच्या,

पेशव्यांच्या दरान्यांच्या अशा यांत कित्येक छोट्या रंजक कथा आहेत. मात्र गोष्टींची निवड चांगली असली तरी त्यांची मांडणी इतिहासधर्तीचीच आहे. त्यांत वर्णनें, संवाद व प्रसंगप्रकटन यांना अधिक वाव नाहीं.

गेल्या तीस पस्तीस वर्षांत या पद्धतीवर अनेक ऐतिहासिक कथांचीं पुस्तकें लिहिलीं गेलीं. त्यांत वर नमूद केलेल्या सुधारणाहि कालमानास अनुसरून अंगिकारलेल्या दिसून येतात. श्री. ग. रा. देवळे यांच्या ऐतिहासिक कथांचे पांच भाग या दृष्टीनें पाहण्याजोगे आहेत. यांत अगदीं बुद्धकालापासून कथाविभागाला सुरुवात झाली आहे. गोष्टींतील शीर्षकें देखील अधिकच वेधक योजलीं आहेत. उदाहरणार्थ—

"अरेरे! किती निष्ठुर आहे हें जग!," "वाढली माती अन् मिळालें राज्य!," "बर्फांतलें मोती," वगैरे. अशीं शीर्षकें म्हणजे मुलांचें मन एकदम गोष्टीकडे खेचून घेणारी किमयाच ती! आणि वर्णनक्षेत्रातहि विकास झालेला दिसतो. उदाहरणार्थ, याच पुस्तकातील एक स्थलवर्णन पहा—

"थंडीचे दिवस! कपड्याबाहेर बोट निघालें तर गळून पडेल इतकी थंडी! आपल्याला अशा थंडीची फारशी कल्पनाहि येणार नाहीं. मी सांगतो ती थंडी आपल्या देशांतली नाहीं. अफगाणिस्थानमधील ही गोष्ट आहे. चारशें साडेचारशें वर्षांपूर्वीची! त्यावेळची काबूलनजीकची थंडी ती. आभाळांतून बर्फाचे बारीक थंड पीठ भुळभुळ गळत होतें. झाडावर पानहि शिल्लक नव्हतें. चुन्यानें रंगवावींत तशीं सारीं झाडें बर्फानें पांढरीशुभ्र झालीं होतीं. डोंगरमाथ्यानें बर्फाचे पांढरे पागोटें बांधलें होतें. काबूल नदी गोठली होती. मातीचा चिखल व्हावा तसा सगळीकडे बर्फाचा जाड थर चहूंकडे पसरला होता. दुसरा पाय ठेवायचा असेल तर पहिला पाय बर्फाच्या पांढऱ्या मातींतून उपसून काढावा लागे,...... अशा थंडींत, अशा बर्फांत, बाबरचें सैन्य काबूलजवळ येत होतें...."

—ऐतिहासिक कथा, भाग २ (पृष्ठ १)

अशा समुचित वर्णनांनीं इतिहासाच्या घटनांनाहि नवें रंजकत्व चढलें असल्यास काय आश्चर्य! घटनाची निवडहि चांगली. म्हणजे ज्यांत उत्कृष्ट कथाबीज सापडेल, अशीच आहे. अशा सुसंगत व गोष्टीरूप इतिहास मुलांपुढें ठेवण्याचा प्रयत्न आणखीहि कांहीं लेखकांनीं मनःपूर्वक केलेला आहे. उदाहरणार्थ, 'मेवाडचे वीर' (श्री. र. ल. उपासनी) हें एक छानदार पुस्तक पाहा. गुहिलोट घराण्यापासून रजपुतांचा इतिहास सुरू होतो. त्यांतल्या निवडक गोष्टी यांत आहेत. मात्र त्यांत कालदृष्ट्याहि सुसंगतपणा व चरित्रकथात्मक भाग अधिक असल्यानें 'रजपुतांचा गोष्टीरूप इतिहास' असेंच नांव याला अधिक शोभलें असतें. भाषा

सोपी असून उचित वर्णनेंहि जागोजाग आहेत तींहि मुलांची उत्कंठा वर्धित करणारींच. उदाहरणार्थ, समरांगणात लढणाऱ्या दोन सख्ख्या भावांच्या भेटीचें हें वर्णन असें आहे—

"सूरजमल्लाकडे जाण्यास पृथ्वीराजास भय किंवा संदेह मुळींच वाटला नाहीं. शुद्ध मनानें तो त्याच्या डोळ्यात शिरला. त्यावेळीं सूरजमल्ल आपल्या जखमा बांधीत होता. पृथ्वीराजाला पाहून सूरजमल्लास फार आनंद झाला. तशाहि स्थितींत तो बिछान्यावरून मोठ्या कष्टानें उठून नसल्या व त्यानें पृथ्वीराजाच्या गळ्यास मिठी मारली. अहाहा, काय तो देखावा असेल नें ! हें दृश्य पाहून हे दोन्ने वीर थोड्या वेळापूर्वीं लढत होते असें कोणास तरी वाटलें असतें काय ! किती प्रशंसनीय क्षात्रधर्म ते पाळीत होते! सूरजमल्लाचें हृदय भरून आलें. त्याचें सान्त्वन करून पृथ्वीराज कळवळून म्हणाला, 'भाऊ तुझ्या जखमा कशा काय आहेत?' 'थोड्या वेळापूर्वीं पीडा देणाऱ्या माझ्या जखमा तुझ्या भेटीनें आता साफ बऱ्या झाल्या आहेत,' सूरजमल्लानें तितक्याच कळवळ्यानें उत्तर दिलें. त्या वीर बंधूनी एकाच थाळींत मोठ्या प्रेमानें भोजन केलें. परस्परांविषयीं किती सहानुभूति आणि विश्वास हा !"

—मेवाडचे वीर (पृष्ठ ३९)

याच प्रकारचे 'रजपुताच्या गोष्टी' हें पुस्तक गो. वि. चिपळूणकर यानींहि लिहिलें आहे. पण 'मेवाडचे वीर' मधील भाषासौष्ठव अधिक परिणामकारक वाटतें. 'शीखांचे गुरु' (ले. श्री. उपासनी) आणि 'वीरांच्या कथा' (ले. कै. वा. गो. आपटे) हींहि या पद्धतीचींच पुस्तकें. पण एकंदरीनें हा ओळीनें इतिहासकथा सांगणारा प्रकार गोष्टीरूप दालनात कमीच आहे. श्री. बल्वंत बष्ट याचे 'शीखांचे इतिहास कथा' हें या धर्तीचें आणखी एक पुस्तक. याची भाषा ओजस्वी आहे. श्री. श. रा. देवळे यांचें 'दिल्लीचे मोगल बादशहा' हें पुस्तक याच प्रकारात येतें. तेंहि सुरेख लिहिलेलें आहे.

अलिकडेच प्रसिद्ध झालेलें मुल्कराज आनंद यांचें 'भारताची कहाणी' (अनुवादक–प्रा. मंगेश पाडगावकर) हें पुस्तक विशेष रंजक व काल्सगति राखून लिहिलेलें आहे. यात आर्यकालापासून नेहरूकालापर्यंतच्या ठळकठळक गोष्टी थोडक्यात दिल्या आहेत. याचें आणखी एक आकर्षण म्हणजे यात पानागणिक चित्रें आहेत व तीं सर्व प्राच्य शिल्पपद्धतीचीं रेखाचित्रें आहेत.

जाणत्या मुलांसाठीं ऐतिहासिक कालावर आधारलेल्या आणखीहि कांही चरित्रकथा उपलब्ध आहेत. वेष पाहावा तर चरित्राचा, पण देह मात्र कथारूप असल्यामुळें त्यातील इतिहास–प्रसिद्ध नीरसता जाऊन त्यात रंजकता आलेली आहे.

'रामशास्त्री' या पुस्तकास चित्रपटाच्या कथानकाचाच पूर्ण आधार घेतल्यामुळेंच कीं काय, यांतले संवाद इतके ओजस्वी व भावसुंदर झाले आहेत कीं, त्यासाठींच मुलें रामशास्त्रीचीं पारायणें करतील! उदाहरणार्थ, खालील संवाद पहा. – सिंहासनावर राघोबादादा आरूढ होण्याचा महत्त्वाचा प्रसंग आहे हा. रामशास्त्री त्यांच्याशीं बोलत आहेत —

शास्त्रीबुवा :—भीति कशाची वाटली श्रीमंत? उचला पाऊल. ही पेशव्यांचीच 'मसनदी' आहे. हिरवाच रंग आहे तिचा. रक्तानं लाल झालेला नाहीं.

आनंदीबाई :—बापू, हा काय पोरखेळ चालला आहे?

शास्त्रीबुवा :—चलावं श्रीमंत! बाईसाहेब अधीर झाल्या आहेत. – काय? गादीवर बसण्याची भीति वाटते? छे... छे... तसं वाटण्याचं कांहीं कारण नाहीं. गादीवर कोणी नाहीं. गादी रिकामी आहे. माधवराव गेले, नारायणराव गेले, – होय, खरंच गेले ते! आठवतं ना आपल्याला? गारद्यांनीं घाव घातले, तेव्हां त्यांनीं किंकाळी फोडली, काका मला वाचवा, काका मला वांचवा—

रघुनाथराव :—(भेदरून मागें होत) नाहीं, नाहीं, मी या गादीवर बसणार नाहीं!

सखारामबापू :—श्रीमंत......श्रीमंत......

आनंदीबाई :—काय हें! काय हें! मागें फिरावं, गादीवर बसावं.

शास्त्रीबुवा :—(उपरोधी स्वरांत) कसें बसतील? थोरल्या बाजीरावसाहेबांची पवित्र गादी आहे ती! शत्रूचंच रक्त पिऊन मस्त झालेली आहे ती! यांच्यासारख्या भ्याडांना तिला स्पर्श करण्याची देखील हिंमत होणार नाहीं."

इतिहासाला पुन्हां कांहीं काल सजीव करण्याचं सामर्थ्य अशा प्रभावी संवादांत नाहीं काय? मुलें वाचतांना या प्रसंगाशीं तद्रूप झाली नाहींत तरच नवल! श्री. ना. रा. रानडे यांचे 'तीन पिढ्यांचा दाजी' हेंहि छोटें पुस्तक असेंच कथारूप इतिहास सांगणारें आहे.

या संदर्भांत आणखी दोन उत्तम पुस्तकांची नोंद करणें उचित ठरावें. तीं म्हणजे 'मराठ्यांच्या राजकन्या' (गो. स. सरदेसाई) व 'मराठ्यांच्या वीरकथा" (श्री. वि. गं. लेले) हीं होत. यांतील मराठे हा उल्लेख जातीवाचक नसून प्रांतदर्शक आहे हें विशेष. महाराष्ट्रीय वीरांच्या या सर्व कथा-कथानकें

अत्यंत रोचक व सत्यदर्शी निवडलीं आहेत. त्यामुळें या कथा रंजक व बोधप्रद तर झाल्या आहेतच, परंतु इतिहासाची अनेक अज्ञात पानें जणु ह्या लेखकानीं लोकां समोर नव्यानें उघडून धरल्यासारखीं वाटतात, त्यामुळें ऐतिहासिक ज्ञानातहि भर पडते, हे विशेषच गुण म्हणावे लागतील. उदाहरणार्थ, 'मराठ्यांच्या वीरकथा'मधील 'महाराज ! मी देवकान्या !' आणि 'सुनेच्या माडीवर सासरा दत्तक' या सुंदर गोष्टी पाहाव्या किंवा 'मराठ्यांच्या राज्यकथा' मधील 'हूडपणाचें बक्षीस' व 'विपरीत शेवट' या लेखाची साक्ष घ्यावी गो. स. सरदेसाई हे इतिहासाला वाहून घेतलेले मान्यवर साहित्यिक होते. त्यांच्या पुस्तकातून ऐतिहासिक सत्याचा आढळ व्हावयाचाच ! पण तो रंजकतेनें झाला आहे हेंच विशेष !

इतिहासकालीन वीरश्रीपूर्ण प्रसंगावर आधारलेल्या कथांचीं पुस्तकें आज आवर्जून लिहिली जात आहेत हें मुलांचें भाग्य. यातहि कांहीं नवकल्पनांचा उदय झालेला दिसतो. या दृष्टीनें अनेक लेखकांनीं मिळून एक पुस्तक संकलित करण्याची नवप्रथा ' इतिहासाच्या पानोपानीं ' या पुस्तकात साकार झाली आहे. यात दहा सुंदर ऐतिहासिक गोष्टी आहेत व दहा लेखकानीं त्या लिहिल्या आहेत. यात जग जेत्या शिकंदराचा पराभव, प्रतापी चित्तक, उदेरीचा पराभूत सागर इत्यादि गोष्टी सुंदर आहेत ' मराठ्यांचें महापराक्रम ' ही दहा भागाची एक माला छोट्या छोट्या पुस्तकरूपात प्रकाशित केली गेली आहे. उपक्रम चांगला, पण कथनात नीरसता आहे, शिवाय, त्यात कालसंगतीहि नाहीं. पहिलें पुस्तक माधवराव पेशव्यासंबंधी तर दुसरें ' सिंड अशी पावन झाली ' असें आहे थोड्या अवधानानें हा क्रम सुरळित राखता येणें शक्य होतेसें वाटतें. 'थोरांची थोरवी' याहि अशाच चरित्रकथा कै. वि. वा. हडपानीं लिहिल्या. त्या इतक्या लोकप्रिय झाल्या कीं, दहा वर्षांत त्यांच्या सहा आवृत्त्या निघाल्या. त्यातहि कालसंगति ठेवता आलेली नाहीं. उदाहरणार्थ गांधीनंतर, महमूद गवान व आगरकरानंतर आर्य चाणक्यांची गोष्ट आली आहे ही विसंगति थोडक्याशा प्रयत्नानें दूर करता आली असती. ऐतिहासिक प्रसंगावर आधारित अशा काहीं कथा श्री भा द. खरे यानींहि ' ऐतिहासिक गुजगोष्टी ' नावानें प्रसिद्ध केल्या आहेत. अर्थात, चरित्रकथा म्हटल्यावर मुळातच लालित्य कमी, पण या कथा निवड ताना भारतीय व परदेशीय यांची सरमिसळ केली आहे, त्याऐवजीं हे दोन स्वतंत्र विभाग करून लिहिले असते तर बरें झालें असतें. उदाहरणार्थ, 'जोसेफ मॅझिनी व वासुदेव बळवंत' या दोन जीवनकथांच्या या पुस्तकात फक्त काहीं पानांचेंच अंतर असले तरी इतिहासात मात्र धर्म, देश, व्यक्तिमत्त्व व कालखंड यांत जमीनास्मानाचा फरक आहे. ऐतिहासिक कथाकथनात कालाची सुसंगति राखणें हें त्या कथांचें सौंदर्य वाढवणारेंच साधन ठरेल.

'५७ ची सत्यकथा' ह्या नांवानें कै. वि. वा. हडप यांनींहि एक छानदार' पुस्तक लिहिलें आहे. तें तर खास विद्यार्थ्यांसाठींच. कारण, त्यांत दर प्रकरणांती स्वाध्याय आहे. मंगल पांडे, झांशीची राणी, बिहारचा सिंह, तात्या टोपे हीं सारीं वीररत्नें या काळांत विद्युल्लतेसारखीं चमकलीं, तरवारीसारखीं तळपलीं आणि दुर्दैवानें निर्माल्यासारखीं कोळपलीं; परंतु त्यांचीं नांवें इतिहासांत अजरामर झालीं! ह्या सर्व शौर्यकथा या 'सत्यकथे'त विस्तारानें आल्या आहेत व त्या एकाद्या रहस्य कथानकाप्रमाणें गूढ व वास्तवदर्शी असल्यानें हें पुस्तक फार रंजक झालें आहे. १८५७ सालीं झालेल्या स्वातंत्र्य युद्धाला १९५७ सालीं शंभर वर्षें पुरीं झालीं. या शताब्दि महोत्सवानिमित्त अनेक तत्कालीन हकिकती सांगणारीं पुस्तकें लिहिलीं गेलीं. श्री. मं. श्री. दीक्षित यांचें 'सत्तावन्नचे सप्तर्षि' हें पुस्तक त्याच पद्धतीचें आहे व या १८५७ सालच्या धामधुमींत स्वकर्तृत्वानें चमकणाऱ्या सात व्यक्तींचीं शब्दचित्रें व माहिती यांत आली आहे. 'आईची देणगी' यांतील आठ भागांत मिळून जुन्या पौराणिक काळच्या वीरचरित्रांबरोबर अलिकडच्या तेजस्वी वीरांच्याहि कथा आलेल्या आहेत. राजस्थानांतल्या प्रतापसिंहाचा, पेशवाईतील चिमाजी आप्पांचा दृढनिश्चय यांत दिसेल तर अलिकडच्या शीख वीर हरिसिंग नलवा व बंगाली राष्ट्रपुरुष सुभाषचंद्र यांच्याहि देशप्रीतीच्या गोष्टी यांत आढळतील. श्री. गो. नी. दांडेकर यांनीं या भारताचा इतिहास घडवणाऱ्या कथा मुलांना सांगितल्या आहेत त्याहि चांगल्या आहेत.

एकंदरीत इतिहासकथांच्या या परिशीलनांतून एक निष्कर्ष निघतो तो हा कीं, या दालनांत कथांहून कादंबरी–नाटकांचेंच प्रमाण अधिक आहे. मोठ्यांच्या तसेंच छोट्यांच्या साहित्यातहि. याला कारण एकच. इतिहासांतील वीरश्रीयुक्त कथानकांना व वैचित्र्यपूर्ण घटनांना कथेचें क्षेत्र अगदींच मर्यादित किंबहुना थिटेंच ठरतें. इतिहास हा भाव–भावनांना चेतवणारा जादूगार. त्याचे खरें सामर्थ्य नाटककादंबरींतूनच अधिक स्पष्ट होतें. कथा व चरित्रें म्हणजे केवळ या अभिनिवेशाची नांदीच ठरेल.

## वास्तवकथा

अद्‌भुत रंजनांत गुंगण्याचें मुलांचें वय बारापर्यंत कल्पिलें जातें; पण यानंतरचा १२ ते १६ वर्षांपर्यंतचा कुमारवयाचा कालखंड असतो. या सुमारास वाङ्मयीन आवडीची क्रांति होऊं लागते. यानंतरच्या मुलांना अद्‌भुतकथा सर्वांशीं प्रिय वाटत नाहीत; तर त्यांतील वीररसात्मक कथानक व साहसी नायक यांचींच वर्णनें अधिक आवडतात. या वयाला वीरश्रीयुक्त कथानकें अधिकाधिक आकर्षू लागतात. जादू चमत्कारांहून सत्यवर्णनांची ओढ वाढते व त्यांतहि आपल्या एवढ्या

वयाच्या मुलाच्या हकिकती तर उत्कटतेनें हव्याशा वाटतात, पण आश्चर्य असें कीं बालजीवनावर आधारलेल्या व सत्यदर्शी सामाजिक गोष्टींची पुस्तकें अद्भुत-कथाच्या वा पुराणकथाच्या तुलनेनें फारच कमी दिसतात. मुलाच्या स्वतन्त्र साहस-कथा–शौर्यकथा तर अगदीं अभावानेंच डोळ्यात भरणाऱ्या. कारणें स्पष्ट आहेत. अद्भुतकथा रचायला विशेष श्रम नाहीत. लोककथा–परीकथा यांची कथानकें परिपूर्ण व तयार असतात. फक्त भाषेचा फुलोरा व प्रसगाने दुवे जोडले कीं झालें. लोककथेंत तर सारे मनेत ठरलेलेच. लेखकाच्या कर्तृत्वाला त्यात अवसर फारसा नाहीं. पुराणात आणि इतिहासात घडलेल्या हकिकतीची चौकट इतकी मजबूत की, थोडी कलाकुसर करण्याएवढीच काय ती लेखकाची कामगिरी, त्यामुळें या सचित सामुग्रीतून निर्माण झालेल्या साहित्याचा प्रसार बालसाहित्यात सर्वांत अधिक झाला. त्यामानानें वास्तवकथा वा स्वतन्त्र सामाजिक बालकथा याची निपज अगदीं कमी आहे. त्याचें आणखी एक कारण असें कीं, मुलाच्या जीवनावर लिहायचें तें सत्याश्रयी ठरावयाचें, तर बालमनाचा अभ्यास हवा. बाल व कुमारजीवनाचे विचार, आकाक्षा, प्रवृत्ति, स्वभावधर्म, भाषा या सर्वांचें निरीक्षण पाहिजे, त्याचा नित्य सहवास हवा, तरच योग्य तें त्याचें मनोलेखन व्हावयाचें व उचित असे निष्कर्ष निघावयाचे ! ही गोष्ट सगळ्याना सहज साधणारी थोडीच आहे ?

या वास्तवदर्शी बालकथाचें दोन विभाग पडतात. मुलाचें जें दैनंदिन नित्यजीवन असतें, त्याबद्दलच्या कथा हा एक विभाग व दुसरा म्हणजे ठराविकाच्या चाकोरीबाहेर जाऊन मुलानीं केलेलें सशोधन, साहस, धाडसीं कृत्यें, चतुराईचीं कामें, प्रवास इत्यादिकाबद्दलच्या कथा. पहिल्या प्रकारात अद्भुतरम्यता मुळींच अपेक्षित नसते तर वस्तुनिष्ठता हेंच त्याचें खरें वर्णनकेंद्र. लेखकाच्या कथनशैलीचे गुणदोष खरेखुरे पारखले जातात ते याच कथातून !

वस्तुनिष्ठ कथाचाच काहींसा वेगळा भाग मुलाच्या साहसकथा हा आहे. साहसकथा बालाच्या आवडत्या खऱ्या, पण त्या ज्या काय लिहिल्या जातात त्या बहुतांशी साहसकादबऱ्या ! मग त्या दीर्घकथारूप असोत वा कादबरीच्या पूर्ण प्रबुद्धरूपात असोत. बालसाहित्यकारानाहि कथेपेक्षा तेंच क्षेत्र अधिक प्रिय दिसतें कदाचित् कथेच्या थोडक्याशा प्रागणात साहसकथेचा तपशिलासह विस्तार मावणार नाहीं हेंहि एक त्याचें कारण असेल. कसेंहि असो, या क्षेत्रात मोजकीं नावें व थोडक्याच कथा दिसतात एवढें खरें. श्री. भा. रा. भागवत याचें ‘ चितोड्याचा प्रताप ’ हें एक पुस्तक यात आवर्जून सागण्याजोगें आहे. यातली धाडसी मुलें शाळेंतल्या कुमाराएवढीच, पण त्याचें प्रसगावधान, चतुराई व साहस मोठी कौतुकास्पद ठरणारी आहेत ! उदाहरणार्थ, पहिल्याच गोष्टीत

१२-१३ वर्षांच्या चंदूनें गुंडांनी पळवून नेलेली सात वर्षांची पुष्पा मोठ्या युक्तीनें सोडवली आहे. सौ. मालती दांडेकर यांचें 'सुवर्णचंपक' हेंहि पुस्तक असेंच लहानमोठ्या मुलांच्या साहसांवरच आधारित आहे.

या क्षेत्रांत स्वतंत्र रचना अद्याप फारशी नाहीं. सध्यां ज्या साहसकथा निर्माण होतात त्यांतल्या बऱ्याच पाश्चात्य कथानकांवर आधारित असतात. त्यांतली बरींच चांगली रूपांतरें येथें नमूद करण्यालायक आहेत. श्री. भा. रा. भागवतांचें 'सोविएटच्या समरकथा-भाग १, श्री. दा. सी. देसाई कृत 'सहा साहसें', श्री. भा. द. खेर यांच्या 'साहसी सत्यकथा' इत्यादि पुस्तकें वाचनीय व स्फूर्तिदायक आहेत. 'सहा साहसें'च्या प्रस्तावात लेखक म्हणतात—

" साहसकथांचा आधार सत्य असल्यानं त्यांना एक वेगळंच तेज चढतं. अशीं पुस्तकं विद्यार्थ्यांच्या हातीं पडावीं असं मला वाटतं; पण त्याची मराठीत कमतरता. " अशी कमतरता आहे हें साऱ्यांना पटतें. त्या अधिक लिहिल्या जाव्यात व स्वतंत्रहि असाव्यात असेंहि वाटतें: पण त्या मानानें त्यांची निर्मिती होत नाहीं एवढें खरें.

'सोविएटच्या समरकथांत' युद्धकालांत रशियन रहिवाश्यानी जें अनेक प्रकारें वृत्तीचें शौर्य व देशनिष्ठा प्रकट केलेली होती त्याच्या रोचक हकिकती आहेत.

स्वराज्यविषयक चळवळीला सुरुवात झाल्यापासून अनेकांनीं देशासाठी कारावास व हाल सोसले-प्रसंगीं आत्मबलिदानहि केलें ! बेचाळीसची जी राष्ट्रीय चळवळ भारतभर झाली त्यांत अनेक थोरांबरोबर हिरीरीनें सत्याग्रहांत भाग घेणारे बालदेशभक्तहि होते. अशा शूरांच्या व हुतात्म्याच्या कथा या साहसकथाच नव्हेत तर काय ! आणि या साहसकथांना जें एक नवें तेजावरण आहे तें सत्याचें व वीरश्रीचें ! अशा खऱ्या साहसकथा श्री. गो. नी. दांडेकर यांच्या 'आईची देणगी' या पुस्तकांतून बऱ्याच आलेल्या आहेत व त्या निश्चित स्फूर्तिप्रद व देशप्रीति उत्पन्न करणाऱ्याच आहेत. 'चिरंजीव त्याचें जगीं नाम राहे' याहि साहसाच्या सत्यकथाच. यांत पुराणकालीन नचिकेत, अभिमन्यु यांच्याबरोबरच परदेशी हॉलंडवीर पीटर वगैरे शूर मुलांच्याहि कथा दिसतात. ही विसंगति थोडी खटकते खरी पण कथामूल्य त्यामुळें उणें होणारें नव्हे.

इंग्रजी वाङ्मयांत मुलांमुलींसाठीं असें वाङ्मय वैपुल्यानें आहे व त्यांतील बाल-नायक नायिका अधिक आत्मविश्वासानें त्या क्षेत्रांत काम करीत असल्याचे प्रसंग व त्यांतून निर्माण होणाऱ्या साहसकथा त्या वाङ्मयांत पुष्कळच दिसतात; पण तो तपशील बाजूस ठेवून पाहिलें तर मुलांनीं वेळप्रसंगी दाखवलेलें धाडस व साहसाच्या सत्यनिष्ठ हकिकती खरोखरच रंजक व रोमांचकारक असतात. प्रश्न

असा कीं, तशा तऱ्हेचे प्रसंग काय इकडे घडतच नाहींत ? बुडत्याला वांचवणारी कोळ्याची धीट मुलंमुली इकडे नाहींतच कां ? तिरंदाजीचा ज्यांना बाळ अभ्यास त्या पारध्यांच्या मुलांच्या नेमबाजीच्या हकिकती 'नेमक्या' आकर्षक ठरतील. गारुड्यांचीं मुलें साप पकडतात व खेळवतात—बाळ अभ्यासच त्यांचा तो—त्यांत धाडस नाहीं काय ? सर्कशींतली मुलें किती बालपणींच वाघ सिंहाशीं खेळायला शिकतात ! परंतु अशा विविध जमातींतील विशिष्ट गुणी मुलांना आपल्याकडील साहसकथांत स्थान नाहीं, अजिबात नाहीं ! या दृष्टीनें बाल–कथालेखकांना एक नवा दृष्टिकोन मिळण्यासारखा आहे. धाडसी मुलेंमुली फक्त शाळेंतच असतात व तीहि सुशिक्षित वर्गांतच; ही एक गैरसमजूत असल्यानें इकडे साहसकथा ज्या आहेत त्यांना फार मर्यादित क्षेत्रांत वावरावें लागतें व मग ठराविकाच्या चाकोऱ्या निर्माण होतात !

सामाजिक कुमारकथांचा विभाग याहून कांहींसा अधिक संपन्न आहे. जाणत्या वयाच्या मुलांमुलींचेंहि एक स्वतंत्र जग असतेंच ! मावंडे, पालक, शिक्षक, शेजारी, मित्रमैत्रिणी व मुके सोबतीचे प्राणी हे त्यांतले प्रमुख घटक; आणि घर, शाळा, मैदान, गांवाबाहेरचा परिसर, क्रीडांगण, नदीकिनारा इत्यादि त्यांतील प्रमुख घटनास्थळें ! या चिमण्या विश्वांतहि किती मजेदार सत्यकथा घडतात ! भावकोमल प्रसंगांची सायहि या जीवनाला अधुनमधून लाभते व त्यांच्या आधारानेंच कल्पित सामाजिक कथा पोसतात. मुलांच्या मानसिक बदलाची हीच वेळ व हीच त्याची पार्श्वभूमि ! या वैचारिक विश्वांत कुमारांचे आत्मगुण, कलागुण, कलाप्रवृत्ति, क्रीडाप्रेम, रसिकतेच्या साक्षी देणारी बुद्धिनिष्ठता, हींहि वर्धित होत असतात. या सर्वांचें चित्रण कुमारकथांतून आलें पाहिजे; पण अशा कथाहि थोड्याच आहेत. ज्या आहेत त्यांचें गुणमूल्य पारखण्याचा हा एक छोटा प्रयत्न !

अशा दृष्टीनें वस्तुनिष्ठ कुमारकथा लिहिणारे कांहीं निष्ठावंत बालसाहित्यकार आहेत. कै. साने गुरुजी, कै. पिरोज आनंदकर, श्री. देवदत्त टिळक, श्री. शशीकांत पुनर्वसू श्री. भा. रा. भागवत, सौ. कावेरी कर्वे, सौ. मालती दांडेकर, श्री. द. के. बर्वे, श्री. भा. द. खेर, श्री. सरोजिनी बाबर, श्री. श्री. बा. रानडे अशीं कांहीं ठळक नांवें यांत सांगता येतील.

या संदर्भांत 'बोधकथा' यावरील टिळक पतिपत्नीच्या कथासंग्रहाचें नांव अगत्यानें घ्यावें लागेल. यांतले दोघांचेंहि लेखनगुण वर्णनीय ठरतील. उदाहरणार्थ, रेवरंडांची 'कला केळे व सदू संत्रे' ही गोष्ट आकर्षक बाललेखनाचा एक छानसा नमुनाच आहे. आधी कला केळे, नाना नारळ इत्यादि मजेदार नावें मुलांच्या मनात

शिरून बसणारीच. शिवाय, प्रसंगदर्शनहि नित्यांतलें. यात छोटी कला पाण्यांत बुडते व बाकीचीं तिला वर काढतात असें एक प्रसंगदृश्य पुढीलप्रमाणें वर्णिलें आहे.

" कलावती केळे व सदाशिव संत ही दोघं मावसभावंडें होतीं. कला मोठी गोड मुलगी होती. केळ्याच्या जातींतील स्त्रिया आधींच सुंदर. त्यांत ही सोनकेळ्याची मुलगी. तिचा तो सुंदर वर्ण, नीटस बांधा, गोजिरवाणें रूप पाहून तिला कोणीहि चटकन उचलून घेई. लहानगा सदू तिचा सोबती होता. सदू मोठा खोडकर मुलगा. त्याचा तो वाटोळा गरगरीत सदा हंसरा चेहरा, गुबगुबीत गाल, केशरासारखी अंगकांति. त्यांना तो मोठा मनोहर दिसे. "

फळातले हे विशेष गोष्टीरूपानें समोर आल्यानें अधिकच 'मिष्ट' वाटतात !

कै. पिरोज आनंदकरांचें 'किशोरकथा' हेंहि बोधकथासारखेंच एक उल्लेखनीय पुस्तक. मुलांच्या नित्यजीवनांत साहस दाखवण्याचे प्रसंग फारसे येतातच कोठें ! त्यानून १२–१३ च्या वयाला झेपतील असे ते प्रसंग हवेत. शिवाय ते शक्य कोटींतलेहि पाहिजेत, नाही काय ? अशाच एका मुलानें गाडींतला चोर पकडून दिल्याचें वर्णन यांतील ' स्काउट ' या गोष्टीत आलें आहे तें किती स्वाभाविक वाटते ! प्रसंगरचना, शैली या सर्व दृष्टीनें ही गोष्ट आदर्श ठरेल ! 'किशोरकथा ' याच नावाचें एक पुस्तक प्रा. फडके व सौ. फडके यांनींहि प्रसिद्ध केलें आहे. त्यांतला फरक नामसादृश्यानें तर अधिकच ठळक होतो. सौ. फडक्यांची गोष्ट आहे वर्गांत द्वाडपणा करणाऱ्या मुलाची व त्याची नायिका आहे एक अगाऊ जहागिरदारीण; पण त्यामुळें मुलांवर बराच अन्याय झालेला आहे. वर्गच्यावर्ग अनावर व त्या खोड्याहि बुद्धिनिष्ठ नसून केवळ त्रासदायक व मूर्खतेच्या. हें मुलांचे चित्रण अयोग्य वाटतें. या उलट श्री. शशिकांत पुनर्वसूचें ' उल्काफुलें ' पुस्तक पाहावें. त्यातील पहिल्याच गोष्टींत हाच कथनप्रसंग किती तरी आत्मीयतेनें व सत्यार्शी जवळीक ठेवून मांडला गेला आहे. मुलें जादा चलाख असतात आणि तीं एखाद्या शिक्षकाला सतावीतहि असतील; पण चतुर शिक्षकहि युक्तीनें त्याना कसा जिंकूं शकतो व त्यासाठीं कोठल्या वृत्तीची व भाषेची जरूर आहे हें यांत फारच चांगल्या प्रकारें सूचित झालें आहे.

अर्धेअधिक मुलांचें विश्व शाळेचं व खेळाचें. त्यांतील विविध व बारकाईची वर्णनें असलेल्या गोष्टी एकदरीत कमीच. त्यातहि मनोविश्लेषणात्मक गोष्टींची संख्या अगदीं हाताच्या बोटांवर मोजण्याएवढीच. वर उध्दृत केलेल्या ' किशोरकथां'तील प्रा. फडके यांच्या कथा या दृष्टीनें सरस ठरतील. पण त्या बालमनोविश्लेषणावर

आधारित असल्या तरी त्याची मांडणी बैठक ही पाल्कासाठी आहे म्हटले तरी चालेल.

बालमनाचे योग्य निरीक्षण आणि त्याच्या भावनांशी समरसता हा अशा गोष्टीचा आत्माच म्हणावयाचा ! या गोष्टीतून घडणारे बालदर्शन जेवढे सत्याश्रयी तेवढी गोष्टीची रंगत वाढत जाते अशी एक रंगतदार शैली इंदिरा तेलंग यांच्या 'इनाचीं स्वप्नें' या पुस्तकात आढळते। छोट्या इनाची ही स्वप्नें रोजच्या प्रसंगा वरच आधारलेली सरी, पण रोज मोठ्यांच्या हातून सहजीं पण नकळत घडणाऱ्या गोष्टीमुळे बालमनावर जो अन्याय होतात याला नाजूक कुंचल्याने प्रकटरूप देणारा ठरतील उदाहरणार्थ, एका स्वप्नाची पार्श्वभूमि पुढीलप्रमाणें सांगितली गेली आहे

"आज सकाळपासूनच इनाचे बिनसलें होतें तोंड धुताना तिचा ब्रश सापडला नव्हता म्हणून पपाकडून तिनें रागावून घतलें होते. चहा पिताना तिला बिनकानाचा कप मिळाला होता व बिस्किटाचा कापरा मोडला होता. तिनें त्या दोन्ही वस्तू बदलून घ्यायचा प्रयत्न केला होता. थोडासहुत सत्याग्रहहि दाखवला होता, पण आईनें दुर्लक्ष केल्यामुळें मुकमुगत चहा पिण्यावेरीज गत्यंतर उरलें नव्हतें. पण खरा कहर झाला तो न्हाणीवरात ती आंघोळीला गेली होती तेव्हा घरात खूप धूर झाला होता. तिचा टॉवेल चुकून पपानी वापरला होता. पपाना आज लवकर नवाची गाडी पकडायची होती त्यामुळें तिच्याकडे लक्ष द्यायला कुणालाच आज फुरसत नव्हती अशा चिडलेल्या मन स्थितीतच तिनें घाईघाईनें दोन तांबे अंगावर पाणी घेतलें व तशीच ओलेत्यानें स्वैपाकघरात शिरून ती कपडे मागू लागली तव्हा तिच्या अंगावरून निथळणारे पाण्याचे ओघळ चुलीपर्यंत पोचले. मग अगदी अनपेक्षितपणें तिच्या पाठीत दोन रपाटे पडले व "आधी अंग पुस पाहू ! येवढी घोडी झाली तरी पण अक्कल काडीची नाहीं" असे गर्जून तिच्या आईनें तिला बाहेरच्या खोलीत ओढून आणलें, तिचें अंग ओल्याच टॉवेलाने पुसलें आणि कपड्यात पाहिलें तों तिचा झगा बेपत्ता ! कारण, तो काल धुण्यात न पडता तसाच पलंगाच्या कोपऱ्याला लोंबकळत होता मग अव्यवस्थितपणाबद्दल पुष्पांजली वाहून व वर चापटपोळ्याचा नैवेद्य दाखवून आई तेव्हाच स्वैपाकघरात गेली होती वास्तविक इनानें तो झगा आईकडे तुटलेलें बटन लावण्यासाठी काल दिला होता व आईनेंच मग लावीन म्हणून पलंगाच्या कोपऱ्यात टाकला होता पण या अन्यायाची दखल आज होणें शक्य नव्हतें. चुरगळलेल्या मनस्थितीत हुंदके देत देत इना आपल्या पलंगावर पडली व तिनें अश्रूना मोकळी वाट करून दिली '

(इनाचीं स्वप्नें–पृष्ठ १३–१४)

मोठ्या प्रसिद्ध लेखकांच्या गोष्टी आज निवड करून कुमारांसाठीं दिल्या जात आहेत, त्याबद्दलहि थोडासा विचार येथें प्रस्तुत आहे. यांतले कांहीं लेखक खरोखरच बालांसाठीं लिहितात, कुमारवाङ्मय म्हणून लिहितात, तेव्हां त्या गोष्टी खरोखरच सर्वसामान्य लेखकांच्या गोष्टींहून अनेकप्रकारें सरस ठरणाऱ्याच असतात. आचार्य प्र. के. अत्रे यांची 'ठोकळ्याचें चित्र' व श्री. वि. स. खांडेकर यांची 'फणसाचे कांटे' या प्रसिद्ध गोष्टी कोणता मुलगा विसरूं शकेल? कवि यशवंतांनीं अनंगवासंती वगैरे अद्‌भुतरम्य कथा ज्या सुरेख शैलीनें लिहिल्या, त्याच कमावलेल्या भाषेनें त्यांनीं मुलांसाठीं 'दरोडेखोर? छे, देवदूत' ही सामाजिक भावकथा लिहिली आहे. ती वर्णनदृष्ट्या मोठी चटका लावणारी ठरेल. पुढील कथन पहावें —

"त्यांचे (दरोडेखोरांचे) ते बुरख्यांच्या भोंकांतून चमकणारे डोळे पाहून कोणाचीहि भीतिनें गाळणच उडेल. त्यांनीं इशारा देऊन आपल्या घोड्यांना टांच मारतांच तीं चपळ घोडीं हरणासारखीं दौडत सुटलीं. त्यांची ती दौड पाहून कोणाला वाटावें कीं, पाखरेंच चाललीं आहेत. त्यांच्या मागोमाग त्याचे साथीदारहि निघाले. काळीकुट्ट रात्र, त्या रात्रींच्या काळोखावर मात करणारे त्यांचे तें काळे बुरखे आणि सगळ्या काळेपणाला लाजवणारी त्यांची काळीकुट्ट अंतःकरणें. त्यांचें डोळे पाहून आभाळांतील चांदण्याहि भेदरून गेल्या!" (पृष्ठ ७-८)

आणि ही गोष्ट केवळ वर्णनसुंदरच आहे असें नव्हे. तर ती मानवी दुष्टतेचें परिवर्तन वात्सल्यासारखी मूलभूत भावना नितळ सत्प्रवृत्तींत करूं शकते याचं चित्रणहि यांत प्रत्ययकारी झालें आहे. मुलांना अशा गोष्टी जरूर आवडतात.

अनेक प्रसिद्ध लेखकांनीं मुद्दाम लिहिलेल्या कुमारकथांचा संग्रह 'किशोर-कुंज' या नांवानें दोन भागांत प्रसिद्ध झाला आहे, त्यातहि सामाजिक आणि विविध प्रसंगकथा आहेत. व त्यातल्या कित्येक आकर्षकहि आहेत. अशीं संकलनें बहुसंख्य व्हायला हवींत, तेव्हां या क्षेत्रांतील ही कमतरता भरून निघेल! नामवंत लेखकांनीं आजवर खेळगडी, शालापत्रक, आनंद, कुमार यांतून अनेक चमकदार व सर्वस्वी कुमारोपयोगी अशा गोष्टी लिहिलेल्या आहेत व त्या इतिहासजमा खात्यांत दाखल होऊं पाहत आहेत. त्यांतील संशोधित व निवडक गोष्टींचे संग्रह कोणी खटपटीनें प्रसिद्ध केले तर हें रितें दालन निश्चित् समृद्ध दिसेल. श्री. वि. स. खांडेकरांच्या कांहीं निवडक गोष्टी 'पाकळ्या' या नांवानें कुमारांसाठीं प्रसिद्ध झाल्या आहेत, त्याहि मुलांची वाङ्मयीन रुचि वाढवणाऱ्या आहेत.

कादंबरीप्रमाणें या कथांतूनहि लेखनशैलीचे विविध प्रकार व भिन्न मनोहारिता पाहिली कीं, एखाद्या पुष्पवाटिकेंत शिरल्याप्रमाणें मन प्रसन्न होतें. कथेचा जीव एवढासा. तिच्यांत वर्णनाच्या विस्ताराला जागा नसते व व्यक्तिदर्शनाला पूर्ण

वाव नसतो. या अडचणींतूनहि अनेक लेखकांनीं आपलें वर्णन कौशल्य प्रकट केले आहे. कथनाच्या भिन्न तऱ्हांचाहि अविष्कार केला आहे.

श्री. उमाकांत ठोमरे यांच्या ' यशोधरे दार उघड ' या कथेंत एका पक्ष्याचं बंदिवासांतलं मानसचित्र मोठ्या हृद्यतेनें व्यक्त झालें आहे. पुढील संवाद त्याची कल्पना देईल.—

" चांगलं गावं, नाचावं, बरं वाटेल त्यानं तुझ तुलाच ! " यशोधरा म्हणत होती.

" कसं गाऊ ? गर्द झाडी, नितळ पाण्यात तुडुंब भरलेली तळीं, भाताचीं हिरवी लुसलुशीत शेतं, ही सारीं नजरेसमोर असल्यावांचून मला कस गातां येईल !"

या गोष्टींतून मूक वस्तूंना व प्राण्यांना वाचा व भावना हीं असतात हा केवळ कल्पकतेचाच भाग असला तरी त्याच्याशी संबंधित असलेली मुलेंमुलीं मात्र वास्तवसृष्टींतलींच आहेत, व म्हणूनच याना महत्त्व.

कथाकथनाची आणखी एक स्वतंत्र तऱ्हा श्री गोपीनाथ तळवलकर यानीं 'निंबोणीच्या झाडाखालीं' यांत प्रकट केली आहे. लेखकाची बालांच्या मेळाव्यांत बसून गोष्ट सांगत असल्याची भूमिका तर यांत आहेच, पण नुस्ती ही गोष्ट सांगून लेखकाचें समाधान होत नाहीं. प्रथम गोष्ट, नंतर मुलाच्या शंका व प्रश्न व नंतर त्यांची उत्तरें हाहि एक उपक्रम यांत आहे.

असा आहे हा एकंदर बालकथाविश्वाचा पसारा ! कथात्मक वाङ्मय म्हणजेच प्रमुख बालवाङ्मय अशीहि व्याख्या करण्याजोगें याचें बालजगांत महत्त्व असल्या-मुळेंच कथांचे हे विविध प्रकार बऱ्याच विस्तारानें येथें नमूद केले आहेत. त्यावरून आजच्या बालकथेचा वेग, प्रगतीची दिशा, व औचित्य या सर्वांची रसिक व अभ्यासू वाचकांना नीट कल्पना येईल.

## नाट्यकथा

मराठी बालनाट्याला मदतशील ठरणारा असा नाट्यकथाचाहि एक छोटासा प्रवाह बालसाहित्यांत आज दृष्टीस पडतो. नाटक म्हटलें तरी तें कथानकावरच आधारित असावयाचें ना ? आणि हें कथानक जर मुळातच आकर्षक असलें तर त्याला कथारूप दिल्यानें वेगळ्या घडाईचा पण रंजक असा एक साहित्यप्रकार होऊं शकतो, हें जाणून अनेक लेखकांनीं मूळ नाट्यवस्तूच्या कथा, दीर्घकथा, कादंबऱ्या बनवल्या आहेत. ही पद्धत वाचकाना उपकारकहि ठरणारीच. प्रत्येक नाटक प्रत्येक मनुष्य पाहतोच व वाचतोच असें कोठें आहे ? त्या दृष्टीनें नाट्यकथानकाची ओळख थोडक्यांत या नाट्यकथा करून देतात व प्रत्यक्ष नाटकें पाहतां आलीं

नाहींत तरी त्यांच्या कथावस्तूचा हा वाङ्मयीन परिचय वाचकांच्या अभिरुचीला पात्र ठरूं शकतो.

प्रथम या वाङमयप्रकारास चालना मिळाली ती श्री. नी. शं. नवरे यांच्या संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें १९२८ सालीं लिहिल्या गेलेल्या पुस्तकानें. यावेळीं शेक्सपियरच्या सर्व नाटकांचीं गोष्टीरूप कथानकें प्रौढ वाचकांकरितां एकत्र करण्यांत आलीं होतींच. त्यावरून ही कल्पना सुचल्याचें लेखकानें नमूद केलें आहे. अभिज्ञानशाकुंतल, विक्रमोर्वशीय, मृच्छकटिक, स्वप्नवासवदत्त, मुद्राराक्षस व उत्तररामचरित, प्रतिमा, नागानंद इत्यादि नाट्यकथा या दोन्ही भागांत आहेत. नाट्य म्हटलें तरी तें कथानकाच्याच पायावर आधारित असें संवादमंदिर असतें. अर्थात् नाट्य परिचयांत या दोन्ही गोष्टींचा संगम दिसावा हें साहजिकच. आपल्याकडील संस्कृतींतहि महाकवि कालिदास, बाण, शूद्रक, भवभूति असे थोर गुणांचे नाटककार होऊन गेले. त्यांच्या नाट्यकृतींच्या ह्या साऱ्या कथा. विद्यार्थ्यांसाठींच या प्रामुख्यानें लिहिल्या गेल्यानें भाषेंत सोपेपणा व रंजकता आलेली आहेच. शिवाय, मूळ कथानकेंच मुळीं गुंतागुंतीचीं रहस्यमय तेव्हां एकप्रकारची उत्कटताहि ह्या कथाकथनांत उतरलेली दिसते. मालविकाग्निमित्र व अभिज्ञानशाकुंतल हीं कालिदासाचीं कथानकें नाट्यप्रसंगपूर्ण अशींच आहेत. या कथाकथनांत संवादांना प्राधान्य नाहीं. तें आहे गोष्टीच्या सुसूत्रतेला. जरूर तेथें भाषणें थोडीशी दिलीं आहेत पण तीं मुळांतल्या संभाषणाच्या रूपांतर-स्वरूपांत नाहींत.

मूळ नाटकांत संवादाची बहार पाहण्यासारखीच असावयाची. परंतु त्याची गोष्ट करावयाची म्हटलें कीं इतके संवाद घालणें कठीणच. तथापि कांहीं हृद्य संवाद प्रसंगपरत्वें आलेले मूळ नाट्यलेखकाचें कौशल्य सूचित करणारेच दिसतात. उदाहरणार्थ, प्रतिमा या भासाच्या नाट्यकथेंत पुढील हृद्य प्रसंग वर्णनीय ठरेल. दशरथ वधानंतर भरत मातुलगृहाहून आयोध्येस आल्यावर त्याला सर्व रामायण कळलें व फार खेद झाला. "राज्याभिषेक आतां आमच्या ह्या मातुश्रींनाच करा," असें संतापानें त्यानें सांगितलें व रामभेटीला तो अरण्यांत गेला- तेव्हांचा संवाद पाहा- भरतानें अनुतापानें सुमंत्राला सांगितलें-

भरत—राज्यलोभी कैकयीचा पुत्र भरत आला आहे.

सुमंत्र प्रधान—वडील माणसांसंबंधीं असें बोलणें बरें नाहीं.

भरत—खरेंच. दुसऱ्याच्या दोषाचा आपण उच्चार कशाला करा. तर मग असें सांग कीं, इक्ष्वाकुकुलाला कलंक लावणारा भरत आला आहे.

सुमंत्राला हेंहि सांगवेना. तेव्हां भरत म्हणाला—

भरत—बरं तर, मी स्वतःच मी आल्याचें कळवितों. कारण ब्रम्हमानें स्वतःच स्वतःच्या नांवाचा उच्चार करायचा असतो.

असें म्हणून तो स्वतः पुढें होऊन म्हणाला—

एक कृतघ्न व निर्दय असा रामाचा भक्त दर्शनासाठीं आला आहे. त्यानें आंत यावें काय ?

(संस्कृत नाट्यकथानकें भाग २ पृष्ठ २८-२९)

या शब्दांतून भरताचा वैताग व रामाच्या भेटीची इच्छा दोन्हीहि किती उत्कटतेनें प्रकटलीं आहेत ! वर्णनेंहि अशीच मूळ सौंदर्यास धक्का न लावतां सोप्या भाषेंत आलीं आहेत.

अनेक पूर्वकालीन नाटककारांच्या कलाकृतींचा एकत्र परिचय ही एक पद्धत. तशीच एकेका नाटककाराच्या सर्व कलाकृतींबद्दल एक स्वतंत्र पुस्तक ही दुसरी पद्धत. दोन्ही तऱ्हेच्या नाट्यकथा रंजनप्रधानच होतात. या दुसऱ्या पद्धतीचा अविष्कार बा. द. गांगल यांनी 'सुलभ कालिदासकथा' या पुस्तकांत केला आहे, तोहि कुमारांना आवडणाराच आहे. ( नाट्यकथाबरोबर यांत कालिदासाच्या काव्यकथाहि आहेत एवढेंच ! ) यांतहि संवादप्रधानता नाहीं. मात्र कथनांत मूळचें वर्णन पुष्कळांशीं विस्तारानें व यथातथ्य आलें व तें संस्कृत न जाणणाऱ्या बाल-वाचकांना कालिदासाच्या वर्णनशैलीचा परिचय घडवणारें आहे. शृंगारप्रधानता हाहि या सर्व नाटकांचा एक विशेष होताच. पण नाट्यकथांतून मात्र त्याचा आविष्कार संयमानें झाला आहे हेंहि इष्टच म्हटलें पाहिजे.

या दोन्ही प्रकाराहून नाट्यकथानकें लिहिण्याचा आणखी एक थोडासा भिन्न प्रकार म्हणजे दरेक नाट्यकथानकावर विस्तृत दीर्घकथा लिहिण्याचा. आजकाल असे अनेक प्रयत्न होत आहेत. त्यांत चारुमती भागवत याचा अगत्यानें उल्लेख करायला हवा. त्यांनीं *शाकुंतल, विक्रमोर्वशीय, उत्तररामचरित्र, मुद्राराक्षस,* वेणीसंहार व मृच्छकटिक अशीं स्वतंत्र पुस्तकेंच या नाट्यकथानकांवरून लिहिलीं आहेत. मूळ संवादांना वर्णनांबरोबरच यांत थोडीबहुत अधिक स्वतंत्रता मिळालेली दिसते. चारुमतीबाईंचें वैशिष्ट्य असें कीं, या थोड्याशाच मूळ संवादांतील सुंदर उपमाउपमानें व सूक्ष्म वर्णनांची बहार यांचा त्यांनीं संक्षेप केलेला नाहीं. उदाहरणार्थ, विक्रमोर्वशीयमधील पुढील राजा पुरुरवा व त्याचा मित्र विदूषक यांचा हा संवाद पहा—

विदूषक—मित्रा वसंतऋतूच्या आगमनामुळें प्रमदवनाची शोभा पाहा किती अवर्णनीय दिसत आहे !

राजा—होय, खरं आहे, पावलोपावलीं ती मला दिसत आहे. युवतींच्या नखाप्रमाणें लालसर दिसणारीं ही कोरांटीचीं फुलें अग्रभागीं फिकट लाल असून दोन्ही बाजूला श्यामरंगाची आहेत. हीं अशोकाचीं मोहक आरक्त फुलं उमलण्याच्या बेतांत आहेत आणि फिक्कट पिवळ्या दिसणाऱ्या आम्रवृक्षाच्या ह्या मंजिरीवर नुकतेच पराग दिसू लागले आहेत, त्यामुळें वाटतें कीं, वसंतलक्ष्मी बाल्याचा मुग्धपणा सोडून यौवनांत पदार्पण करीत आहे.

विदूषक—आणि तिकडे बघ. माधवीलतेच्या मंडपावर फुलं फुललीं आहेत आणि त्या मंडपाखाली तर बघ, ती शिला आसन म्हणून ठेवली असून भ्रमरांच्या पायांच्या आघातांनीं त्या शिलेवर माधवीलतेचीं फुलं पडलीं आहेत. हा लतामडप या सर्व वस्तू घेऊन जणुं कांहीं तुझं स्वागत करण्याची वाटच पाहत आहेत असं वाटतं.

मूळ संवादांतील काव्यात्मतेचा हा परिचय जाणत्या कुमारांना निश्चित् लोभस वाटणारा आहे।

कुमारोपायन ठरणाऱ्या ह्या कांहीशा मोठ्या दीर्घकथांच्या जोडीला बालवाचकांनाहि आवडतील अशा सोप्या शब्दांत संस्कृत नाट्यांवरच्या लहान लहान संक्षिप्त कथाहि प्रसिद्ध झालेल्या आहेत. 'सोन्याची गाडी' ही मृच्छकटिकाची छोटी कथा श्री. भवानीशंकर पंडित यांनीं चांगल्या आकर्षक भाषेंत लिहिलीं आहे व श्री. म. का. कारखानीस यांनीं वत्सराज उदयनावर चारपांच जीं नाटकें लिहिलीं गेलीं त्या आधारें 'चतुर प्रधान व गुणी राजा' ही कथा व भवभूतीच्या मालती-माधव नाटकाची कथा त्याच नावानें प्रसिद्ध केली आहे. 'हरवलेली अंगठी' ही शाकुंतलकथा रा. स. जोशी यांनीं लिहिली आहे. आणखीहि अशाच संक्षिप्त कथा अनेकांनीं लिहिल्या. यांत नाट्यापेक्षां कथात्मकतेचाच भाग ज्यास्त आहे व लहानपणीं मुलांना तोच अधिक आवडतो.

अगदीं अलिकडे विशेष आकर्षक पद्धतीनें श्री. पु. रा. लेले यांनींहि नाट्य-कथा बालवाचकांसाठीं लिहिल्या. मात्र त्याची क्षेत्रमर्यादा फक्त प्राचीन संस्कृत नाटकांपुरतीच पर्याप्त नव्हती; तर ज्यांचे प्रयोग मराठी रंगभूमीवर गाजले अशा पौराणिक, सामाजिक, ऐतिहासिक मध्ययुगीन सर्व प्रकारच्या नाटकाच्या कथा त्यांनीं लिहिल्या, हें वैशिष्ट्य उल्लेखनीय ठरावें. दुसरें असें कीं, आकाशवाणीवर एकादें प्रसंगचित्रण सादर करावें तशा पद्धतीनें—म्हणजे थोडें निवेदन, मग प्रमुख

संवाद व मधूनमधून त्यांतील प्रमुख पदेंहि उध्दृत केलेलीं, अशा सरंजामासहित या कथा साहित्यक्षेत्रांत प्रविष्ट झाल्यानें मूळचे नाट्यगुण अधिकच ठळक झाल्यासारखे वाटतात. शिवाय ह्या नाट्यकथांना चित्रालंकारहि प्राप्त झालेले आणि निवेदन-शैलीहि सोपी–अगदीं साधीं, त्यामुळें त्या बालप्रिय व्हाव्या यांत नवल नाहीं. या पद्धतीनें मृच्छकटिक, शारदा, सौभद्र, मूकनायक, भाऊबंदकी, वधूपरिक्षा इत्यादि 'नाटकांच्या गोष्टी' लिहिल्या गेल्या व तद्नुषंगानें तत्कालिन सुप्रसिद्ध नाटककर्ते व तेव्हांची सामाजिक परिस्थिति यांचीहि थोडक्यांत माहिती दिली गेली.

ऐतिहासिक नाटकांतून संवादांनाहि तलवारीसारखी धार चढते. त्यांतून लेखकहि कसलेल्या कलमाचा असला म्हणजे तर मूर्त इतिहासच जणूं सजीव होऊन अक्षरशः "बोलू लागल्याचा" भास होतो. अशा जोमपूर्ण नाटकांत कै. कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर यांच्या भाऊबंदकी नाटकाचा अंतर्भाव होतो. याची कथा तर श्री. पु. रा. लेले यांनीं ओजस्वी भाषेंत दिली आहेच पण मूळ संवादहि कोठेंकोठें अगदीं जसेच्या तसे दिले आहेत. त्यांनीं या नाट्यकथेवर ऐतिहासिकाचें तेज चढविलेलें दिसेल. उदाहरणार्थ, पुढील रोमांचक भाषणें पाहा—

सुमेरसिंग—महाराजांच्या ह्या शत्रूला कैद करून आणले आहे. सरकारचा जसा हुकूम होईल तशी त्याची व्यवस्था लावून टाकूं.

नारायणराव—काका, काका, मला ही पेशव्यांची गादी नको. राज्य नको, कांहीं नको. सिंहगडावर, पुरंदरावर, शिवनेरीवर, काका, तुम्हांला वाटेल त्या किल्ल्यावर अधारकोठडींत मला ठेवा. कोंड्याच्या भाकरीच्या तुकड्याशिवाय मी आपणाशीं कांहीं मागणार नाहीं. काका, कसंहि करून माझे प्राण वांचवा. काका, मला मारण्याचा हुकूम करूं नका.

आनंदीबाई—मी किंवा हा पोरटा, यापैकीं कोणातरी एकाचा प्राण आपण यावेळीं घेतला पाहिजे. माझ्या शरिरात खेळणारा जीव हा माझा प्राण नसून आपल्या हातांतील लेखी हुकूम माझा खरा प्राण आहे. मी जिवंत राहवं अशी आपली इच्छा असेल तर तो तेवढा माझा प्राण मला परत द्या.

नारायणराव—काका, काका, कसंहि करून माझे प्राण वांचवा. काका...

सुमेरसिंग—सरकार, लवकर काय तो हुकूम व्हावा.

तुळोजी०—सांपडलेल्या सापाला शहाणे जिवंत सोडीत नसतात.

दादा०—विषारी दात पाडल्यावर साप गारोड्याचं खेळणं होतो.

आनंदी०—मानवी सापाचे दांत अन् प्राण भिन्न नसतात. दांत पाडूं पाहणाराला त्याचा प्राणच घ्यावा लागतो. तुम्हांला जर त्या

आपला जिवंत ठेवायचं असेल तर तुमच्या हातांनीं, नाहीं माझ्या हातांनीं, या कट्यारीनें मी माझा प्राण......

दादा०—आनंदी, हा तुझा प्राण मी तुला परत देतो. नारायणा, तुला जर तुझे प्राण पाहिजे असतील तर हिच्यापासून ते मागून घे.

असे हे संवाद हेच नाटकाचे खरे मूल्यवान घटक—ते या पुस्तकांतून घातल्यानें त्याची मौलिकता वाढली आहे. अर्धाशतकापूर्वीच्या काळांत किर्लोस्कर देवल, कोल्हटकर इत्यादि प्रख्यात नाटककार होऊन गेले. त्यांच्याहि सौभद्र, शारदा, मूकनायक व वधूपरिक्षा इत्यादि नाटकांचा परिचय याच संवादकथांनीं श्री. पु. रा. लेले यांनी घडवला आहे. ही प्रथा इतकी उपयुक्त आहे कीं, त्यांनीं आजघडीच्या अवस्थेपर्यंतच्या नाटकांचेंहि रसग्रहण त्यांनीं करावयास पाहिजे असा आग्रह धरावासा वाटतो. नाट्यसंवादयुक्त निवेदन किती उत्तम करतां येते याचा हा नमुनाच. असाच दुसरा रसग्रहणाचा सरस नमुना श्री. दा. न. शिखरे यांच्या नाटककार भाग १–२ या पुस्तकांतहि सांपडतो. या दोन्ही भागांत मिळून जुन्या नव्या दहा नाटककारांचें जीवनवृत्त दिलें आहे. शिवाय नाटकांतील प्रवेशांचें वैशिष्ठ्य व सौंदर्यस्थळें यांचीं उदाहरणें देऊन माहिती सांगितली आहे व केवळ संवादांचेंच सौंदर्य नजरेस आणलें असेंहि नव्हे तर त्यातलें संगीत व रागदारी, तत्कालिन राजकीय परिस्थितीचें साम्यरूप वाटणारें वर्णन, स्वभावरेखनाची कुशलता व एकंदर प्रत्ययकारिता याचीहि सुसंगत छाननी त्यांनीं विद्यार्थ्यांपुढें मांडली आहे. विशेष गोष्ट अशी कीं, कै. गडकरी, श्री. मामा वरेरकर, श्री. मो. ग. रांगणेकरप्रभृति अत्याधुनिक नाटककारांच्या कलाकृतींचेंहि रसग्रहण त्यांनीं चोखंदळपणें व रसिक वृत्तीनें केलें आहे. मुलांना नाटककारांचा सर्वांगीण परिचय त्यांनीं घडवला आहे.

शेवटीं, कुमारोचित नाट्यकथाच्या सदर्भात आणखी एक नांव अवश्य घ्यावें लागेल तें कै. वि. द. साठे यांचें ! यांनीं मराठी नाट्यकथेचा एवढा सखोल विचार केला आहे कीं, नाट्यकथालेखनाचीं सर्व तंत्रें, गुणदोष आणि रसग्रहण यांबद्दल 'मराठी नाट्यकथा' हा त्यांचा ३०९ पृष्ठांचा ग्रंथ अभ्यासूंना मार्गदर्शकच ठरेल ! यांत नाट्याचे नवेजुने प्रकार व गाजलेल्या नाटकांच्या कालानुक्रमें येणाऱ्या नाट्यकथा–कोठें कोठें मूळ संवादांसह दिलेल्या आहेत. एवढेंच नव्हें तर कथनौघांत आजच्या नाट्यकलेची भरती–ओहटी, नवप्रवाह, त्यांची कारणें इत्यादि विवेचनहि यांत सहजतेनें आलें आहे. आणि हें प्रौढ विद्यार्थ्यांसाठीं आवर्जून लिहिलें गेलेलें पुस्तक आहे ही तर सगळ्यांत उल्लेखनीय गोष्ट आहे ! सौभद्रापासून–माझें घर पर्यंतच्या अकरा नाटकांच्या कथा व संवाद यांत आहेत. कथेची वर्णनशैलीहि पाहण्याजोगी आहे. उदाहरणार्थ, कीचकवध नाटकांतील हा एक प्रसंग पाहा —

मध्यरात्रीं द्रौपदीला भैरवाच्या देवळांत एकटीला सोडण्यांत आलें आहे. दुष्ट कीचक तेथें आलेला आहे. या संकटांतून सोडवण्याकरतां द्रौपदी भैरवाची प्रार्थना करीत आहे हा प्रवेश. याचें वर्णन साठे यांनीं केलें आहे तें असे—

"कीचक—द्रौपदी, माझ्या ताब्यांतून तुला सोडवण्याची या भैरवाची काय प्राज्ञा आहे ! माझ्या शक्तीचा आतांच चमत्कार पाहयचा असल्यास मला आज्ञा कर. डाव्या हातानें याची शेंडी धरतों आणि उजव्या हातानें एक बुक्की याच्या छाताडावर मारून याच्या धडाचें चूर्ण करून निराधार झालेल्या या भैरवाचें शीर तुझ्या पायावर वाहतो. सैरंध्री बघच आतां चमत्कार !"

असें म्हणून कीचकानें खरोखरच आपली मूठ त्वेषानें वर उगारून भैरवाच्या छातीजवळ नेली. परंतु ती मूठ भैरवाचे छातींत बसण्यापूर्वीच भैरवाच्या त्या जड मूर्तीकडून ती परच्यावर झेलली गेली. इतका वेळ पाषाणवत् असलेली ती भैरवाची मूर्ति निमिषार्धांत सचेतन झाली व तिनें कीचकाला अशी एक जोराची गचांडी दिली कीं, तो दोनतीन कोलांटया खाऊन समोरच्या भिंतीवर आदळला. स्वतःला कसेंबसें सावरून कीचक भैरवाच्या मूर्तीकडे आश्चर्यानें पाहूं लागला तों त्या मूर्तीच्या मुखांतून पुढील शब्द कानावर पडले. — कीचका ! धुंघट्या, तुझी छाती असली तर भीमाकडे पाहा. वल्लव म्हणतात तो हा मी. भीम म्हणतात तो हा मीच. तुझ्या मानगुटीवर बसून तुझीं हाडं फोडण्यास तयार आहे. बोल आतां."

हें वर्णन ह्या सर्व प्रसंगाला उचितच नव्हे काय ? व संवादाला साजेल असेंच हें निवेदनहि समर्थ शब्दांचें नव्हे काय ?

नाट्यकथा व नाटक यांचा दुवा ठरणारें 'रंगदेवता' या नांवाचें एक चांगलें पुस्तक श्री. वि. स. खांडेकर यांनीं लिहिलें आहे. यांत प्रसिद्ध नाटककारांच्या नाटकांतील दहा प्रतिनिधिक नाट्यप्रवेश दिलेले असून दरेक नाटककाराचीं वैशिष्ट्यें, दृष्टिकोन व लेखनगुण हे दर प्रवेशारंभीं विशद केले आहेत. शेवटीं अभ्यासप्रश्नहि असल्यानें हें पुस्तक खास कुमार-विद्यार्थी वर्गासाठींच लिहिलें गेलें असल्याची ओळख पटते. मात्र त्या दृष्टीनें प्रस्तावना व निवेदन हें प्रौढभाषी आहे.

असें आहे हें नाट्यकथेचें दालन. नाट्य म्हणजे तें संवादरूपानेंच प्रकट व्हावयास हवें. पण तो आग्रह कुमारांसाठीं बाजूस ठेवून नाटकानें कथेचा आग्रह केला व ती बालसन्मुख आली. प्रसिद्ध नाटकांचा वाङ्मयीन परिचय व त्यांतील लेखनगुणांचा रसास्वाद यांची आवड उत्पन्न करण्याचें तिचें कार्य व तें ह्या सर्वच नाट्यकथालेखकांनीं एकविचारानें पार पाडलें आहे हें कोण नाकबूल करील !

# बालनाट्य

बालसाहित्याच्या ललितशाखेंत नाटकाचा समावेश अगत्यानें केला पाहिजे मुलांना कथाविभाग जसा अतीव प्रिय त्याप्रमाणेंच नाट्य हेंहि 'बालानाम् प्रिय' असेंच उपानय. त्याची प्रत्ययकारिता एक प्रकारें कथाकादंबरीहूनहि अधिकच म्हणावी लागेल. कारण, नाटकाला प्रायोगिक मूल्यें असतात तीं नाटकाची रगत वाढवतात व प्रतिपाद्य विषय मनात अधिक प्रभावीपणें ठसवू शकतात. तशी साधनें कादबरी व कथेला कोठें आहेत? खास मुलांसाठीं नाटकें लिहिण्याची प्रथा अलिकडचीच म्हणावी लागते, परंतु त्याची पूर्वतयारी म्हणून संवादात्मक लेख मात्र बालवाङ्मयाच्या प्रारंभकालातच लिहिले गेलेले आहेत. 'बालमित्र 'मध्यें छत्र्यानीं पुष्कळसे संवाद लिहिले आहेत. त्या कालच्या बालसाहित्याच्या त्रुटि लक्षात घेऊन जर ह्या संवादाकडे पाहिलें तर तीं भाषणें बरींच चागलीं वाटतात एवढेंच नव्हे तर हे संवाद प्रयोगरूप व्हावे अशीहि छत्र्यानीं इच्छा प्रकट केली आहे. प्रस्तावनेंत ते म्हणतात—

"बहुतेक गोष्टींचे, मुलाचे ठायीं, अनुभवहि घेऊन पाहिले आहेत. कोठें कोठें नाटकें योजिलीं आहेत तेणेंकरून त्यास हावभावयुक्त निभाडतेनें चौघात बोलता यावें. लज्जेनें तोंड मुरडतात तें मुरडू नये. पात्रात आईबापासहि मिश्रित केली आहेत, तेणेंकरून मुलाचे आनद भोगावयास त्यासहि सवड दिली आहे."

हे संवाद ठोटे छोटे नाहींत. त्याना एकाकिका म्हटलें तरी चालेल, एवढ्या व्याप्तीचे आहेत. शाळेंतल्या मुलाना करता यावेत असेच विषय साध्या व सोप्या भाषेंत माडलेले आढळतात. या भाषेची कल्पना पुढील 'लपडाव' या उताऱ्यावरून येईल—

मध्यरात्रीं द्रौपदीला भैरवाच्या देवळांत एकटीला सोडण्यांत आलें आहे. दुष्ट कीचक तेथें आलेला आहे. या संकटांतून सोडवण्याकरतां द्रौपदी भैरवाची प्रार्थना करीत आहे हा प्रवेश. याचें वर्णन साठे यांनीं केलें आहे तें असे—

"कीचक—द्रौपदी, माझ्या तावडींतून तुला सोडवण्याची या भैरवाची काय प्राज्ञा आहे ? माझ्या शक्तीचा आत्तांच चमत्कार पाहयचा असल्यास मला आज्ञा कर. डाव्या हातानें याची शेंडी धरतों आणि उजव्या हातानें एक बुक्की याच्या छाताडावर मारून याच्या धडाचें चूर्ण करून निराधार झालेल्या या भैरवाचें शीर तुझ्या पायावर वाहतो. सैरंध्री बघच आतां चमत्कार !"

असें म्हणून कीचकानें खरोखरच आपली मूठ त्वेषानें वर उगारून भैरवाच्या छातीजवळ नेली. परंतु ती मूठ भैरवाचे छातीत बसण्यापूर्वींच भैरवाच्या त्या जड मूर्तींकडून ती वरच्यावर झेलली गेली. इतका वेळ पाषाणावत् असलेली ती भैरवाची मूर्ति निमिषार्धात सचेतन झाली व तिनें कीचकाला अशी एक जोराची गचांडी दिली कीं, तो दोनतीन कोलांटया खाऊन समोरच्या भिंतीवर आदळला. स्वतःला कसेंबसें सावरून कीचक भैरवाच्या मूर्तीकडे आश्चर्यानें पाहूं लागला तों त्या मूर्तीच्या मुखातून पुढील शब्द कानावर पडले. — कीचका ! धुंघटर्या, तुझी छाती असली तर भीमाकडे पाहा. बल्लव म्हणतात तो हा मी. भीम म्हणतात तो हा मीच. तुझ्या मानगुटीवर बसून तुझी हाडं फोडण्यास तयार आहे. बोल आतां. "

हें वर्णन ह्या सर्व प्रसंगाला उचितच नव्हे काय ? व संवादाला साजेल असेंच हें निवेदनहि समर्थ शब्दांचें नव्हे काय ?

नाट्यकथा व नाटक यांचा दुवा ठरणारें 'रंगदेवता' या नांवाचें एक चांगलें पुस्तक श्री. वि. स. खांडेकर यांनी लिहिलें आहे. यांत प्रसिद्ध नाटककारांच्या नाटकांतील दहा प्रतिनिधिक नाट्यप्रवेश दिलेले असून दरेक नाटककाराचीं वैशिष्टयें, दृष्टिकोन व लेखनगुण हे दर प्रवेशारंभीं विशद केले आहेत. शेवटीं अभ्यासप्रश्नहि असल्यानें हें पुस्तक खास कुमार–विद्यार्थी वर्गासाठींच लिहिलें गेलें असल्याची ओळख पटते. मात्र त्या दृष्टीनें प्रस्तावना व निवेदन हें प्रौढभाषी आहे.

असें आहे हें नाट्यकथेचें दालन. नाट्य म्हणजे तें संवादरूपानेंच प्रकट व्हावयास हवें. पण तो आग्रह कुमारांसाठीं बाजूस ठेवून नाटकानें कथेचा आग्रह केला व ती बालसन्मुख आली. प्रसिद्ध नाटकांचा वाङ्मयीन परिचय व त्यांतील लेखनगुणांचा रसास्वाद यांची आवड उत्पन्न करण्याचें तिचें कार्य व तें ह्या सर्वच नाट्यकथालेखकांनीं एकविचारानें पार पाडलें आहे हें कोण नाकबूल करील !

●●●

# बालनाट्य

बालसाहित्याच्या ललितशाखेंत नाटकांचा समावेश अगत्यानें केला पाहिजे. मुलांना कथाविभाग जसा अतीव प्रिय त्याप्रमाणेंच नाट्य हेंहि 'बालानाम् प्रिय' असेंच उपानय. त्याची प्रत्ययकारिता एक प्रकारें कथाकादंबरीहूनहि अधिकच म्हणावी लागेल. कारण, नाटकाला प्रायोगिक मूल्यें असतात. तीं नाटकांची रंगत वाढवतात व प्रतिपाद्य विषय मनात अधिक प्रभावीपणें ठसवूं शकतात. तशी साधनें कादंबरी व कथेला कोठें आहेत? खास मुलासाठी नाटकें लिहिण्याची प्रथा अलिकडचीच म्हणावी लागते; परंतु त्याची पूर्वतयारी म्हणून संवादात्मक लेख मात्र बालवाङ्मयाच्या प्रारंभकालांतच लिहिले गेलेले आहेत. 'बालमित्र'मध्यें छत्र्यांनीं पुष्कळसे संवाद लिहिले आहेत. त्या कालच्या बालसाहित्याच्या त्रुटि लक्षांत घेऊन जर ह्या संवादाकडे पाहिलें तर ती भाषणें बरींच चांगलीं वाटतात. एवढेंच नव्हे तर हे संवाद प्रयोगरूप व्हावे अशीहि छत्र्यांनीं इच्छा प्रकट केली आहे. प्रस्तावनेंत ते म्हणतात—

"बहुतेक गोष्टींचे, मुलांचे ठायीं, अनुभवहि घेऊन पाहिले आहेत. कोठें कोठें नाटकें योजिलीं आहेत. तेणेंकरून त्यांस हावभावयुक्त निर्भीडतेनें चौघांत बोलता यावें. लज्जेनें तोंड मुरडतात तें मुरडूं नये. पात्रात आईबापांसहि मिश्रित केली आहेत; तेणेंकरून मुलांचे आनंद भोगावयास त्यांसहि सवड दिली आहे."

हे संवाद छोटे छोटे नाहींत. त्याना एकांकिका म्हटलें तरी चालेल, एवढ्या व्याप्तीचे आहेत. शाळेंतल्या मुलांना करतां यावेत असेच विषय साध्या व सोप्या भाषेंत मांडलेले आढळतात. या भाषेची कल्पना पुढील 'लपडाव' या उताऱ्यावरून येईल—

"तात्या—( शिवराम व दुर्गा यांना पाहून नमतो ) मी तुमचा सेवक आहे. मजवर दया असावी. तुमचे रावजींनी मला तुम्हांमध्यें खेळावयाची आज्ञा दिली आहे म्हणून मी आजचा दिवस तुम्हांमध्यें खेळेन.

दुर्गा—मी घरधनीन आहे, म्हणून तुला ह्या सर्व पाहुण्यांची वेगवेगळालीं नांवें सांगितलीं पाहिजेत. हिचें नांव कावेरीबाई.

तात्या—अततत, हें नांव ऐकून मला फार आनंद झाला.

दुर्गा—आणि याचें नांव—

तात्या—आहा ! याची माझी तर पक्की ओळख आहे. ( भीमाकडे बोट दाखवून ) हिचें नांव काय बरें असेल ? हिचें नांव साडेभावार्थीबाई असेल. ही फार भोळी दिसते. हिला लोकांस वाकोल्या दाखवतां फार चांगल्या येतात. ( मग खोलींत लंगडशाही घालीत घालीत मनीकडे बोट दाखवून म्हणतो. ) हा तर लंगडशहा बादशहा. ही माराचे भयानें पळतां पळतां पडली आणि पाय मोडला म्हणून ही रोज रोज लंगडशाई खेळते. ( वडिल पारख्याकडे बोट दाखवून म्हणतो ) हे तर मोटे दोड्डाचार्य, आम्हां गरीबांकडे पहात देखील नाहींत. ( धाकट्या पारख्याकडे बोट दाखवून ) ह्याचें नाव तर उघडच आहे. ह्याचे आईनें ह्याची लहानपणीं जीभ चांगली ओढली नाहीं म्हणून हा तुतुतु करितो आणि ह्याजवरून तोत्रोपंत नांव पावला !

शिवराम—तूं लोकांना नांवें ठेवण्याविषयीं इतका चतुर आहेस तर त्वा मला काय नांव दिलें ?

तात्या —मी अजून तुला पुरता जाणत नाहीं; पण थोड्याच अवकाशांत तुझेहि गुण बाहेर काढीन.

दुर्गा —तात्या, माझें बोलणें तुला फार कडू लागेल. मी जर तुझे गुण काढले तर कसें होईल ? ईश्वराचे इच्छेकरून जी कोणाचे शरीरीं स्वाभाविक खोड आहे ती काढून त्याची थट्टा करावी हें चांगलें नव्हे."

बालमित्र भाग २ पृष्ठ १४१–४२

या संवादांत नेपथ्याचा पसारा बिलकुल नाहीं. भाषेंत कांहींसे जुने वळण दिसणें अपरिहार्यच; पण बोजडपणा कोठेंहि नाहीं. शिवाय हे संवाद नाट्यगुणांनीं युक्त आढळतात. कथावस्तुहि बालायोग्यच निवडलेल्या आहेत. अर्थात्, याचें पुष्कळसें श्रेय बालमित्राचे मूळचे फ्रेंच लेखक बर्कीन यांचेकडे जातें; तथापि अनुवादहि सरस उतरले आहेत.

बालसंवादाची ही प्रथा याप्रमाणें अगदीं जुनी असली तरी मध्यें कित्येक वर्षे तिला पोषण मिळालें नाहीं; परंतु या उपेक्षेची पुढें भरपाई झाली व याच सुमारास कै. राम ग. गडकरी यांची सकाळचा अभ्यास व गुपित हीं दोन प्रहसनें, दोन चुटके या नांवानें प्रसिद्ध झालीं; तीं खऱ्या अर्थानें विद्यार्थ्यांचें स्वभावदर्शन करणारीं व चुरचुरीत अशीं होतीं. विनोदी तरच होतीच. आनंद मासिकांतून हीं प्रसिद्धी झालीं होती. यानंतर शिरगोपीकरांची 'बालरंगभूमिवर' होणारी कांहीं बाल नाटकें अस्तित्वांत आलीं. हीं नाटकें करणारी कंपनी 'आनंद संगीत मंडळी' या नांवाची होती. व ती गोकुळचा चोर, शिरगोपीकरांचे बालशिवाजी इ. नाटकें करीत असे. मात्र हीं नाटकें नांवाचीच 'बाल' होती. उदा. 'बाल-शिवाजी' नाटकांतील भाषणें मोठ्या नाटकांत शोभावीं अशीं प्रौढ व प्रणयीवृत्तीची दिसतात. पण मुलांनीं नाटक करणें या प्रथेला ती एक चालना होती, एवढेंच त्याचें महत्त्व! कै. वासुदेव गोविंद आपटे यांनीं नाट्यभारत व नाट्यरामायण ही दोन पुस्तकें १९१३–१४ सालीं प्रसिद्ध केलीं. मात्र हे एकाच विषयावरचें एकच नाटक नसून ते वेगवेगळे संवाद होते. पौराणिक व्यक्तीचे संवादरूप शब्दचित्र, असेंच त्यांचें वर्णन करावें लागेल. आजच्या सुधारलेल्या नाट्यतंत्राचे निष्कर्ष या संवादांना लावणें इष्ट होणार नाहीं. शाळेंतील मुलांना फारशी सामुग्री न लागतां सहजी हे संवाद करतां यावेत एवढीच कै. आपट्यांची भूमिका होती.

संपूर्ण बालनाटकांची प्रथाहि याच सुमारास मूळ धरू लागली. तत्पूर्वीचा एक उल्लेखनीय प्रयत्न म्हणजे किरात यांनीं लिहिलेलें व १८९९ सालीं प्रसिद्ध झालेलें पन्हाळगडचा किल्लेदार हें छोटें नाटक. हें नाटक तसें मोठें नव्हतें; उलट त्यांवर '*एक ऐतिहासिक नाट्यप्रसंग*' अशीच नोंद होती; *तथापि* संवादांहून मोठें व नाटकाहून लहान अशी याची मध्यम प्रकृति होती. बोलून चालून ही रंगमंचावरील पहिली बालनाटिका. तिच्याकडे समीक्षकानें त्या काळच्या बालनाट्य-वाङ्मयाच्या त्रुटि लक्षांत घेऊनच पाहणें इष्ट. या नाटिकेंत एक गोफणगीत व दुसरें दिंडीचें गाणें आलें आहे, ते पोवाडा पद्धतीचें आहे. संगीताची ही बालनाटिकांतील सुरवात विशेष आकर्षक नाहीं. शिवाय यांतील विनोद निर्मितीहि तोतेपणासारख्या शारीरिक व्यंगावर आधारलेली असल्यानें प्रभावी होऊं शकली नाहीं. पण प्रारंभ-कालांतले हे दोष फारसे टीकास्पद नव्हेत.

मुलांसाठीं उद्बोधक व विनोदी असें संपूर्ण नाटक लिहिण्याचा अग्रमान आचार्य प्र. के. अत्रे यांनीं मिळविला आहे. याचा प्रयोग १९१९ सालीं झाला. त्या वेळीं कै. न. चिं. केळकरांनीं मराठी नाट्यलेखनास नवी दिशा दाखवून दिल्याबद्दल अत्र्यांना धन्यवाद दिले होते, ते सार्थच म्हटले पाहिजेत. या नाटकाचें नांव गुरुदक्षिणा असें होतें.

आचार्य अत्र्यांनीं हें नाटक लिहिलें तेव्हां ते शिक्षक पेशांत होते; त्यामुळें मुलांच्या नाटकविषयक अपेक्षा व अडचणी त्यांना पूर्ण परिचित होत्याच; त्यामुळें विद्यार्थ्यांना एकदम प्रिय होणाऱ्या 'श्रीकृष्णाची विद्यार्थीदशा' अशाच विषयाची निवड त्यांनीं गुरुदक्षिणेंत केली व विनोदानें नाटकें रंगतात हें ओळखून ह्या नाटकांत विनोदी पात्रें व संवाद योजिले. विषय पौराणिक काळचा व अध्ययन संस्कृत भाषेचें, ह्यामुळें हे संवाद समुचित व खुसखुशीत झाले आहेत. त्यांतला हा एक नमुना—

" वक्रतुंड–हे पहा आतां थोडे संस्कृत शब्द मला शिकवून ठेव म्हणजे बोलण्यांत ते नेहमीं वापरतां येतील.

कुमार–कांहीं हरकत नाहीं. काय बरें तुला शब्द शिकवावे ? हं, या अरण्याला आम्ही अटवी म्हणतो.

वक्रतुंड–काय अटवी ? टिटवीची बहीणच ही. राहील लक्ष्यांत.

कुमार–पाण्याला आम्ही वारी म्हणतो.

वक्रतुंड–वारी ? ठीक. आणि अंघोळीला ?

कुमार–अंघोळीला स्नान.

वक्रतुंड–काय अस्नान ? थांब, आतां संस्कृत बोलण्याची मला स्फूर्ती आली आहे. ' अटवीत जाऊन वारीनें अस्नान करा, काय वाटतें कां थोडें संस्कृत बोलल्यासारखें !

कुमार–वा ! तूं लवकरच संस्कृत शिकशील !

वक्रतुंड–कांहीं हरकत नाहीं. आतां थोडी जनावराची सस्कृत नांवें शिकव पाहूं ! घोड्याला काय म्हणतात ?

कुमार–वारू

वक्रतुंड–आणि कोल्ह्याला ?

कुमार–फेरू.

वक्रतुंड–फेरू म्हणजे वारूचाच भाऊ आणि मघाची वारी ती या वारूचीच बहिण दिसते आहे. एकाच कुटुंबांतला गोतावळा आहे वाटतं हा ! बरें, लाकडाला काय म्हणतात ?

कुमार–दारू.

वक्रतुंड दारू ! माझी थट्टाचिट्टा तर करीत नाहीस ना ? लाकडाला दारू म्हणतात ?

कुमार–हो, दारू किंवा काष्ठम्.

वक्रतुंड–नाहीं नाहीं ! काष्ठम् पेक्षा दारूच ठीक आहे ! थांब, तुला संस्कृत बोलून दाखवितो ऐक. 'मी दारू पिऊन–नाहीं नाहीं वारी पिऊन वाल्वर नसलों व अटवीत दारू तोडायला गेलो तिथें मला पेरू 'भेटला ! कार्य ? एकाद्या पटाईत संस्कृत बोलणाऱ्याप्रमाणें बोलतो आहे कीं नाहीं मी ? ''

हे विनोदी संवाद हेंच या नाटकाचें यशस्वी गमक. या नाटकानें स्त्रीभूमिका विरहित नाटकाची एक नवी प्रथा सुरू करून विद्यार्थ्यांची मोठीच अडचण दूर केली. कारण मिश्र नाटकें करावयाला मुली व त्याचे पालक तयारच नसत तेव्हा ! जसजशी मुलींच्या शिक्षणाची वाढ होत चालली तसतशी ही गरज उभयपक्षीं ठरू लागली व पुरुषभूमिकाविरहित अशाहि नाटकाची आवश्यकता भासू लागली. ना. धों. ताम्हणकर याची मुलींचीं मंगळागौर, चौकोनी खुर्च्या, विद्यामंदिरात, पहिली पायरी, अशीं खास मुलींकरिता व केवळ मुलांकरिता लिहीलेलीं नाटकें याचवेळी रंगभूमीवर आलीं, प्रि के. गो. पंडिताचे नाट्यछटा व संवाद, श्री. स. अ शुक्लाचे 'नाटक–नाटक' हे संवाद व नवलनगरीची राजकन्या, जगल्या भिल्ल इ. नाटुकली, चि. आ. मुडले याचीं हसरी नाट्यसुमनें वगैरे नाटयें या कालखंडानें विद्यार्थ्यांना बहाल केलीं. ऐतिहासिक नाटकात आचार्य अत्र्यांचें वीरवचन, मोगल गिंदीकराचें चंद्रगुप्त, श्री. गो. नी. दाण्डेकरांचें सिंहाच्या गुहेंत इत्यादि नाटकें विद्यार्थीवर्गाला उपयुक्त होतीं सौ. कुमुदिनी रांगणेकराची ह्यदगा, इच्छानगरी वगैरे नाटिका, गो म. सोहनींचें एकलव्य हें सुंदर नाटक आणि वीरकराचे "सुरस नाटिका" हें संवादात्मक पुस्तक हीं सर्व याच कालखंडातली वि. ग. ताम्हनकर यानीं लिहिलेली मित्रभाव, मृत्युंजय, परिवर्तन, वि. कृ नेरूरकर याचे मुलींची शाळा आणि पा. ना. मिसाळ याचें मित्रप्रेम वगैरे छोटे छोटे संवाद अशी कितीतरी निर्मिती या काळात झाली व तिनें बालनाट्याची शाखा बहरून टाकली.

*आणखी एका नाविन्याचा पुरस्कार बालनाट्यविभागात घडून आला.* तो श्री. वि. द. घाटे याच्या नाट्यरूप महाराष्ट्र या सुंदर पुस्तकानें. पूर्वी कै. वा. गो. आपटयानीं एकेक मर्यादित काळ खंड घेऊन त्यावर सुसूत्र अशा संवादाची पुस्तकें नाट्यभारत, नाट्यरामायण इ. नावाना प्रसिद्ध केलेलीं होतीं, तीच पद्धत घाटयानीं पुनरूज्जीवित केली व ऐतिहासिक कालक्रम सभाळून महाराष्ट्राच्या राज्यकर्त्यांचें नाट्यदर्शन बालाना घडविलें. असाच प्रयत्न कै ग भा. निरंतर याच्या 'नाट्यरूप पेशवाई मध्येंहि आढळतो आणि अगदी अलिकडे प्रसिद्ध झालेलें आशा मुतार याचें 'संपूर्ण पंचतंत्रहि ' याच पद्धतीनें आहे. कालदर्शी प्रसंग व सुसंगत मांडणी हा याचा प्रमुख गुण. संवादांची व्याप्ति आटोपसर. पात्रें कमी, रंगमंचसिद्धतेची या

संगीताची आवश्यकता ठेवलेलीच नाहीं व अगदीं इवल्याशा वेळांत होणारे प्रसंग-दर्शन हें या नाट्यप्रकाराचें विशेष; आणि हे प्रकृतिधर्म मोठ्या रंगमंचापेक्षां विद्यार्थी संमेलनांतून होणाऱ्या कार्यक्रमांनाच अधिक उपयुक्त ठरणारे दिसतात. बाल-नाट्याच्या दालनांतले हे नवे पाहुणे; त्यांचे स्वागत तर व्हावेंच, पण अनुकरणहि व्हावें. पेशवाईप्रमाणें मोंगलाई, आंग्लाईचें व महाराष्ट्राप्रमाणेंच इन्द्रप्रस्थ, राज-पुताना, विजयनगर इ. गाजलेल्या ऐतिहासिक भूमीचें नाट्यरूपदर्शन विद्यार्थ्यांना घडवण्याचें कार्यहि महत्त्वाचें ठरेल !

मात्र यावेळीं मुलामुलींनी एकत्र नाटकें करायला हरकत नाहीं अशीहि सुशिक्षित समाजाची धारणा होत चालल्यानें अशीहि छोटी मिश्रनाट्यें लिहिण्याची प्रथा या कालखंडांत सुरू झालेली दिसते. श्री. स. अ. शुक्लांचीं प्रहसनें व नाटकें, हीं या तऱ्हेचें सुंदर उदाहरण ठरावें; आणि तसें पाहिलें तर मिश्रनाटकच खरें पूर्णांगीं वाटतें. स्त्री–भूमिकाविरहित नाटकें नीरसतेकडे झुकूं पाहतात तर पुरुष भूमिकाविरहीत नाटकांत दमदारपणाचा अभाव जाणवून विषयांना घरगुती मर्यादा पडतात. त्या दृष्टीनें खरें व्यवहारचित्र दिसतें तें अशा संमिश्र नाट्यांतूनच. ही सुधारणा इष्टच होती. व त्यामुळें या पद्धतीचा अविष्कार आजकाल बऱ्याच मोठया प्रमाणांवर झालेला दिसतो. गेल्या २५–३० वर्षांतल्या या एकंदर निर्मितीच्या नाट्यगुणांकडेहि मूल्यमापनाच्या दृष्टीनें पाहणे इष्टच ठरेल. विनोदाची बाजू कै. ताम्हनकरांच्या पारि-तोषिक, बहीणभाऊ इत्यादि नाटकांत बऱ्याच चांगल्या तऱ्हेनें संभाळली गेली आहे. विशेषतः यांतील मुलामुलींचें संवाद अत्यंत साहजिक वाटतात. मुलांना सद्वर्तनाची शिकवण या नाटकांतून असली तरी 'बहीणभाऊ'मधील श्रीमंतीनें उर्मट झालेली कीर्ति हिचें स्वभावचित्रण अस्वाभाविक नाहीं. या वेळच्या सर्व बालनाटकांची रचना विद्यार्थीजीवनाला अनुलक्षून व्हावी हाहि विशेष वेधकच वाटतो. संवाद हा नाटकाचा आत्मा. खटकेबाज संवादांनी नाटक किती रंगतें त्याचें प्रत्यंतर गुरुदक्षिणेंतील संवाद पटवूं शकतात. आणखीहि कांहीं सुरेख संवादाचीं उदाहरणें पाहण्याजोगीं आहेत. विनोदाप्रमाणें काव्यात्मतेनेंहि संभाषणें खुलतात. याचें उदाहरण श्री. स. अ. शुक्लांच्या नाटकांतून मिळतें. त्यांच्या ' नवलनगरीची राजकन्या ' यामध्यें लंबकेशी राक्षस-देखील मुलांशीं काव्यमय बोलण्याएवढा रसिक दाखवला आहे व त्याची भाषा काव्यमय असूनहि कठीण नाहीं. तो राजकन्येला म्हणतो—

" कंटाळा आलाय् ! चल तुला चंद्रलोकांतून फिरवून आणतो. आकाश-गंगेंत न्हाऊं घालतों. ताराफुलांची वेणी देतों. कल्पवृक्षांचीं फळें स्वादाला देतो. चल, तुला चंद्रलोकांतून फिरवूं की सूर्याच्या रथांतून मिरवूं ! मेघांच्या हिंदोळ्यावर झुलवूं किं चंद्रकिरणाच्या झोपाळ्यावर झुलवूं ? उषेच्या रंगानें फुलवूं कीं संध्येच्या सोनेरी साजानें खुलवूं ? बोल, काय करूं ? "

राजकन्या–मला माझ्या आईबाबाकडे पोचव म्हणजे झालं.

हें काव्यमय भाषण व राजकन्येनें त्याला दिलेला एकच वाक्याचा विरोधी पूर्णविराम, दोन्हीं किती नाट्यपूर्ण !

हे संवाद अशा प्रकारें खटकेबाज लिहिले गेल्याचीं प्रत्यंतरें आपण पाहिलींच. पण सर्वच बालनाटकांतून हे गुणसौंदर्य कोठेंले आढळायला ? कथानकाची रचना आकर्षक असलेली गुरुदक्षिणा, एकलव्य वगैरे पौराणिक व वहीणभाऊसारखी सामाजिक नाटकें थोडीशींच. पण या संवादांतूनहि अनेक प्रकारची विसंगति असणारीं नाटकेंहि कांहीं कमी नाहींत ! श्री. नाना कोचरेकर यांच्या वाल्मिकी या स्त्रीपात्रविरहित नाटिकेंत, वाल्याचा साथीदार मित्राला म्हणतो– 'थूः तुझ्या जिंदगीवर ! मर्दासारखा मर्द तू अन् लाचारपणाच्या गोष्टी बोलतोस ? ' हें वाक्य इतिहासाला शोभणारें; पुराणाला नव्हे. कलेजा, तैनात वगैरे या नाटकांतले मोगलाई शब्दहि या पौराणिक वातावरणाला खुपणारेंच ! प्रि. के. गो. पंडितांच्या नाट्यछटा व संवादांतून कृष्णसुदामाचें संभाषण आलें आहे, त्यांतहि सुदामा कृष्णाचा 'लंगोटीयार मित्र' असल्याचा उल्लेखहि याच प्रकारे विरस करणारा आहे. कालोचित वातावरण व भाषा हीं नाटकाचें सौंदर्य वर्धित करणारी एक अवश्य बाब, पण तिच्याकडे दुर्लक्ष झाल्याचीं उदाहरणें अलिकडच्याहि बालनाटकांत दिसतात. 'जांबगांवचा जादूगार' ही जादूकथेवर आधारित नाटिका असतांहि तिच्यांत अगदीं आधुनिक असे पॅंट वगैरे शब्द आलेले आहेत ! हे दोष सहज टाळतां येणारे आहेत.

विनोदाचीं सुंदर उदाहरणें यथाक्रम मी उद्धृत केलीं आहेतच; पण त्याबरोबरच रटाळ विनोदहि बालनाटकांतून आजकाल प्रवेश करतांना दिसतो, त्याला कटाक्षानें प्रतिबंध केला पाहिजे. कोल्हा आणि द्राक्षें, वरील वाल्मिकी नाटक, सौ. रांगणेकर यांचें इच्छानगरी इत्यादि नाटकांतून हीं उथळ विनोदाचीं उदाहरणें आढळतात. उतरलेल्या फळाप्रमाणें बेचव व नाट्यसौंदर्याला विघातक ठरणारीं आहेत.

लांबलांब भाषणें हाहि मोठ्या नाटकांप्रमाणेंच छोट्या नाटकांना मारूं पाहणारा रोग. लोककवि अनंतफंदी यांची 'कुसुमची कारवाई' ही नाटिका पाहा. यांत एक भाषण जवळजवळ ३० ओळींचें आहे व तें 'स्वगत' आहे ! नेर्लेकरांचे 'युवराज भोज' यांत राजा मुंज याचें भाषण २५ ओळींचें तर प्रधानाचें तब्बल २८ ओळींचे भाषण ! पाठांतर करतांना मुलांचा जीव मेटाकुटीस यावा अशी हीं भाषणें ! खरें म्हणजे नाटक घटनाप्रधान हवें. लांब भाषणांनी त्यांत नीरसता येते, कस उतरतो ! पण याकडे चांगल्या लेखकाचेहि दुर्लक्ष होतांना दिसतें ! ह्याचें

किती नवल करावें ! म. का. कारखानीसांचींहि नाटकें यापासून अलिप्त नाहींत. शर्मिष्ठेमध्यें लांब भाषणें आहेतच आणि नाटयरूप पंचतंत्रांतहि वीस वीस ओळींचें भाषण आढळतेंच ! निदान मुलांसाठीं नाटकें लिहितांना तरी हा दोष कटाक्षानें टाळला गेला पाहिजे. श्री. स. अ. शुक्लांची बाल-नाटकें या दृष्टीनें आदर्श ठरावीं. त्यांचे संवाद छोटे छोटे असूनहि रसपूर्ण व विषयाला गति देणारे असतात. लांब भाषणें पाठांतराला कठीण, तशीच उपमा अलंकारांनीं अधिक सजलेलीं भाषणेंहि बोलायला कठीण पडतात. शिवाय नाटक हें जरी काव्यमय रंजनाचा प्रकार असला तरी व्यवहारी भाषणांत इतक्या उपमा उत्प्रेक्षा क्वचितच येत असल्यानें या अशा भाषणांना कृत्रिमतेचें फार मोठें रूप येतें. चंद्रगुप्तांतील शिकंदराचें हें एक भाषण त्या दृष्टीनें पाहण्यालायक आहे—

" शिकंदर—गर्जना करीत उसळणाऱ्या पावसाळी मेघपंक्ती पाहिल्या म्हणजे मति कशी गुंग होऊन जाते. या देशाचा मुकुटमणि गगन-चुंबित निळसर हिमालय पांढरा स्वच्छ मुकुट धारण करून स्वस्थ उभा असलेला दिसत आहे. "

आणि चाणक्याचें भाषणहि याच धर्तीचें—

"मगधाचे समुद्रवलयांकित असं एकछत्री राज्य स्थापन झालंय. लाचारी सूडबुद्धि, असहिष्णुता आदि आज असलेले दुर्गुण जाऊन सर्वसंपन्न, सर्वसमर्थ, फलपुष्पभरित हिरवा शालू विभूषित अशी भरतभूमि विश्वास, प्रेम नि वीरतेचा संदेश देत आहे. "

केवढें मोठें वाक्य ! अन त्यात दर दोन शब्दाआड येणारे किती खडबडीत कठीण शब्द ! हे एका दमांत व अभिनयासह उच्चारायचे म्हणजे रंगभूमिवरच्या छोटया चाणक्याच्या चाणाक्षपणाचीच परिक्षा म्हणावी लागेल ! बाल नाटक लिहिणारांनी तें एक दृश्यवाङमय आहे व शब्दोच्चारणाच्या सहजतेलाहि त्यांत अवश्य स्थान आहे हें विसरून चालणार नाहीं !

कथानकाची नीरसता हा आणखी एक असा दोष आहे कीं तो सुधारावा कसा हें सांगणें अवघड आहे ! नाटकाला रंगत चढायची तर कथानकच मुळांत नाटयपूर्ण नको काय ? आणि ही योजकता नाटयलेखकालाच असायला हवी तेथें दुसऱ्याचें काय सांगावें ? पण ही निवड योग्य नसल्यानेंहि अनेक नाटकांतील संवादात कंटाळवाणेपणाचा प्रादुर्भाव होतो. म. भा. भोसले यांची 'नापासनगरी' अशीच. त्यांत घटना जवळजवळ नाहींतच; व संवादहि खटकेबाज नाहींत. हादगा हे कथानक जुन्या कुंतीगाधारीच्या कथेवर आधारित असतें तर त्यांत कांहींतरी नाट्य होतें; पण मुलींनीं जमून रोज गाणीं म्हणावी व प्रसंगीं एकमेकींत गप्पा माराव्या ही नाट्यवस्तु होऊंच शकत नाहीं. कांहीं वेळां नाट्यवस्तु उत्कृष्ट असूनहि

अविष्कार योग्य तऱ्हेनें केला जात नाहीं. शर्मिष्ठेच्या भांडणाचेंच उदाहरण पाहा. लेखकानें हें भांडण समक्ष दाखवणें इष्ट ठरलें असतें; पण हा प्रसंग सख्यांच्या बोलण्यांतून व्यक्त झाला असल्यानें नाट्यप्रसंगाची उत्कटताच नष्ट झाली आहे.

एकच कथानक दोन लेखकांनी नाट्यरूप केलें असेल तर त्यांत तुलना करण्याची वाचकांची प्रवृत्ति होतेच. श्री. गो. नी. दांडेकरांचें व्रतसाधन व गो. प्र. सोहनींचें एकलव्य हीं दोन्हीं एकाच विषयावरचीं नाटकें. दोन्हीं स्त्रीभूमिकाविरहितच. एकलव्याच्या कथानकात त्याची गुरुभक्ति जेवढी तेजस्वी तेवढीच द्रोणाचार्यांनें मागितलेली गुरुदक्षिणा अन्याय्य व आचार्यांबद्दल घृणा उत्पन्न करणारी होती. हें पौराणिक सत्य अधिक सात्त्विक दाखवून, 'अंगठ्याचा उपयोग करूं नकोस' एवढीच ते गुरुदक्षिणा मागतात असें दाखविलें आहे. उलट सोहनींचे, 'द्रोणाचार्य एकलव्याचा आंगठा कापून मागतात, पण पश्चातापानें जळत राहतात,' हेंच स्वभावदर्शन वस्तुस्थितीला अधिक धरून आहे. या दोन्हीं द्रोणाचार्यांची याबद्दलच्या प्रतिक्रियेचीं भाषणें पाहण्याजोगीं आहेत.

व्रतसाधनेंतील द्रोण—

"धन्य एकलव्या! अवघ्या विद्यार्थी जगासमोर तूं एक आदर्श निर्माण करून ठेवला आहेस. आज तू गुरुदक्षिणा दिलीस; तुझें अध्ययन पूर्ण झाल! युग येतील आणि जातील! पण विद्यार्थीविश्व म्हणेल कीं अध्ययन कराव तर ते एकलव्यासारख!"

एकलव्यमधील द्रोणाचार्य (एकलव्याला उद्देशून)

"अर्जुनाला अद्वितीय धनुर्धर म्हणून जरी जगानं ओळखलं तरी त्या अद्वितीयत्वाला लागलेला तुझ्या निष्पाप रक्ताचा डाग कधींहि पुसला जाणार नाही. या द्रोणाच्या निष्कलंक चारित्र्याला आज तुझ्या रक्ताचा कलंक कायमचाच चिकटणार. तुझ्या मोठेपणामुळें तो कलंक चंद्राच्या कलंकाप्रमाणें मला भूषणच ठरेल."

आणि हींच प्रतिक्रिया साहजिक व मनाला पटणारी असल्यानें सोहनींची द्रोणप्रतिमा स्वभाव लेखनाच्या दृष्टीनें अधिक ठळक व निर्दोष झाली आहे. एथवर हीं सारीं बालनाटकें अशा वैशिष्ट्यपूर्ण धर्तीनें लिहिलीं जात होतीं.

बालनाटकांची कक्षा जसजशी मोठा आकार घेऊं लागली तसतसें बालनाट्य लेखनांतहि नवे प्रयोग होऊं लागले. यात सामाजिकांबरोबरच अद्भुतरम्यतेचाहि एक नवा प्रवाह येऊन मिसळला व लोककथांवर आधारित नाटकांचा एक नवा गटच तयार होऊं लागला. इंग्रजींत चहूकडे गाजलेल्या लोककथांचा 'कथावस्तु' म्हणून यात उत्तम उपयोग होतो असें आढळून येतांच त्याहि दृष्टीनें नाट्यकथा

रंगू लागल्या. एकतर लोककथांतून वैचित्र्यपूर्ण व घटनापूर्ण संविधानक तयारच मिळतें. दुसरें म्हणजे लोककथा या स्वाभाविकच नाट्यरसानुकूल प्रकृतीच्या व अद्‌भुतरम्य असतात. व तिसरें सर्वांत महत्वाचें कारण यांतलें नायकत्व अनेकवेळां *किशोर वा कुमारवयी मुलामुलींकडे सुपूर्त केलेलें असतें.*

अद्‌भुतरम्य गोष्टी ज्या कारणासाठीं मुलांना आवडतात त्याच गोष्टींचा परिपोष या 'अद्‌भुतरम्य' बालनाटकांतून विशेष प्रकर्षानें दर्शवलेला असतो. शिवाय मांडणी आणि रंगभूमि दोन्हींतहि बालसुलभ आकर्षणाचें तंत्र कटाक्षानें संभाळलेले असल्यानें आजकाल हीं नाटकें खूप बालप्रिय व जनप्रिय ठरूं पाहत आहेत. व त्यामुळें या निर्मितींत बरीच वाढ होत आहे. सौ. सुधा करमरकर यांनीं जादूचा वेल हें इंग्रजी लोककथेवरील आधारित नाटक लिहून या नव्या नाट्यप्रकाराची नांदी केली. नंतर श्री. रत्नाकर मतकरी यांची मधुमंजिरी, कळलाव्या कांद्याची कहाणी, इ. नाट्यें, कुमुदिनी रांगणेकर यांची इच्छानगरी, श्री. भालचंद्र भिडे यांची हरवलेला पैंजण, हेमा आणि सात बुटके, सई परांजपे यांचे झाली काय गंमत, सौ. मालती दाण्डेकर यांचे पन्याची राणी, सुंदर देश आणि सोनेरी नदीचा राजा, प्रा. अनंत काणेकर यांचे सोनपरी चांदपरी इ. अनेक नाट्यें प्रसिद्ध झालीं, रंगभूमीवर आलीं व त्यांनीं हे बालनाट्याचें नवेच दालन सुशोभित करून टाकलें.

*लोककथावर आधारित बालनाट्यें प्रिय होतात हें लक्षांत आल्यावर त्यांत* लेखनविविधता येणें क्रमप्राप्तच होतें. स्नो व्हॉइट ॲण्ड सेव्हन ड्वार्फस या प्रसिद्ध लोककथेवर श्री. भालचंद्र भिडे यांनी हेमा आणि सात बुटके हें नाटक रचलें व विशेष म्हणजे तें वय ६ ते ७ या बालश्रेणीसाठींच आवर्जून तयार केलें. या नाटकांतील भाषा यमक जुळणीच्या वाक्यांनीं झाली असल्यानें याला संगीतक हे एक नवें नांव दिलें गेलें आहे. तथापि या नांवानें सूचित होणारे पद्यगर्भ काठिण्य यांत अजिबात सांपडणार नाहीं. साधेच शब्द पण जरा जुळविलेले; लहान मुलांच्या गोष्टींतून जसें, गद्यात्मक किंचित् पद्य यावें तसें. हेमाचें हें वर्णन पाहा–

आईविना पोर ।
जणु चंद्राची कोर ।
दिवसामाशी वाढे ।
हिच्या रूपाचा जोर ।
रूपाची खाण ।
ही बाला अजाण ।
अन् म्हणून ती वया ।
छळते हिची काया ॥

हीं वाक्ये (क्वचित् यांत काया व वया अशी संस्कृत व ग्रामीण शब्दांची मैत्री आढळली तरी) मुलांना चटकन् पाठ होणारीं आहेत. मुलांच्या गोष्टींतून यमकयुक्त शब्दांची सरमिसळ जशी त्यांना अधिक प्रिय होते तद्वत ही सारी रचना असल्यानें ती बालकांना आवडलेली दिसते.

मात्र सगीतक चांगलें लिहिलें गेलें असलें तरी कांहीं उणीवा खटकतातच. उदाहरणार्थ, एका जादूच्या आरशावरच ह्या सर्व कथानकाची मुळांत उभारणी आहे. ह्याचा सुंदर उपयोग कथानकांत अवश्य करून घेतां आला असता; पण हेमा व सात बुटकेमध्यें महत्त्वाची भूमिका करणाऱ्या त्या आरशाचा प्रत्यक्ष दृक्प्रत्यय कोठेंहि होत नाहीं व एक मजेदार नाट्यप्रसंग उणावलेला भासतो. परीकथांवर आधारलेलें 'हरवलेला पैंजण' हें श्री. भालचंद्र भिडे यांचें दुसरें नाटक बरेंच बालसुलभ व रंजक वाटतें; परंतु यालाहि एका दोषाचें गालबोट लागलें आहे. यांतली हेमाराणी (सिंडरेला) व राजपुत्र यांचा संवाद, मुलांसाठीं लिहिलेला वाटतच नाहीं! उलट, एखादें जाणतें प्रणयी दंपत्यच तो करीत आहेसें दिसतें! ही त्यांची समायण पद्धत पाहा—

"शिरीषकुमार—तुझ्या पैंजणाचे आवाज जोगियाचे बोल होऊन माझ्या कानात शिरत होते.

हेमा— आणि तुम्ही लग्नाचे वचन दिल्यावर मी हरणीच्या पायांनी बागडलें आणि तुम्ही राजहंसाच्या डौलानें मजकडे पाहत उभे राहिलात तेव्हां—

शिरीषकुमार—तेव्हा ना? उषा अरूणाच्या मिलाफानंतर सूर्यनारायणान सोन्याच्या अक्षता उधळाव्या आणि चहुबाजूनीं भूपरागाची सुरावट कानात घुमावी, तसं वाटल."

ह्या संवादाचें उपमासौंदर्य मान्य करूनहि हा बालमेवा नव्हे हें जाणवल्यावांचून राहत नाहीं! दुसरें एका ठिकाणीं हा नायक नायिकेच्या रूपाचें वर्णन मोठें काव्यमय करतो. तें असें—

"हिरव्या चाफ्याचा लपंडाव तुझ्या डोळ्यात आहे, चाफेकळीची सरलता तुझ्या नाकात आहे, गुलाबाचे गेंद तुझ्या गालांत आहेत नि जास्वंदीची लाली तुझ्या ओठात आहे!" कदाचित् ती नायिका अशी ठराविक सौंदर्य कल्पनांच्या चौकटींत बसणाऱ्या रूपाची असेलहि; परंतु बालनाटकांत अशीं वर्णनें येणें सुसंगत वाटत नाहीं. मुलाच्या तोंडीं हे संवाद अप्रशस्त व नेणिवेचेच भासतात आणि बालप्रेक्षकांनाहि त्यातली रसज्ञता कळायला अजून तारूण्यसीमा गांठण्याइतका अवकाश असतोच. शाल किंतीहि उंची असला तरी लहान बालिकेला तो शोभत नाहीं!

श्री. भिड्यांचे संगीतक निस्संशय चांगलें आहे. पण या प्रकारांत अजूनहि 'अनामिका' सार्थ होण्याजोगीच परिस्थिति दिसावी हें योग्य वाटत नाहीं. अशीं संगीतकें काव्यगुण असणाऱ्या लेखकांनीं अवश्य रचलीं पाहिजेत व त्यांचीं संख्या वाढली पाहिजे. बालनाट्य शाखेला त्यानें एक आगळें नावीन्य व वैशिष्ट्य येणार आहे. सौ. सुधा करमरकर ह्यांनीं 'बालरंगभूमि' या नव्या कल्पनेचा पुरस्कार केला व नाट्याच्या या शाखेंत नवें दालन उघडलें. त्यांचें जादूचा वेल हें पहिलें नाटक व अल्लादिन आणि जादूचा दिवा हे दुसरें नाटक. मूळ कथानकें प्रसिद्धच आहेत. नाट्यासाठीं थोडाबहुत बदल त्यांत क्षम्य असला तरी तो बालनाट्याला उचित ठरेल कीं नाहीं ह्याचाहि विचार अवश्य व्हावयाला पाहिजे. अंगणांत 'जादूचा वेल' निर्माण होण्यापूर्वीच पृथ्वीवरची एक अगदीं लहानशी मुलगी वरवर आकाशांत गेली. कशी ? – कोण जाणें ! व तिला भल्या थोरल्या त्या भीमकाय राक्षसानें आपली बायको बनवली असा यांतला बदल मनाला मुळींच बरा वाटत नाहीं. लोककथांतून सुद्धां राजकन्याशीं राक्षस लग्न करण्यापर्यंतच गोष्ट रंगत येते व मग राक्षसाचें पारिपत्य होतें, तोंच संकेत येथेंहि पाळणें इष्ट झालें असतें, किंवा या छोटीला पळवून नेऊन राक्षस मोलकरणीसारखें राबवतो व राक्षसीण मात्र तिजवर कन्येप्रमाणें माया करते अशीहि कलाटणी योग्य दिसली असती ! प्रत्यक्ष रंगभूमीवर एवढा मोठा राक्षस छोटया मुलीला बायको करून जीव जाईतो नाचवतो हे दृश्यहि अतिरंजित ठरणारें आहे. याउलट अल्लादीनमध्यें अल्लादिन व राजकन्या दोघेहि पूर्वकथेनुसार लग्नास योग्य तरुणतरुणी न दाखवतां छोटीं मुलें दाखवून तशा प्रकारची बालिश संभाषणें घातलीं आहेत. हा फरक अधिक औचित्यपूर्ण वाटतो.

मात्र या नाटकानें अद्भुताची एक रेशमी पाऊलवाट बाल नाटकांना दाखवून दिली हें मान्य करावे लागेल. यांत चंद्रदेवाचे प्रत्यक्ष दर्शन आहे. स्वरमंडल हें यंत्र मानवरूप झालेलें आहे. जादूचा वेल व त्यावरील घर यांचेहि देखावे बालमनाला मोह घालणारे ठरतील. भाषा सुंदर आहे. छोटी छोटी वाक्यें व त्यांतून नकळत होणारें उद्बोधन -रम्य आहे; आणि स्वभावदर्शनांत लेखिकेनें वरच्या दर्जाचें कौशल्य दाखविलें आहे.

सौ. करमरकरांच्या या नव्या प्रथेचें अनुकरण विनाविलंब होऊं लागलें. श्री. रत्नाकर मतकरी यांचीं बालनाटकें बाल प्रेक्षकांना रिझवण्यासाठीं रंगभूमीवर प्रविष्ट झाली व अशा नाटकांचा एक नवसंप्रदायच जणुं निर्माण झाला. पैकीं आजकाल रंगभूमि गाजवणाऱ्या मधुमंजिरी या नाटकाचेंहि वाङ्मयनिकषावर चिकित्सक परिक्षण होणें अवश्य आहे. याला शिशुनाट्य म्हटलें आहे खरें, पण भाषा व त्यापेक्षांहि यातील प्रसंगरचना शिशुऐवजीं कुमारवयास उचित दिसते.

या नाटकाला रंगतदार करणारा रसपरिपोषहि चांगला जमला आहे. विशेषतः मधुमंजिरी व तिचे आई-वडिल हीं पात्रें नाजूक व यथातथ्य स्वभावदर्शनानें खुलतात. उत्कंठा वाढवण्याचेंहि तंत्र यांत 'ठीक' जमलें आहे. पण हें सर्वमान्य करूनहि या नाट्यांत आक्षेप घेण्याजोगी एक मोठी विसंगती खटकते ती ही कीं, नायिकेला चेटकीण बनवण्याचा जो यातल्या चेटकीणीचा प्रयोग चाललेला असतो त्यांतील गाणीं, भाषणें व कृति या सर्वांवर भीषणतेचे [ कांहीं अंशीं बीभत्सतेचेहि ] रंग चढले आहेत, ते यांतल्या मनोज्ञ रसाविष्कारांचा लोप करून टाकतात! ही भेसूर वर्णनचित्रें अशा कठोरतेनें चित्रीत झालीं आहेत कीं, मुलांनींहि हा प्रसंग प्रत्यक्षांत पाहातांना अंग शहारून डोळे मिटूनच घ्यावें! पुढील वर्णनप्रसंग पाहा—

"चेटकी (ग्रंथांत पाहून) चेटकी घडवण्याचें बाळकडू. [समोरच्या पातेल्यांत एक एक पदार्थ टाकत राहते व काढा ढवळते. [ साहित्य—

बेडुक आणि पाली। नारिंगाच्या साली।
वाघळाचा कोथळा। कावळ्याचा डावा डोळा।
अजगराचा पिवळा दांत। साळिंदराचे काटे सात
मगरीचा मेंदु। मांजराचा मोतिबिंदु
मिसळून ढवळा। नि ढवळून घोटा!

आणि हा दिव्य काढा मधुमंजिरीला भांगेप्रमाणें चढून मग तीहि एक भयंकर गाणें गाते तें असें—

यारे सारी यारे—कोवळी कोवळी पोरे
आमुची पंचपक्वान्नें तुम्हींच ना रे!
इवल्या इवल्या नराची गोऱ्या गोऱ्या गालाची
धार लावुनि दाढेला। हिरवी चटणी करायची!

*आणि शेवटींहि एक भयानक वर्णनाचें गाणें चेटकी म्हणतेच—*

"चाखू दे तिजला अशी पेटती वाळू
अन् पिऊ दे तिजला डोळ्यामधले पाणी
होऊं दे तिच्यावर क्षुधा गिधाडाची तृप्त
हाडांचे तिचिया वाजूं देत खुळखुळे!
अन् मस्तक फुटुनि रक्ताचे ओहोळ!"

*अशीं हीं कवनें! या घृणास्पद वर्णनाला नवकाव्यांतील विदारकतेचीहि साथ* आहे! रंगभूमिवर चेटकीचे भितीदायक व्यक्तिदर्शन व त्या जोडीला अशीं ही

भीषण संवादगीतांची मिसळण. मुलांनीं पहाण्याजोगीं नाटकें अशीं अतिरंजित, भयोत्पादक आणि अतीव क्रूरतेचा ठसा उमटवणारी असावींत काय ? आणि बालमानसदृष्टीनें तें कितीसें इष्ट ठरेल ? खुद्द लेखकानें निवेदनांत प्रत्यक्ष प्रयोग पाहतांना मुलांना भीति वाटत नसल्याचा अनुभव निवेदन केला आहे, त्याची सत्यता ग्रहीत धरूनहि, हें नाटक याहून सौम्य स्वरूप करतां आलें असतें, तर बालप्रेक्षकाचे दृष्टीनें ते अधिक उपयुक्त ठरलें असतें. असेंच म्हणावेंसें वाटतें !

कळलाव्या कांद्याची कहाणी हें त्या मानानें अगदीं वेगळया प्रकृतीचें नाटक आहे. यांत विनोदाला वाव आहे व तो विनोद व्यक्तिनिष्ठ आणि प्रसंगनिष्ठ असल्यानें चांगली रंगत भरते. मात्र लिंबाजी व मिरची ही जोडप्याचीं विनोदी नांवें योजून या वस्तूंतील प्रकृतिधर्म वा वैशिष्टय भाषणांतून सहज उल्लेखित करतां आलें असतें ! राजपंडिताची अकारण गंभीर भाषा हाहि विनोदाचा विषय होऊं शकेल. उदा.—" राजपंडिताच्या कानांवर असें आलें आहे कीं, राजदांपत्यास फलकरंडकांत कांही अपूर्ण दृष्टवस्तूचा लाभ झाला असून त्या विपयींच्या अज्ञानानें उभयता अगदीं दिङमूढ होऊन गेलीं आहेत. " (पृष्ठ २०)

तर्कशास्त्राधारें विचार करतां पक्ष्यांनीं फळें घालण्यापेक्षां अंडीं घालणें हेंच अधिक संयुक्तिक वाटतें ! " (पृष्ठ २२) इत्यादी भाषणें पाहावीं. मात्र या नाटकांत एक गोष्ट खटकते आणि ती म्हणजे यांतील चित्रें. ती सारींच व्यंगचित्रें व विचित्र वेषी कां असावींत हें समजत नाहीं. नाटकांतील विनोदाला त्यामुळें मुळींच उठाव मिळत नाहीं. व्यंगचित्रें असलीं तरी त्यांतहि कुरुपता आणि विद्रूपता असावी, असा कांहीं नियम नाही ! पण अशीं चित्रें बालवाङ्मयाच्या सर्व शाखेप्रमाणें नाटकांतहि येतात. शहाणी मुलें, राजकन्येची सावली हरवली, नवें गोकुळ इ. नाटकांतून अशीं चित्रें आहेत.

या नाटकापेक्षां सई परांजपे यांच्या नाटकांचा घाट अगदीं वेगळा. अद्‌भुत-रम्यतेपेक्षांहि कल्पनारम्यतेला त्यांत प्रामुख्यानें स्थान दिसतें. शेपटीचा शाप, झाली काय गंमत, पत्तेनगरांत इत्यादि नाटकें बाळांना फार आवडतात, याचें कारण अद्‌भुत नाटकें असूनहि यांत भयानक वर्णनदृश्यांना वाव नाहीं; तर विनोद हाच त्यांचा आत्मा आहे. चक्रमादित्य महाराज, अवडंबरशास्त्री, तराणासेन हीं नांवें देखील विनोदाची सूचना देणारीच. आणि प्रसंगरचनाहि अशाच विनोदी घटनांनी नटलेली. गंभीर, जाडजूड शब्दांचे अवडंबर घालून सुचवलेले हे प्रसंग कोणते, तर टॉफीस्तानाहून येणारे चॉकोलेटचे गलबत चाच्यांनी लुटलें ! किंवा, राणीसाहेबांनी स्वतः बनवलेली ताटभर पिस्त्यांची चिक्की नाहीशी झाली ! खोटं बोलणाराला शेपूट फुटेल हा भयंकर शाप ! व त्यामुळें उडालेली सगळ्यांची घबराट ! इत्यादि सर्वच या प्रवेशांत विनोदाची लयलूट आहे, असा हा सर्वच गमतीचा मामला.

मुलाना अद्भुतरम्यतेएवढेंच विनोदी मजेदार गोष्टींचेंहि आकर्षण असतें हे पराजपे यानीं अचूक हेरून त्या पद्धतीवर नाटक लिहिलें तें अतीव बालप्रिय झाल्यास आश्चर्य नाही भाषण सुदर आहेत, व स्वभावदर्शन चागल्याप्रकारें साधलें आहे— उदा.

"चक्रमादित्य—आणि सगळ्यात कळस झाला अवडबऱ्या तुझ्यापुढे दरबारात आमच्या पुढें पुढें करून पाठीमागें आमची निंदा करतोस तू ?

अवडबरशास्त्री—छे छे— म – म –महाराज–

चक्रमादित्य— [ त्याचा कान पकडून ] राजेसाहबाना काडीची अक्कल नाही अस म्हणालास तू ?

अवडबरशास्त्री— भलतच महाराजाधिराज ! मी तर आपल्याला काडीची अक्कल आहे अस म्हटल !"

किंवा

" चक्रमादित्य—वराहाचार्य, तुमच्या बायकोन राणीसाहेबाचा डोळा चुकवून त्याचा भरजरी शालू बोहारणीला दिला आणि त्याच्यावर पितळेचा भाडी घेतलीं—

वहाराचार्य—पितळेचीं भाडीं ? अहो, चादीचीं भाडीं आलीं असती निमानपक्षीं घरा जाऊन बायकोला झोडपता चागली न स्त्री स्वातत्र्य अर्हति !"

असें उपहासानें खुलणारे सवाद हे या नाटकाचें सर्वांत मोठें आकर्षण आहे पराजपे याचीच, 'झाली काय गमत' हीहि एक छोटी नाटिका ती एका बालिकेच्या स्वप्नावर आधारलेली आहे व हें स्वप्न परीच्या भेटीचें आहे नायिका निरूपमा ही एक अपग छोकरी आहे व ती खेळणी, निसर्ग याच्या सहवासात सुख मान णारी व यक्षपऱ्याच्या विचारात तन्मय होणारी मुलगी तिचे स्वभावदर्शन फार रेखीव उतरले आहे शिशुवर्गासाठी फारशीं नाटकें नाहीत, पण तीं कोणी लिहील तर निरुपमेच्या निरागस बालप्रवृत्ति दर्शविणाऱ्या मानसचित्राप्रमाणें त्यातील पात्रें हळुवारपणें चित्रित व्हायला हवींत परीकथावर आधारलेली चादपरी सोनपरी (प्रा अनत काणेकर) पऱ्याची राणी, सुदर देश (दाडेकर) राजकन्येची सावली हरवली हीहि कल्पनारम्य नाटुकलीं आहेत पण कल्पनारम्यता म्हणजे कशीहि कल्पकतेची भरारी असा अर्थ काढता येणार नाही इच्छानगरी या नाटकात शिवाजी, तानाजी, रभा, उर्वशी, झाशीची राणी लक्ष्मी, आरोग्यमंत्री, तानसेन हे सर्व एकत्र येऊन फारच गोंधळ करतात, तो वर्णिला आहे एवढेंच नव्हे तर

व्हिटॅमिन्सबद्दलची चर्चा या संमेलनांत होते ! हें सारेंच मनाला खटकतें. पौराणिक या ऐतिहासिक आदरणीय व्यक्तींनीं विनोदमिषानें देखील अत्यंत खालच्या पातळीवर येऊं नये ही प्रेक्षकांची रास्त अपेक्षा, तिलाहि या नाटकांत फार ढळ पोचला आहे. उदा. पुढील संवाद पाहा–

आरोग्यमंत्री – हीं जीवनसत्त्वें पोटांत गेल्यामुळें मुलांच्या मनाची कळी उमलेल व तिच्यांतून आरोग्याचा सुगंध दरवळेल.

नारद–आरोग्याचा सुगंध दरवळेल कीं अपचनाचा दुर्गंध पसरेल हो मंत्रीसाहेब !

किंवा

नारद–(शिवाजीस) महाराज तुम्ही गोब्राह्मण प्रतिपालक आहांत ना ! या गाईसारख्या गरीब ब्राह्मणाचं प्रतिपालन करा हो.
(सिंहासनामागें दडतो.)

नारद हा विश्वप्रेमी असला तरी हास्यास्पद भाषणें करणारा विदूषक नव्हता, हें विसरून कसें चालेल ? पण चमत्कृतिजन्य निर्मिती करतांना यांत रंभा-उर्वशी सामान्य साळू-सखूप्रमाणें रुपांवरून भांडतांना व नाचाचे थैमान करतांना दिसतात. व नारदाला मेल्या व चोंबड्या अशा शिव्या देतात– हें कसें पटवून व पचवून घ्यावयाचें ? अशा औचित्यभंगाच्या दोषापासून बालनाटकें दूर असावीं हेंच योग्य.

विनोदालाहि आजकाल या नाटकसंवादांतून प्राधान्य मिळूं लागलेलें दिसतें. श्री. पु. ल. देशपांडे यांची 'वयं मोठं खोटं' व 'नवे गोकुळ' हीं नाटुकलीं व प्रा. गंगाधर गाडगीळांची 'आपण आपले थोर पुरुष होणार' व 'शहाणी मुलें' ह्या नाटिका हीं या सदरांत येणारीं विनोदी नाटकें होत. प्रा. गाडगीळांनीं आपल्या नाटिकांतून अनुकरणप्रिय व उपद्व्यापी अशा मुलांचें दर्शन घडवलें आहे, तें मोठें मजेदार आहे. 'वयं मोठं खोटम्' यांत श्री. पु. ल. देशपांडे यांनींहि मुलांची मोठ्यांचें अनुकरण करण्याची प्रवृत्ति व बारीक निरीक्षण हाच विषय रंगवलेला आहे. मुलें नकल करीत असतांना तें सारें विसरून, मध्येंच नेहमींच्या भूमिकेंतून बोलतात व परत त्या चुका सावरून घेऊन नाट्यांत गर्क होतात. यांतून बालभाव फार मनोज्ञतेनें स्पष्ट झाला आहे. नवें गोकुळच्या शेवटीं प्रचार आलेला आहे, तो मात्र फार रसहानिकारक आहे. शिवाय यांतील विनोद ही अतिरंजित झाला आहे. तो बालस्वभावावर अधिष्ठित नाहीं तर विदूषकी चाळ्यावर सावरल्यासारखा आहे.

या अलिकडच्या सर्व नाटकांकडे पाहिले तर असें दिसतें कीं बालनाटकांचा एक नवा जमाना सुरुं झाला आहे. त्यांत अद्‌भुताला प्रमुख स्थान आहे व त्या

खालीखाल विनोदाला. अद्भुतरम्य नाटकें बालमनोरंजन हा हेतु उत्कृष्टपणें सिद्धीस नेऊं शकतात; पण त्यांतून शेवटीं उद्बोधन थोडेंतरी हातीं लागलें पाहिजे. त्या दृष्टीनें 'सोनेरी नदीचा राजा', 'चांदपरी-सोनपरी', जादूचा वेल इ. नाटकें यशस्वी ठरतील. विनोदी नाटकांतहि वैचित्र्य व विविध कल्पना यांचा वापर होत आहे. परंतु हे विनोद अगदींच उथळ किंवा शरीर व्यंगांवर आधारलेले असले तर मुलांनाहि ते रूचणार नाहींत व या दृष्टीनें विनोदी बाल नाटकांची दरवर्षी एकवार पाहणी व परीक्षण होणें अवश्य आहे. यांतील संगीताकडे लक्ष पुरवलें तर त्यांतहि स्थित्यंतरें घडलेलीं दिसतील. पूर्वीच्या बाल नाटकांतून गाणीं असत व तीं गातां येण्याजोगीं होतीं. वीरवचनमधील गाणीं त्या वेळच्या, ललनामना, या नवलनयनोत्सवा इत्यादि सुप्रसिद्ध नाट्यपदांच्या चालीवर रचलेलीं दिसतात, तर संगीत एकलव्य, या सुमारें २० वर्षापूर्वीच्या नाटकांतून पदें आहेत तीं 'यमुना जळी खेळूं खेळ', 'आकळे न अघटित घटना' इ. तत्कालिन लोकप्रिय चालीवर आहेत. 'जादूचा वेल' त्यानंतर १८–२० वर्षांनीं प्रसिद्ध झालें. त्यांत संगीतापेक्षां गद्याकडे झुकणारी शब्दरचना आहे. तिला पद्य हें नांव देणेंच कठीण. मुक्तछंद हा तर आजच्या कवनांचा नवा छंद! तेव्हां या गद्यपद्याला रचना, ताल, यमक मात्रा यांचा धाक नसतो न् आवश्यकता त्याहून नाहीं! रागदारीचाहि जणु या नव्या रचनेला रागच येतो. पुढील रचना जादूचा वेलमधील आहे—

यांतील नायक हें गाणें म्हणत असतो—

तांवड तांवड मातीच्या, घेवड्याच्या बियांनो
सूर्याचा प्रकाश न्हातां जादूच्या बियानो
पहाटेचा पिऊन दंव-नी पावसाची धार
असाल तुम्ही जादूमय तर घडवा चमत्कार—
जंतर मंतर—" यांत काव्य शोधूनहि सांपडणें मुष्कील !

या तीन टप्प्यांवरची नाटकांतील कवनें पाहिलीं तर असें दिसतें कीं आजच्या बालनाट्याला संगीताची रंगत फारशी अपेक्षित नाहीं. पूर्वीच्या नाटकांतील गाण्यांतलें काव्य, शब्दसुंदरता, गेयता याचे गुणमूल्य हीं नवी नाटकें मानीतच नाहींत. परंतु असें असले तरी, आणि अगदींच गद्यभाषी पद्यें रचायची असलीं तरी त्यांतहि रसिकतेचा प्रत्यय यावा, ललित शब्दांची सुंदर गुळणी असावी, असें प्रेक्षकांना वाटणें साहाजिकच; व त्या दृष्टीनें वरच्यासारखीं ढोबळ कवनें नैराश्य उत्पन्न करतात हें मान्य करावेंच लागतें.

एकंदरींत बालनाट्य प्रगतीचा विचार केला तर अनुकूल अशा कित्येक नव्या घटना नजरेसमोर उभ्या राहतात. आजचा काल रंगभूमीच्या उर्जितावस्थेचा

त्यांत बालरंगभूमिहि येतेच. सर्व घर प्रकाशमय झालें कीं बालखोलीहि झगझगणारच! बालनाटकांनाहि अनेक तऱ्हेचें तेज लाभलें आहे. एकतर पूर्वी चांगलीं बालनाटकें लिहिलीं तरी शालेयरंगभूमीवांचून त्याला दुसरा आसरा नव्हता व विद्यार्थी विश्वाहून मोठ्या कक्षेचे विषयहि नव्हते. आज छोट्यांसाठीं स्वतंत्र बालरंगभूमि (मुंबई) चिल्ड्रन्स थिएटर (पुणें) व कलायतन, (नाशिक) या तीन नाट्यसंस्था स्थापन झाल्या असून ही प्रथा वाढतच जाण्याची सुचिन्हें आहेत. पूर्वी शालेय गरजेनें हीं नाटकें लिहिलीं जायचीं. आज सर्वच महाराष्ट्रीय बालप्रेक्षकांसाठीं ती लिहिली जातात. तिसरी गोष्ट सुरेख नाटकें लिहिलीं तरी त्यांचा आदर पूर्वी शालेय विद्यार्थी व शिक्षकवर्ग यांतच व्हायचा. आज सरकारहि उत्कृष्ट बालनाट्य लिहिणारांना बक्षिसें देतें; त्यामुळें या लेखनास उत्तेजन मिळत आहे. सर्वांत महत्त्वाची घटना अशी कीं, कांहीं जाणत्या नाट्यप्रेमी व बालप्रेमी अशा व्यक्तींनीं यांत लक्ष घातलें असून मूळ नाटक रंगमंचावरहि कशा प्रकारें आकर्षक होऊं शकेल याचा सर्व दृष्टीकोनांनी आज विचार केला जात आहे. सौ. सुधा करमरकर; सई परांजपे, अरुण जोगळेकर, प्रा. मालवा केळकर, कलायतनचे चालक या सर्व मंडळींनीं या दृष्टीनें प्रात्यक्षिकें केलीं आहेत. रंगमंचावर प्रतीकात्मक सजावट करून मूळ नाट्यवल्लीला किती उठाव देतां येतो याची कल्पना या प्रात्यक्षिकांनीं प्रेक्षकांना व नव्या नाट्यलेखकांना दिली आहे. बालनाटकाची वाङ्मयीन मूल्यें व त्यांचें येथवर परिशीलन झालें आहेच. पण नाटकाचे प्रायोगिक मूल्य अगदी निराळें असतें. जी नाटकें वाचायला बरी वाटतात तीं स्टेजवर रंगतातच असें नाहीं. किंवा वाचतांना नीरस वाटतात तीं प्रत्यक्षांत प्रेक्षकांना आवडल्याचीहि उदाहरणें आहेत. अशा प्रायोगिक सामर्थ्याचें फार मोठें लेणें आज बालनाटकांना लाभलें आहे, ही केवढी भाग्याची गोष्ट! पण यांतून भाग्योदय होण्यासाठीं बालनाटकेंहि बालप्रिय होणाऱ्या विषयांची व रसानुकूल भाषेचींच हवींत, हें दृष्टीआड करतां येत नाहीं.

●●●

# शिशुगीतं – बालगीतं

बालसाहित्यांतील ललित विभागांत कथा–कादंबरी व नाट्य याप्रमाणें बाल-काव्याचाहि अंतर्भाव होतो. मात्र बालकथेसारखी बालकविता वैपुल्यानें लिहिली गेली नाहीं. कारण शिशुगीतें वा बालगीतें यांची रचना अगदीं सोप्या शब्दांनीं करावी लागते व नेमकी हीच गोष्ट विद्वज्जनांना जड जाते. स्वतःचें मोठेंपण, विद्वत्ता, सगळें विसरून बालवृत्तीशीं तद्रूप होणें व शैशवातील आकांक्षा, आवडी-निवडी, विचार व कल्पना यांचा अभ्यास करून बालसुलभ काव्यभाषेंत त्या प्रकट करणें हें वाटतें तेवढें सोपें नाहीं ! तथापि असाहि प्रयत्न कांहीं नामवंत कवींनीं केला आणि बालगीतांची एक नवी शाखा पल्लवित व पुष्पित होऊं लागली.

बालकाव्याला खरी सुरुवात रेव्हरंड टिळकांच्या काळीं म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस झालेली दिसते. अर्थात् तत्पूर्वी कोणी बालांसाठीं कविता लिहिलेल्याच नव्हत्या असें मात्र नव्हे. साहित्याच्या मुद्रणपूर्व कालखंडात स्त्रीजनां-कडून अलिखित बाळगाणीं घरोघर म्हटलीं जात होतीं. "चांदोबा चांदोबा भागलास कां !" किंवा "इथें इथें बैस रे मोरा, बाळ घाली चारा" अशीं अगदीं सोपीं पण तालबद्ध शिशुरंजनें आजाहि त्यांची ओळख पटवूं शकतील. लोकगीतांत मुलींनीं म्हणण्याच्या झोंपाळ्यावरच्या ओव्या वगैरेहि ज्या प्रचलित आहेत, त्याहि साऱ्या मुद्रणपूर्वकालच्याच–त्यांचा मुख्य गुण गेयता हाच. शिवाय सोप्या भाषेंत कांहीं गमतीच्या कल्पना त्यांतून मांडल्या गेलेल्या दिसतात. महाराष्ट्रांतील संतांनींहि बालासाठीं कांहीं कविता रचली आहे. नामदेवांचे "किसना यमाल ले यमाल अपुल्या गाई" हें बालगीत बालभाव प्रकट करणारेंच नाहीं काय ! अर्थात् बाल-साहित्याच्या दृष्टीनें या कविता लिहिण्यांत आलेल्याच नव्हत्या. तर देवाच्या बाललीलांचें वर्णन करण्याची सतभक्तीच त्यांतून अधिकांशानें प्रतीत झालेली आढळते.

मुद्रणाला सुरवात झाल्यानंतर क्रमिक पुस्तकांतून कांहीं बालकविता येत होत्या. कै. भास्कर दा. पाळंदे, कै. मोगरे, कै. लोंढे, कै. लेंभे, कै. वासुदेवशास्त्री खरे वगैरे त्यावेळचे कवि. त्यांच्या कविता या पुस्तकांतून घेतल्या जात. रचना सोपी असे व क्लिष्टहि ! कै. लोंढे यांची क्रमिक तिसऱ्या पुस्तकांतील,

चिमकुला बहु बालक हा असे । बघुनिया सुख गे मज होतसे ।
चरणकोमल तांबुस हे किती–वदनरम्य दिसे नयनांप्रति ।

ही कविता नादमधुर व अर्थालाहि सोपी; शिवाय एका लहान बालिकेची तान्हुल्या भावाबद्दलची भावना व्यक्त करणारी आहे; पण अशा सर्वच सोप्या व अर्थसुगम कविता क्रमिक पुस्तकांत होत्या असें मात्र नाहीं. यापूर्वीच्या बालवर्गासाठीं जी क्रमिक अंकलिपी, ' मुलांसाठीं सोपीं गाणीं ' नांवानें प्रसिद्ध झाली होती, त्यांतील पुढील पद्य पाहा —

शाळेमध्यें जाशिल रे जाशिल रे ।
मार छडीचा खाशिल रे ॥
रोज धडा तूं घेशिल रे घेशिल रे ।
तरीच शहाणा होशिल रे ॥
बाप बोलतो मुलाला मुलाला ।
शहाणा होशिल काय मुला ॥
वेडा मुलगा वाईट वाईट ।
त्याचा येतो रे वीट ॥
मुलगा म्हणतो बापाला बापाला ।
उत्तर देऊं काय तुला ॥
शाळेमध्यें जाईन जाईन ।
शहाणा लवकर होईन ॥

ही बालकविता लहान मुलांना आवडणें शक्य होतें काय ! शब्द सोपे असले तरी त्यांतला 'मार खाण्याचा' बोध अंगावर शहारे उठवणाराच ! आणि पुनरुक्ति असली तरी तो ताल गेयतेचा नसून अभ्यासाचा न् ठेका शाळेबद्दलचा ! असल्या दहशतवादी कवितांना पहिल्यावहिल्या क्रमिक बालपुस्तकांत स्थान मिळावें हेंच आश्चर्य ! मुलांच्या मनाचा व मनोविकासाचा या प्राथमिक क्रमिक कवितांतून यत्किंचितहि विचार केला जात नसे हें यावरून ध्यानीं येईल. व याबद्दल 'वासंती' या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेंत आचार्य प्र. के. अत्रे यांनीं जे निषेधपर उद्गार काढले आहेत, त्यांतलें यथार्थत्व पटेल. अर्थात् क्रमिक पुस्तकांतील कविता हें कांहीं खरें

कलात्मक बालकाव्य नव्हेच. पण शिशुकाव्याची जाणीवपूर्वक निर्मिती होण्यापूर्वीची स्थिति ह्या कविता सूचित करू शकतात व तेवढेंच त्याचें महत्त्व.

बालकवितेचे तीन ठळक प्रकार कल्पावे लागतात. एक मुलाना उद्देशून असणारी, दुसरी बालनायक किंवा बालनायिका हेंच वर्णनविषय कल्पून लिहिण्यात आलेली व तिसरी बालाना समजेल, आवडेल अशी–त्याच्याच भावना प्रकट करणारी. पैकीं पहिल्या व दुसऱ्या प्रकारची कविता बालसाहित्याच्या ऊर्जित कालानतर विशेष अगत्यानें लिहिण्यात आली व विसाव्या शतकात तिसऱ्या प्रकारची कविता उत्कर्षाला चढलेली दिसते. मात्र एकोणिसाव्या शतकाच्या अखेर अखेरपर्यंत चागलेसें बालकाव्य नव्हतेंच म्हटलें तरी चालेल. यावेळीं खऱ्या अर्थानें बालयोग्य व बालस्वभावदर्शक कविताना जर कोणी सुरुवात केली असेल तर ती स्विस्तवासी रेव्हरड ना. वा. टिळक यानीच! १८९५ पासून १९१० पर्यंत त्यानीं वैपुल्यानें बालकविता लिहिली त्याचे लिहिण्याचे आवडते विषय दोन – मुलें व फुलें! ह्यावर त्यानीं इतकी गीतें रचलीं कीं, त्याना फुलामुलाचे कवि हें सार्थ नाव पडलें आहे. त्यावेळचे ख्रिस्ती मुलाचें एक मासिक 'बालबोध मेवा' या नावानें प्रसिद्ध होत असे, त्यातून टिळकाच्या पुष्कळ बालकविता प्रसिद्ध होत असत. ट ला ट, प ला प, या गमतीच्या नावानें त्यानीं शिशुकाव्याचें एक स्वतत्र सदरहि त्यात सुरू केलें. शिशूसाठीं अगदीं सोप्या शब्दात लिहिण्यात आलेल्या याच पहिल्यावहिल्या चागल्या कविता. ह्या सदराची कल्पना पुढील 'उन्हाळा' या कवितेच्या काहीं ओळींवरून येईल.—

घम् घम घम् घम् सुवास चाले।  
डव डव डव डव मोहोर आले॥

गुड् गुड् गुड् गुड् मधमाशी बोले।  
गुरुदु खाचें मिश्रण झाले॥

कशास व्हावे रडू रडूं–पडूं पुन्हा बाहेर पडू।  
गोड करूं जे दिसे कडू॥

शिशुकाव्यात लागणाऱ्या अवश्य गोष्टी म्हणजे सोपे शब्द, पुनरुक्ति, तालबद्ध रचना व नादमाधुर्य. ही सर्व गुणसामुग्री या छोट्या कवितेंतून उत्तम प्रकारें व्यक्त झाली आहे आणि शेवटीं एका ओळीत सूचित झालेली व कवीस हवी असलेली रम्य बालवृत्तीहि वर्णनीयच नव्हे काय?

रेव्हरड टिळकानीं अशीं छोटीं शिशुकाव्यें थोडींबहुत केलीं. परतु त्याची खरी निपुल रचना जाणत्या मुलासाठीं अधिकारानें आहे. त्याची "ताई तू फूल

गडे माझे। तारे तू नक्षत्रचि माझें " ही हृदयगम कविता तर बालकाव्याचा आदर्श म्हणून दर्शविता येईल.

रे. टिळकाच्या कवितेंत बालवर्णनें असूनहि प्रौढता आहे, प्रसाद तर आहेच. बहुधा शेवटच्या एकदोन ओळींत तात्त्विक भावहि प्रकट करण्याची त्याची पद्धत आहे. उदाहरणार्थ, 'मी येऊ का ?' या पाखराच्या कवितेंत शेवटीं

**'कोणि न मोडी प्रीतिविना–जगातला हा दूरपणा '**

—अशा सुदर ओळी आहेत. तर मुलाबद्दलच्याच 'मुलें ' या कवितेंत.

**व्यवहारी जगिं नाहीं शिरली–रत्नें निर्मल अजुनी उरली ।**
**प्रभुच्या मुकुटीं योग्य रमाया–मला भासली ॥**

अशी रम्य कल्पना आढळते.

"बालबोध मेवा" या मासिकातून आणखीहि काहीं चागले कवि बालकविता लिहू लागले व तेहि खि. रेव्हरड टिळकाच्या प्रेरणेनें व उदाहरणानेंच. त्यात कै. बालकवि त्र्यबक बापूजी ठोंबरे व कै. कवि दत्त याचीं नावें आवर्जून घ्यावीं लागतील. पूर्वी बालकवितांचे स्वतत्र सग्रह निघत नव्हते, त्यामुळें कोणी मोठ्या कवींनीं बालगीतें रचलीं, तरी मोठ्या दहा माणसाच्या घरात लहान मुलाना जसें स्वतत्र प्राधान्य मिळत नाही तशीच त्या कविताची स्थिति असे. त्यामुळें कै. बालकवि, कै. तांबे, कै. कवि दत्त इत्यादि नामवत कवींच्या प्रौढ काव्यसग्रहातूनच या बालकाव्याचाहि समावेश केला जात असे.

**कै. दत्ताची 'मोत्या शीक रे अ आ ई, गडे तूं बोलत का नाहीं ?'** वगैरे प्रसिद्ध बालकाव्यें व कै. बालकवींच्या 'माधा भाऊ ' 'चादोमा मजला देई ' इत्यादि उत्कृष्ट कविता त्याच्या अशा प्रौढ काव्यसग्रहातच समाविष्ट झालेल्या आढळतील. काव्यदृष्टीनें पाहता विषयाची निवड बालप्रिय गोष्टींची, नादमाधुर्य चागलें व रचना सोपी हीं या तिन्हीं कवींचीं वैशिष्ट्यें साम्यरूप ठरावीं. मात्र त्यातहि रे. टिळकाचा जसा बालसृष्टीचा आत्यतिक जिव्हाळा दिसतो तद्वत् बाल कवींची या छोट्या कवितातूनहि निसर्गसौंदर्यवर्णन करण्याची प्रवृत्ति आपल्या पृथगात्मतेनें नजरेंत भरते. बालकवींच्या पुढील कवितेंतील ओळी त्याची सत्यता पटवतील.

**ऊन पडलें । पान फूल दिसे कसे गोड गोडुलें**
**गोड गोडुलें । मोतियाचे दाणे कोणी सालीं पाडले ॥**

आणि यातील पुनरुक्ति आणि उपमा हीहि किती वेधक वाटतात !

१९१० नतर बालकवितांचा दुसरा व वेगळ्या तऱ्हेचा कालखड सुरू झाला असें म्हणावयास हवें. कै. वा. गो आपट्यांचें 'आनद ' हें बालमासिक सुरू

झाल्यानंतर बालकाव्याला ऊर्जितकाळ आला व या मासिकातून अनेकांनीं बाल-कविता लिहिली, त्याचा एक प्रातिनिधिक संग्रह 'मुलांची गोड गाणीं' या नावानें १९१७ सालीं प्रसिद्ध झाला. आणि यावेळच्या अनेक कवितांना गाणीं अशीच संज्ञा वरचेवर दिली गेली आहे. ना. के. बेहेरे यांचींहि गाणीं, झोपाळ्यावरचींहि गाणींच. वाङ्मयगुणाहूनहि गेयतेच्या दृष्टीनेंच हीं गाणीं अधिक बालप्रिय झालीं असावींत, कारण या सर्व कवितांना सुंदर चालीहि योजल्या आहेत. कै. गडकऱ्यांची 'कळ्यांचीं फुलें कशीं झालीं' ही प्रसिद्ध बालकविता व तांब्यांची 'आतां गडी फू दादाशीं' हें बालगीत यांत आहे. ना. के. बेहेरे, आनंद कृष्णा टेकाडे इत्यादि तत्कालीन प्रसिद्ध कवींच्या कविताहि यांत आहेत. मात्र एक वैशिष्ट्य यांतील बहुतेक कवितांतून दिसतें तें म्हणजे ही रचना बालसुलभ विषयावर असली तरी त्यांत प्रौढ शब्द व तात्त्विक बोध यांचा अधिक्षेप बाजवीहून अधिक झाला आहेसा वाटतो. उदाहरणार्थ, बालांना उद्देशून म्हटलेल्या ह्या दोन ओळी पाहा—

क्रूरा चिंता न करी तुमच्या कोमल हृदयीं वास
विचारमार्गी सदा वाहती मंद समीरण खास ।

मात्र सर्वच बालकविता यावेळीं अशाच प्रकृतीची होती असें नव्हे. विख्यात कवि कै. भा. रा. तांबे यांनींहि या कालांत कांहीं नितांत सुंदर बालकाव्यें रचलीं. त्यांतील वत्सलता, बालभाव व सोपी रचना हीं सर्वच वर्णनीय आहेत. शिवाय या काव्यांना गेयतेचेंहि लेणें लाभलेलें आहे. त्यांच्या एका कवितेंत आई बाळाला उद्देशून एक गीत म्हणत आहे तें किती सुंदर आहे पाहा—

रुणुझुणु ये रुणुझुणु ये झणकारित वाळा
लुडु लुडु लुडु दुडु दुडु दुडु ठुमकत ये बाळा
जागति बघ चिउ काउ
लागति घरट्यास जाउ
डोलति तरु लागति करु
श्रीहरि-भजनाला ॥

हें सर्वच गीत जेवढें वत्सल तेवढेंच निसर्ग प्रेमाचेंहि द्योतक आहे.

बालकाव्याला कांहींशी निराळी चालना देणारे आणखी दोन प्रातिनिधिक काव्यसंग्रह याच सुमारास प्रसिद्ध झाले. १९२९ सालीं वि. स. सुखटणकर यांनीं प्रसिद्ध केलेलें वासंती व १९३० सालीं ग. ह. पाटील यांनीं संकलित केलेलें बालशारदा ही दोन्हीं पुस्तकें यानंतरच्या २५-३० वर्षांतील बालकाव्याचें

स्वरूप उत्तम तऱ्हेनें स्पष्ट करणारीं आहेत. तुलनात्मक दृष्टीनें पाहिलें तर असें दिसेल कीं पूर्वींच्या बालकवितांतून नीतिशिक्षणहि मिळावें असा एक अलिखित संकेत असायचा तर अलिकडच्या क्रमिक पुस्तकांतून कवितांची निवड व्हावयाची ती बहुधा जुन्या संत कवितांतील वेंच्यांचीच! त्यांत परमार्थ बोध आणि उपदेश यांवाचून दुसरें काय असणार? मुलांच्या या वयाला या दोन्हीं गोष्टींचें वावडेंच असल्यानें काव्यानंदाशीं बालकांची ओळखच शाळेंत होणें मुष्कील! ती परिस्थिति पालटली. बालांकरितां कविता असली तरी त्यांतहि नव्या कल्पनांचा आविष्कार आणि बालमन आकर्षून घेणारें लालित्य हवें ही नवी आणि इष्ट सुधारणा यावेळच्या बालकाव्यांतून स्पष्टतेनें प्रतीतीस येऊं लागली. शिवाय कथांच्या शेवटीं जसा पूर्वीं तात्पर्यार्थ असे तसे काव्यांतहि शेवटीं मुलांना न समजणारें कांहीं प्रमेय असावें हीहि पद्धत मागें हटली व तिच्याऐवजीं सोपी रचना व बालमन विकसित करणाऱ्या कल्पनांचा अविष्कार व तोहि अगदीं सोप्या शब्दांत करण्याची कविजनांची प्रवृत्ति या दोन्हीं संग्रहांतून प्रकट झाली आहे.

रविकिरण मंडळाच्या स्थापनेनंतर मराठी कवितेला जें नवें प्रगत वळण मिळालें त्याचा प्रत्यय प्रौढ कवितांप्रमाणेंच बालकाव्य रचनेंतूनहि घडू लागला. रविकिरण मंडळापैकीं कै. माधव ज्यूलियन व कवि यशवंत यानीं बालकवितेकडे बरेंच लक्ष पुरवलेलें दिसतें. कै. माधवराव पटवर्धनांनीं बालांसाठीं काहीं कविता केल्या, काहीं पूर्वपद्धतीस अनुसरून बालदृष्टीस अनुलक्षून केल्या व कांहीं बालांशी तादात्म्य होऊनहि लिहिल्या. या कविता 'स्वप्नरंजन' मधून बालरंजन करताना दिसतील. पैकीं 'आमचें घर' ही रचना किती बालसुलभ व बालमनाची घराची ओढ व्यक्त करणारी दिसतेः—

आमुचें घर छान, शेजारीं वाहे ओढा
कागदी होड्या सोडा, दूर जाती
उथळ वाहे पाणी-नितळ थंडगार
नाचतां त्यांत फार-मौज वाटे

सोप्या शब्दांनीं व ठेक्यांत म्हणण्याजोग्या या पद्यपंक्तींनी हें गीत मुलाना आवडतें व्हावें यांत आश्चर्य नव्हे. पण शेवटीं मात्र कविचें स्वतःचें मन आपल्या घरच्या आठवणींनीं भरून आलें आहे. कवि म्हणतात—

'आमुचें घर सान-आतां तें कोठें गेलें?
वाल्याचें हें भुकेलें मन पुसे!

बालगीताचा शेवट तात्त्विकतेनें व्हावा हें खि. रे. टिळकांचें सूत्र यातहि दिसतें. मात्र त्यांची सारी बालकविता अशी नाहीं. "कशासाठीं पोटासाठीं" या कवितेंत

खेळांतल्या आगगाडीचें वर्णन अगदीं बालांच्या जिभेवर खेळत राहील इतकें बालवृत्तीनें करण्यांत आलेलें आहे.

चला खेळूं आगगाडी–झोका उंच कोण काढी ।
वाळू नीट कडी धर–झोका चाले खालीं वर ।
ऐका कुकुक्, शीट झाली, बोगद्यांत गाडी आली ।

हें काव्य तालबद्धतेनें आणि बालक्रीडावर्णनानें अधिकच रम्य झालें आहे. आटोपशीर व लयबद्ध रचनेचें नवांकुर अणू बालकवितेंतून यावेळीं उद्भवू लागलेले दिसतात. कवि यशवंतांनीं या पद्धतील अधिक स्पष्ट रूप दिलें. 'मोतीबाग' हें त्यांचें स्वतंत्र बालकवितेचें पुस्तक. यातील अनेक कविता बालभावनाना लालित्यपूर्ण प्रकट रुप देणाऱ्या आहेत. उदाहरणार्थ, एका खोडकर पोराची 'मिठाई' कशी होती ते त्याच्याच विशिष्ट भाषेंत ऐका.—

अहो मी मिठाईवाला । हवे कुणाला काय काय बोला ।
शिव्या घाल जरी । धम्मकलाडू तरी ।
बघा मिळेल एकेकाला — ॥

घाल कोपरखळी । तरी चापटपोळी ।
नाहिं उशीर मुळिं देण्याला ॥

यातून ठोशास ठोसा देणाऱ्या व कुरापती काढणाऱ्या मुलाचें घडणारें दर्शन किती साहजिक वाटतें ! 'घरकुल' ही दुसरी एक हृद्य कविता– तशीच छोट्या मुलीचें मनोगत समर्पकतेनें व्यक्तवणारी मुलगी आईला म्हणते—

तुला ग आई ! कांहींच कळत कां नाहीं ?
आणिली न कुठुनी कुंचली
भाऊनेंच की अम्हांस दिधली
तुझ्याहून बघ किती चांगली
केरसुणी ही ! नेशील लुबाडुन बाई !

या छोट्या मुलीनें घर आवरतांना जीव रडकुंडी आल्यामुळें आतां मदतीस सूनबाई हवी, म्हणूनहि उद्‌गार काढले आहेत. त्यातून आईच्या अनुकरणाचें किती यथातथ्य शब्दचित्र उमटलें आहे !

यानंतर बालकाव्याचा आधुनिक कालखंड सुरु झाला व बालमानसशास्त्राच्या दृष्टीनें सोपी काव्यरचना करण्याचा नवा प्रघात पडूं लागला. मॉंटेसरीबाईंच्या पूर्व-प्राथमिक शिक्षणपद्धतीचा प्रसार होत होताच. त्याचाहि यावेळच्या काव्यरचनेवर परिणाम घडलेला दिसतो.

यावेळचीं बालकाव्यें पाहिलीं तर पूर्वींहून तीं अधिक सोप्या आशयाची व कमी व्याप्तीची असावींत असा जणूं अलिखित दंडकच ठरूं लागलेला दिसतो. व या दृष्टीनें कवि वा. गो. मायदेव यांची कामगिरी सर्वप्रथम नांव घेण्यासारखी उत्कृष्ट ठरावी. त्यांनीं मुलांना अभिनय आवडतो हें जाणून स्वतंत्र अभिनय गीतें आणि क्रीडागीतें लिहिलीं. बालांसाठीं अगदीं चार चार ओळींची रचना करण्याची मूळ कल्पनाहि त्यांनीच उदयास आणली. उदाहरणार्थ—

मिठू मिठू पोपट, चोंच किती लाल
विडा कां कुठें खाल्लास काल ?

यांत लहान मुलाला सुचणारीच एक सहज सुदर कल्पना माडली आहे, व तीहि अगदीं बालभार्षेत. त्यामुळें या ओळी बाल ओठांवर खेळत रहाव्यात यांत आश्चर्य नाहीं. मुलांची आवड, जिज्ञासा आणि बालमनाचे प्रकटीकरण या बालकाव्यांतल्या सर्व गुणांचा कवि मायदेवांनीं आपल्या कवितातून आविष्कार केला. लहान भावालाचें आई सारखी घेते याबद्दल एका चारपांच वर्षाच्या मुलानें आईला, "झालो बाळ म्हणजे ना घेशिल जवळ ?" असा प्रश्न केला आहे. त्यांतून किंवा एका छोटीनें 'घरकुल' या कवितेंत बाहुलीबद्दल "पान घेतलें ! अहो सकाळपासून आहे माझें, सोनें भुकेलें !" हे उद्गार काढले आहेत. त्यांतून बालकांच्या कोमल भावनांचा किती स्वाभाविक आविष्कार झाला आहे ! मुलांमुलींना नित्य परिचयानें कुत्रा, माऊ, कोंकरूं, चिमणी हेहि मुके सोबती आवडतात. त्याजबद्दलचा जिव्हाळा 'वाघाची मावशी व कोंकरूं' या सुंदर कवितेंतून स्पष्ट झाला आहे.

कवि मायदेवांनीं बालकवितांचे शिशुगीत, बालगीत, क्रीडागीत, अभिनयगीत, छंदगीत असे भिन्न विभाग कल्पून बालकाव्याला अधिक रेखीव व आखीव स्वरूप आणलें यांत संदेह नाहीं. या कवितांतून भाषालकारांचें ओझें व उपमा उत्प्रेक्षांचें अवडंबर मुळींच नव्हतें. व तें तसें नसावें या मतप्रणालीला मायदेवांच्या बालकवितेनेंच शुभारंभ केला आहे.

गेल्या दोन तीन तपांत या दृष्टीनें सोपी व सुदर बालकाव्यें लिहिणारांची एक नवी पिढीच उदयाला आली. अपर्णा देशपांडे, म. का. कारखानीस, श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. वि. म. कुळकर्णी, श्री. भवानीशंकर पंडित, श्री. ना. गं. लिमये, संजिवनी, ग. ह. पाटील, श्री. कुसुमाग्रज, श्री. शांताराम आठवले, श्री. ह. स. गोखले इत्यादि अनेक ख्यातनाम कवि व लेखकांनीं यावेळीं बालकवितेची अगत्यानें जोगवण केली आहे. सर्व सुवासिक पुष्पें असलीं तरी प्रत्येकाच्या सुवासाचा कांहीं भिन्न परंतु हर्षद प्रत्यय यावा तसें यांतल्या कवींचे भिन्न गुण व वेगवेगळें सौंदर्य

पैलू यांनीं बालकवितेला एक वेगळा आकार व निराळी वेधकता येत असल्याचें दिसतें; आणि बालमनाचा आविष्कार हेंच त्या सर्वांचें प्रमुख लक्ष्य स्थान आहे. मात्र जुन्या रचनेची गंभीर छाया अजूनहि यांपैकीं कांहीं कवींच्या कवितेवर दिसून येईल. उदाहरणार्थ श्री. शांताराम आठवल्यांच्या 'नदीचें गाणें' या बालगीताचा आरंभ असा आहे.

वाहते सुनिर्मल मी सरिता
नित गात गात मधु संगीता
जनन लाभलें मज गिरीशिखरीं
शेवट तर उदधीच्या उदरीं
जननमरण योजना ईश्वरी
जगताची त्यासच चिंता ॥ (तारकापुंज)

कवि भालचंद्र यांचें पुढील एक गीत पाहा—

क्रांतिदीप हा नव्या युगाचा । उजळुनि नष्ट करा अंधार ।
मायभूमिच्या पराक्रमाचा ।
निनादो त्रिभुवनीं एक पुकार ॥ गर्जा जयजयकार ।
(किशोरगीतें—पृष्ठ ३१)

किंवा श्री. ना. ग. लिमये याची पुढील एक कविता पाहा—

ही धन्य मातृभूमि । सर्वस्व मानितों मी
भालीं हिमाद्रि चंद्र लोळे पदीं समुद्र
गंगादिकी नद्यांही समृद्धता सर्वदाही ॥ ही धन्य मातृभूमि

आणि श्री. सूर्यकांत खाडेकर यांच्या 'छुमछुम' मधील या दोन पद्यपंक्ति तशाच—

सैनिक आपण नव्या युगाचे । फुलवूं जीवन मांगल्याचें
मानवतेचा भक्त न मानी – कोणाची दरकार । घुमवा रे ललकार

सौ. आशा गवाणकरांच्या बालगीतांतून तर पुढील ओळी अधिकच प्रौढरूपानें प्रकट होतांना दिसतील. यात बहीण भावाला सांगते—

मिटल्या मुठींत तुझीया दादा – विजलीची रेषा आहे
मिटल्या मुठींत तुझीया दादा – राष्ट्राची आशा आहे !

शेवटच्या उदाहरणांतील रचना सोपी पण आशय मात्र बालबुद्धीच्या आटोक्या-पलीकडचा वाटतो. श्रीमती शिदोरे यांचें 'स्वातंत्र्यगीतें' हें सर्वच पुस्तक खास

बालांसाठीं प्रसिद्ध झालें आहे. मात्र यातील रचना बालसुलभ वाटत नाहीं. उदाहरणार्थ—

पारतंत्र्याचें ग्रहण सुटलें
स्वातंत्र्यसूर्याचें दर्शन झालें
मंगलवाद्यें वाजुं लागलीं
स्वातंत्र्याची प्रभा दूर फाकली
मंगलस्नान करुनी झडकरी.
स्वातंत्र्यसूर्याला वंदन करी।

ह्या प्रौढ ओळींत कल्पकतेचा व सुभग शब्दरचनेचा देखील अभाव जाणवतो. खरें म्हणजे या जाणत्यांसाठींच असणाऱ्या कविता वाटतात. शिवाय याला प्रचार-गीतांचें स्वरूप आलें आहे; त्यानें रसहानि होते. अर्थात् अशा प्रकारची प्रचारक वा प्रौढ रचना यावेळच्या सर्वच बालगीतांत नव्हती ही एक आनंदाचीच गोष्ट. उलट बालगीत या कालखंडांत बहरलें तें मोहक कल्पना व शब्दचमत्कृति यांच्या सोप्या अविष्कारानेंच. उदाहरणार्थ, श्री. वि. म. कुलकर्णी यांच्या 'झुक् झुक झुक' ह्या कवितेच्या काहीं ओळी पहा—

गाडी आली गाडी आली झुक् झुक् झुक्
शीट कशी वाजे बघा कुक् कुक् कुक्
इंजिनाचा धूर निघे भक् भक् भक्
चाके पाहूं तपासून ठक् ठक् ठक्

ही रचना बालांना अत्यंत प्रिय झाली ती तालबद्धतेने व सोपेपणानेंच. बालाना खेळणीं किती आवडतात; तेव्हां त्यांच्या आवडत्या चेंडूचें हें अपर्णा देशपांडे यांनीं केलेलें हितगूज त्याना गुळगुळीत वाटावें यांत काय आश्चर्य ?

मऊ माझें अंग, माझें नांव सांग
आकारानें गोल, कळलें कां बोल !
गडी आवडीचा, आहे ना मी साचा ?
माझ्यावीण बाळा, कोण येई खेळा ?

अगदी साधे शब्द पण त्यांत यमक आहे, ठेका आहे व बालाना रुचणारी नादमाधुरीहि आहे.

ग. ह. पाटील याची

पांखरांची शाळा भरे पिंपळावरती
चिमण्यांचीं पोरें भारी गोंगाट करती

ही बालकविता किंवा,

पंख चिमुकले निळे जाभळे हालवुनी झुलते
फुलपाखरूं । छान किती दिसतें ॥
डोळे बारीक करिती लुकलुक । गोल मणि ते । फुलपाखरूं

ही रचना किती साधी व सुबोध आहे ! बालमनाचा ठाव घेणाऱ्या अशा कविता ग. ह. पाटलानी केल्या तर श्री. म. श्री. पडित यानीं मायदेवाच्याप्रमाणेंच बालकाव्याच्या वर्गीकरणाचे शिशुकाव्य, बालकाव्य व कुमारकाव्य असे स्पष्ट फरक करून 'बीजेची कोर,' 'चवथीचा चाद,' 'अष्टमीचा चद्र' इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध केलीं. त्यात या मूलपणाच्या वेगवेगळ्या अवस्थासाठीं भिन्न कल्पना व रचना आहे या पुस्तकानें बालकाला अधिक नीटनेटक्या सीमा घातल्यासारख्या दिसतात म्हणून त्याचें महत्त्व जास्त.

बालप्रिय विषय व काहींशी गभीर रचना हें यावेळचें बालकाव्याचें बाह्यरूप होतें, तर बालमानसदर्शन व बालविचाराचें प्रकट शब्दचित्र हा त्याचा आत्मा होता असें म्हणता येईल भाषा लालित्यपूर्ण होती गेयतेकडे तिची प्रवृत्ति होती सोप्या उपमा व शब्दालकार याचीहि तिला हौस होती, असें दिसतें. या बालकवितेचें रूप अगदींच शिशुसदृश नव्हतें, तर बाल व कुमार यासाठींहि तिनें अधून मधून उपायन पुरवलें आहे, आणि तिची एकदर प्रकृति व प्रवृत्ति सौम्य परतु काहींशी गभीर अशीच भासते

अलिकडच्या दहा पधरा वर्षांत बालकविता पुन्हा नव्या तेजानें उजळू लागली आहे. विशेषत. शिशुगीताना तर नवा मोहोरच आल्यासारखा भासतो अगदीं छोट्या बालकाना अभिनयाची आवड बरीच दिसते व बालकविता त्याला पूरक असतील तर त्या त्वरित बालप्रिय होतात. जात्याच बालाची वृत्ति नाट्यानुकूल प्रवृत्तीची. तेव्हा या कवितातून या प्रवृत्तीला पोषक अशी कृतिगीतें असलीं तर छोट्याना ती अधिक आवडतील हें जाणून अशा प्रकारचीं शिशुकाव्यें किंवा शिशुगीतें गेल्या पधरा वर्षांत बरींच प्रसिद्ध झालीं. प्रौढ साहित्यातील काव्य प्रातात ज्याप्रमाणें नवनवे प्रवाह व नव्या रचनापद्धति येतात त्याचप्रमाणें बाल कविताहि वेगळ्या गुणानीं व वेगळ्या दर्शनानें नटत आहे. या नव्या बालकवीमध्ये श्री वि. म. कुळकर्णी, श्री. गोपीनाथ तळवलकर, श्रीमती शाता शेळके, श्रीमती सजीवनी इत्यादि पूर्वख्यात कवींची नावें आढळतील. त्याचप्रमाणें विंदा करदीकर, राजा मगळवेढेकर, श्री सदानद रेगे, ना. गो शुक्ल नलिनी तळपदे, सौ. शाताबाई जोशी, सौ सुमति पायगावकर, अनिरुद्ध पुनर्वसू, लीला देशपाडे, तारा वैशपायन, ता पराजपे, के नारखेडे, सौ लीलावती भागवत, सरिता पदकी

सौ. मेबल असे कितीतरी काव्यक्षितिजावर, नव्यानें उदित झालेले तारेहि आहेत. आविष्करणाच्या नवनव्या पद्धति यानीं साकार केल्या आहेत; तशाच रचनेच्याहि.

अगदीं प्रथम मागल्या पिढीच्या व या आधुनिक बालकाव्यांत जो फरक जाणवतो तो आहे रचनेचा. मागल्या कविता काव्य या संज्ञेला पात्र होणाऱ्या असत. त्याना यमक व छंद असे. पण आज शिशुवाङ्मयात गद्य व पद्य यांच्या सीमाच हरवल्यासारख्या झाल्या आहेत. तीं दोन्हीं एकमेकांत मिसळूं पाहत आहेत. गद्य म्हणावें तर अनुप्रास व यमक थोडथोडे जुळलेले. पद्य म्हणावें तर मजकुराची ठेवण सरळसरळ वाक्यरूप गद्याची! उदाहरणार्थ, श्री. मगळवेढेकरांच्या 'वाऱ्याशीं भाडण' यातील ही एक रचना पाहा—

उंदिरमामा, उंदिरमामा, येवढी कसली घाई
तुरु तुरु तुरु तुरु स्वारी कुठें जाई ?
काय करूं बाबा आतां घर बघतो नवं
खायला प्यायला जगायला तर हवं ?

खरें म्हणजे ही कविता आहे, पण मुलीचें सासर माहेरशी सारखेंच नातें असावें तसें या रचनेचें गद्यपद्याशीं समान नातें दिसतें! अर्थात् अशा गद्यरूप पद्यरचनेंतून गेयतेची अपेक्षा करणेंहि व्यर्थच म्हटलें पाहिजे. आजची शिशुकविता गाता येण्यासारखी नाहीं. ती ठेक्यात बोलून दाखवण्यासारख्या रूपाची होत चालली आहे, असेंहि (काहीं अपवाद वगळून) म्हणता येईल. पुढील उदाहरणें या दृष्टीनें वाचण्याजोगीं ठरतील.—

खिडक्याला पडदे दाराला तोरण
काय आहे आमच्या घरीं सांगा पाहूं कारण !
गरम गरम चहा, शिरा न् पोहे
सांगा बरं आमच्या इथें आज काय आहे ?

(नलिनी तळपदे–धम्मक लाडू चापट पोळी)

एकदां एका मुलाचा पतंग गुल् झाला
ठेंगूच्या देशामध्यें उडत उडत गेला !

(प्रा. विंदा करंदीकर–राणीची बाग)

एक होती उंदरी – एक होती चिचुंद्री
भूक लागली दोघींना – लागल्या खाऊ शोधायला
खाऊ शोधित घरांत गेल्या – इकडे तिकडे पाहूं लागल्या ।

(ना. गो. शुक्ल)

आतां अगदीं थोड्या वेळांत
आइस्क्रीमची गाडी येईल
लौकर देना पैसा आई
उन्हांत सगळें वितळून जाईल!

(श्री. सदानंद रेगे)

चिऊताई चिऊताई !
काय रे चिमणा ?
हा बघ आणलाय मोत्याचा दाणा
छान आहे बाई पण ठेवायचा कुठं ?
त्यांत काय मोठं, बांधूं या घरटं।

(सौ. लीलावती भागवत)

भडाभडा बोलणें, मुळुमुळु रडणें
फिदी फिदी हंसणें–मला नाहीं आवडत
सिनेमा बघणें, चोरून खाणें
खोटारडें बोलणें–मला नाहीं आवडत।

(अनिरुद्ध पुनर्वसू)

ह्या साऱ्या कविता (!) अगदीं आधुनिक आहेत व गद्यपद्यरचना एकमेकांत मिसळूनच त्यांची निर्मिती झाली आहे. अर्थात् सुभग रचनेचा काव्यगुण यांतून उणावलेला असला तरी सोपेपणा व ठेक्याची शब्दरचना हे गुण मान्य करावे लागतील. शिवाय या साधेपणानेंच बालओठांवर या कवितांचे शब्द सारखे खेळतात; व त्या दृष्टीनें ही रचना अधिक बालसुलभ व बालप्रिय ठरणारी आहे हें कोण नाकबूल करील ?

आधुनिक बालकाव्याचा आणखी एक मोठा गुण कल्पकतेच्या नाविन्याचा म्हणावा लागेल. यांतहि अधुनमधून उपमा आढळतात, पण त्यांचें रूप सांकेतिक या ठराविक नाहीं; त्यामुळें त्यांना एक आगळें सौंदर्य मिळालें आहे. उदा. 'चिमणचारा' या श्रीमती शांता शेळक्याच्या पुस्तकांतल्या या चमकदार कल्पना पाहा—

चांदुमामा–चांदुमामा–गोरा तुझा रंग
चांदण्याच्या दुधानें कां घुतोस तूं अंग ?
किंवा
(मनी मांजरी) रात्रीच्या वेळीं,
डोळ्यांतून बॅटरी लावते कां निळी ?

श्री ना॰ गो शुक्लांची काव्यप्रतिभा एका खासेराव नावाच्या छोट्या मुलाशीं संभाषण करते तेंहि या कल्पनाचमत्कृतीच्या दृष्टीनें पाहण्यासारखें ठरावें—

खासेराव, खासेराव, जाता तुम्ही कुठें ?
ढगाशीं खेळते विजुताई तिथें !
खासेराव खासेराव, जाता तुम्ही कुठें
लुकलुक चांदण्या जमतात तिथें

निर्मला देशपांडे यांचें फुलाचें कुटुंब किती सुंदर वेषभूषा करणारें—

गुलाबराणी गुलाबराणी–लाल परकर हिरवी चोळी
तुला शिवली कोणी
चपकवाळा चपकवाळा–सोनेरी झगा रुपेरी फुगा
नाजुक रुपडं आरशात बघा

ही कल्पना बालानाच नव्हे तर काव्यरसज्ञ प्रौढानाहि आवडेल कोठें कोठें या कल्पनासुंदरतेला काव्यमय भाषेचीहि जोड लाभून तें द्विगुणित होतें या आधुनिक कवितांतूनहि या अशा कविता मुलींच्या मेळाव्यात सुंदर वस्त्रालंकारानी खुलणाऱ्या बालिकेप्रमाणें लक्ष वेधून घेतात संजीवनी एका छोट्याची अपेक्षा सांगताना म्हणतात—

कधींकधीं मज वाटे जावें उंच ढगाच्या वर
दो हातानीं रविचंद्राचें हलवावें झुंबर !
कधींकधीं मज वाटे व्हावें मत्स्यराज सुंदर
पाहुन यावें जलदेवीचें रत्नाचें मंदिर

अर्थात् हें शिशुकाव्य नसून बालकाव्य आहे हें स्पष्टच आहे

या कल्पकतेचा आणखी एक वेगळा पैलू आजकाल विशेष दिमाखानं बालकाव्यातून चकाकू लागला आहे तो वैचित्र्याचा ! कल्पना वैचित्र्याचे हे नमुने बालकवितेला निराळी प्रगत दिशा लाभल्याचें तर सूचित करतातच, पण त्याबरोबरच आशयाच्या प्रकटीकरणाची संकेतबद्ध चाकोरीहि जणु बदलून टाकतात ! एका बाळाची अपेक्षा एका कवितेंतून पुढीलप्रमाणें व्यक्त झाली आहे

असावा सुंदर चॉकलेटचा बंगला–
चंदेरी सोनेरी चमचमता चांगला
चॉकलेट बंगल्याला टॉफीचं दार
झोपटीच्या झुपक्यानं झाडून जाईल सार !

बाळाचे किती अद्‌भुतरम्य हें घर, नाहीं काय ? 'वान्याशी भांडण' मधील एका 'चिनूची चिंता' कोणाचेहि ओठ हसरे करील—

सदा कदा पहाल तेव्हा चिनू आपला चिंतातूर
हसा खेळा गाणें म्हणा। चिनूला आपली एक हुरहूर
कसें करावें। काय करावें ?
आभाळाला नाहीं खांब, चंद्र राहतो लांबच लांब
समुद्राला नाहीं झाकण। कोण करील चादण्याची राखण ?

अनिरुद्ध पुनर्वसूचे 'लई नाही लई नाहीं मागणें' यात देवाला पुढीलप्रमाणें बाळ वर मागतो—

आवळ्याचीं झाडें उंच वाढतात—पोंहचत नाहीं उंचावर हात !
अगदीं लहान झाडें तीं होऊ दे—खूप खूप आवळे आम्हाला खाऊ दे !
लिमलेट गोळ्या पावसामधून— रोज बरसाव्या खाऊं त्या वेचून।

कल्पनावैचित्र्याचेंच चमत्कृति हें दुसरें रूप. इंग्रजींत नॉन्सेन्स व्हाईम्स नावाचा एक बालकवितांचा प्रकार प्रचलित आहे. तो अद्याप तरी आपल्याकडे आलेला नव्हता. असंबद्ध गोष्टींची काव्यजुळणी हें त्याचें प्रमुख लक्षण. आजकाल चमत्कृतिजन्य बालकविता निर्माण होते त्यात याप्रकारची कविताहि आकारू लागली आहे. कवि विंदा करंदीकर यांनीं त्याची सुरवात केली आहे. 'एकदा काय झालें' या पुस्तकातील पुढील ओळी पाहा—

एकदा काय झालें, एकदा काय झालें
पक्षि उडून गेले, म्हणून झाड उडून गेलें !
एकदा काय झालें एकदां काय झालें
गणपतीचा मुकुट घालून उंदिरमामा आले !

राजा मंगळवेढेकराचें 'म्हणे एका गावात' असेंच चमत्कृतिजन्य काव्य आहे—

म्हणे एका गावात, पंख आहेत मुलाना
उडत उडत जाऊन, शिवून येतात ढगाना !
म्हणे एका गावात, आहे पेढ्याचा डोंगर
मुलें चढतात त्याच्यावर येते जेव्हा लहर

किती मजेदार न् बालकर्षक कल्पना आहेत या !

यातल्या घटनेचा कार्यकारणभाव हुडकत बसायला नको, की सत्यासत्यतेचा निकष त्याला लावायला नको—चोख्खनचालून ह्या 'काहींतरी' कविता. मुलाना

गम्मत वाटली कीं तियेंच त्यांचा कार्यभाग संपला! बालांच्या अपेक्षा वेगळ्या, त्यांना गम्मतजम्मत आवडते आणि याजबरोबर बालमनावर कुतूहल–जिज्ञासा यांचेंहि राज्य चालतें. या कुतूहलाला बालकाव्यांतून प्रकटरूप आजवर फारसें नसे; पण आतां तो प्रमुख वर्णनविषय होऊं पाहत आहे, व प्रश्नोत्तररूप संवादहि या स्वच्छंद बालकवितेंत प्रकटूं लागले आहेत. श्री. ना. ग. शुक्लांच्या 'खुळखुळ्यांतील' ह्या ओळी पाहा—

कढईला कान आहेत ऐकत मुळीं नाहीं
सुईला नाक आहे वास घेत नाहीं
टेबलाला पाय आहे चालत मुळीं नाहीं
डब्याला तोंड आहे खातपीत नाहीं
बापूकाका बापूकाका माझं जरा ऐका
असं कां ? तसं कां ? सांगतां कां काका ?

या प्रकारच्या कुतूहलजन्य कविता आज अनेक पुस्तकांतून आढळतात.

या सर्व विवेचनावरून स्पष्ट दिसेल कीं, बालकाव्याची वेषभूषा आता कालानुसार बदलत आहे. तिच्यांत नवे रंग येत आहेत, नव्या पद्धतीचें आवाहन ती करीत आहे. गेयता अगर सुंदर चालींची चाल तिला मानवत नसली तरी लयबद्ध शब्दरचना व ठेका आणि ताल यांच्या तालावर तिची रचना होत आहे हें मान्य करायला हवें. निर्मला देशपांडे यांच्या,

घुसळ घू घुसळ घू । डोईवर हंडा कोण ग तूं ।
छनन्न् छनन्न् छन् । माझं नांव राधा गवळण ।

या सुंदर ओळी पाहा किंवा विंदा करंदीकरांचें,

परी ग परी । कोण तुझ्या घरीं
मनी मांजरी सैंपाक करी !

हें तालबद्ध गीत या दृष्टीनें उल्लेखनीय ठरेल. श्री. गोपीनाथ तळवलकरांचें एक बालगीत तर सर्वस्वी या ठेक्याच्या तालांतच रंगणारें आहे. तें असें—

ठण् ठण् ठण्
ठण् ठण् ठण् सकाळ झाली रे गजन् ।
ठण् ठण् ठण् ऊठ तोंड धू रे पटकन् ।
ठण् ठण् ठण् दिलीप माया ए शालन् ।

ठण् ठण् ठण् दूध पिऊनी घे चटकन् ।
ठण् ठण् ठण् कपडे घालुन लाव बटन् ।
ठण् ठण् ठण् देवाजीला करी नमन् ।
ठण् ठण् ठण् उचल आपुलें दप्तर अन् ।
जा झटकन् घंटा वाजे ठण् ठण् ठण् ।

जाताजाता आणखी एका नाविन्याचा उल्लेख करावासा वाटतो, परंतु हें नाविन्य स्तुत्य नाहीं. साहित्यातील काव्यात नवकाव्याचा प्रवाह आला. त्याच्या छायेनें बालकवितेसहि अनेकदा भासलेलें दिसतें. त्यामुळें काहीं बालकवितेंत नवी दुर्बोधता, प्रतीकजडता, न समजणाऱ्या उपमा व शिथिल रचना हेहि दोष निर्माण होत आहेत. पुष्कळदा बालकाव्यात वरील दोषानी निरर्थ व नीरस रचनेचा अंतर्भाव होताना दिसतो. श्री सदानंद रेगे ह्या आधुनिक कवींची 'चोंबडी कोंबडी' ही कविता अशीच आहे:—

लालतुऱ्याची काळी कोंबडी । आहेत तिचीं पिलें शेंबडी
वरें झालें भली जिरली – नाहींतरी ती आहे चोंबडी !

ही कोंबडी चोंबडी का ह्याचा बोध होत नाहीं. केवळ शब्द साधर्म्यामुळेंच तर नव्हेना ? 'सरडा' ही दुसरी छोटी कविता पहा—

तेरड्याचा रंग तीन दिवस—सरड्याचा फार तर चार दिवस

कविता म्हणजे या दोनच ओळी ! त्या एखाद्या मोठ्या म्हणीप्रमाणेंच भासतात; पण काव्यगुणापासून त्या दूरच नाहींत काय !

बालसाहित्यातील काव्यप्रांत हा असा वैशिष्ट्यपूर्ण दिसतो. मुद्रित बालकवितेच्या प्रारंभकालापासून आतापर्यंत त्यात अनेक बदल घडत आले क्वचित् ह्या बदलातले काहीं प्रगत स्वरूपाचे नसले तरी कित्येक वेगळ्या प्रथा यात ज्या सुरू झाल्या, त्या निस्संशय प्रशंसनीयच म्हणायला हव्यात. या पायऱ्यावर पाऊल ठेवीत ठेवीत बालगीत आता सुंदर व अधिक खेळकर झालें आहे व अभिव्यक्ति आणि आशय या दोन्हीं दृष्टींनी तें बालजीवनाशीं अधिकच सवादित्व राखणारें झालें आहे; परंतु त्याबरोबरच जुन्या बालकाव्यातून बालमनावर उत्कृष्ट संस्कार करण्याची जी एक अनामिक प्रवृत्ति होती, व जिची बालवयात अत्यंत आवश्यकताहि असते, ती मात्र आज लोप पावल्यासारखी झाली आहे. पूर्वीची बालकविता बालाना देवावर निष्ठा ठेवण्यास शिकवीत असे. म. का. कारखानीसांचें पद्य पाहा—

हें रम्य नील नभ रचिलें । तेजानें सारें भरलें, कुणि वरें ?
मोराला रम्य पिसारा । दिली पिकास वाणि मधुरा । कुणि वरें ?

अशी गेल्या पिढीच्या अनेक कवितांतूनहि श्रद्धासंस्काराची साक्ष पटेल, पण आज असे संस्कार करण्याचें माध्यम बालकाव्य हेंच असलें पाहिजे, हाच विचार मागासल्याप्रमाणें झाला आहे! किंचित् प्रौढ शब्दांचें आवरण घेतलेलें पूर्वीचें सुंदर कल्पनारम्य वर्णन आताच्या बालकवितेला झेंपत नाहीं, पेलत नाहीं. कल्पित शब्दसुंदर निसर्गवर्णनापेक्षा वस्तुनिष्ठेची साधीसुधी शब्दचित्रें तिला अधिक आवडू लागलीं आहेत. तिची वृत्ति अधिक बालसदृश झाली आहे. काव्यात्मतेपेक्षाहि बालरंजन हेंच तिचें प्रमुख साध्य दिसतें. त्याची इष्टानिष्टता अजून काळाच्या कसोटीवर ठरावयाची आहे.

कवितेच्या अंतरंगाबरोबरच बाह्य रूपाचाहि विचार करणें यावेळीं उचितच ठरेल. बालकाव्याला चित्रांनीं नवी शोभा येते हें सूत्र आजकाल सर्व प्रकाशकांनीं मानलेलें आहे, पण या चित्रांतहि सौंदर्य नको काय? तेथेंहि नवचित्रकला (मॉडर्न आर्ट) प्रकट होऊं लागली आहे, त्यामुळें पुस्तकांतील चांगल्या कवितांनाहि कांहींसें वैगुण्य आल्यासारखें वाटतें. व्यंगचित्रें ही कवितेचा आशय गमतीनें व्यक्त करीत असतात, हेंहि मान्य, पण हीं व्यंगचित्रें ओबडधोबड व कशीशींच वाटणारीं असलीं तर बालांना तीं आवडतील काय?[१] बालकवितेचा आशय जसा बालसुलभ व परिणामीं चांगला ठरणारा हवा, तसा काव्यानुषंगिक चित्रांचाहि पाहिजे, हें स्पष्टच आहे, आणि जेथें पुष्कळदा हें नवचित्रकलेचे संकेत सर्वसामान्य जाणत्या वाचकांनाहि कळत नाहींत, तेथें ते बालकांना कळतील असें गृहीत धरतां येत नाहीं. अलिकडच्या कांहीं बालकवितेच्या पुस्तकांतून अशीं चित्रें आलीं आहेत. 'चादोबा चादोबा, चणे घ्या चणे' इत्यादि पुस्तकें या विषयाच्या बाबतींत नमूद करण्याजोगीं आहेत, पण ही चमत्कारिक नवचित्रपद्धतीच कांहीं समीक्षकांना फार पसंतीस आलेली दिसते, व त्यांनीं त्याची तारीफहि केलेली आहे, अर्थात् मतभिन्नता सगळीकडेच असते तशीच ती याहि क्षेत्रांत असायचीच!

सुदैवानें सर्वच बालकवितांतून अशीं नवचित्रें नाहींत. उलट कांहीं पुस्तकांतून तर मुखपृष्ठ, आंतील चित्रें, सजावट इत्यादि अधिकच सौंदर्यपूर्ण करण्याकडे कांहीं प्रकाशकांनीं लक्ष पुरविलें आहे. पूर्वीच्या बालपुस्तकांतून या गोष्टींना विशेष स्थान नव्हतें. शिवाय, जेथें बालकाव्यसंग्रहच अभावानें असत, तेथें त्यांच्या सजावटीचा प्रश्नहि दूरदूरच असावा यांत आश्चर्य नव्हतें. १९१० सालापासून या कवितांचा उर्फ गाण्यांचा संग्रह काढण्याची प्रथा सुरू झाली, पण त्यांत चित्रें येण्यास आणखी कांहीं कालावधि लागला. १९४२ सालीं केशव भिकाजी ढवळे या प्रकाशन

[१] देवदास बागुल—बालवाङ्मय

सध्येनें 'मोतीनाग' हें यशवंतांचें पुस्तक प्रसिद्ध केलें व एक नवें सुशोभित व देखणें असें बाह्यसजावटीचें रूप बालकवितेस प्राप्त करून दिलें. याची छपाई तर आकर्षक होतीच, पण मुखपृष्ठहि चंदेरी होतें. व आतील चित्रें सुबक असून रंगीत होतीं! बालाकर्षणाचें एक नवें दालनच जणू दवळ्यांनी या निमित्तानें या क्षेत्रात उघडलें. यानंतर आज अनेक बालकाव्यसंग्रह सुंदर चित्रांनीं, नाजुक छपाईनें व आकर्षक बाह्यांगानें नटलेले दिसतात. पॉप्युलर प्रकाशनाचें 'मातीची गाय' ज्ञानराज प्रकाशनाचें, 'एकदा काय झालें,' ओरिएंटल लॉंगमन्सचें 'वाऱ्याशीं भांडण' हे अशा आकर्षकतेनें नटलेले बालकाव्यसंग्रह जरूर उल्लेखित करण्याजोगे आहेत. मात्र या सजावटीबरोबरच आणखी एक तदनुषंगिक विचार वारंवार जाणवतो, तो या सुंदर दिसणाऱ्या पुस्तकांच्या वाढलेल्या किंमतीबद्दल! लहान पुस्तकाची पृष्ठें अमुक असलीं तर अमुक किंमत असावी असें कांहींच परिमाण ठरलेलें नसलें तरी काय झालें!' चांदोबा चांदोबा' व 'मातीची गाय' या १६ पृष्ठांच्या पुस्तकाची किंमत एक रुपया, तर 'म्हणे एका गावात' या २० पृष्ठांच्या छोट्या पुस्तकाची व 'राणीचा बाग' या पुस्तकाची किंमत दोन दोन रुपये! प्रकाशकाच्या सगळ्या अडचणी मान्य करूनहि या वाढत्या किंमतीचें संकट या सुंदर बालप्रकाशनाच्या प्रसाराला बाधक ठरत आहे हें मुद्दाम उल्लेखित करावेंसें वाटतें. बालकाव्यें अधिक सुंदर होत आहेत, वेधक रूपात प्रकट होत आहेत, ही भाग्याची गोष्ट, पण त्यांना बालश्रोतापर्यंत पोंचायला याच गोष्टींनीं अडथळा व्हावा हें इष्ट कसें मानावयाचें!

●●●

## बालकादंबरी

बालवाङ्मयांतील बहुतांशी कादंबऱ्या कुमारवयीन मुलांसाठींच लिहिल्या जात असल्यानें या साहित्याचें परिशीलन करण्यापूर्वी कुमारमनाची धारणाशक्ति कशी बनलेली असते याचा थोडासा विचार करणें इष्ट ठरेल

बालवयाची सीमा ओलांडून मुलें कुमारावस्थेंत प्रवेश करतात, त्यावेळीं अनेक तऱ्हेचा बदल त्यांच्या प्रकृतीप्रमाणें मनोधर्मांतहि पडूं लागतो. त्याना जगाची ज्ञाणीव व व्यवहारी जीवन याची नवी ओळख होते व केवळ कल्पनारम्य गोष्टींत रमणारें वय हल्लेच मागे सरतें. अद्भुतरम्यतेंत आजवर भान् विसरणारें बालमन आता जणु जागृत होऊन विचार करूं लागतें कीं, अद्भुत चमत्काराच्या या गोष्टी सुंदर आहेत खऱ्या, पण सत्य सृष्टींत त्या थोड्याच दिसणार आहेत! सोन्याचा पक्षी आणि अल्लाउद्दिनचा, हवें तें देणारा, दिवा या फार मूल्यवान् गोष्टी, पण त्या लाभणारा भाग्यवंत कथांतूनच असायचा! व्यवहारात हें भाग्य कोणाला कधींच मिळणारें नाहीं! पऱ्या कुणाला भेटून हिरेमाणकें देणार नाहींत, वा राजकन्याचें पण जिंकून त्या कधीं मिळवितांहि येणार नाहींत

अशा प्रकारें केवळ रंजन व तेंहि अद्भुतांतून घेण्याची प्रवृत्ति मुलांतून नष्ट होऊं लागते. कल्पित वा असंभाव्य गोष्टींबद्दलची उत्सुकता ओसरते. मनाचा विकास वेगानें होतो. युवावस्थेची हाक साद घालूं लागते. गंभीर विचारशीलतेचा उदय होतो

आणि या नव्या विकसनाला जीवनातल्या खऱ्याखुऱ्या गोष्टींचीच अधिक ओढ वाटूं लागते. कल्पित असल्या तरी शक्य कोटींतल्या कथानकांची गुंफण व सामाजिक वस्तुनिष्ठ वातावरण यांची आतापर्यंत सुप्त असलेली आवड जागी होते

मानसशास्त्रदृष्ट्या पौगंडावस्था हें विभूतिपूजेचें वय मानलें गेलें आहे, त्यामुळें व्यक्तित्वसंपन्ननायक-नायिकांच्या कथा त्यांना जीवाविशेष प्रिय होतात. सामान्य हकीकतीप्रमाणेंच यावेळीं वीरश्रीयुक्त कथांचीहि फार ओढ लागते. तसेंच रहस्यमय गूढ कथानकेंहि फार आवडतात. बालमनाहून अशाप्रकारें कुमारमनाचा आकारच जणु वेगळा होतो. त्यात वेगवेगळ्या अभिरुचीचे भिन्नरंग भरत जातात.

ही भिन्न प्रेरणा, हा वाचनविषयक आवडीनिवडीतला बदल बाल व कुमार या दोन भिन्न वयश्रेणींची मध्यरेषा स्पष्ट करणाराच म्हणावयास हवा. अर्थात् यालाहि अगदीं नक्की वयोमान कल्पिणें कठीणच. कारण काहीं मुलें एवढी तीव्र बुद्धिमत्तेचीं असतात कीं, ती दहाव्या वर्षीच कुमारमनाची ग्रहणक्षमता दर्शवितात. अशी मुलें लहानपणापासूनच मोठमोठ्या कादंबऱ्यात सदैव डोकें खुपसून बसलेली आढळतात, तर कधीं याच्या अगदीं उलटहि प्रकार दिसतो, म्हणजे बारा चौदा वर्षें उलटली, तरी काहीं मुलामुलींच्या बालिश वाङ्मयीन आवडी त्यांच्या मनात रेंगाळतच राहिलेल्या दिसतात. कोठल्याहि बालवाचनालयात सहज नजर टाकली तर हे दोन्ही प्रकार सरमिसळ आढळतील ! अर्थातच दरेक मुलाची वाङ्मयीन आवड व ग्रहणशक्ति भिन्न भिन्न असल्यानें काहींच्या मनात कुमारमन लवकर साकार होतें व काहींच्या बाबतींत योग्य त्या वयालाहि तें बाल्यशैशवातच रमणारें दिसतें, असें म्हटलें पाहिजे. पण सरसकट व स्थूल नियम सांगायचा तर बारा ते सोळा हीं वर्षें कुमारवयाचीच मानलीं जातात

कुमार कादंबरीचे प्रामुख्यानें चार विभाग पडतात. ऐतिहासिक, सामाजिक, अद्‌भुतरम्य आणि अनुवादित. पैकीं ऐतिहासिकात खऱ्या इतिहासघटनांवर आधारित अशा उष काल, सूर्योदय, सावळ्या ताण्डेल अशा काहीं कादंबऱ्या आहेत. तद्वतच केवळ ऐतिहासिक पार्श्वभूमि पण कथानक मात्र पूर्ण कल्पित असलेल्या अशा वीरधवल, रत्नगुप्त, उदयकुमार, अजयगडची राजकन्या अशा ऐतिहासिक काल्पनिकाहि आहेत. दोन्हींचें रूप वेगळें, सौंदर्य वेगळें, पण मुलांना दोन्हीहि आवडतात.

सामाजिक-कादंबरींतहि अगदीं असेंच दोन स्पष्ट भेद आहेत एक सर्व साधारण जगाचें दर्शन घडवणारी-मिरी, ताई अन् भाऊ, दोन भावंडें, गोप्या वगैरेसारखा, पण यांची संख्या फार नाहीं. दुसरा व्यक्तिदर्शनात्मक. यात गोप्या, कॅप्टन प्रताप, चिंगी वगैरे मुलांचें मानसचित्र असतें. वाङ्मसाहित्यात आज या दुसऱ्या प्रकारचीं पुस्तकेंच अधिकांश लिहिलीं जात आहेत असें दिसतें

अद्‌भुतरम्य कादंबरीचा विभाग म्हणजे अज्ञात प्रदेशातले धाडसी प्रवास, संशोधनें, गुप्तधनाचा शोध व वैज्ञानिक आश्चर्यें यावर आधारलेल्या हकीकती. यात

चमत्कृति व गूढता या दोहोंचेंहि समीकरण होत असल्यानें मुलाना या कादंबऱ्या अतिशयच आवडतात. वैज्ञानिक चमत्कारावर आधारित अशा, पाताळलोकची अद्भुत यात्रा, अदृश्य माणूस, पृथ्वी ते सप्तर्षी मडळ, आव्हान इत्यादि पुस्तकें या मद्रासतच येतात अशा कादंबऱ्या अगदीं थोडक्याच आहेत, आणि हीच तर खरी तक्रार आहे !

अनुवादित कादंबरी प्रांताला व्याख्येचें काटेकोर बंधन लावता येणार नाहीं. ती सामाजिक, ऐतिहासिक आणि अद्भुत या तीन्हीं प्रकाराचा परामर्ष घेणारी आहे. परदेशीय सुंदर व वैशिष्ट्यपूर्ण कादंबऱ्याचा थोडक्यात परिचय घडविणें हेंच तिचें प्रमुख कार्य. हीहि शाखा नुकतीच फुलूं लागली आहे. या सर्व भिन्नभिन्न प्रकाराचा स्वतंत्रपणें परामर्ष घेणेंच अधिक सोईचें होईल.

## ऐतिहासिक बालकादंबऱ्या

बालकादंबऱ्याच्या प्रांतात ऐतिहासिक कादंबरीला अग्रस्थान द्यावें लागेल. कारण, ज्यावेळीं मुलासाठीं सामाजिक स्वतंत्र कादंबरी लिहिण्याची कल्पना अमूर्तावस्थेत होती, त्यावेळीं ऐतिहासिक कादंबरीच बालरंजनाचें कार्य करण्यासाठी प्रथम कुमारासमोर प्रकट झालेली दिसते.

या क्षेत्रात प्रथमच जर कोणाचें ठळक नाव नजरेसमोर येत असेल तर ते कै. हरि नारायण आपटे यांचेंच. त्याच्या ऐतिहासिक कादंबऱ्या अत्यंत लोकप्रिय झाल्या होत्या, त्याचेच संक्षिप्त रूपांतर होऊन त्या बालासाठीं प्रसिद्ध होऊं लागल्या १९१९ सालीं सूर्योदय या प्रसिद्ध कादंबरीची संक्षेपरूप आवृत्ति मुलासाठी प्रसिद्ध झाली व तिनें जणु बालकादंबरीच्या जगात नवा प्रांत काल्च प्रकट केला. साडेतीनशें पृष्ठाची ही कादंबरी अवघ्या सव्वाशें पृष्ठात सामावली गेली व मोठ्या कादंबऱ्या संक्षिप्त करण्याचा एक नवा नमुना तिनें साकार केला. 'गड आला पण सिंह गेला' या छोट्याशा कादंबरीचें तर कुमार जगात एवढें स्वागत झालें कीं, गेल्या ३० वर्षात या पुस्तकाच्या २० आवृत्त्या निघून ७०००० प्रतींचा खप झाला ! सूर्योदयप्रमाणेंच उष काल, सूर्यग्रहण, केवळ स्वराज्यासाठी या पुस्तकाचे संक्षेपहि बालप्रिय ठरले.

पण केवळ हीं पुस्तकें ऐतिहासिक स्वरूपाचीं होतीं म्हणूनच मुलाना फार आवडलीं असें म्हणणें सयुक्तिक ठरणार नाही, तर या सर्व पुस्तकाची कथानकें आकर्षक होतीं व भाषा कै. हरीभाऊसारख्या कसलेल्या लेखकाची होती, हेंच या यशाचें मुख्य कारण. कै. हरीभाऊ आपटे हे साक्षात् भाषाप्रभुच होते. एखादा प्रसंग एखाद्या समर्पक शब्दात ते मूर्त करावयाचे कीं, जणु वाचकासमोर तो प्रसंग खरो

सरच घडत असल्याचा भास उत्पन्न व्हावा ! आपल्या कथांतून मनुष्य स्वभावास हव्याहव्याशा वाटणाऱ्या गूढतेलाहि ते कसें उत्कंठावर्धक शब्दरूप देत असत तीहि शैली पाहण्यालायकच ठरेल. पुढील वर्णन तसेंच नाहीं काय ?—

"त्या वेळीं तो सहज त्या समोरच्या बलभीमाच्या मूर्तीकडे पाहत होता. इतक्यांत तो एकाएकी दचकला व त्याच्या तोंडून एकदम अरे !– पण हें काय !" असे उद्‌गार निघाले.

तो एकसारखा त्या बलभीमाच्या मूर्तीकडे पाहात होता. ती मूर्ति हळूहळू पुढें सरकत होती ! पहिल्या प्रथम हा केवळ मद्याच्याप्रमाणेंच भास असावा असें त्या शूर शिपायास वाटलें. परंतु ती मूर्ति डुलत नव्हती किंवा तिचा झोंक पुढें पडत नव्हता. केवळ जशीच्या तशी उभीची उभी राहून अत्यंत मदपणें पुढें सरकत होती. हें आहे काय ? या मूर्तींत चेतना उत्पन्न झाली की कोणी तिच्या आड बसून तिला सरकवीत आहे ? –छे. एक तें बाहेरलें टेंभे आणि ही कोपऱ्यांतली धुनी यांवेरीज मनुष्यवस्तीचें चिन्हसुद्धां कोठें दिसलें नाहीं; असें असतां आतां एकाएकी ही मारुतीची पवित्र मूर्ति सरकवणार कोण आणि काय म्हणून ? असे अनेक प्रश्न त्याच्या मनांत आले. पण समाधानकारक उत्तर मुळींच सुचेना. इतक्यात मारुतीच्या मागें किंचित् प्रकाश दिसल्याचा भास झाला व मारुती आपल्या मूळ जागेपासून चांगला हात सव्वाहात पुढें आलेला दिसला. हा उजेड आला कोठून ? हें सगळें आहे तरी काय ?"

अशी ही बालांना आवडणारी कथनशैली हरीभाऊंच्या कादंबऱ्यांतून जागोजाग दिसते. त्यांच्या ऐतिहासिक कादंबरींत शिवाजीचें चारित्र्य व आकर्षक व्यक्तिमत्त्व याचा आढळ होत असे. तसेंच त्यांतील साहस वर्णनें अद्‌भुत योगायोग, गुप्त तळघरें, हेरांची कामगिरी इत्यादि सर्वच सामुग्री कुमाराच्या खास प्रीतीची असल्यानें हीं पुस्तकें तावडतोब अनेकावृत्त्यांनी प्रसिद्ध झालीं. शिवाय ५०–६० वर्षांपूर्वीं कुमारकादंबरीच्या प्रांतात सारींच कपाटें जवळजवळ रिकामी ! हें रितेपणहि या नवप्रयोगा फार पोषक ठरलेलें.

एकदरींतच मुलांना ऐतिहासिक कादंबऱ्या अधिक प्रिय होतात असें दिसतें. छत्रपति शिवाजीबद्दल लिहिलेल्या नाथमाधवांच्या स्वराज्याचा श्रीगणेशा वगैरे सातआठ मोठ्या कादंबऱ्याहि आज संक्षिप्त, आटोपसर रूपानें कुमार विद्यार्थ्यांपुढें आल्या आहेत; त्यांचेंहि कुमारांनीं विलक्षण आपुलकीनें स्वागत केलें. *शिवाजीचा उजवा हात, सावळया तांडेल* ही पुस्तकेंहि बालप्रियतेचा वारसा मिळवून बसलेलीं आहेत.

या सर्व ऐतिहासात्मक कादंबऱ्या मुलांना जिवाविशेष प्रिय कां, याची थोडीशी मानसशास्त्रीय छाननी येथें उचित ठरेल. इतिहासाला मुलें फार कंटाळतात; पण ऐतिहासिक कादंबरीकडे मात्र धांव घेतात. हें असें कां व्हावें

हाहि एक विचार करण्याचा प्रश्न आहे. इतिहासातल्या त्या सनावळ्या आणि लढायाच्या जन्या किंवा बदलत्या राजवटींचें रूक्ष धावतें विवेचन यात थोडेंतरी लालित्य वा रंजन असतें काय? दर मिनिटाला बदलणारा हा राजकीय नकाशा लहानपणा लक्षात राहणेंच कठीण जातें, हा अनेकाचा अनुभव! पण ऐतिहासिक कादंबरींतून मात्र वीररसाचा अविष्कार व साहसी घटनाचा परिपोष हींच वैपुल्यानें असतात व कुमारमनाला त्याची या वयात विलक्षण ओढ वाटते. शिवाय बाल जीवनातल्या विभूति पूजनाचा हाच कालखंड! नजरेसमोर एखादी आदर्श व्यक्ति असावी, तिला आपलें ध्येयस्थान कल्पावें, त्यावरून जीव ओवाळून टाकावा अशा भावनांनी मनें पुलकित होण्याची मुलामुलींचीं हाच ती मौलिक वर्षे! त्याला पुष्कळच तऱ्हेचें खाद्य ऐतिहासिक कादंबऱ्यात् प्राप्त होतें. वरील शिवछत्रपतीच्या कथा घ्या. त्या वाचताना मुलें तहानभूकहि विसरून जातील! शिवाजी हा आदर्श राजा होता, तसा आदर्श लढवय्याहि होता, सद्गुणी होता तसा कर्तृत्वाचाहि होता, प्रेमळ होता तसा साहसात उडी घेणारा वीरहि होता. त्याचा आदर्श कुमार हृदयात ध्रुवपद घेऊन बसलेला. त्यामुळेंच उष:काल, सूर्योदय, स्वराज्याचा श्रीगणेशा, शिवछत्रपती या कादंबऱ्यातून होणारें शिवदर्शन मुलाना अत्यंत शिव-सुंदरच वाटतें.

पण अशा मुलासाठीं खास लिहिल्या गेलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्या कितीशा आहेत? या प्रश्नाला नैराश्यपूर्णच उत्तर द्यावें लागेल. कै. नाथमाधवाच्या व कै. आपट्याच्या कादंबऱ्यातून शिवशाहीचा रंजक इतिहास मुलासमोर आला हें मान्य, पण शिवाजी महाराजासंबंधीं जेवढें कादंबरी-वाङ्मय प्रसिद्ध होऊन कुमाराच्या हातात पडलें आहे, तेवढें नंतरच्या इतिहासाबद्दल आहे काय? केवळ शिवशाही म्हणजेच का भारताचा पूर्ण इतिहास? शिवशाहीतूनच आविष्कृत झालेल्या पेशवाईनें नंतरचें अठरावें शतक गाजविलें होतें, त्यासंबंधीं ऐतिहासिक कादंबऱ्या का निर्माण होऊ नयेत? थोरले माधवराव पेशवे हेहि आदर्श ठरू शकणारे एक युद्धकुशल व करारी राजपुरुष होते. अंतस्थ आणि बाह्य या दोन्हीं तऱ्हेच्या कारवायाना यावेळीं तर जणु ऊत आला होता. त्या सर्वांचें कादंबरीमय चित्रण कुमाराना व बालाना रोमांचकारी वाटणारच नाहीं का? थोरले नानासाहेब, बाजीराव याची कारकीर्द, पानिपतचा संग्राम, शिंदे होळकराचा उदयकाल यात काहींहि चित्तथरारक कथानकाची सामुग्री नाहीं काय? किंवा याहि पूर्वीचा सुवर्णयुगाचा काल घ्या. चंद्रगुप्त, अशोक याच्या कारकीर्दींत धर्मपरिवर्तनें झालीं, राजवंश बदलले, ते इतिहासरूपानें मुलासमोर आले असले तरी कुमाराना आवडेल अशा पद्धतीनें भारताचा तत्कालीन इतिहास कादंबरीरूपानें प्रसिद्ध व्हायला हवा आहे. पण तशा दृष्टीनें फारसे प्रयत्न झालेले नाहींत. मोठ्या ऐतिहासिक कादंबऱ्यांचे असे छोटे संक्षेप करण्याच्या प्रथेतहि दिवसानुदिवस सुधारणा होत चालल्यानें वीरधवलच्या संक्षेपात दिसणारे

दोष कै. नाथमाधवांच्या स्वराज्यविषयक कादंबरीमालेच्या संक्षिप्तावृत्तींतून राहिलेले दिसत नाहींत. 'स्वराज्याचा श्रीगणेशा' येथपासून 'स्वराज्याचें परिवर्तन' येथपर्यंतच्या ह्या कादंबऱ्या खास कुमारांसाठीं संक्षिप्त स्वरूपांत प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांत अधिक व अनावश्यक पाल्हाळाला रजा दिली आहे. प्रेमविषयक भाषणें व प्रसंग यांतहि योग्य तेवढी संपादकीय कात्री लागली आहे; त्यामुळें ही माला बालसुलभ व बालोचित अशा स्वरूपाची झाली आहे. या पुस्तकांना अनेकांनीं संक्षेप केलें हें खरें, पण उत्कृष्ट संक्षेपक म्हणून श्री. अनंत अ. कुलकर्णी व अकोल्कर यांचा निर्देश करणें योग्य वाटतें.

ऐतिहासिक कादंबरीच्या नात्यागोत्यांतलाच दुसरा कादंबरी प्रकार म्हणजे काल्पनिक मध्ययुगीन कादंबऱ्या. यांत कधीं प्रतापसिंहाच्या हकीकतींची पार्श्वभूमि असेल, तर कधीं हर्ष, चंद्रगुप्तापर्यंतचा मागोवा घेत कथानकाचे धागे सुवर्ण युगाला पोंचलेले दिसतील ! थोडक्यांत म्हणजे-फक्त वातावरण जुनें, ऐतिहासिकाचें, पण कथानक मात्र काल्पनिक ! एकंदरीत बालकादंबऱ्यांचें प्रमाणच जेथें अल्प तेथें याहि विभागांत गर्दी करणारीं नांवें नाहींत हें स्वाभाविकच. कांहीं आहेत. रत्नगुंफा (श्री. ना. ह. आपटे) ही अशी एक नमुनेदार कादंबरी आहे. काल विक्रमाचा कल्पिलेला, तेव्हां बैलतांड्यांचा, प्रवास, पुतळ्या, मोहरा इत्यादि वर्णनें आणि अर्थदास, धनदत्त श्रेष्ठी, वगैरे नांवावर ही प्राच्य छटा आहेच. या कादंबरीनें अशा प्रकारच्या वाङ्मयाला सुरवात केली म्हटलें तरी चालेल. शिवाय, उद्योग श्रेष्ठ की नशीब श्रेष्ठ या पुरातन वादाला यांत प्राधान्य मिळालें आहे व त्यामुळें दोन भावांच्या विशिष्ट व विरोधी स्वभाव-गुणाचा परिपोष चांगल्याप्रकारें झालेला दिसतो. प्रस्तावनेंत १२ ते १६ वर्षे मुलांसाठीं ही कादंबरी असल्याचें नमूद केलें आहे; तथापि भाषा मात्र बालग्रहण क्षमतेच्या दृष्टीनें अधिक प्रौढ वापरलेली दिसते. खालील उताऱ्यावरून ही गोष्ट लक्षांत येण्यासारखी आहे.

"प्रशस्त राजमार्ग, उंचउंच जलमंदिरें, सुवर्णशिखरांनीं तळपणारीं भव्य देवालयें, ठायीं ठायीं स्वच्छ मधुर जलाच्या पुष्करण्या, फुलांनीं फुललेल्या सुमनवाटिका आणि नगरीच्या बाहेर पसरलेलीं रम्य वनोपवनें पाहून कोणालाहि उज्जयिनी नगरी ही या लोकींची नसून इंद्राची अमरावतीच सहजलीलेनें विहार करण्यासाठीं खालीं पृथ्वीवर उतरली आहे असें वाटे."

वाक्यें लहान व मजकूर याहून सोप्या भाषेत असता तर त्यानें या कथेची मौलिकता वर्धितच झाली असती; पण गाल्बोटाप्रमाणेंच हे दोष आहेत. कै. ह. ना. आपट्यांप्रमाणेंच नाथमाधवांच्याहि अनेक ऐतिहासिक कादंबऱ्या संक्षिप्त रूपांत मुलांसाठीं म्हणून प्रसिद्ध झालेल्या दिसतात. पैकीं 'वीरधवल' या वीररसात्मक कादंबरीची छोटी प्रतिकृति श्री. परब नांवाच्या गृहस्थांनी १९४९ सालीं तयार केली.

वरून म्हणावें लागतें; आणि या विधानाची सत्यता पटवण्यास फार शोध घेत बसावें लागत नाहीं.

बालकादंबरींतून केवळ सृष्टीवर्णनांतच अशी 'आगयघनता' दिसते असें नाहीं; तर संवादांतील पात्रांचीं भाषणेंहि अशीच अस्वाभाविक व अतिरंजित आढळतात !

वास्तविक प्रणयी जीवन व प्रीतीभावना ही दोन्हींहि कुमार वय ओलांडल्यावर आयुष्यांत येणारी स्थिति; तेव्हां त्याबद्दल थोडक्यांत सांगितलें, तरी हरकत नसावी पण हें सर्व दृष्टीआड करून व छोट्या वाचकांचें कोवळें वयहि विसरून तारुण्य सुलभ प्रीतीबद्दलची रसभरीत वर्णनें अनेक संभाषणांतून येतात.

'लीलावती ( ले.-ज. वा. रानडे ) ही एक ऐतिहासिक कालांतली काल्पनिक कादंबरी पाहा. यात नायकाचें एका स्त्रीवर प्रथमदर्शनी प्रेम जडतें व त्या पायीं त्याला दुसरें कांहीं एक सुचत नाहीं ! नायिकेला नायक त्यासंबंधीं सांगतो, –

"प्रेमामुळें प्राप्त होणारें दास्यत्व, दास्यत्व न वाटतां स्वातंत्र्य वाटतें. प्रेमामुळें उत्पन्न होणारा बंधनें, बंधनें न वाटतां प्रेमानें एकमेकांच्या हृदयांचें सम्मीलन करणारे सुवर्ण तंतू वाटतात. प्रेमी मनुष्याची कृति वेड्यासारखी असते. उर्वशी करतां प्रेमानें वेडा झालेला विक्रम प्रत्येक झाडाला, लतेला खुळ्यासारखें नव्हता कां प्रश्न विचारीत ? प्रेमी मनुष्य तर वेडाच, तर वेड्यास गुलामगिरी आणि स्वातंत्र्य यांतला भेद काय करणार ? ( लीलावती–पृष्ठ ४० ) आणि या भाषणांत मुलांना तरी काय गोडी वाटणार ? जें अजून दूर क्षितिजापलिकडे आहे, त्याची कल्पना देण्याचा यांत उद्देश असलाच तर तो निष्फळच ठरणारा. शिवाय या वर्णनांत भाषाशैलीच्या दृष्टीनेंहि आकर्षकता नाहीं ! हायस्कूलमधून स्थूल अभ्यासासाठीं हें पुस्तक लावलें जावें हा लेखकाचा जो निवेदनांत प्रकट झालेला उद्देश, त्याला वरील वर्णनें जरूर बाधक ठरणारीं आहेत !

काल्पनिक ऐतिहासिकांत कांहीं नांवें आजकाल विशेषत्वानें आढळतात. श्री. शरचंद्र टोंगो याच्या 'कुमार व झेलम' या कादंबऱ्या प्रा. स. बा. हुदलीकर यांची अजयगडची राजकन्या, द. के. बर्वे याची गुलछबू, सौ. मालती टांडेकराची उदय-कुमार अशीं अनेक पुस्तकें आहेत. यांतील कांहीं पुस्तकांतून तर नजरेंत भरण्याजोगी वर्णनसुंदरता आढळते. उदाहरणार्थ श्री. शरच्चंद्र टोंगो याच्या झेलम कादंबरींतील पुढील मनोज्ञ वर्णन पाहण्यालायक ठरेल. हें वर्णन एका नदीचें आहे.

"अरे झेलम ती झेलम. रानांत हिंडणारी नागीण ती ! तुमच्या दर्यासारखं चार भिंतींत कोंडलेलं जनावर नाहीं तें "......

" पाऊस सरसरला नि झेलम तट्ट फुगून धावूं लागली. पिकाच्या काळ्या शेतजमिनीवर तिच्या पाण्याच्या फेसाचे ओघळ वाहूं लागले. विजेच्या लखकन प्रकाशांत काळ्या जमिनीवर सांडलेला झेलमचा शुभ्र फेस दिसला कीं काळें अस्वल फेसाळून गेल्यासारखें मनांत येई......"

" पुष्कळदां ती ( झेलम ) फेसाळते आणि कानांत गोष्ट सांगायला म्हणून म्हाताऱ्या दौलतच्या जवळजवळ येते. अश्रूचा एक थेंब टपदिशीं झेलमच्या पात्रांत पडतो. तिच्या अगणित थेंबांत ती तो वाहून नेते......"

एका नदीची भावशब्दांनी बांधलेली ही पूजा मुलांना सहज समजेल व त्यांची काव्यात्मकता जागी करील, अशीच नाहीं का? अशी चमकदार वर्णनें ऐतिहासिक-काल्पनिक कादंबरीचें रूपसौंदर्य वाढवणारींच म्हटली पाहिजेत. फक्त त्यांचीं उदाहरणें अल्प दिसतात, एवढेंच काय तें!

## अद्‌भुतरम्य आणि साहसी कादंबऱ्या

आजकाल वाचनालयांची संख्या पुष्कळच वाढली आहे. परंतु प्रत्येक ठिकाणीं बालवाचनालय आहेच असें नाहीं; त्यामुळें अनेक ठिकाणीं कुमार-कुमारी या मोठ्या वाचनालयांतूनच पुस्तकें नेतांना दिसतात. यांतून मुलें नेमकें कोणतें वाङ्मय अधिकांश नेतात याचे आकडे कोणी साक्षेपी चालकांनी प्रसिद्ध केले तर बालवाचनाभिरूचिवर एक निराळाच प्रकाश पडेल. बहुधा 'रहस्यकथा' याच कोठल्याहि वाङ्मयप्रकाराहून अधिक वाचल्या जातात असा या सर्वांचा अनुभव! ती झुंजार-विजयेची जोडी, ते धनंजय व छोट्ट, तो महंत आणि काळा पहाड आणि ते हृदयनाथ व चारूहास या सर्वांनाच किशोर मनांत अग्रपूजेचा मान मिळतो! खरें म्हटलें तर हें बालसाहित्य नव्हेच; परंतु चुकीनें यालाहि बालसाहित्य मानलें जावें व तसें सरकारी संस्थेकडून अधिकृतरित्या प्रसिद्धहि व्हावें ही केवढी आश्चर्याची गोष्ट![1] किशोर वाचतात तेंच बालसाहित्य एवढीच का बालसाहित्याची व्याख्या करावयाची? आणि अशीं व्याख्या करायची ठरविली तर एकंदर साहित्यांतून बालसाहित्याचा वेगळा भाग करण्याचेंहि प्रयोजन उरत नाहीं!

रहस्यकथा मुलांनीं वाचणें अनेक दृष्टींनीं अनिष्ट आहे व त्यांचा उहापोह साहित्यश्रेष्ठांनीं केलेलाहि आहे. त्यांतील मजकुराबद्दल तर अनेक आक्षेप आहेतच; पण हीं इंग्रजीचीं रूपांतरें अनेकानेक दोषांनीं व्याप्त असून मराठी भाषा दृष्टीनें त्यांस कसलेंहि सौष्ठव व सौंदर्य नाहीं, असेच त्यांचे ( कांहीं सामान्य व मोजके अपवाद

१ मराठींतील निवडक बालवाङ्मयाची सरकारी वर्गीकृतसूची पृष्ठ १४१ ते १६१ यांत अशा ५७५ पुस्तकांची नोंद केलेली आहे.

वगळून ) वर्णन करावें लागेल. खरें म्हणजे अशीं दोषपूर्ण पुस्तकें बाळांच्या हातांत पडणेंच इष्ट नाहीं. आणि याबाबत वाचनालयाचे चालक व मुलाचे पालक यांनींच एकमतानें कांहीं योजना केल्या तरच त्याला प्रतिबंध व्हावयाचा; येरवीं नाहीं. मात्र या गूढ, गुप्त, गहन अशा कादंबऱ्या वाचणाऱ्या मुलांचे प्रमाण एकसारखें वाढतें आहे ही गोष्ट नाकारण्यांत अर्थ नाहीं. हीच पुस्तकें मुलें अगत्यानें कां वाचतात, याचा विचार केल्यास एक महत्त्वाची गोष्ट ध्यानीं येते ही कीं, मुलांना या वयांत साहसी नायक, गूढ वातावरण, संशोधनाच्या हकीकती, विलक्षण प्रवास, गुप्तधनाचा शोध, वीरश्रीवर्णन इत्यादिकांवर आधारलेली निर्मिती फार प्रिय असते व या कादंबऱ्या वाचतांना मुलें तहानभूकहि विसरतात! ही तन्मयता ओळखून अशा तऱ्हेचीं पुस्तकें मुलांसाठी अधिकाधिक निर्माण करण्याची प्रेरणा लेखकांनींहि घेण्याजोगी अशी आहे. आणि मुलांच्या ठिकाणीं असणारी ही 'गूढरम्यता' सूत्रामागून खून वर्णनें आलीं किंवा गुन्हेगारी क्रौर्याची कृत्यें वर्णिली तरच आढळते असें नाहीं; इतर साहसकथाहि त्यांना जिवापलिकडे आवडतील; पण त्यांत विलक्ष गूढरम्यता हवी, संशोधन हवें, साहस हवें!

मुलांच्या या सहजप्रवृत्तीला पोषक होणारीं पुस्तकें पाश्चात्य साहित्यात अनेक आहेत. त्यांचेहि कुमारयोग्य अनुवाद (तेहि संक्षिप्त रूपांत) आजकाल नव्या बालपिढीसाठीं केले जात आहेत व ते लोकप्रियता मिळविणारे ठरत आहेत. गुप्त गोष्टींचें संशोधन म्हटलें कीं प्रवास हा अपरिहार्यच आहे! पण या प्रवासाच्याहि ज्यूल व्हर्न नांवाच्या एका फ्रेंच लेखकानें किती विलक्षण अकल्पित तऱ्हा निर्माण केल्या! त्याचा एक नायक रॉकेटमध्यें बसून चंद्रावर स्वारी करील तर दुसरा नायक भूमि खोदून पाताळयात्रा करील! याशिवाय पाण्याखालींच नित्य राहणारा एक साहसी नायक ज्यूल व्हर्ननें निर्माण केला तो तर अत्यंत विलक्षण! त्यानें उत्पन्न केलेलें जळविश्वांतलें एक नवेंच आश्चर्य. नॉटिलस नांवाची एक अद्‌भुत पाणबुडी व त्या वाहनात बसून कॅप्टन नेमो यानें पाण्याखालून केलेले जगप्रवास यांची वर्णनें वाचतां वाचतां चित्त थरारून जातें. वृत्ति बेभान होतात मोठ्या वाचकांची ही तऱ्हा, मग याच गोष्टींची ज्यांना उत्कृष्ट मोहिनी त्या कुमार वाचकांना या अद्‌भुतरम्य कथा किती आवडत असतील? या अनुवादात— 'अलिकडे मुलांच्या संशोधन प्रवृत्तीला आवाहक अशी प्रवास-पुस्तकेंहि पुष्कळ आढळतात. प्रवाळाच्या बेटावर (कोरल आयलंड) गुप्त खजिना-(ट्रेझर आयलंड), सुलीमानचा खजिना (King Solomans Mines) इत्यादि कित्येक पुस्तकें कुमारमान्य ठरलेलीं दिसतील. या सामाजिक कादंबऱ्या नाहींत; आणि कादंबरीची तंत्रें पाळीत बसण्यास या संशोधनकथांना सवडहि नसते! प्रेमाच्या व प्रणयाच्या

गोड गोष्टींना यांत कोठेंच थारा नाहीं; सारें कांहीं साहस आणि संशोधन. एकप्रकारें हीं प्रवासवृत्तेंच, पण तीं अद्‌भुतरम्यतेच्या सदरांत येतील; व म्हणूनच त्यांना कादंबऱ्या म्हणावयाचें. यांतील बहुतेक प्रवाशांना अखेर थोडें बहुत गुप्तधनहि सांपडलेलें दिसतेंच; परंतु त्याचा मोह त्या प्रवाशांना असला तरी बालवाचकांना मात्र या धाडसी प्रवासवर्णनांत येणारे निरनिराळे देश, तऱ्हेतऱ्हेचे लोक, प्रादेशिक वर्णनें व विचित्र साहसाचे अनुभव यांचीच ओढ अधिक वाटते.

शास्त्रीय शोधांवर ज्यांची अद्‌भुतरम्यता आधारलेली असते अशा पुस्तकांनीं आणखी एक नवें वैचित्र्यपूर्ण कुतुहल कुमारमनांत निर्माण होतें व याहि पुस्तकांची त्यांना मोहिनी पडते. जेकेल व हाइड याचें रूपांतर कोणी किशोरांसाठीं केलें तर त्यांना तें खात्रीनें आवडेल. श्री. भा. रा. भागवतांचा अदृश्य माणूस ( इन्‌व्हिजिबल मॅन ) यांपैकींच. चंद्रावर स्वारी, पाताळलोकची अद्भुत यात्रा इ. पुस्तकांतील साहसी नायक व त्यांचे लोकविलक्षण प्रवास काल्पनिक असूनहि मनाला ओढ लावणारे, आकर्षक असेच नाहींत काय ? त्यांत शास्त्रीय शोधांवर आधारित अशीं सत्यें व त्या सभोवतीं साजून दिसणारी प्रसंगरचना असते. चंद्रावर स्वारीमधील एक प्रसंग पाहा. चंद्रलोकांवर जातांना या मंडळींनीं आपला मृत कुत्रा विमानांतून बाहेर भिरकावला आणि तो विमानाबरोबर दोन हात अंतरावरून तरंगत चालला, या प्रसंगांतून चंद्राजवळ हवेवाचून प्राणी खालीं पडणें अशक्य आहे अशीं स्पष्ट सूचना दिली गेली. चंद्रावरचे हवामान व दृश्य याचें यांत वर्णन आलें आहे, त्यांतहि शास्त्रीय सत्यता पुष्कळच आढळते. एकूण सत्य माहिती, साहस व रंजन असे तीन हेतु या पुस्तकांत एकवटलेले असतात. कुमारांच्या बुद्धीला नवप्रेरणा देण्याचें कार्य हीं पुस्तकें जरूर करतात. आणि हीं कल्पनाचित्रें असलीं तरी ती आजच्या युगांत खरेपणाकडेहि बोट दाखवणारीं अशींच ! चंद्रावर जाण्याचें सुखस्वप्न आज रॉकेट उड्डाणांच्या काळांत कधीकाळीं सत्यसृष्टींतहि उतरण्याची शक्यता आहेच !

या पुस्तकांची संक्षिप्त रूपांतरें करण्याबद्दल श्री. भा. रा. भागवत यांचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. शास्त्रीय पुस्तक म्हटलें कीं मुळांतील किचकट व कंटाळवाणा भाग त्यांत येणें अपरिहार्यच नाहीं काय ! व मग यथाक्रम तो संक्षिप्तिकरणांतहि उतरावा हेंहि गृहीतच धरावें लागणार ! परंतु श्री. भागवतांनीं असल्या या ' शास्त्रीय व सत्याधारित ' क्लिष्ट कादंबऱ्याहि इतक्या सुटसुटीत व सोप्या भाषेंत बालांच्या हातांत दिल्या कीं त्याबद्दल बालवाचक त्यांना धन्यवादच देतील.

आणखी विशेष म्हणजे श्री. भागवतांनीं यांतलें कांहीं प्रवासी अगदीं भारतीय वातावरणातले व महाराष्ट्रीयन योजले व शास्त्रीय वर्णनांची क्लिष्टता काढून रंजकता

तेवढी वाढविली, त्यामुळें हीं पुस्तकें बालप्रिय होऊन नसलीं आहेत या अशा प्रकारचीं स्वतंत्र पुस्तकें आपणाकडे अजून फारशी नाहींत. श्री. गोपीनाथ तळवलकराची 'साराच चमत्कार' ही रंजक कादंबरिका 'मंगळावरील माणसाची' थोडीबहुत कल्पना देणारी अशी होती. यात मंगळासंबंधीं माहिती आली होती. ती शास्त्रीय सत्यावरच आधारलेली होती. तेथील कालव्याचें वर्णन, थंड हवा हें सर्व पार्श्वभूमि दाखल उपयोगात आणलेलें दिसतें या संदर्भात नुक्तीच प्रसिद्ध झालेली 'पृथ्वी ते सप्तर्षिमंडळ' ही कल्पनिक प्रवासकथाहि उल्लेखनीय ठरेल ही डॉ. संपूर्णानंदानी लिहिली त्याचा अनुवाद श्री. शि. श. आपटे यानीं केला आहे. दूरस्थ ग्रहावर म्हणजे मरिची, अभिजित् इत्यादि ग्रहावर विमानानें काही मंडळी जाऊन आली, त्याची ही रंजक हकीगत, अर्थात् प्राचीन भारतीय संस्कृतीचें पालन करणारे लोक व भिन्न जाती या प्रवाशाना दिसल्या वगैरे कथाभाग कल्पितच आहे, पण ग्रहाबद्दलची माहिती शास्त्रीय सत्याची आहे. अगदीं अलिकडे 'आव्हान' नावाची एक वैज्ञानिक काल्पनिका प्रसिद्ध झाली आहे. हीहि रूपांतरितच आहे. यात आकाशग्रहापैकीं एका अनोळखी ग्रहावरील मंडळींनीं एका विलक्षण रॉकेटच्या सहाय्यानें पृथ्वीपर्यटन केलें असें दर्शवून त्या रॉकेटचेंहि दर्शन वाचकाना घडविलें आहे, तेंहि वर्णन रोमाचकारी व नाविन्यपूर्ण ठरेल.

अद्‌भुतरम्य रोमाचकारी, लोकविलक्षण अशा कथानकाबद्दल मुलाना कशी ओढ असते व त्या संदर्भात कोणतें वाङ्मय उपलब्ध आहे याचा थोडा बहुत अदाज या विवेचनावरून सहज येईल त्यातून निदर्शनाला येणाऱ्या एका महत्त्वाच्या गोष्टीकडे लक्ष जाते. या सर्वच साहसकथा चागल्या असल्या व उत्तम भाषेनें सजून कुमारासमोर आल्या असल्या तरी त्यातल्या बहुताशीं परदेशीय कथानकावर आधारित आहेत. आपल्या इकडेहि रामनूसारखे संशोधक होते व आहेत. त्यानीं अद्‌भुत शोध लावले आहेत. भारतातहि नागाचा प्रदेश, हिमाचलातील वस्ती, सह्यगिरी, सातपुड्यातील डोंगराळ मुलूख अशीं कादबरीतून शोभणारीं व गूढतेनें भारलेलीं स्थलेंहि आहेत. मग संशोधनप्रवासाच्या कथा इकडेहि कोणी स्वतंत्रपणें कुमारासाठीं का निर्माण करीत नाहीं? हा प्रश्न मनात डाचत राहतो या वास्तवाच्या आधारानें कोणी काल्पनिका लिहिल्या व त्या जर कुमारमनाला उत्कंठा वाटेल अशा लेखनशैलीनें आकर्षक केल्या तर बालसृष्टींत त्याचें स्वागत अवश्य होईल. या दृष्टीनें अजून नाव घेण्यासारखे प्रयत्न झालेले नाहींत खरे, पण ही उणीव लेखकानीं मनात आणलें तर सहज दूर होणारी आहे.

अशा अद्‌भुतरम्यतेच्या संदर्भात येणारी, परतु काहीं विशिष्ट प्रवृत्तीची पुस्तकेंहि बालरंजनक्षेत्रात दाखल होत आहेत, त्याचाहि थोडा विचार करणें अवश्य आहे बालप्रवृत्तीला कल्पनारंजित पुस्तकें काही एका ठरीव वयोमर्यादेपर्यंत फार

हवीहवीशीं वाटतात, हें मान्य; अद्‌भुताचीहि त्यांना विलक्षण आवड असते, हेंहि आपण पाहिलेंच; पण मुलांना अद्‌भुतरम्य गोष्टी आवडतात, म्हणून या अद्‌भुताचें प्रमाण एका कथावस्तूंत किती असावें याला कांहीं प्रमाण आहेच. चांदोबांतून क्रमशः प्रसिद्ध होणाऱ्या अद्‌भुत कादंबऱ्या आतां पुस्तकरूप होऊन मुलांसमोर आल्या आहेत, या दृष्टीनें त्यांची एकवार पाहणी करणें अत्यंत आवश्यक आहे. जुळ्या बहिणी हें त्यांपैकीं एक पुस्तक पाहा. अगदीं गुलबकावलीच्या पावलांवर पाऊल ठेवून या जुळ्या बहिणी चालतांना दिसतात ! यांत राक्षस, राजपुत्र, राजकन्या हे अद्‌भुत-राज्यांतले माननीय प्रजाजन तर आहेतच. पण त्याच्या जोडीला मानवपूर्व कालांतले चमत्कारिक पशुपक्षी, जादूटोणा, रूपें बदलून टाकणारीं सरोवरें, ज्याचें भक्षण करतांच दुसरा देह प्राप्त व्हावा असलीं फळें, यांची या पुस्तकांत पानांपानांवर एवढी दाटी झाली आहे, व यांतल्या व्यक्तींची इतक्यांदा रूपें बदलली जातात कीं बालांचीच काय, आबालांचीहि हें पुस्तक वाचतांना एखाद्या चक्रव्यूहांत शिरल्या-प्रमाणें संभ्रमित अवस्था होऊन जाते ! मुलांना खमंग पदार्थ आवडतात म्हणून कोणी त्यांत पसाभर हिंग आणि ब्रणीभर तिखटमीठ घालत नाहीं, पण हा साधा विवेकहि लेखकांना उरूं नये, याचें आश्चर्य वाटतें. मुलांच्या अद्‌भुताच्या आवडी-लाहि पेलणार नाहींत, पचणार नाहींत अशीं अत्यद्‌भुत व अभूतपूर्व पुस्तकें आज बालसाहित्यांत दाखल होत आहेत; आणि तींहि बहुसंख्येनें ! पालकाचा विरोध ( असलाच तर ! ) तो यांच्या वाढीला कोठवर पुरा पडणार ? कारण हीं पुस्तकें इतर पुस्तकांचे मानानें स्वस्त मिळतात. त्यांत भरपूर रंगीत चित्रेंहि असतात व त्याचा प्रसार व्यवस्थित केला जातो. शिवाय त्याच्या रूपाची ओळख [ चांदोबांतून प्रसिद्धीकरण झालेलें असल्यामुळें ] मुलाना आधींच झालेली; त्यामुळें या कादंबऱ्या चटकन् बालहातांत येतात यांत आश्चर्य नाहीं. एकाद्या झंझावाताप्रमाणें येणाऱ्या व बालवाचकांची चमत्कारिक दिशाभूल करणाऱ्या या पुस्तकांच्या लाटांना पालक व शिक्षक यांनीं कसा आळा घालावयाचा हीहि एक मोठीच समस्या होऊन बसलेली दिसते. या वाचनानें मुलांची कोणत्याहि प्रकारची मानसिक उन्नती होत नाहीं. तेव्हां अशा पुस्तकांच्या वाचनाबद्दल मुलांना परावृत्त करावें हेंच योग्य !

## अनुवादित

कादंबरीक्षेत्रांत अनुवादित कादंबऱ्यांचा विभाग चांगला समृद्ध असून तो दिवसानुदिवस वर्धित होत आहे. कादंबरीच्या अद्‌भुतरम्य क्षेत्रांत ज्याप्रमाणें संशोधन, साहसपर इंग्रजी कादंबऱ्यांचीं मराठी रूपांतरें झालीं, अशा त्याप्रमाणेंच केवळ संशोधनच नसलें तरी कुमारांना चटकदार वाटतील अशा मजेदार, लोकविलक्षण आणि नाविन्यपूर्ण विषयांवर इंग्रजींत ज्या कादंबऱ्या आहेत, त्यांचेंहि अनुवाद

मराठींत येत आहेत. हे अनुवाद रंजक व बालाकर्षक भाषेंत अनेक लेखकांनीं केले आहेत. त्यांत सौ. उषा आपटे, श्री. भा. रा. भागवत, श्री. वि. कृ. श्रोत्रिय, श्री. शं. रा. देवळे, श्री. दत्त आपटे, कै. साने गुरुजी, श्री. ह. भा. वाघोलीकर, प्रा. गंगाधर गाडगीळ, प्रा. सुशील परभृत, श्री. देवदत्त ना. टिळक, प्रा. स. भा. हुदलीकर अशीं कित्येक मान्यवर नावें आढळतात. या अनुवादित कादंबरीक्षेत्रांत संशोधनपर, अद्‌भुत कादंबऱ्यासारख्याच. सामाजिक व बोधप्रद कादंबऱ्या आणि मुलांना आवडणाऱ्या बालसृष्टीवर आधारित असलेल्याहि आहेत. याशिवाय कांहीं चांगल्या इंग्रजी कादंबऱ्यांचे अनुवाद सर्वसाधारण समाजदर्शन घडवणारेहि आढळतात.

प्रथम लोकविलक्षण कथानकांकडे पाहू. मुलांना अशीं कथानकें आवडतात एवढेंच नव्हे, तर त्यांत कांहीं अद्‌भुत वा साहसी वर्णन असेल तर ही आवड विशेषच दृढ होते. टारझन हें इंग्रजी पुस्तक पाहा. याचा मूळ लेखक एडगर राइस बरोज. १९१५ मध्यें ' टारझन ऑफ द एप्स ' ही पहिली कथा त्यानें प्रसिद्ध केली होती. आफ्रिका खंडाच्या घनदाट अरण्यभूमीच्या पार्श्वभूमीवर रेखाटलेलें हें एक अपूर्व नवल होतें. वन्यपशूंच्या सहवासांत वाढलेल्या एका धाडसी कुमाराचें हें जीवनचित्र अगदीं वेगळें आणि जीव थरारून टाकणाऱ्या हकीकतींचें होतें. पाहतां पाहतां या पुस्तकाचा खप लाखावर गेला. जगांतल्या बहुतेक भाषांतून हें रूपांतरीत झालें. तसेंच चित्रशाळेतर्फे तें मराठींतहि आणलें गेलें, व याचेहि दहा भाग प्रसिद्ध झाले. इतकें रोमांचपूर्ण कथानक मुलांना कां आवडणार नाहीं ? ' टारझन'ची लोकप्रियता अपूर्व आहे. प्रत्येक मुलाला टारझन आवडतो. कारण, कथानायकाचें विलक्षण आयुष्य व संकट, साहसांतून वर येणारी वीरप्रवृत्ति व याचा मोह या वयांत पडावयाचा नाहीं तर केव्हां ?

इंग्रजींत रॉबर्ट स्टीव्हनसन यानें कांहीं सुंदर पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांत ट्रेझर आयलंड, जेकेल व हाईड, किडनॅप्ड इत्यादि पुस्तकें आहेत. मुळांत हीं पुस्तकें पुष्कळच विस्तृत आहेत; पण मराठींत त्यांचे बऱ्याच संक्षेपानें अनुवाद करण्यांत आले. पैकीं ट्रेझर आयलंड हें एक मुळांतच खास बालवाचकासाठीं लिहिण्यांत आलेलें पुस्तक होतें; त्यामुळें यांतील भाषा अगदीं साधी सोपी आहे; शिवाय सागरी जीवनाचें वेगळें आगळें दर्शन या कादंबरींतून घडतें; म्हणून याचा मराठी अनुवादहि बालांना आवडणारा झाला आहे. श्री. ह. भा. वाघोलीकर यांनीं ट्रेझर आयलंडचा अनुवाद ' गुप्त खजिना ' या नावानें केलेला आहे; व तोहि अवघ्या १५० पृष्ठात ! या स्टीव्हनसन्‌चेच आणखी एक जगप्रसिद्ध पुस्तक ' किडनॅप्ड ' हें होय. ही एका खेडवळ साल्स मुलाची जीवनकथा. वातावरण आपल्या १८५७ च्या बंडासारखेंच; म्हणजे स्कॉटिश लोकांच्या राजकारणाचें व

धामधुमीचे. डेव्हिड या कथानायकाला या कादंबरीत जे जगाचे भलेबुरे अनुभव आले. त्यांनीं त्याचें जीवन पैलूदार घडविलें. सालस, भित्रा डेव्हीड अखेर शूर रणवीर होऊन लढाई देखील जिंकतो, हें सुरेख स्वभाव परिवर्तन यांत आलें आहे. मुलांना अशा वीरश्रीच्या गोष्टी आवडतातच. त्यामुळें कादंबरीचा श्री. श्रोत्रि यांनीं केलेला, 'पळवलेला पोर' हा संक्षित अनुवाद बालप्रिय व्हावा यांत नवल नाहीं. यांतहि दर्यावर्दी जीवनाचें बारकावे प्रकट झाले आहेत व त्यांनीं कादंबरीला नाविन्याचे रंग चढले आहेत. *कोरल आयलंड या पुस्तकाचे मराठीकरण 'प्रवाळच्या बेटावर' या* नांवानें झालेले आहे. त्यांतूनहि सागरी जीवन दर्शनाचा प्रत्यय घडतो. *मराठींत अशीं 'दर्यासारंग' पुस्तकें कमीच; आणि मुलांसाठीं तर सावळ्या* तांडेलचा अपवाद वगळून जवळजवळ नाहींतच म्हटलें तरी चालेल.

चार्लस डिकन्सच्या डेव्हीड कॉपरफील्ड या पुस्तकाचा अनुवाद श्रोत्रि यांनी 'डेव्हिड कॉपरफील्ड' याच नांवानें प्रसिद्ध केला आहे, तोहि सुरेख उतरला आहे. मूळची या डेव्हीड कॉपरफील्डचीं १००० पानें होतीं. त्याचा संक्षेप अवघ्या १६० पृष्ठांत लेखकानें केला असला तरी कोठें विसंगति वाटत नाहीं कीं डिकन्सची शैली हरवल्यासारखी वाचकाला भासत नाहीं; व हेंच अनुवादककाराचें मोठ्यांत मोठें यश मानलें पाहिजे. एन्‌ रायडर हॅगार्ड यांचें एक सुप्रसिद्ध पुस्तक 'किंग सालोमन्स माइन्स' या नांवाचें आहे व तें आफ्रिकेंतील साहसमय प्रवासावर आधारलेलें आहे. याचाहि अनुवाद मुलांसाठीं सौ. मालती दांडेकर यांनीं केला आहे. मुळांत पुस्तकच अत्यंत रोमांचकारक हकीकतीचें व त्याला अद्‌भूताची व गुप्तद्रव्यसंशोधनाची पार्श्वभूमि; त्यामुळें या पुस्तकाचें मराठीकरणहि मोठें बालप्रिय ठरलें. हॅगार्डचें पुस्तक ४००–४५० पृष्ठांचें होतें. त्याचा अनुवाद अवघ्या सव्वाशें पृष्ठांत आणला गेला आहे. आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे मूळ इंग्रजी लोकांऐवजीं भारतीय प्रवासी योजल्यानें या पुस्तकाची आकर्षकता निश्चित वाढली आहे. मार्कट्वेनकृत 'टॉमसायर' *हेंहि एक प्रख्यात पुस्तक. त्याचा अनुवाद 'धाडसी चंदू' या नांवानें प्रा. गंगाधर* गाडगीळ यांनीं चांगल्या तऱ्हेनें केला आहे. अर्थात्‌ मूळ लेखकानें टॉमसायरचें व्यक्तिचित्रणच इतक्या नाजूक हातानें केलें आहे की, त्यांतून एका *गमत्या, खोडसाळ*, धाडसीप्रवृत्तीच्या आणि सद्‌वर्तनी मुलांचें दर्शन वाचकांना घडतें. वस्तूच मुळांत मनोहर असल्यावर तिची छबी सुंदर निघायचीच! शिवाय यांत *एक खून व त्याचा* उलगडा, गुप्तधन संशोधन ही बालांना आवडणारी सामुग्री देखील भरपूर आहे! मग मुलांना हें पुस्तक कां आवडणार नाहीं? प्रा. गाडगीळांची चटकदार भाषाशैली यांतून स्पष्ट झाली आहे. मात्र त्यांचे वर्णनसंकेत मुलांच्या पुस्तकांत कांहीसें दुर्बोधच ठरतील. कुंपण रंगवतांना कथानायक चंदू याच्या मनांत आलेला विचार पाहा—

ल्हानशा बिळांत सहज जातां येईल इतकी मी ल्हान होतांच माझं खुजेपण संपलं. मी उड्या मारीतच त्या चिमुल्या दरवाजाकडे निघालें, पण एकदम माझा सारा आनंद मावळला. कारण किल्ली राहिली होती टेबलावर. ''

दोन्हींतला फरक व सरसनिरसता यावरून लक्षांत येईल. कथनपद्धतीच्या जशा या दोन तऱ्हा, तसेंच अनुवादहि दोन पद्धतीनें केले जातात. एक इंग्रजी नांवें व पाश्चात्य संस्कृति कायम ठेवून शब्दश: मराठीकरण व दुसरा कथासूत्रांत, वर्णनांत, प्रसंग दर्शनांत बदल नाहीं; परंतु वातावरण व नांवें मात्र भारतीय योजून तोच अनुवाद लिहिणें. कुशल लेखक असेल तर या दोन्हीं तऱ्हांत तो एकसारखेंच लालित्य व लेखनसौंदर्य निर्माण करूं शकेल. याचें एक चांगलें उदाहरण देण्याजोगें आहे. एन्. नोसाव्ह या रशियन लेखकाची 'वित्या माल्येव 'ही एका रशियन बालविद्यार्थ्याच्या जीवनावरची वि. ग. फाटक यांनी अनुवादित केलेली " वित्या माल्येव-घरी व शाळेंत " याच नावाची कादंबरी आणि प्रा. स. वा. हुदलीकर यांनीं ' शाळकरी मुलें ' नांवानें याच पुस्तकाचें संपूर्ण महाराष्ट्रीय रूप देऊन केलेलें मराठी रूपांतर दोन्हीहि तुलनेनें पाहावी. मूळ पुस्तकच उत्कृष्ट लिहिलेलें (स्टालीन पारितोषक मिळवणारें) व दोन्हीं लेखकहि चांगल्या दर्जाचे बालसाहित्यकार; त्यामुळें या दोन्हीं पुस्तकांत सरसनिरसतेची प्रत लावणें फार अवघड. हे अनुवाद जितके सरस होणें आवश्यक आहे तितके ते सरस झाले आहेत.

लोकविलक्षण कथानकाची आवड आपल्याप्रमाणें पाश्चात्यांनाहि आहेच. आस्कर वाइल्डच्याहि कादंबऱ्या अशाच अद्भुताची भुलावण घालणाऱ्या! यांत भुतेंखेतें, पिशाच्चे, सैतान, अवाढव्य देहाचे राक्षस व गूढ गोष्टी अशा सामुग्रीची रेलचेलच असते. अशापैकीं कांहीं कादंबऱ्या मराठींत आल्या आहेत; एवढेंच नव्हे तर त्या ' बालरंजक ' रूपानें बालसाहित्यांतहि प्रवेशत आहेत. मुलांना हें सर्व भूत वा अद्भुतसाहित्य योग्य ठरेल की नाहीं हा एक विवाद्य प्रश्न आहे; व याचें उत्तर प्रतिकूलच येण्याची शक्यता जास्त; तथापि हें भीतीदायक रसायन बाल-साहित्यांत प्रविष्ट होताना गाळून, सौम्यरूप करून व त्यातहि उद्बोधनाची गुणौषधी मिसळून नवरूप धारण केलेलें असें असल्यास त्याबाबत थोडा विचार करण्यास हरकत नसावी. पिशाच्च कथा इकडे कुमारवाङ्मयांत नाहींतच; आणि ही एक आनंदाचीच गोष्ट म्हटली पाहिजे; पण आस्कर वाइल्डच्या एका कादंबरीचा छोटा व रसाळ अनुवाद दत्त आपटे यांनीं ' शिर्क्यांच्या गढीतलें पिशाच्च ' या छोट्या पुस्तकांत केलेला आहे, तो अनेक कारणांनीं स्वागतार्ह ठरेल. ही कथा फार रंजक आहे व तिच्यांत भूत असूनहि भीतीचें वातावरण नाहीं! या कथेंत बालांचा संबंध पुष्कळच आहे. एका जुन्या वाड्यांत रात्रीं भटकणाऱ्या

पिशाचाला तेथील मुलेंसुद्धा भीत नाहींत ! उलट, तीं त्याच्या खोड्या काढतात. या भुताच्या बाटेंत मुलें एक नकली भूतच उभें करतात. एवढेंच नव्हे तर लोणी जमिनीला चोपडून खुशाल त्याला पाडतात व खेळातल्या बंदुकीनें भुतावर बाराणे मारीत बसतात ! मुलाची ही वृत्ति बालवाचकातहि भीतिऐवजीं धीटपणाच उत्पन्न करते ! शेवटीं छोटी सरोज भुताशींहि मायेनें बोलते, व त्याचा उद्धार होतो ! अशाप्रकारें बालजीवनाशीं ही कथा जोडली गेली आहे व त्यामुळें तिला एक सात्त्विक रूप आलें आहे. दत्त आपट्याची वर्णनशैलीहि वर्णनीयच ठरेल. खालील उताराच त्याची साक्ष देऊ शकेल.

" जून महिन्यातील सायकाळ ! हवा मोठी मजेशीर होती रानफुलाचा मद-सुगंध मधूनमधून येत होता. किनाऱ्यावर बसलेले होले 'येऽग कुई' ची साद घालीत होते. निळ्याभोर छात्या वर काढून गण्या पक्ष्याच्या जोड्या कोठें कोठें झुडपावर बसल्या होत्या. मध्येंच एखादा ससा पादींतून टुणटुण उड्या मारीत आपली लाडी शेपटी वर करून येई व जवळच कुठेंतरी गवतात शिरे. "

अशा प्रकारची भूतकथाहि मुलाना आवडावी यात नवल नाही.

अद्भुतरम्य कादंबरी असूनहि तिचें मराठीकरण करताना या उपायनात मुलाना आवडेलसा विनोद व चुरचुरीत भाषा याचा वापर जर कोणी अगत्यानें केला असेल तर तो ' मायापुरचे रंगेल राक्षस ' या आपल्या अद्भुतरम्य कादंबरींत श्री. भा. रा. भागवतानीच ! हीहि कादंबरी (लोककथा नसूनहि) राक्षसादि सामुग्रीनें सिद्ध व चमत्काराना व्याप्त होतीच, राक्षसाचे रूपाकार अत्यंत प्रचंड होते खरें, पण एरवीं तें अगदीं सौम्य होतें. त्याच्यातील बाळराक्षसाच्या खोड्या अगदीं बालप्रमाणेंच होत्या, आणि शौर्य व देखणेपणा हे गुण तर कादंबरी-नायकाप्रमाणेंच अलौकिक असल्यानें मुलाना हे श्री. भागवताचे " चडासुर, धटासुर " विशेष प्रिय झाले. त्यातहि भाषिक विनोदाची सुदर खुलावट असल्यामुळें तर त्यात अधिकच भर पडली, आणि त्यामुळें या पुस्तकात भयानकता वा राक्षसी दुष्ट कृत्याची यादी न येता चमत्कृति व भव्यता याचाच बालमनावर अधिकाशानें ठसा कोरला जातो. भाषेची सुदर खुलावट असली म्हणजे मुलानाहि त्यात किती गोडी वाटत असेल हें पाहवयाचें असेल तर खालील उतारा अवश्य लक्षात घ्यावयास हवा.

" गमत ही की तेथें सर्व काहीं जोडीनें असावयाचें. म्हणजे जमीन असली कीं जुमीन असावयाचीच. पाऊस असला की पाणी असावयाचें. पाला असला कीं पाचोळा ठेवलेलाच. कीड अन् मुगी, गुरे नि ढोरें, चिट्टू आणि पाखरूं, पाहुणे आणि रावळे, नात्यातले नि गोत्यातले हे सर्व जोटी-जोडीनें हिंडत. गावात घरें होतीं नि दारेंहि होती. शेती होती नि वाडी पण होती. गावात उधळ पेठेंत माधळ बाजार

होता. तिथें सर्वांप्रमाणें बेंचहि चालं असायचा. नदीवर समोरासमोर दोन घाट होते. एकाचें नांव आदळ नि दुसऱ्याचें नाव आपट!"

या वरील उताऱ्यांत नेहमीच्या व्यावहारिक मराठी जोड शब्दांचा किती कल्पकतेनें वापर करून घेतला आहे तो पाहा. ह्या अशा मोहक शैलीमुळें हें पुस्तक अत्यंत रंजक झालें आहे; पण हा विनोदगर्भ भाषेचा नमुना अभावानेंच आढळणारा नव्हे काय? भागवतांनीं मूळ लेखक रॅस्पे यांचें ४०० वर्षांपूर्वींचें हें पुस्तक विद्यार्थ्यांसाठीं लिहितांना मूळ पुस्तकापेक्षां अधिक सोपें केलें व कंटाळवाणें वर्णन व भारूडें काढून टाकलीं. त्यामुळें हें बालोपायन म्हणून फार नमुनेदार झालें आहे.

अर्थात् केवळ अशा वैशिष्ट्यपूर्ण अद्‌भुतरम्य कादंबऱ्यांचेच अनुवाद कुमारांना आवडतात असें नव्हे. उलट, त्यांची ही आवड यावेळीं अष्टपैलू होऊ लागलेली असते; व त्यामुळें चांगल्या ऐतिहासिक वा सामाजिक पाश्चात्य कथांचींहि रूपांतरें त्याना स्वागतार्ह वाटतात. अशीं कांहीं नमुनेदार रूपांतरें सांगण्याजोगीं आहेत. उदा. श्री मस्केटिअर्स या अलेक्झांडर ड्यूमाच्या प्रसिद्ध कादंबरीचें एक लहानसें रूपांतर सौ. उषा आपटे यांनीं 'तीन शिलेदार' या नावानें केलें आहे, तें अत्यंत वाचनीय झालें आहे. आणखी एक विशेष म्हणजे यांत प्रसंगानुसार सुंदर चित्रेंहि असल्यानें त्याचें आकर्षण बालदृष्टीनें अधिक वर्धितच झालें आहे. "वीस वर्षांनंतर" हेंहि याच लेखिकेचें याच तीन शिलेदारांच्या उत्तर आयुष्यांत घडलेल्या हकीकतींचें अनुवादित पुस्तक; पण तीन शिलेदारसारखी लोकप्रियता याला मिळाली नाहीं एवढें खरें. सख्ख्या भावंडात देखील एकाचें रूपगुण दुसऱ्याला असतेंच असें कोठें आहे? तसाच हा प्रकार!

'प्रिझनर ऑफ झेंडा' या प्रसिद्ध पुस्तकाचें अगदीं छोटें पण चटकदार रूपांतर श्री. द. के. बर्वे यांनीं "गोड गुपित" या नांवानें केलें आहे, तेंहि उत्तम जमलें आहे.

पाश्चात्य वाङ्मयपरिचय आणखी अनेक छोट्या मोठ्या कादंबऱ्यांनीं कुमार जगाला घडविला आहे. म्हटलें तर काल्पनिक प्रवास वर्णन व म्हटलें तर कादंबरी अशा प्रकारचीं दोन सुंदर पुस्तकें वारंवार अनुवादित झालेलीं दिसतात, तीं म्हणजे गलिव्हरचा वृत्तात आणि सिंदबादच्या सफरी. गलिव्हरचा वृत्तांत पूर्वीं हरी कृष्ण दामले यांनीं ४ भागांत केला होता. पण अलिकडे श्री. भा. म. गोरे यांनीं अगदीं थोडक्यांत 'गलिव्हरचे प्रवास' दिले आहेत, ते मुलांना सहज आवडतील असेच आहेत. सिंदबादच्या सफरी अनेकांनीं लिहिल्या. या कथानकांत नावीन्य नाहीं; परंतु वैचित्र्य भरपूर असल्यानें हेहि प्रवास रंजक ठरले आहेत.

अशाच एका अद्भुतरम्य प्रवासावर आधारलेली एक अनुवादित पण वेगळ्या रूपागुणाची सुंदर कादंबरी नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. तिचे नाव " हिमविश्व. " ( मूळ पुस्तकाचें नाव ( The world of Ice ) हा अनुवाद श्रीकृष्ण हवालदार यांनी केला आहे. उत्तर ध्रुवाच्या परिसरात अडकलेल्या एका जहाजाची व नाविकाची अत्यंत रोमांचकारी कथा यात आहे, तीहि बाल्याचकाना निश्चित आवडण्यासारख्या नाविन्यानें नटली आहे.

डॉन क्विझोट रॉबिनसन क्रूसो, रॉबिनहूड हे पाश्चात्य बाल्साहित्यात गाजलेले नायक आहेत. त्यावर ही लहान मोठी मराठी पुस्तकें प्रसिद्ध झाली आहेतच. रॉबिनसन् क्रूसो, श्री. वि. स. सुखटणकर यांनी रूपांतरीत केलें. श्री मा. प. शिरस्त्यांनीं डॉन क्विझोट ही कादंबरी त्यातल्या विनोदी वर्णनाला मजेदार मराठी साज देऊन बालांना दिली व रॉबिनहूड तर श्री. भा. रा. भागवतांनी इतक्या आत्मीयतेनें मराठी साहित्यात आणला की बालाच्या गळ्यातला तो ताईत होऊन राहिला आहे.

व्हिक्टर ह्यूगो या सुप्रसिद्ध फ्रेंच लेखकाची ' ला मिझरेबल ' ही एक गाजलेली कादंबरी ह्या कथानकावर आधारलेली एक छोटी ' दु सी ' या नावाची कादंबरी कै. साने गुरूजींनी गोड गोष्टी या मालेंतून प्रसिद्ध केलेली आहे ती बालदृष्टीनें अतिशय सरस झाली आहे. अर्थात् रूपांतरित कादंबरीत आणखीहि दोन तऱ्हा असतातच. एक ' तीन शिलेदार ' प्रमाणें नावें, वातावरण व प्रसंगरचना वगैरे सर्व सामुग्री मुळातलीच कायम ठेवून फक्त बालसुलभ संक्षिप्तीकरण करणें व त्यातून जमेल तेवढा स्वत च्या भाषाशैलीचा अविष्कार करणें हा एक प्रकार. दुसरा प्रकार म्हणजे दु.सीप्रमाणें मूळ कथासूत्र तेवढें विदेशी ठेवावयाचें, पण वातावरण, नावें, प्रसंगदर्शन, परिस्थिति रूढी वगैरे सर्व संपूर्ण भारतीय बनवून नव्यानेंच सर्व पुस्तक या कथेवर आधारित असें लिहावयाचें. कै. साने गुरूजींची गोप्या, नवजीवन, मिरी, मनूबाबा, तीन मुलें इत्यादि पुस्तकें अशाच स्वतंत्र अनुवाद धर्तीची असून ती अनुक्रमें मीरू हेरिटेज, रिसरेक्शन, लँपलाइटर, सिलासमॅनर, एनॉकआर्डेन यावर आधारित आहेत.

मराठींत अशा प्रकारें रूपांतरित वा अनुवादित दोन्ही तऱ्हेच्या बाल्काद बऱ्याची संख्या आज भूमितीश्रेढीनें वाढत आहे. व तिनें बालकादंबरीची एक शाखा चांगली संपन्न केली आहे, यात संदेह नाहीं. परंतु कुठल्याहि नव्या प्रथेंतून गुणाइतके दोषहि येण्याची शक्यता धरूनच या पुस्तकांची एकवार चिकित्सा होणें अवश्य वाटतें. ज्या परदेशी कादंबऱ्या बालासाठीं रूपांतरित करावयाच्या त्याची निवड चोखंदळपणें व कसोशीनें व्हावयास नको काय ? पण अनेक पुस्तकांचें बाबत ही निवड चुकीची झालेली आहे, आणि मान्यवर

लेखकांकडूनहि हें अवधान राखलें गेलेलें नाहीं, याचें आश्चर्य वाटतें. कै. साने गुरूजींच्याच 'आवडत्या गोष्टी' या कथामालेंतील 'नवजीवन' हें पुस्तक घेऊं. टॉलस्टॉय या सुप्रसिद्ध पाश्चात्य लेखकाचें 'रिसरेक्शन' हें एक फार गाजलेलें पुस्तक अनेक भाषांत रूपांतरित झालेलें, मान्यता पावलेलें. नवजीवन ही याच प्रसिद्ध गोष्टीवर आधारलेली बालकादंबरी आहे. भाषांतर (रूपांतर) अर्थातच चांगलें आहे, व गुरूजींच्या नेहमींच्या जिव्हाळ्याच्या भाषेनें व कारुण्यानें नटलेलेंहि आहे; परंतु हें कथानक कुमारवयाला योग्य होतें काय हा प्रश्न विचारी मनाला खटकल्यावाचून राहत नाहीं. कारण कथानकाचा गाभाच मुळीं 'स्त्री पुरूषसंबंधावर' आधारित; आणि एका तरुणानें एका कुमारिकेला फसविलें येथूनच कादंबरीची सुरुवात! खरें म्हणजे ही गोष्ट बालभाषेंत वर्णन करणेंहि दुस्तर व्हावें; परंतु पुस्तकाची मध्यवर्ती घटना तीच असल्यानें तें वर्णन वगळून तरी चालणार कसें! पुढील वाक्यें त्या दृष्टीनें येणें अपरिहार्यच. गुरूजी लिहितात—

"प्रतापचे एक मन त्याला म्हणे तूं येथून जा. पडशील नि पाडशील." दुसरें मन म्हणे "येथें राहा, भीति कशाची! भोग नि मग जा."

"रूपा, रात्रीं मी तुझ्या खोलींत येईन. तूं एकटी असशील. कडी लावूं नको." तो म्हणाला.

"तिनें दार हळूंच उघडलें. त्यानें तिला एकदम उचललें. ती नको नको म्हणत त्याला अधिकच बिलगली. त्यानें तिला आपल्या खोलींत नेलें."

"प्रताप विचार करूं लागला परंतु 'असें' सर्वांच्याच बाबतींत होतें. प्रत्येकजण 'असें' करतो. 'असें' न करणारा आमच्या लष्करी अधिकाऱ्यांत कोण आहे?" तो निश्चितपणें झोंपला." (नवजीवन, पृष्ठ ३६–३७)

हें 'असें' म्हणजे काय याची स्पष्ट कल्पना चौदापंधरा वर्षांच्या मुलांमुलींना असतेच असें समजायचें काय? "भोग" म्हणजे काय हें या निरागस मुलांना कोठल्या शब्दांत समजावून द्यायचें? आणि त्याचें प्रयोजनच काय! "रूपाला झोंप आली नव्हती. ही सुखाची घटना कीं दुःखाची? याचें पर्यवसान काय होणार? याचा ती विचार करीत तळमळत होती." या वाक्यांनीं बाराचौदा वर्षांच्या मुलीला 'त्या घटनेचा' बोध होणे किती कठिण! नीट समजावून सांगावें तर वय लहान. मनांतले विकारविचाराचें जग अजून जागेसुद्धा झालेलें नाहीं चरें, सांगूं नये तर कथानकाचा पायाच अबोध राहणार; असा हा अवघड पेंच, योग्य कथानक निवडलें गेलें असतें तर उद्‌भवला असता काय? हा अनुवाद खरोखर मोठ्यांसाठींच योग्य झाला असता. 'खास मुलांसाठीं मुद्दाम

लिहिलेलें पुस्तक ' असा शेरा यांवर मुद्रितहि झालेला आहे; त्यामुळें तर हे विचार अधिकच तीव्रतेनें मनांत येतात.

अनुवादांनी आमच्या बालकादंबरी विभागांत महत्त्वाची व मौलिक भर पडत आहे; आणि म्हणूनच त्यांच्या सरसनिरसतेची योग्य पारख वेळेवारीच होणें अवश्य आहे.

## सामाजिक ( व्यक्तिदर्शनपर )

ऐतिहासिक व अद्भुतरम्य कादंबऱ्यांचा प्रांत अशा प्रकारें बालप्रिय होत असला तरी कुमारवयाला आज त्याहूनहि उत्तम उत्कटतेनें हवें असणारें वाङ्मय सामाजिक व सत्याधिष्ठित स्वरूपाचेंच लागतें; कारण यावेळीं मनोवृत्ति विकसित होत असतात; त्यामुळें कल्पनायुग मागें पडून सत्यसृष्टीकडे मुलांचे लक्ष वळतें, हें आपण पाहिलेंच. कुमार वयांतील जाणत्या मुलांचें विचारक्षेत्र पाहिलें तर त्यांत घर, आई–वडिल, भाऊ–बहीण वगैरे आतेष्ट, शाळा शिक्षक, शालेय क्रीडाजीवन व अभ्यासू वृत्ति, मित्रमंडळी, कलात्मकवृत्तींचें वर्धन व ज्ञानार्जनाची तीव्र लालसा ह्या सर्व गोष्टी आढळतात. शिवाय नव्या कालांत जे अनेक राजकीय फेरफारहि इकडे झाले, त्या राजकीय वातावरणाचें विचारकेंद्र जाणत्या मुलांच्या मनांत नव्यानें प्रभावी होत असतेंच; थोडक्यांत म्हणजे कुमार जें जीवन जगतात, जें जग पाहतात व अनुभवतात, त्याचेंच सत्यचित्रण त्यांना मनापासून आवडतें.

अशा सामाजिक कादंबऱ्याहि बहुसंख्येनें आज किशोर व कुमारांसाठीं प्रसिद्ध होत आहेत. त्यांत ठळक असे दोन फरक दिसतात. एक म्हणजे व्यक्ति-दर्शनपर. या विभागांत नायकत्व एखाद्या कुमारवयी मुलाकडे किंवा मुलीकडे असून सर्व कथाकाची गुंफण या मुख्य व्यक्तिरेखेचा उठाव देण्यासाठींच हेतुपूर्वक गुंफलेली असते तो प्रकार. यांत गोट्या, प्रताप, वसंत, चिंगी, छोट्या वगैरे प्रमुख किशोर व चिंगी इत्यादि किशोरींचें चित्रण येतें.

दुसरा प्रकार सर्व साधारण सामाजिक कथांचा. यांतील वर्णनक्षेत्र केवळ कुमारनायकाभोंवतींचेंच असतें असें नव्हे, तर व्यवहारिक जगांतल्या अनेक भल्याबुऱ्या व्यक्तींचें त्यांत मनोलेखन आढळतें. हें विश्व जाणत्या माणसांचें असतें. अर्थात् यातहि प्रसंगोचित बालजीवन येतेंच; पण तोंच कादंबरीचा लक्षबिंदु असत नाहीं. जाणत्यासाठी जशा सर्वसाधारण रंजक व उद्बोधक कादंबऱ्या लिहिल्या जातात, तशाच या कुमारांसाठीं लिहिलेल्या एवढेंच. या विभागांत सानेगुरूजींच्या सामाजिक कादंबऱ्या येतील, कै. पिरोज आनंदकर, सौ. कुमुदिनी रांगणेकर, श्री. भा. रा. भागवत अशांच्याहि कांहीं येतील. पैकीं किशोर नायक असलेल्या कादंबऱ्याचा विचार आधीं पाहणें योग्य होईल.

कुमारांना नायकत्व देऊन कादंबरी लिहिण्याची ही प्रथा नवी आहे असें मुळींच नाहीं. 'हरी आणि त्रिंबक' हें कै. गोविंदशास्त्री बापट यांचें पुस्तक १८७५ सालीं प्रसिद्ध झालें. हें उपदेशपर पुस्तक खरें, परंतु सर्व कथानकाची गुंफण श्रीमंताचा एक लाडावलेला मुलगा त्रिंबक याच्या वैशिष्ट्यपूर्ण स्वभावदर्शनावरच आधारलेली दिसून येते. यानंतर 'शीलाचें मोल' हें वि. कृ. नेरूरकरांचें कुमार-जीवनाचा विकास सूचित करणारें पुस्तक विचारार्ह ठरेल. सुमारें ४० वर्षांपूर्वी हें लिहिलें गेलें. त्यामुळें कथनपद्धति जुन्या वळणाची आहे; शिवाय जुन्या कादंबरी संकेतांना अनुसरून यांतला कुमारनायक असामान्य गुणाचा पुतळाच दर्शवला गेल्यानें तो सर्वसामान्यांचे प्रतिनिधित्व करूं शकत नाहीं. हेंहि पुस्तक 'हरी आणि त्रिंबक' प्रमाणें सद्गुणवर्धन व संस्कार यांची महति सूचित करणारेंच आहे मात्र एका बाबतींत याचें वैशिष्ट्य वर्णनीय ठरेल. मिशनरी लोक अशीं शतदरिद्री मुलें हेरून त्यांना द्रव्यसहाय्य देतात व आपले अनुयायी बनवतात, अशी वेगळ्या आशयाची हकीकत यांत आली आहे व ती उपेक्षणीय नाहीं. आणखी एक याच प्रकारचें पुस्तक १९२४ सालीं प्रा. सत्यबोध हुदलीकर यांनीं लिहिलें, त्याचें नाव "बूची" असें होतें. बूची हा एक जर्मन मुलगा आहे; त्यामुळें त्याचे रीतिरिवाज, घर शिक्षण, वातावरण हें सर्व पाश्चात्य वळणाचें आहे. पण या काळांत व्यक्तिदर्शनपर विशेषतः बालजीवनदर्शी, पुस्तकें नव्हतींच; त्यामुळें 'बूची' जाणता होईपर्यंतच त्याचें चित्रण बालदृष्टीनें स्वागतार्हहि ठरेल. प्रा. हुदलीकरांची भाषाहि टसठशीत आहे.

व्यक्तिदर्शनपर अथवा विशेषेकरून कुमारजीवनपर कादंबऱ्याचा या अलीकडच्या पंचवीस तीस वर्षांत कितीतरी तऱ्हेनें उत्कर्ष झाला आहे. पूर्वींप्रमाणें हें व्यक्तिदर्शन उद्बोधनापुरत्याच मर्यादित स्वरूपाचें राहिलेलें नाहीं, तर कुमार नायकाच्या सर्व कृतींचें, वृत्तिप्रवृत्तींचें, स्वभाव विशेषाचें एक संपूर्ण भावचित्रच वाचकांसमोर आजकाल साकार होतांना दिसेल. भाषाहि पूर्वींपेक्षा अधिक रेखीव, प्रसंगरचना आजच्या समाजजीवनाची आणि पार्श्वभूमि आज घरींच्या कौटुंबिक राहणीची. अशा सर्वच सुधारणांमुळें या कुमारजीवनपर कादंबऱ्या मुलांना आपल्याच जीवनादर्शाचें एक सत्य चित्रण वाटल्यास आश्चर्य नाहीं! याचें एक ठळक उदाहरण म्हणजे कै. ना. धों. ताम्हनकरांचा "गोट्या." हा चरित्र नायक बालवाचकांत आज याच गुणांनीं अत्यंत प्रिय होऊन बसलेला दिसेल. गोट्याबाबत आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्याचा बालवयापासून यौवनदशेपर्यंतचा विकास त्यांत टप्या टप्यानें रंगला आहे. एवढेंच नव्हे तर गोट्या हा मूळचा हॉटेलमधें पोऱ्या होता, तेव्हांपासून उत्तम संस्कार घडून व शालेय शिक्षण मिळून तो एक आदर्श तरुण बनतो! हा परिस्थितीचाहि आदर्श फरक क्रमानें दर्शविला गेला

आहे. या दुहेरी विकसनानें गोट्याची व्यक्तित्वसंपन्नता आकर्षक व पैलदार झालेली दिसते.

बाल, किशोर, कुमार या सर्वच अवस्थांतून गोट्याचा जीवनप्रवास होत असल्यानें या भिन्न वयश्रेणींत घडणारें मुलाचे स्वभाव, सहजप्रवृत्ति व बुद्धिनिष्ठता यांचेंहि दिग्दर्शन फार हलुवारतेनें झालेलें दिसतें. अर्थात् त्यावरहि आक्षेप घेतला गेला आहे तो असा कीं, गोट्या वाजवीहून अधिक आदर्श व गुणसंपन्न दर्शविला गेल्यानें जुन्या जमान्यांतील सद्गुणी व सुगुणी नायकनायिकासारखा तो वास्तवापासून बराच दूर असलेला असा भासतो. परंतु हा आक्षेप पटणारा नाहीं. कारण गोट्याच्या कल्पकतेचे प्रसंग व त्याची बुद्धिमत्ता ही कांहीं अशक्य कोटींतली वा अवास्तव नाहीं. आजहि एकट्यानें हस्तलिखित मासिक लिहून काढणारीं, किंवा उत्कृष्ट वक्तृत्व करूं शकणारीं आणि नित्य खोड्या करणारीं, परंतु त्यांतूनहि सुस्वभावी वृत्तीनें उमटून दिसणारीं मुलें समाजांत कितीतरी सांपडतील. त्यांचेंच प्रतिनिधित्व गोट्यानें केलें आहे व त्या दृष्टीनें ही व्यक्तिरेखा असाधारण नसून एकप्रकारें मुलासमोर एक आदर्श ठेवण्यासारखी आहे असें म्हणतां येईल. मुलांना गोट्या आवडतो तो त्याच्या या अष्टपैलू व्यक्तिमत्वामुळेंच !

कै. ताम्हनकरांचा 'पंडित' (खडकावरचा अंकुर) व 'राजाबाळ' (सांवटांतले रोप) हे दोन बालनायक भिन्न परिस्थितींत वाढले. पंडितच्या भोंवतीं अत्यंत प्रतिकूल व अपमानकारक वातावरण होतें; तो वार लावून जेवण्याएवढा दरिद्री होता व त्याला मायेची अशी एकच वृद्ध स्त्री होती, पण यांतून पंडितची प्रगति निष्ठा किती चिकाटीनें व जोमानें प्रगत होते ! कठिण भिंत फोडून एकादें पिंपळाचें इवलेसें रोप हवेंत लहरावें त्याप्रमाणें पंडितचें हें शब्दचित्र सुरेख साधलें आहे. एकपरीनें तो आदर्श मुलगाहि ठरूं शकेल. शिवाय पंडितच्या स्वभावचित्रणांतून आणखी एक मौलिक विचार प्रकट झाला आहे. मुलांची स्वाभाविक आवड लक्ष्यांत न घेता धोपट मार्गानें सर्वांना सारखेंच शिक्षण देणें हें घातुक ठरतें हें यांतून स्पष्ट झालें आहे, तर सांवटांतले रोप या पुस्तकांत सर्व संपन्नता असली तरी अति लाडानें मुलें कशी बिघडतात, याचें एक दर्शन घडतें व तें मुलापेक्षां पालकानाच अधिक बोधप्रद व्हावें. मात्र 'पंडित' जेवढा मनांवर परिणाम करतो तेवढा 'राजाबाळ' करूं शकत नाहीं. कुमारजीवनाची वैशिष्ट्यपूर्ण व विविध चित्रें रेखाटण्याच्या बाबतींत ताम्हनकरांनीं जणु नवा संप्रदायच निर्माण केला म्हटलें तरी चालेल. गोट्या, सांवटांतले रोप याप्रमाणेंच अलिकडेच प्रसिद्ध झालेली त्यांची नीलाक्षी, रत्नाकर, मणि आविक्षित इ. पुस्तकें केवळ कुमारजीवनावरच आधारित आहेत. अर्थात् यातलीं कांहीं वेदकालीन वा पौराणिक आहेत; तीं या सामाजिक विवेचनांत येणारीं नव्हेत. तथापि मणि, रत्नाकर, बळी इत्यादि पुस्तकें आजघडीच्या परिस्थितीचें चित्रण

करणारीं आहेत व या सर्वांचा विशेष म्हणजे सभोवतीच्या प्रतिकूलतेंतून स्वप्रयत्नानें वर आलेलेच चरित्रनायक यांत दर्शविले आहेत. आक्षेप घ्यायचाच तर मी एवढेंच म्हणेन की, यांत आधुनिक स्वभावदर्शनाबरोबर जुन्या पद्धतीनें केलेला उपदेश बराच व बऱ्याचवेळां जाणवतो. पण तरी काय झालें ? कै. ताम्हनकरांचीं हीं पुस्तकें सत्प्रवृत्त मुलांचा आदर्श निर्माण करणारीं आहेत. बळीराम व रत्नाकर या कथांतून आदर्श शेतकऱ्याचें एक स्वप्नचित्र रंगलेलें आहे, तेंहि अत्याधुनिकतेच्याच सदरांत येईल; पण वाचतांना तें मुळींच खुपणारें नाहीं !

'मणि' ह्या पुस्तकांत मुलांच्या सहजप्रवृत्तींना आई कसें उत्कृष्ट वळण लावूं शकते याचें एक शब्दचित्र आहे. अर्थात् ह्यामुळें बोधप्रदतेलाच यांत अग्रस्थान मिळालें आहे. मणि वा रत्नाकर यांच्या रेखा त्यांच्या गोष्टया व पंडित इतक्या रेखीव व सुस्पष्ट झालेल्या नाहींत असाहि भास होतो. फोटोंत जास्त माणसें असलीं कीं, प्रत्येक व्यक्तीचा आकार छोटा छोटा होत जातो. तसें या पुस्तकांचें झालें आहे. शिवाय उपदेशाधिक्यानेंहि मणीचें सौंदर्य उणावलेलें वाटतें.

श्री. वि. वि. बोकील यांची 'विजय' ही बालकादंबरीहि मनोविश्लेषणात्मक दृष्टीनें अत्यंत सरस उतरली आहे. विजयचें चित्रण वेगळ्या पार्श्वभूमीवरून झालेलें असल्यानें तें नाविन्यपूर्ण व आकर्षक वाटतें. आईबापाला सोडून परक्या वातावरणात राहणाऱ्या मुलाची होणारी कुचंबणा व विरोधी गृहजीवनांतून होणारी भावनांची गळचेपी याचें एक उद्बोधक चित्र छोट्या विजयनें स्पष्ट केलें आहे. बहुधा कुमारजीवनावर आधारित असा शालेय जीवनाचाच भाग सामाजिक कादंबऱ्यांतून विशेष प्रकर्षानें रंगवण्यांत येतो; कारण मुलांचें अर्धें जीवन विद्यालय घडवितें. येथेंहि भलेबुरें वातावरण व विद्यार्थ्यांची चुरस वा द्वेषाचें वर्तुळ असतेंच ! गटबाजी असते, जिवाला जीव देणारे मित्र या क्षेत्रांत लाभतात तसें उत्कर्ष सहन न होणारे बालशत्रु व त्यांच्या कारवाया याहि जगांत आहेत व त्यामुळें संस्कारित होणारें कुमारजीवन कमी अधिक फरकानें वर उल्लेखित केलेल्या बहुतेक कादंबऱ्यांतून आलें आहेच; याशिवाय कालमानानें आजच्या कुमारांना क्रीडाजीवनाची ओढ व आवड अत्यंत उत्कटतेनें असते; त्यामुळें या सर्वच कुमार–चरित्रांतून शालेय खेळ, शर्यती, क्रीडानैपुण्य, त्यांतील हेवेदावे यांचें वर्णन अगत्यानें करण्यांत आलेलें दिसतें. याचें विशेष बारकाईचें वर्णन श्री. बोकिलांच्या 'विजय' मधें आलें आहे व तें चांगलें साधलें आहे. क्रीडापटु विद्यार्थी शालेयजगांत किती लवकर प्रिय होतो याची विजयची शब्दरेखा ही एक साक्षच म्हणायला हवी.

श्री. बोकीलांची "वसंत" ही व्यक्तिरेखा तर विजयहूनहि प्रभावी झाली आहे व ती गोष्टीप्रमाणेंच बालवाचकांची अत्यंत आवडती अशीच आहे ! मात्र गोष्टी व

वसंत यांत एक मोठाच दर्शनी फरक आहे. गोट्या बाल्वाचकांसमोरच बाल्य व किशोरावस्था ओलांडतो, त्यामुळें त्याच्या स्वभावदर्शनांत व विचारविश्वांतहि हळूहळू प्रगति व प्रौढता यांचा आढळ होतो; तसें वसंताचें नाहीं! बेबीचा भाऊ, साडेतीन शहाणे, चिमखडे, वसंत इ. ४–५ पुस्तकांतून वसंत आपल्याला भेटतो. त्या सर्व कालखंडांत त्याचें बारातेराचेंच वय कायम दिसतें. त्याच्या बुद्धिनिष्ठ खोड्या हाच त्याचा स्थायी स्वभाव! त्यांतून उद्बोधनाचा बिलकूल प्रयत्न नाहीं. चार मुलें असतात तसाच–खोडकर, पण त्यांतल्या त्यांत अधिक, चलाख-आणि अतिशय डोकेबाज पोर आहे तो! गोट्या आदर्शकुमारांचा प्रतिनिधि ठरतो, तर वसंतानें सर्वसामान्य खोडकर मुलांचें प्रतिनिधित्व उत्कृष्टपणें केलेलें दिसतें.

'वसंत' लोकप्रिय होण्याचें आणखी एक कारण आहे तें म्हणजे लेखकानें विनोदगर्भ व गमतीच्या भाषेंत त्याचें शब्दचित्र रेखाटलें आहे. मुलांनाहि विनोद आवडतो व तोहि वसंतासारख्या मुलाच्या खोड्यांतून निर्माण व्हावा हें तर त्यांच्या फारच पसंतीस येतें. एकच नायक वा नायिका कल्पून तिचे स्वभावधर्म प्रकट होतील अशाप्रकारें अनेक कादंबऱ्या लिहिण्याची कल्पना आपल्याकडे अजूनहि कल्पनेंतच आहे; व जेथें मोठ्यांसाठीहि असा प्रयत्न नाहीं, तेथें बालसाहित्यांत त्याचा आढळ होणें क्वचितच! परंतु पाश्चात्यांच्या बालसाहित्यांत या कल्पनेची मूर्तावस्था दृष्टीस पडते. "विल्यम्" ह्या नांवाचा १२–१४ वर्षांचा कुमारनायक रिचमल कॅम्प्टन् (Richmal Campton) या इंग्लिश लेखकानें निर्माण केला तो जवळ जवळ ३०–३२ कादंबऱ्यांचा केंद्रनायक आहे! या सर्वच कादंबऱ्यांवर या वयाच्या मुलांच्या उड्या पडाव्या अशी त्याची भाषा व प्रसंगरचना दिसेल. विल्यमचीं अवखळ कृत्यें, त्यानें करून नकरून माजवलेले घोटाळे, त्याचे विचार व भाषण या सर्वांतून उमदा, सत्प्रवृत्त पण अत्यंत खट्याळ कुमार डोकावून पाहतांना दिसतो!

असा हा कादंबरीबहुल चरित्रनायक आपल्या कुमार साहित्यांत अद्यापि तरी सांपडत नाहीं. गोट्या तीन भागांचा चरित्रनायक आहे व श्री. बोकीलांनी वसंतावर ६–७ पुस्तकें लिहिलीं हें खरें, पण वसंत ही व्यक्तिरेखा मूळ विल्यमवरूनच मराठींत चित्रित झालेली आहे.[१] अर्थात् केवळ कथासूत्र घेऊन याला जी मराठीची वेषभूषा चढविली गेली ती मात्र अतिशय नीटस व सुसंगत आहे हें एकदम मान्य केलें पाहिजे. मात्र वसंताचे दर्शन श्री. बोकीलांनी ७–८ विभागांतच केलें व मराठी बालसाहित्यांतला एक अभिनव प्रयोग तेथेंच थांबला; पण ही प्रथा अजूनहि पुढें चालविण्याइतकी उपयुक्त आहे व ती बालप्रियहि ठरेलसें वाटतें. गोट्याचेहि तीन भाग निघाले आणि हा गोट्याहि मूळ रिचमलच्या विल्यमवरच आधारित

[१] वि. वि. बोकीलकृत बेबीचा भाऊ-प्रस्तावना

असल्याचें एका समीक्षकानें म्हटलें आहे.[२] अर्थात् एकाच पुस्तकावरून मराठींत आलेल्या दोन भिन्न रूपांतरांत निदान कथानकाचें तरी साम्य हवें; पण तें या दोन पुस्तकांतून आढळत नाहीं, याचें मात्र आश्चर्य वाटतें.

वसंत व गोट्याची बालप्रियता अजमावल्यानंतर या पद्धतीचेंच अनुकरण चंदू (खानविलकर), किशोर, (पेठकर), छोट्या (मो. धा. पटवर्धन), बंड्या (नाईक व गुरव), चेंडू–गोंडू आणि टिल्लू (शांतिलाल भंडारी) इत्यादि अनेक वेगवेगळे छोटे नायक कल्पून करण्यांत आलें आहे. परंतु मनोविश्लेषण दृष्टीनें या मुलांच्या मनाच्या विकास छटा दर्शविण्याच्या बाबतींत ते गोट्याच्या तुलनेला टिकणारे नव्हेत. कांहीं जणांनीं त्यांत वाढाळू मुलांचें चित्र रंगविलें; परंतु खोड्या वर्णन करतांना चरित्रनायकालाच हीनत्व येईल एवढें त्या खोडकरपणाचें स्वरूप उथळ व सर्वसामान्य दर्शविलें आहे. *टिल्लू या छोट्या नायकानें घड्याळाची* अंतःरचना पाहाण्यासाठीं एक चांगलें घड्याळच पार मोडून टाकलें आहे! त्याऐवजीं एखाद्या घड्याळजीशीं स्नेह करून, त्याच्या दुकानांत जाऊन, त्यानें हें शिक्षण गुपचूप घेतलें असतें तर अधिक बुद्धिनिष्ठता त्यांतून व्यक्त झाली नसती काय?

'कॅप्टन प्रतापच्या' मनोविकासाला अगदीं बालदशेपासून सुरवात झाली असली तरी अनेक प्रकरणें अत्यंत सामान्य दर्जाची व व्यक्तित्वाला उजाळा न देणारीं उतरलीं आहेत. बंडखोर '*बंड्याच्या*' *सर्कशींतून लोकांना चांगलाच उपद्रव* पोहोचलेला आहे व 'शेकोटी' म्हणून त्यानें गवताच्या गंजीला आग लावली हेंहि स्तुत्य म्हणतां यावयाचें नाहीं. अर्थात् असे कांहीं आक्षिप्त वर्णनप्रसंग असले तरी ह्यांतील कांहीं मुलांच्या अंगीं थोडेंफार गुणवैशिष्ट्य आहे व तें उमटून दिसण्याइतकें ठळकहि आहे. आजकाल सर्व धर्मांचीं मुलें एकत्र शिकतात, तेव्हां निदान या वयांत तरी धर्मांतील बंधुभाव असावा अशा शिकवणीनें शांतिलाल भंडारींच्या 'किशोर व आब्बास' यांनीं एक एक निर्मल बंधुभावनेचा आदर्श साकार केला आहे, तर *त्यांच्याच चेंडूनें इंग्रज–ख्रिस्ती मुलांबद्दल योग्य तो स्नेहभाव ठेवला तरी अंधपणानें त्या संस्कृतीचेंच अनुकरण करूं नये, हें सूत्र स्वधर्माभिमानानें पाळलेलें दिसेल!* छोट्यानें कलाप्रदर्शन करून मिदनापूरसाठीं फंड जमविला यांतली त्याची कल्पकता व सद्हेतु गोट्याच्या तोडीचाच आहे. गोट्या व प्रताप हीं मुलें मोठीं होऊन कार्यक्षम झालेलीं दिसतात. त्यांचा अपवाद सोडला तर–बाकीचीं हीं मुलें बहुधा एकाच वयाचीं असल्यानें व पुस्तकांतून त्यांच्या वाढत्या वयाचा उल्लेख नसल्यानें *या सर्व व्यक्तिमत्वाला ठराविक कालखंडाची सीमा* पडते व *त्यांतल्या* वर्णनक्षेत्रांतहि ठराविक संकेत व समान प्रसंगांचेंच आधिक्य राहतें हें आपण

[२] बालवाङ्मय – बागूल.

पाहिलेंच. पण केवळ कुमाराचें ठरीव वय या हुशारी न वर्णिता ते बिकट परिस्थितीं तून वर आले असल्याचीं आशाजनक व स्फूर्तीप्रद शब्दचित्रेंहि कांहीं कांहीं कादंबऱ्यांतून आलीं आहेत. शाळेप्रमाणेंच गृहजीवनहि बालविकास घडवीत असतेंच, परंतु सर्व घरें या दृष्टीनें आदर्श व आनंदी वातावरणाची असतातच असें तरी कोठें आहे? बालमानसविकसन हा विषय डोळ्यासमोर ठेवून कितीशा घरांतून बालजीवनाचें संवर्धन होत असतें? या प्रश्नाचें उत्तर आशाजनक मिळणार नाहीं! अनेक तऱ्हेनें हें वातावरण दूषित वा प्रतिकूल असतें व त्याचा कुमार व बालजीवनावर दूरगामी परिणाम होत असतो

कांहीं लेखकांनीं आपल्या कांहीं बालनायकाकडून या प्रतिकूल पण सार्वत्रिक परिस्थितीचें दर्शन घडविलेलें दिसतें. कै. ताम्हनकरांनीं गोट्या निर्माण केला त्या समोंवतींचें वातावरण, घर व शाळा या दोन्हीं ठिकाणीं, प्रसन्न व अनुकूल होतें. उलट कै. सानेगुरुजींचा श्याम गरीबींतून वर आलेला असल्यानें त्या परिस्थितीस वेगळेच रंग चढलेले दिसून येतील

एका निरागस, चलाख कोंकणी पोराचें शब्दचित्र व्यक्त करणारी 'काकणचा घारू' ही भालचंद्र रानडे यांची कुमारकथा या दृष्टीनें अधिक लक्ष्यात राहण्याजोगी उतरली आहे. कोंकणामधील उल्लेखनीय प्रादेशिकता यांत जागोजाग आलेली असल्यानें घारूत एक आगळेंच चैतन्य निर्माण झालें आहे मोहाचें नारळ किंवा भाजके कडवे वाल इत्यादि खास कोंकणी मुलाचा मेवा अगर फटुकफळी व थरपिलाचे (नारळाच्या चिकट खोडाचे) नेल वगैरे अशा खेळण्याच्या विशिष्ट उल्लेखातून त्याचें प्रांतवैशिष्ट्य उमटून पडतें. तसेंच बुडणाऱ्या शिवाला, म्हैस पाण्यात घालून, वाचविणें अगर पाड्याची झुंज लावणें यातूनहि शेतकरी वर्गाचा एक प्रतिनिधि होऊं पाहणाऱ्या घारूचें आगळें व्यक्तिमत्त्व नजरेंत भरतें. अग्रागर, पुळण शिपटी, इत्यादि शब्दहि चंद्रकलेवर खडी शोभावी तसें या वातावरणाचें सौंदर्य वाढवितात. या सर्व कुमार–व्यक्तिदर्शनात आणखी एक सुंदर व्यक्तिरेखा केवळ वैशिष्ट्यानें आपल्या मनाचा ठाव घेणारी आहे ती म्हणजे कै. साने गुरुजींचा श्याम याची घारू कोंकणच्या गरीबींतला असला तरी प्रसन्न व खेळकर व्यक्तिमत्त्वाचा पोर, तर श्यामची जीवनकथा कारुण्य व गांभिर्यानें नटलेली! बाकीच्या बालनायकांचें वर्णन इतरांनीं केलेलें, तर श्यामनें आत्मकथा लिहिलेली, आणि त्याला गुरुजींच्याच अनुभवाचा सत्य पाया! गोट्या, विजय हीं कलात्मकतेनें काढलेलीं चित्ररेखाचित्रें, तर श्यामचें व्यक्तिदर्शन भावनापूर्ण निव्हाळ्यानें नटलेलें! इतर चरित्रनायक सुंदर प्रसंगांना नटून सजून भाषाभूषणें लेऊन वाचकांसमोर आले बापडा श्याम!—त्यानें स्वताचे दुर्गुणहि उघडे केले आहेत वाचकांसमोर! सरजुल्या हाताची अवहेलनाहि समोर मांडली, व चोरटेपणा केला त्याची निर्भर्त्सनाहि वेशीवर टांगली! चोरीमुळें

गेलेली अब्रू श्यामनें सेवाव्रतानें भरून काढलेली दिसते आणि त्याची रसिकताहि त्याच्या पायपिटींतून त्याबरोबर प्रवास करतांना दिसते. मात्र या लेखनांत बाल कौतुकाची भावना नाहीं; आणि त्यामुळें श्यामचें चित्र अगदीं वस्तुनिष्ठ पण रुक्ष वाटतें. परंतु तें याहून बरेंच आटोपसर झालें असतें तर बरें झालें असतें. पाल्हाळीक कथन एवढेंच यांत गालबोट व श्यामची नैराश्य प्रवृत्ति हीच उल्लेखनीय उणीव !

अर्थात् कुमारजीवनावरील या सामाजिक कादंबऱ्याचा विचार करतां एक *गोष्ट चांगलीच खटकते ती ही कीं, खास कुमारनायक कल्पून बरींच पुस्तकें* निर्माण झालीं, त्याप्रमाणांत किशोरी नायिकांचीं चरित्रचित्रें फारशी नाहींतच ! असें कां ? ताम्हनकरांची चिंगी ही व्यक्तिरेखा एका बुद्धिमान् छोट्या पोराची असली तरी गुणसंपन्नतेंत ती गोट्याहून वा पंडितहून कितीतरी थिटी वाटते व कर्तृत्त्वानेंहि 'चिंगुलीच' ठरते ! मोठी मीना (श्री. वि. वि. बोकील), लिलूच्या लीला (रत्नप्रभा घारपुरे), सौ. कावेरी कर्वे यांची चिंगी, सानेगुरुजी यांची मिरी अशीं कांहीं हातांबोटांवर मोजण्याएवढींच नांवें सांगतां येतील. त्यांत सान्यांचा अपवाद सोडला तर प्रभावी व्यक्तिमत्त्व कोठल्याच कन्येला नाहीं. लिलूच्या लीलामधील लिलू तर फक्त ३ वर्षांची. त्यांत स्वभावचित्रण असतें तर कांहींतरी या रेखेला उठाव मिळाला असता. परंतु केवळ कृतिप्रधानता दर्शविल्यानें आणि ह्या कृतीहि *राखेच्या ढीगांत लोळणें, होळींत बाहुली पाडणें, असल्या विरस करणाऱ्याच* असल्यानें त्यांत चटकदारपणा वा स्वारस्य उतरलेलें नाहीं. जिला नायकत्त्व द्यायचें ती व्यक्ति लहान असली तरी व्यक्तिमत्त्वसंपन्न हवी हा सिद्धांत विसरून कसें चालेल ?

*या गटाचा* स्वतंत्र विचार केला तर आणखी एक गोष्ट जाणवते. हे कुमार-नायक वा नायिका समाजाच्या सुशिक्षित व मध्यमवर्गीय घरांतूनच निर्माण झाल्या; त्यामुळें परिस्थितीचें वैचित्र्य त्यांत नाहीं व विविधतेलाहि त्यांत वाव राहिलेला *नाहीं. इंग्रजींतहि बालजीवन वर्णित कादंबऱ्या आहेत, पण त्यांत ही विविधता जरूर* आढळते. 'किडन्याप्ड' हें स्टीव्हनसनचें पुस्तक किंवा चार्लस डिकन्सचें 'डेव्हीड कॉपरफील्ड' हें पुस्तक पाहिलें तर या दोन्हीं 'डेव्हीड' नांवाच्या नायकांच्या आयुष्यांत कितीतरी *रोमहर्षक व भिन्न जीवनदर्शी प्रसंग आले आहेत. कॉपरफील्डला काजळीच्या* कारखान्यांतून लेबलें डकविण्याचें व पार्सलें बांधण्याचें काम करावें लागतें, व विविध रंगी आपमतलबी दुष्ट लोक त्याला बालपणींच परिचित होतात, हें चित्रण किती वेगळ्या जीवनाचें आहे !

आपल्याकडे श्रमजीवी वर्गहि खूप मोठा आहे. तन्हेतन्हेच्या धंद्यांत बाल-पणापासून मुलें भाग घेतात. शेतकरी, मळेकरी, गुराखी, गवळी, सुतार, सोनार, विणकर, धनगर अशा कुटुंबांतून कुमारजीवन अत्यंत वेगळ्या धडाडेंनें गुंफलें जात

आहे. पण त्यांवर फारसें बालसाहित्य निर्माण झालेलें नाहीं. तुटवडा, प्रसंग दृश्यांचा नाहीं किंवा भिन्नगुणी, भिन्नसंस्कारी कुमार जीवनाचाहि नाहीं, तर त्यांवर निर्माण होणाऱ्या पुस्तकांचा आहे ! या दृष्टीनें पाश्चात्यांसारखे खूप प्रयत्न व्हावयास हवेत व समाजाच्या सर्व थरांतले कुमारजीवन प्रतिभावंतांनीं लेखगत करायला हवें, तरच या प्रयत्नांना विविधतेचें सौंदर्य लाभेल आणि एकांगीपणाचे दोष दूर होतील.

## सामाजिक कादंबरी – (सर्वसाधारण)

सामाजिक बालकादंबरींत व्यक्तिदर्शनात्मक पुस्तकांचाच विभाग फार मोठा आहे, हे आजपर्यंतच्या विवेचनांत आलेंच आहे. त्या मानानें सर्वसाधारण विभागांत फारशी समृद्धि झालेली नाहीं. जी झाली आहे असें वाटतें त्यांत कै. साने गुरुजींचेंच नांव अग्रपूजेचा हक्क घेऊं शकेल ! बालसाहित्यकारांत जर कोणी बालांच्या हृदय-सिंहासनावर जाऊन बसलें असेल तर ते कै. साने गुरुजीच. गुरुजींनी पुष्कळ लिहिलें. व बालांसाठीं तर अत्यंत तन्मयतेनें लिहिलें आणि हें त्यांचें सारें लेखन बालांसाठीं बालकथाच होत्या असें नव्हे, तर दीर्घकथा व कादंबऱ्याहि वैपुल्यानें आहेत त्यांत ! या कादंबऱ्यांची भाषा अगदीं साधी–भावुकतेची, शैली जिव्हाळ्याची, सांगणें मनापासूनचें आणि सत्प्रवृत्तीचा बोध देणारें. खरी गुणवत्ता मुलांनाहि ओळखूं येतेच. त्यांच्या गोड गोष्टी व आवडत्या गोष्टी महाराष्ट्रांत घरोघर गेल्या व मुलांनीं जीवाभावानें त्यांचें स्वागत केलें.

यांतील इंग्रजी कथानकांच्या अनुवादांबद्दलची माहिती यथास्थळीं आली आहेच; पण या अनुवादप्रांतांतहि त्यांनीं एक आगळें वैशिष्ट्य व नावीन्य निर्माण केलें तें म्हणजे हे अनुवाद फक्त पाश्चात्य वा इंग्रजी कथांचेच करायचे ही रूढ पद्धत त्यांनीं साफ मोडून टाकली, ही कक्षा ओलांडून टाकली व भारतांतील इतर प्रांतीय साहित्यांतूनहि उत्कृष्ट कथानकें मिळतात हें दाखवून दिलें. गोड गोष्टींत चेंग्री सरोजा ही दीर्घकथा तामील कथानकावरून रचलेली, तर करुणादेवी ही चिनी नाट्यकथा आहे. या सर्वांना गुरुजींनी मराठी रूप दिलें; परंतु शब्दशः अनुवादाची भूमिका त्यांत नाहीं. कै. साने गुरुजींनी प्रस्तावनेंतून म्हटल्याप्रमाणें ते तुरुंगांत या शाळेंत मुलांना या गोष्टी सांगत व सांगत तशाच प्रकारें लिहून काढीत ! त्यामुळें वाक्यें, शब्द, प्रसंग आणि वर्णनें यांतून पाश्चात्य छटेचें दर्शनहि होणें कठीणच. फक्त कथासूत्र घ्यावयाचें व मग इकडच्या साहित्यभूमींत, उद्यानांत हें नवें कोवळें रोप रुजवायचें, ही गुरुजींची पद्धत. त्यामुळें या कादंबऱ्यांना स्वतंत्र रचनेचे पुष्कळसे गुण द्यावे लागतील. कारण, कथनशैली हा त्यांचा खास गुण; व त्यामुळेंच तर या कादंबऱ्या बालप्रिय ठरल्या एवढ्या !

गुरुजींचें कादंबरीलेखन कुमारांना इतकें प्रिय कां वाटतें बरें ? कारण स्पष्ट आहे. त्यांचें सांगणें फार जिव्हाळ्याचें आहे. त्यांच्या बाललेखनाचें ध्येयवाक्यच मुळीं,

"करी मनोरंजन जो मुलांचें
जडेल नातें प्रभूशीं तयाचें।"

अशा उदात्त दृष्टीकोनाचें आहे. तें त्यांच्या दरेक पुस्तकांत अग्रस्थानी देण्यांत येतेंच. याच भूमिकेवरून गुरुजींनी बालकादंबऱ्या लिहिल्या आहेत. गुरुजींची भाषा जशी वैशिष्ट्यपूर्ण आहे, तसे संवादहि साहजिकतेनें नटलेले वाटतात. स्वर्गीय-ठेवामधील एक अनाथ वृद्ध व एक सरलमनस्क मुलगी यांचा संवाद पाहण्या लायक आहे:—

वृद्ध आनंदराम – मी एक म्हातारा आहे. माझा कोणाला उपयोग नाहीं. *कशाला मला नेतां ? तुम्हाला ओझें मात्र.*

शाता – असें म्हणूं नका. मला ओझें नाहीं हो ! माझे बाबा *नाहींत. ते मला सोडून देवाघरीं गेले. मी त्या घरांत एकटी* असतें. जणुं देवानें तुमची सोबत पाठविली. पित्याची उणीव *भरून काढा तुम्ही. मला मुलगी माना.* उठा. येथें फार वेळ बसून उपयोगी नाहीं. तुम्ही भिजला आहांत. ग्राथेल. चला घरीं. गरम कपडे देतें."

त्यांची वर्णनेंहि समर्पक असतात. मनूबाबामधील मनूबाबाचें सोनें चोरीला गेलें होतें. तो रात्रीं शोकाकुल होऊन बसला होता. तेवढ्यात एक मूल रांगत झोपडींत शिरलें. हा प्रसंग कसा वर्णिला आहे पहा—

"त्या दारांतून तें मूल आंत आलें. तें चुलीजवळ आलें. गारठलेल्या त्या मुलाला ऊब मिळाली. मनूबाबा आपल्याच तंद्रीत होता. इतक्यात त्याचें लक्ष त्या मुलांकडे गेलें. सोन्यासारखें मूल तो पाहूं लागला. सोनें आलें असें त्याला वाटलें. त्यानें तें मूल एकदम उचललें. तें मा...मा करूं लागलें. बोलणारें सोनें, जिवंत सोनें, तो त्या मुलाला घेऊन नाचवूं लागला. त्यानें त्या लेकराला घट्ट धरून ठेवलें. जणुं पुन्हां कुणी घेऊन जाईल. ती मुलगी होती. सुंदर मुलगी. डोळे कसे काळेभोर टपोरे होते. डोक्यावर दाट काळेभोर केस होते. अंग कसें गोरे गोरे पान होतें. *मातींतून, खड्यातून ती मुलगी रांगत आली होती. मनूबाबानें तिचे पाय चेपले..."*

या वर्णनांत वाक्यें छोटीं छोटीं, बालवर्णनांतील जिव्हाळा, काव्यात्मता इत्यादि त्यांच्या भाषेचीं सारीं वैशिष्ट्यें यांत प्रकट झालेलीं दिसतील. अर्थात् खास बाल-जीवनावर या कादंबऱ्या नव्हत्या हें खरें, पण त्यांतून सहजगत्या येणारी बाल-स्वभावचित्रणें खरोखरच ठसठशीत व व्यक्तिमत्त्वसंपन्न झालीं आहेत. याचें उदाहरणच

पाहवयाचें झालें तर 'आपण सारे भाऊ'मधील नायक कृष्णचंद्र याची पोरकी अवस्था, दुष्ट भावजयीच्या तडाख्यात सापडल्यानें होणारी हालविपत्ति व सर्कसवाल्याकडे राबताना होणारी भावनिक कुचंबणा याचे शब्दचित्र किती प्रभावी झालें आहे! 'मिरी'मधील गरीब मिरीचा सुस्वभाव व तिची एका वृद्ध कंदील वाल्यावर जडलेली माया याचें दर्शन किती मनोज्ञ वाटतें! लहान मुलामुलींबद्दल कै. साने गुरुजींना अलवत आत्मीयता, त्यामुळेंच की काय छोट्या मंडळींचें मनोरेखन अगदी नाजूकतेनें व भावपूर्ण झालेलें आढळतें.

कै. सानेगुरुजींची बालकादंबरी क्षेत्रात महत्त्वाची कामगिरी केली आहे. त्याचें हें वाङ्मय कुमाराना सन्मार्गदर्शक ठरेल. नीतीची शिकवण देणारेंहि तें आहे. त्यातील लेखनात पाल्हाळीकपणाचा दोष आहे आणि त्यातील काही पुस्तकात प्रचाराचाहि भाग डोळ्यात खुपण्याइतका अतिरिक्त आला आहे. गुरुजींनी मुलाकरिता कितीतरी कादंबऱ्या लिहिल्या त्यात दु:खी मनुबाबा, फुलाचा प्रयोग, यति कि पति इ. गोड गोष्टी इतक्या बालप्रिय झाल्या आहेत की, त्याच्या आतापर्यंत कितीतरी आवृत्त्या निघाल्या आहेत! याहून काहीशा प्रौढ तोंडवळ्याच्या कादंबऱ्या म्हणजे गोप्या, आपण सारे भाऊ, मिरी, स्वर्गीय ठेवा इत्यादि आवडत्या गोष्टी या मालेंतल्या. या दुसऱ्या प्रकारातल्या कादंबऱ्याची कथानकें बरीच गुंतागुंतीची आहेत व मोठमोठ्या सामाजिक समस्यावर तीं आधारित आहेत. त्यामुळें तीं गोड गोष्टींतील पुस्तकाइतकी बालयोग्य नाहीत. शिवाय या पुस्तकातून चालू राजकीय मतप्रणालीचा प्रचार अधिकाधिकानें दिसावा हेंहि गुरुजींच्या बालहितैषी लेखनाला एक गालबोटच लागल्यासारखें वाटतें! राजकारण आज एखाद्या अस्थिर जहाजासारखें हेलकावे खातें. त्यात किती पक्षोपपक्ष, किती मतभेद! जाणत्या मुलाना त्याची माहिती अवश्य हवी हें अगदीं एकदम मान्य, पण भिन्नभिन्न मतप्रचारार्थ बालकादंबरी हें प्रमुख माध्यम ठरणें इष्ट नव्हे पण गुरुजींनी हा प्रचार केला आहे. अगदी तळमळीनें केल्यासारखा दिसतो तो. आपण सारे भाऊ या सुरेख पुस्तकाचा पूर्वार्ध कृष्णचंद्र या बालनायकाच्या भावनिक बदलावर उत्कृष्ट तऱ्हेनें आधारलेला असता उत्तरार्धात मात्र मोठा कृष्णचंद्र सर्वांचे वर्ग चालवतो, सत्याग्रह करतो, धराची एक स्वराज्य' नावाची संस्था बनवतो, त्यामुळें हे सुंदर व्यक्तीदर्शन पुढें पुढें फलाहीन झालें आहे. चित्रा व चारू यात हिंदुमुस्लीम ऐक्याची सूचना आहे. गोप्या कादंबरीत सर्वोदयाचा प्रचार आहे. खालील काही वाक्य त्याची कल्पना देतील

"महात्माजी तर म्हणतात कीं, सारी जमीन गोपाळाची आहे. गोपाळ म्हणजे भगवान, गोपाळ म्हणजे शेतकरी. ही सारी जमीन शेतकऱ्याला वाटून दिली पाहिजे. जो कसतो त्याची जमीन. लोडाजवळ बसणारे ऐदी शेणगोळे त्याचा

काय म्हणून अधिकार!" (गोप्या पृष्ट ६२). अशा मतप्रचारांना नकळत व्याख्यानाचेंहि स्वरूप येतें व त्यानें कादंबरीच्या सहजतेला फार मोठा ढळ पोचतो. बेबी सरोजामधील पुढील परिच्छेद त्याचें एक उत्कृष्ट उदाहरण होऊं शकेल.

" *हिंदुसमाजा! कधीं तुझे डोळे उघडणार? हिंदुस्थानांत आज जी मुसल*मानांची संख्या आहे ती हिंदुधर्मातील स्वधर्मीयांविषयींच्या अनुदारतेचें फल आहे. ज्या जातींना आम्ही तुच्छ मानीत होतो, अशा जातीच्या जाती मुसलमानी *धर्मांत गेल्या. खिश्चन धर्म आल्यावर हजारों तिरस्कृत लोक खिश्चन होऊं लागले.* सनातन्यांनो, ही गळती कधी थांबणार?" बेबी सरोजा (पृष्ट ६६).

सभेंतून हीं व्याख्यानें उत्तम आहेत. पण बालकादंबऱ्यांतून त्याचा वापर करणें म्हणजे रंजकतेवर आक्रमण केल्याप्रमाणेंच होतें. आणि प्रचारालाच कथानकाहून अधिक महत्त्व मिळूं लागलें, तर पाहुण्याचीच मिजास घरमालकाहून जास्त डोईजड ठरल्याप्रमाणें अनवस्थाप्रसंग ओढवेल!

आणखीहि कांहीं पुस्तकें या प्रांतांत वैशिष्ट्यानें चमकून दिसतात. त्यांत श्री. दि. बा. मोकाशी यांच्या 'गुपिता'चा उल्लेख करणें जरूर आहे. यांतील बहुतांश *भाग संवादरूप आहे व हे मुलामुलींचे संवाद सहजसुंदर उतरले आहेत.* एका भित्र्या मुलाच्या मनावर वर्गांत व घरींदारीं दादागिरी करणारा एक द्वाड मुलगा कसें दडपण आणतो याचें हें शब्दचित्र मननीय आहे. रंजकता मात्र यांत अभावानेंच *जाणवते. कारण संवादाच्या जोडीला स्थलकालाची व व्यक्तिस्वभावाची थोडीबहुत* वर्णनें असल्याशिवाय कादंबरी बांधेसूद होत नाहीं; पण त्या वर्णनांना या कादंबरींत फारसा प्रवेशच नाहीं! शालेय जीवनाच्या छटा, यांत चांगल्यातऱ्हेनें स्पष्ट झाल्या *आहेत. श्री' बोकीलांचें 'लाडका राजा' हेंहि या वर्गांतलें चित्र. श्रीमंतांच्या घरांत* लाडामुळेंच मुलांच्या मनोविकसनाला कसें विकृत स्वरूप येऊं लागते. यासंबंधींचा हा शब्दलेख मोठ्या विनोदी व खुसखुशीत भाषेंत श्री. बोकीलांनीं रेखला आहे, व *त्यावरील उपायहि छानदार सुचविला आहे. राजाचें शब्दचित्र बरेंच वस्तुनिष्ठ वाटतें.*

'बालबहिर्जी' ही गुपित सारखीच, लहान मुलाच्या धाडसावर आधारित अशी रंजनपर कादंबरी आहे. कै. पिरोज आनंदकरांनीं ही लिहिली आहे व त्यांत मनोविश्लेषणाचे सुरेख नमुने आढळतात. मुख्य म्हणजे एका अगदीं गरीब चांभाराचा अशिक्षित मुलगा याचा नायक दाखविला आहे, हें विशेष उल्लेखनीय आहे. पण कथेच्या मानानें यांत पात्रें फार आहेत. डोक्यांत अगदीं गोंधळ माजतो जणुं! त्यामुळें रचना सुसूत्र व आटपसर वाटत नाहीं. 'मंगलवाडी' ही एका कुमाराचीच कथा 'बलवंत' यांनीं लिहिलेली आहे. शालेय वातावरण व विचारी शिक्षक याच्या सहवासांत फुलणारें जीवन, बोर्डिंगांत राहण्यानें येणारे मुलांचे वृत्तिविशेष, वाईट

सवयींचा स्पर्श व त्यातून सुटका इत्यादि कित्येक विचारणीय बाबती यातल्या 'सुभाष' नावाच्या बालनायकाच्या हकिकतीतून आल्या आहेत, पण कादंबरीत जी विविधपात्री गुंफण असते व भिन्न भिन्न प्रसंगातून व्यक्त होणारें उत्कृष्ट व चित्तवेधक कथानक असतें, त्याचा यात अभावच जाणवतो. कादंबरीला कथानकाची सुतासारखी सरळ रेषा मानवत नाही, तेथें वळणें, वाकणें नागमोडच हवी असते.

श्री. यदुनाथ थत्ते यांच्या 'वाळवटातील झरे' या कादंबरीचाहि या प्रांतात अवश्य उल्लेख करायला हवा. कादंबरींत सर्व जातीच्या मुलांचे एक नमुनेदार विद्यालय एका ध्येयवादी पारशी गृहस्थानें चालविलें आहे व सर्व मुलें पाळणीच्या सकटानें एकत्र आलीं आहेत असें अगदीं वेगळ्या वाणाचें कथासूत्र आहे. नाविन्यामुळें कथानकाचें वैशिष्ट्य मनात राहतेंच, पण आजच्या राजकीय जीवनावर आधारलेल्या व मुद्दाम लिहिलेल्या बालकादंबऱ्या जवळजवळ नाहींतच त्याची सुरवात जणु या कादंबरीनें केल्यासारखें वाटतें. अर्थातच यात सर्वोदयवादाचा प्रचार आहे व गुरूजींच्या लेखनाची अत्यंत दाट छाप यावर दिसते, हें मान्य केलें पाहिजे

स्वतंत्र सामाजिक बालकादंबरीचा हा विभाग असा मर्यादित आहे. उलट अधिकाऱ्यांनें लिहिल्या जातात त्या सामाजिक व व्यक्तिदर्शनात्मक कादंबऱ्या. त्यात मात्र पुष्कळच समृद्धि आढळते, लेखकाची व पुस्तकाचीहि.

पण त्या मानानें या क्षेत्रात एवढी कमतरता का असावी, हा एक विचारणीय प्रश्न ठरेल. समाजात नित्य अनेक घटना घडतात; अगदीं कादंबरीला लाजवतील अशा लोकविलक्षणहि असतात त्या ! व्यवहारात अनेक ठसठशीत व्यक्ति भेटतात व स्वभाव विशेषांचे तर अनंत नमुने आढळतात. मग, मोठ्यासाठीं सामाजिक कादंबऱ्या वैपुल्यानें निर्माण होत असताना कुमारासाठीं मात्र त्यातून कथानकें पुढ्र नयेत, असें का असावें ? दोन चार कारणें दृष्टीसमोर स्पष्ट होतात. एकतर सर्वसाधारण जनतेसाठीं ज्या कादंबऱ्या लिहिल्या जातात, त्याची बैठक पुष्कळदा प्रीतीचीच असते-जिची कुमाराना अजून ओळखच व्हावयाची असते अशी-ते विवाहपूर्व वा विवाहबाह्य प्रेम, प्रेमाचा प्रसिद्ध त्रिकोन, त्यामुळें होणारीं मानसिक स्थित्यंतरें इत्यादि सारेंच चित्रण मुलासाठीं उपयुक्त ठरणारें नसतें. दुसरें म्हणजे सामाजिक गहन समस्या व त्यावरील उपाय यांचेंहि त्याना वावडेंच तिसरें म्हणजे मोठ्या कादंबरीत वाटेल तेवढा विस्तार असतो. वर्णनक्षेत्र अमर्याद असतें तेवढी व्याप्ति कुमारकादंबरीला मंजूर नसते. थोडक्यात सामाजिक कादंबरी लिहिणें व तीहि चटकदार व बालसुलभ लिहिणें हें खरोखरच कठीण आहे. पण ही दुर्मिळता प्रयत्नानें दूर होणारी आहे. आणि तें साहित्यिकाना अशक्य थोडेंच आहे ?

## संक्षिप्त कादंबऱ्या

स्वतंत्र सामाजिक बालकादंबरीच्या बरोबरीनें आज आणखी कांहीं कादंबऱ्या बालप्रांतांत येत आहेत. त्या मूळ मोठ्या कादंबऱ्यांच्या संक्षिप्तावृत्तीच. यांत कै. हरिभाऊची 'मी,' कै. सानेगुरुजींची 'तीन मुलें,' प्रा. फडक्यांची 'प्रवासी,' श्री. माडखोलकरांची 'मुक्तात्मा,' अशीं बरीच ठळक नांवें दिसतात. 'मी' ही कादंबरी चारशें साडेचारशें पृष्टांची एवढी मोठीं कादंबरी बालवाचकांना झेपणारी नव्हे. तेवढें मनस्वास्थ्य व चिकाटी कुमाराना कोठून असणार? त्यासाठीं ही सुटसुटीत रूपांतरें केलीं जातात. 'मी'चें रूपांतर अवघ्या १३० पृष्टांत करण्यांत आलें आहे. मोठ्यांच्या अनेकानेक कादंबऱ्यांचें असें संक्षिप्तीकरण झालें तर हाहि विभाग संपन्न होईल. मुलांना थोर वाङ्मयकृर्तीचा परिचय कुमारजीवनांतच घडेल, हें सत्य कोणीहि मान्य करील. परंतु याबरोबरच कांहीं अनिष्ट गोष्टीहि चोरपावलांनीं येत आहेत त्याचा विचार व्हावयास नको कां?

जाणत्या मुलासाठीं संक्षेपरूपानें पुस्तकें प्रसिद्ध करण्याची ही जुनी प्रथा आजकाल चांगलीच वर्धित होत आहे व त्यामुळेंच या नव्या प्रथेतील गुणासारखेच तिच्या दोषांकडेहि लक्ष देणें अवश्य वाटतें. ऐतिहासिक संक्षिप्त कादंबऱ्यांचा विचार आपण पाहिलाच. सामाजिक कादंबऱ्यांसंबंधींहि योग्यायोग्यतेची पारख अशाच चिकित्सेनें होणें अगत्याचें वाटतें. कुमारासाठीं स्वतंत्र सामाजिक कादंबऱ्या लिहिणें कितीतरी त्रासाचे व त्याचमुळें त्याची संख्या अल्प दिसते! त्यामानानें नाणावलेल्या लेखकांच्या मोठ्या सर्वजनांसाठीं लिहिलेल्या कादंबऱ्याचाच संक्षेप करून बालकादंबरी तयार करणें सोपें वा सुलभ असल्यानेंच की काय, अनेक मोठ्या नामवंत कादंबऱ्यांचें संक्षेप आज बालसाहित्यांत व कुमारवाचनात नवें दालन खुलें करताना दिसतात. प्रथा मुळींच दोषास्पद नव्हे, फक्त कोणत्या कादंबरीचें संक्षेप करावयाचे व ते कोठल्या प्रकारें करावयाचे याबद्दलच नीट काळजी घेणें जरूर भासतें. हें ज्या चतुर संक्षेपकाला साधलें त्याच्या कादंबऱ्या (संक्षिप्त) आज कुमारमनांत अढळपद घेऊन बसल्या आहेत. प्रो. फडके यांची 'प्रवासी' ही दीर्घ कादंबरी मुलासाठीं संक्षिप्त स्वरूपात लिहून अनंतराव कुळकर्णी यांनीं प्रसिद्ध केलेली आहे. मूळ कादंबरींत कथानायकाच्या स्वभाव चित्रणाला उठाव देण्यासाठीं चंचला नांवाच्या एका स्त्रीच्या जीवनाचें बरेंच वर्णन आहे. तें कुमारदृष्टीनें अनवश्यक वाटून संक्षिप्तावृत्तींत समूळ गाळण्यांतच आलें आहे व तरीहि कथानायक 'राजा'ची स्वभावरेखा कुठेंहि उणी वाटत नाहीं. उपकथानकांचा पसारा मोठमोठ्या कादंबऱ्यांतून असतो. त्याच्या बजावाकीनें अगर केवळ उद्देगानें काम चालत असल्यास कुमारकादंबरींत ही अनुकरणीय पद्धत ठरावी!

संक्षितीकरणाच्या या क्षेत्रात मुळातील वर्णनसुंदरता सभाळली गेल्याचीहि कांनी स्तुत्य उदाहरणें दृष्टीस पडतील का, तरोगरच आनंद वाटतो. श्री. र. वा. दिघे याच्या 'सराई' या सुरेख कादंबरीची संक्षिप्त आवृत्ति झाली आहे, पण त्यात सराईच्या पुढील निसर्गमनोहर वर्णनाला कात्रीचें पातें लागून जखम झालेली नाही!

"सह्याद्रीच्या हिरव्या गोव्यातील निसर्गाचा सचित्र ग्रंथ चाळताना कोणाला कंटाळा येईल? गवतात त्याला सप्ताची वीण दिसे, तर पायाखालून मातीच्या रंगाच्या लाव्ह्या भुर्रर् करून आवाज करीत उडत व त्याच्या विचाराची साखळी तोडीत. रानातील निरनिराळया पक्ष्याची मंजुळ साद ऐकताना त्याचा जीव वेडा होई. कुठें मोर ओरडत, कुठें तरोनी आडवी जात, कीर, राने, हरेळ वडाच्या झाडावर गर्दी करताना दिसत." (सराई–संक्षिप्तवृत्ति–पृष्ठ १३)

पण अशी उदाहरणें थोडीशीच.

संक्षितीकरण ही निस्संशय एक चांगली पद्धति बालकादंबरीवाङ्मयात येत आहे, ती मोठी स्वागतार्ह आहे. पण त्यातूनहि मागें ऐतिहासिक विभागात दिलेल्या भाषेप्रमाणें आणखीहि कांही बालदृष्टीनें जड वाटणाऱ्या गोष्टी आढळतात. लेखक मोठी कादंबरी लिहिताना सर्व समाजामाठी लिहितो. त्यात प्रौढानाच रुचणारे कितीक विषय येतात तात्त्विक मीमांसा, राजकारणाचे प्रवाह, समाजातील दोषाबद्दल विवेचन (आणि तेंही व्याख्यानवजा), प्रेमप्रकरणें, असे पुष्कळच विषय असतात. या अशा कादंबऱ्या संक्षिप्त करायच्या ठरविल्या तर या समग्र विवेचनास तरी लहान मुलांच्या कादंबरीत जागा नसल्याचा नियम लावायला हवा, पण तसें होत नाही 'सुशिलेचा देव' हें एक पुस्तक पहा. ही कादंबरी मूळ ख्यातनाम लेखक कै. वामन मल्हार जोशी यानीं लिहिलेली तत्त्वज्ञानपूर्ण म्हणून गाजलेली व विचारवंतानीं गौरवलेली, तरीहि हिचें संक्षिप्तरूप बालप्रिय वा बालोचित ठरलें नाहीं! का तसें? खालील परिच्छेद त्यावर थोडा प्रकाश पाडील. हें भाषण नायिकेचें आहे.

"या 'स्व' चा अर्थ व्यापक केला तर सबध जग स्वकीय वाटू लागेल. व विश्व हें आपलें कुटुंब असें मानल्यावर 'स्वार्थ' फारसा घातुक होणार नाहीं स्वार्थ घातुक होतो याचें एक कारण 'स्व' चा अर्थ मर्यादित करणें. तें कारण वरीलप्रमाणें दूर झालें आणि अर्थ शब्दाचाहि, पैसा मालमत्ता असा जो मर्यादित व चुकीचा अर्थ करतात तो बदलून ज्याच्या योगानें मनाला खरा सात्त्विक आनंद होतो वा होईल, जें मनाला खरी प्रसन्नता देईल, जें अंतरात्म्याला शांति देईल तो माझा अर्थ, असा जर अर्थ रूढ होईल तर स्वार्थांत कांहीं विशेष किल्मिष राहणार नाहीं."

हा ' स्व'चा अर्थ वा अर्थाचा ' संकल्प ' कुमारांना राहूंच द्या, पण थोरांना तरी रंजक वाटेल काय ? असलीं नीरस व्याख्यानें—तींहि तात्त्विक रुक्ष चर्चेचीं—कुमार कादंबरींत येऊं लागलीं तर कुमारवाचक तिथें थाऱ्यालाहि उभे राहणें कठीण. यशस्वी कादंबरीचें खरें अधिष्ठान लालित्य व रंजन यावर. हा सिद्धांत मोठ्या इतकाच बालकादंबरीलाहि लागू आहे. संक्षिप्तीकरणांतहि ही जोखीम जरूर येतेच. एवढेंच नव्हे, तर अधिकच. मूळ संक्षेपाच्या कादंबरीची निवड किती कसोटीनें केली पाहिजे याची साक्ष ह्या कादंबरीवाचनानें चटकन पटेल.

स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या ' काळें पाणी ' या कादंबरींतील वर्णनें अंगावर शहारे उठवणाऱ्या दुष्टतेचीं व क्रूरतेची आहेत, तशीं तीं आत्यंतिक शारिरीक हालांची आहेत. खरे म्हटलें तर निजलेलीं मनें जागीं होऊन देशप्रीतीचे अर्घ्य देऊं लागतील, एवढें या तेजस्वी कादंबरीचें सामर्थ्य, हें मला विनातक्रार मान्य; पण हें तेज बालांना—कुमाराना झेपणारें नव्हे; तसें तें मानलेंहि जाऊं नये, एवढेंच म्हणणें. चिमण्या हातांना फार मोठें वजन पेलत नाहीं.

संक्षिप्तीकरणाच्या या क्षेत्रांत कुमारवाचकासाठीं आज ऐतिहासिक, अनुवादित, सामाजिक, राजकीय अशा अनेक तऱ्हेच्या प्रसिद्ध कादंबऱ्या निवडल्या जात आहेत. खुद्द लेखकांनींच आपापल्या मोठ्या कादंबऱ्यांचे संक्षेप करायचें ठरविलें तर ते अधिक काळजीपूर्वक केले जातील असें वाटतें. पण जुन्या कादंबऱ्यांचे लेखकच दिवंगत असल्यानें तें शक्य नाहीं व आपल्या नव्या कादंबऱ्यांचे संक्षेप केवळ कुमारांसाठीं करून देणारे साक्षेपी लेखक आजहि सापडणें मुष्कीलच. त्यामुळें कादंबरी मूळची एका लेखकाची व संक्षेपक वेगळा अशी दुही अनेक संक्षिप्त बालकादंबऱ्यांबाबत दिसते.

आणि त्यामुळेंच आज या संक्षेपक लेखकांवरची जोखीम एकप्रकारें वाढली आहे. मूळ लेखनाचा आशय व शैली याना तर धक्का लागता कामाचा नये; आणि कंटाळवाणा पाल्हाळ व अनवश्यक विवेचनें यांचा निष्ठुरपणें सर्वस्वी संक्षेप केला पाहिजे. इतकें करूनहि ही बालकादंबरी आजच्या चोखंदळ कुमारवाचकाला रुचेल व पचेल अशी आकर्षक व्हायला हवी ! हें काम सोपें नाहीं व प्रत्येकाला साधणारेंहि नव्हे !

खरें म्हटलें तर संक्षिप्तीकरण झालेल्या सर्वच कादंबऱ्यांना कुमारवाङ्मय ही संज्ञा लावूं नये असें माझें स्पष्ट मत आहे. एकाद्या व्यक्तीचा फोटो मोठ्यावरून लहान केला तर तो आकारानें लहान, परंतु बाल्यकालचा ठरत नाहीं. संक्षिप्तीकरणचा मूळचा हेतू कुमारांना वाचनोन्मुख करण्याचा नसून मोठ्यांना या धावपळींच्या काळांत पांचसहाशें पृष्ठांच्या कादंबऱ्या वाचायला वेळ नसतो: आणि त्यामुळेंच कीं;

काय पूर्वीच्या मोठ्या कादम्बऱ्यांचें संक्षितिकरण करण्यात येत असावें असें दिसतें दुसराहि एक तोटा आहे. मोठ्या कादम्बऱ्यात किती व्यक्ति, किती प्रसग. त्या सर्वांना छोट्या पुस्तकात आणलें तर व्यक्तिचित्रण, सुदर वर्णनें याना जागा कोठली ! मोठ्या हॉलमधील पगत चिमण्या खोलीत आणल्यावर जशी पात्राची गर्दी दिसते, तशी गर्दी दीडशें पृष्ठात शेंकडो व्यक्तींची होते व पुस्तकाचें मूळ सौंदर्य उणावतें.

किशोरसाहित्यात अशा प्रकारें कित्येक मोठ्या कादम्बऱ्याचा समावेश झालेला पाहिला कीं वयात आलेल्या तरुण मुलीनें परकर-पोल्कें नेसून छोट्या मुलींत खेळायला मिसळल्यासारखें वाटतें. परिवेष कुमारजीवनाचा, परतु अतरग यौवनाचें. त्यामुळें जणु बालिशतेच्या ओढणींतून प्रौढ वाङ्मयच डोकावून पाहत आहे असा भास झाल्यावाचून राहत नाही आणि हा दोष मूळ लेखकाचा थोडाच म्हणता येणार आहे ? तो सक्षितीकरण करणाऱ्याचाच म्हणावा लागेल प्रौढ वाचकासाठीं कोठलाहि विषय लेखनास उपयुक्त ठरू शकतो त्यानी सारें जग पाहिलेलें, अनुभविलेलें, लेखनविषय कोठलाहि असला तरी रसग्रहण करण्यास मोठीं माणसें समर्थ असतात, तशी किशोराची ग्रहणक्षमता असणें दुरापास्तच. म्हणूनच सर्वसामान्य प्रौढ वाचकासाठीच लिहिल्या गेलेल्या कादम्बऱ्याचें किशोरासाठीं सक्षितीकरण करताना लेखकाला योजकता हवी, एवढेंच नव्हे तर सुयोग्य निवड करण्याचा दृष्टिकोनहि अवश्य हवा असा आग्रह धरावासा वाटतो

असा हा बालकादबरी क्षेत्राचा व्याप वाढत चाललेला आहे. बालासाठीं कुमारासाठी कादम्बऱ्या नाहीतच असें १५-२० वर्षांपूर्वी म्हटलें जाई व त्याचा उल्लेख वारवार साहित्य समालोचनातूनहि आलेला असे स्वत. अशा पुस्तकाचे लेखकहि निवेदनात ऊनून ही गोष्ट आवर्जून सागतात. खरें म्हणजे ही तक्रार आज तरी करायला नको, एवढी बालकादबऱ्याची निर्मिती आज होत आहे. इतकेंच नव्हे, तर या अमाप वाढीला नेटकेपणा, उपयुक्तता आणि औचित्यमर्यादा याची चौकट आखली पाहिजे, असें वाटण्याइतक्या बालकादम्बऱ्या आज बहुसख्येनें प्रकाशित होऊ लागल्या आहेत. यासबधी आखणी, पाहणी व मार्गदर्शन याची जरूर आवश्यकता भासते दरवर्षी अधिकृत बालसाहित्यप्रेमी विद्वानांनी प्रसिद्ध कादबरी वाङ्मयाचा आढावा घेऊन सरसनीरसतेची पारख करायचें ठरविलें तरच ही सुधारणा घडू शकेल, आणि अशी व्यवस्था करणें प्रमाणभूत साहित्यसस्थाना अशक्यप्रायच आहे असें मुळींच नाहीं. ●●●

# चरित्रें

कथा, कादंबरी, नाट्य, काव्य या ललित वाङ्मयप्रकारांची लोकप्रियता चरित्रांच्या वाट्यास बहुधा येत नाहीं. त्याचें स्वरूप गंभीर, वृत्ति शिक्षकाची आणि भाषा प्रौढ अनुभविकाची असते. बालसृष्टीला हें सारेंच उपायन जड अभ्यासासारखें वाटावें हें साहजिकच आहे. मुलें सहसा चरित्रांच्या वाटेला जात नाहींत असें दिसतें.

पण हें स्वभावसूत्र ओळखूनच कीं काय आजकाल कुमाराकरितां जीं चरित्रें लिहिलीं जातात त्यांत आकर्षक प्रसंगदर्शन, खुसखुशीत संवाद व वेधक कथनशैली याचा वापर सहेतुक करण्यांत आलेला दिसतो. आणि हे सर्व ललितसाहित्याचेच लेखनगुण असल्यानें चरित्रकथानूनहि अलिकडे रंजकता व चित्तवेधकता यांचा दुर्मिळ संगम आढळूं लागला आहे. या छोट्या चरित्र पुस्तकांची संख्या आज पूर्वीहून बरीच वर्धित झाली आहे व त्यातल्या कांहीं पुस्तकांना तर सातसात आवृत्त्या निघण्याचेंहि भाग्य लाभलें आहे. हा सारा चरित्रानें आपलें स्वरूप बालाकर्षक व रंजनप्रधान केल्याचाच परिणाम नव्हे काय ?

कथाकादंबरीप्रमाणें, नाटकांप्रमाणें चरित्रातहि पौराणिक, ऐतिहासिक व सामाजिक हे कालभेद दिसतातच. राष्ट्रीय भावना देशांत जागृत झाल्यानंतर देशभक्त व राष्ट्रहितैषी व्यक्तींचीं चरित्रचित्रेंहि यांतून नव्या तेजानें प्रकटूं लागलीं आहेत. इतिहास घडवणाऱ्या व्यक्तींचीं चरित्रें म्हणजे देशाभिमान, संस्कृति, वीरश्री, चारित्र्य इत्यादि गुणांचें दर्शन घडविणारे चित्रपटच. चरित्रांचें स्थान वाङ्मयांत हें असें मानाचें आहे व बालसाहित्यानेंहि ही सन्मान्य परंपरा कायमच राखलेली दिसेल.

मागल्या शतकांत कै. वि. कों. ओकांनी बरींच चरित्रें लिहिलीं होतीं. पण त्यांतलीं कित्येक लॉर्ड कॉर्नवॉलिस, सर जॉन माल्कम अशा परकीय पुरुषांचीं होतीं;

आणि तरीहि अशा एका पुस्तकास कै. ओकानी ' महन्मणिमाला ' असें नाव द्यावें हें आश्चर्यच. पण तो काळच मुळीं पाश्चात्य संस्करणानें भारलेल्या व्यक्तींचाच होता. त्यात केवळ ओकानाच दूषण देणें अन्याय्यकारक ठरेल. ओकानी इतरहि काही चरित्रपुस्तकें लिहिलीं व त्यातील ' हिंदुस्थानातील योद्ध्याच्या थोरवीच्या गोष्टी ', ' हिंदुस्थानकथारस ' वगैरे पुस्तकें ग्रन्थापैकीं होतीं.

त्यानतर विसाव्या शतकाच्या आरभीं म्हणजे चाळीस–पन्नास वर्षांपूर्वीहि या प्रथेला नवा उजळा देण्याचें काहीं उल्लेखनीय प्रयत्न झाले. त्यात कै. वासुदेव गोविंद आपटे, कै. कृष्णाजी गोविंद किनरे व श्री. के. नाईक अशा काहीं लेखकाची कामगिरी नमूद करण्याजोगी आहे. श्री. के. नाईक यानी इ. स. १९१४ मध्यें ' मुलींच्या काहीं गोष्टी ' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. म्हणायच्या गोष्टी, पण हीं छोटीं छोटीं चरित्रेंच आहेत व ओकाच्याच पावलावर पाऊल ठेवून लेखकानें यातील बऱ्याच चरित्रनायिका पाश्चात्य समाजातीलच वर्णिल्या आहेत. फ्लॉरेन्स नाइटिंगेल, व्हिक्टोरिया, मेरी इत्यादि अनेक स्त्रीचरित्रांबरोबर डॉ. आनदीबाई जोशी, अहिल्यादेवी इत्यादि मराठीहि स्त्रिया चारदोन आहेत. भाषा बरी आहे. याच मालेंत नसणारे लेखक सिद्ध रामदत्त यांचें ' बालादर्श ' हें १९२९ मध्यें प्रसिद्ध झालेलें पुस्तक. यात मुलींकरता वृंदा, दमयंती, तारामती वगैरे दहा स्त्रियांच्या चरित्रकथा आहेत व त्याच्या संपूर्ण भारतीयत्वानें त्या ' मुलींच्या काहीं गोष्टी ' याहून सरस वाटतात. कृष्णाजी गो किनरे यानीं मुलींची द्रौपदी, मुलींची सीता, इत्यादि पुस्तकें खास मुलींसाठी लिहिलीं. मात्र चरित्रकथा बालवयीन वाचकासाठीं असल्या तरी त्या सुटसुटीत रंजक व्हव्यात, पण ही दृष्टि ठेवून तीं पुस्तकें लिहिलीं असावींत असें दिसत नाहीं. नुसत्या उपदेशाचा कडू कषायच जर वारवार त्यातून अनुभवास आला तर मुलें व मुली वाईट तोंड करून पुस्तक बाजूला ठेवतील, या बालस्वभावाच्या प्रवृत्तीकडे लक्ष न पुरवल्यानें हीं चरित्रें फारच नीरस झालीं आहेत. पुढील मजकूराची भाषा पाहावी. राम वनवासास निघाला आहे व सीतेस बरोबर येऊं नये असें त्याचे म्हणणें आहे. या प्रसगीं सीता म्हणते —

" आपल्याला असें बोलणें मुळींच शोभत नाहीं भार्या हीच कायती पतीच्या भाग्याची वाटेकरीण आहे. तेव्हा आपल्या वनवासाची मी हक्कानें वाटेकरीण आहे. पाहा, या लोकीं किंवा परलोकीं स्त्रियाना पतीवाचून गती नाहीं. म्हणून नाथ, जर आपण वनात जात असाल तर मी आपल्यापुढें होतें. "( पृष्ठ ४८ मुलींची सीता. )

उलट याच पार्श्वभूमीवर आपट्यानी लिहिलेलें ' भारतकन्या ' हें चरित्रकथाचें पुस्तक किती सुटसुटीत व सोप्या भाषेनें रंजक झालेलें आहे ! हीं दोन्हीं चरित्र कथाचीं पुस्तकें १९२८–२९ च्या सुमारास प्रसिद्ध झालेलीं आहेत.

यानंतर आणखी कांहीं चरित्रें–छोटीं मोठीं–प्रसिद्ध झालीं. त्यांत पौराणिक व सामाजिक असे दोन्ही प्रकार होते. पुराणकालानें फार मोठी सामुग्री या चरित्रांना पुरविलेली आहे. आपले धर्मग्रंथ किती प्रचंड! त्यांत हजारों व्यक्तित्वसंपन्न स्त्रीपुरुषांचीं जीवनचित्रें मुलांना आजहि प्रिय वाटावीं अशा विविध रंगीं आणि गुणांनीं तीं समृद्ध आहेत. त्यांतील चरित्रकथांचा बालविभाग के. वा. गो. आपटे यांनीं यशस्वी रीतीनें प्रथम हाताळलेला दिसतो. त्यांनीं बालरामायण, बालभारत व बालभागवत हीं अत्यंत सोपीं पुस्तकें लिहिली, आणि मग त्यानंतर राम व कृष्ण, अर्जुन, भीम, द्रौपदी वगैरेंवर अनेकानेक छोटीं चरित्रें लिहिलीं गेलीं. अवतारी पुरुषस्त्रियांची आज तर इतकी चरित्रें प्रसिद्ध होत आहेत कीं, त्यांची मोजदाद अशक्यप्रायच ठरेल!

या पौराणिक महापुरुषांच्या चरित्रांच्या आलेखांतूनच आणखी एक प्रथा नव्यानेंच अस्तित्वांत आली. ती म्हणजे रामायण, भारत व भागवत हीं महाकाव्यें रचणाऱ्या कवींचीं चरित्रेंहि रसाळपणें वर्णित होऊं लागलीं. आद्यकवि वाल्मीकि, व्यास महर्षी, नारदऋषि अशीं त्यांतलीं प्रमुख नांवें सांगतां येतील. ग. म. वैद्य यांचे 'अकरा महर्षी' व भा. श्री. परांजपे यांचें 'नऊनाथ' हीं पुस्तकें या दृष्टीनें नमुनेदार ठरतील. वैद्यांचे हे अकरा महर्षी कांहीं विशिष्ट गुणसमुच्चयानें मंडित आहेत. नारद महर्षी वेदान्त योग व संगीताचे आचार्य, तर व्यासमुनि महाभारताचे निर्माते, आणि शुकमुनि भागवताचे निरूपण करणारे. अशा निवडक महान् व्यक्तींचीं हीं जीवनचित्रें. श्री. गो. नी. दांडेकर यांचें 'प्राचीन पुरुषोत्तम' हें पुस्तक या ऋषिमुनींची कथात्मक माहिती देणारें आहे. त्यांत स्मृतिकार मनु, काश्यप, तत्त्वज्ञानी वसिष्ठ, आचार्य विश्वामित्र इत्यादि व्यक्तींचे चरित्रलेख रंजक पद्धतीनें दिले आहेत.

हे चरित्रलेख गोष्टीवजाच असल्यामुळें बालांना सहजी रुचणारेच झाले आहेत. दोनचार पानांच्या या चरित्रांत व्यक्तिजीवनालाच अधिक भावसाज चढविलेला असल्यानें यांत रंजकता निर्माण झाली आहे व याच पद्धतीवर पुराणांतील व्यक्तिमहात्म्याला व दैवत महिम्याला कथारूप दिलेली अनेक पुस्तकें आज बालवाङ्मयांत नव्यानें आपलें स्थान कायम करतांना दिसतील. अवतारी पुरुषांची संख्या पुराणांत वैपुल्यानें आढळते; आणि म्हणूनच राम, कृष्ण, बुद्ध, वामन, विष्णू, शंकर यांच्या कथारूप चरित्रांनीं या विभागांत फार मोठी भर टाकली आहे. श्रीकृष्णचरित्र किती तऱ्हांनीं प्रसिद्ध झालें आहे! 'मुलांचा श्रीकृष्ण,' 'श्रीकृष्णाची कथा' हीं छोट्यांसाठीं लिहिलेलीं पुस्तकें, तर श्रीकृष्णाची आत्मकथा ही आपटे गुरुजींनी अगदीं वेगळ्या दृष्टिकोनांतून कुमारासाठीं लिहिलेली कृष्णकथा आहे. श्रीरामावर देखील थोडी पुस्तकें झालेलीं नाहीत! या प्रत्येक पुस्तकाला

भिन्न कसोटी लावावी लागेल. काहींची भाषा सोपी आहे, अगदीं शैशवयोग्य ठरणारी तर, काहींनीं कुमारजीवनाला पराक्रमाची प्रेरणा दिल्ली दिसेल. अर्थात् यात शिशूना समजण्यायोग्य ' बिनजोडाक्षरी रामकथा'हि दिसेल. तथापि एकदरींत हें उपायन शिशूचें नव्हेच. अनेक कादबऱ्याना सामुग्री पुरवू शकणाऱ्या यातल्या प्रगल्भ चरित्रकथानकाना योग्य वाचक म्हणजे जाणती वाड व कुमारवयीन पिढीच. व याच दृष्टीनें अनेकानी पुराणव्यक्तींची चरित्रें लिहिलेली दिसतात. ना. प. महाजन याची श्रीकृष्णचरित्र, श्रीरामचरित्र, चद्रहासचरित्र इत्यादि चरित्रें छोट्याना उपयुक्त ठरणारी आहेत. कै. ज. र. आजगावकरानीहि सुदामा, ध्रुवचरित्र, राजा हरिश्चद्र, प्रल्हाद इत्यादि छोटी चरित्रें बालासाठी प्रसिद्ध केली आहेत. यात ' दक्षकन्या सती ' हें वा. कृ. भावे यानी लिहिलेले चरित्र वैशिष्ट्यपूर्ण भाषेनें कादंबरीप्रमाणें रजक झालें आहे. पण अशी नावें किती सागणार ? पौराणिक प्रसिद्ध व्यक्तावर इतकी छोटी मोठी चरित्रें लिहिलीं गेली आहेत कीं त्या सर्वांचा स्वतत्र उल्लेख करणेंच अशक्यप्राय आहे.

याबाबत दुसरा एक उपयुक्त दृष्टिकोन नऊनायकर्ते भा. श्री. पराजपे यानीं प्रस्तावनेंत उद्धृत केला आहे तो असा—

" मराठींतील सतचरित्रें, ऐतिहासिक गोष्टी, या दृष्टीनेंच लक्षात घेण्यासारखीं आहेत. पण लिहिणारानी तीं भक्तभागवतासारख्या लोकप्रिय पुराणग्रथाच्या धाटणीवर लिहिली, त्यामुळें त्यात अद्‌भुतता जास्त आणि ऐतिहासिक सत्य कमी असा प्रकार झाला आहे. "

आणि हें खरेंच. चरित्रें सताचीं असला तर त्यात दैवी चमत्कार येतात, पण त्याचेंच भारूड वाढविलें तर सताचे स्वभावसिद्ध गुण त्यात हतप्रभ झाल्यासारखे होतात. पण यातूनहि योग्य तें महत्त्व देऊन अनेक सतचरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत व बालदृष्टीनें त्यातली अनेक चागलींहि ठरणारी आहेत. साधुसत हे प्रत्यक्ष देव अगर राम पुराणपुरुष नसले तरी ऐतिहासिकाच्या पलीकडच्या काळातले, दैवी सामर्थ्याचे व समाजाला शिकवण देणारे लोक, त्याचींहि चरित्रें पौराणिकाच्या काहींशी कक्षेबाहेर, पण इतिहासपूर्ण कालाची ठरतात ऐतिहासिक व पौराणिकाचा दुवा जोडण्याचें काम सत व भक्तमालिकेनें केलेलें दिसून येईल समाजाचा सास्कृतिक व धार्मिक इतिहास या सतानी व भक्तानाच साकार केला, नावारूपाला आणला व तेजस्वी रग त्यात भरले, म्हणून त्याचींहि चरित्रें जनतेला आवडतात, व तींहि आज बालरूपानें बाल्वाङ्मयात प्रवेशलीं आहेत.

अशा वैशिष्ट्यपूर्ण पण महत्त्वपूर्ण कामगिरी केलेल्या व्यक्तींचे रजक शब्दालेख कसे लिहावे याचा एक नवा नमुना प. महादेवशास्त्री जोशी यानी साकार केला आहे.

त्यांनीं अशा दहा पुष्पांची 'कथाकल्पकता' प्रसिद्ध केली. त्यांत बहुतांशीं आहेत चरित्रकथाच, पण कुमार दृष्टीनें उचित असा ज्ञानवर्धनाचा दृष्टिकोन त्यांनी ठेवलेला असल्यानें या मालेंतलें दरेक पुस्तक भिन्नगुणी पण मौलिक ठरणारें आहे. पुष्पदंत, दासो दिगंबर व त्यागराज या तीन पुस्तकांत मिळून भारतांतील प्राचीन पंधरा कवींची व लेखकांची चरित्रात्मक माहिती आली आहे. म्हणावयाचीं चरित्रें, पण गोष्टीएवढ्याच वेधकतेनें तीं सांगितलेलीं; शिवाय केवळ महाराष्ट्रापुरतीच. या कथनाची कक्षा मर्यादित नाहीं ही तर विशेषच उल्लेखनीय बाब ठरेल. त्यांचा एक चरित्रनायक तिरुवल्लुवर हा १८०० वर्षांपूर्वीचा नीतिशास्त्रज्ञ होता तर हब्बा खातून ही चरित्रनायिका काश्मीरमधली कवयित्री. जातीयतेचीं बंधनेंहि यांत नाहींत. नरसीभगत गुजराथी तर जक्कणाचार्य हा कर्नाटकांतील ख्यातनाम.

कथाकल्पलता म्हणजे अशा रसदार व सांस्कृतिक आशयाचें माहेरघर! एका पुष्पांत त्यांनी दैवतकथा रसाळ भाषेत सांगितल्या (मंजुमंगल), तर दुसऱ्यांत क्षेत्रकथा (दिंडीवन, नीलमाधव इ.), आणखी एकांत तीन तामीळ महाकाव्यांच्या कथा (मणिमेखला) आहेत.

या कथनांतून जोशांनी भारतांतील इतर प्रांत व त्यांच्या दैवतकथा, संस्कृति-कथा देण्याचा उपक्रम केल्यानें या कथनाला रसवत्तेइतकाच आंतरभारतीचाहि एक नवा पैलू प्राप्त झाला आहे. भाषेचें सौष्ठव व स्वारस्यहि पाहाण्याजोगें आहेच. उदाहरणार्थ, खालील वर्णन पाहा—

"गुणाढ्याचा आवाज एकदम खालीं आला. त्याच्यांत व्यथा आणि दुःख दाटून आलें. तो आपल्या सरस्वतीला उद्देशून बोलूं लागला— 'माझ्या लडिवाळे बाळे! मी तुला जन्माला घातली, सातवाहन राजा तुझं कौडकौतुक करील म्हणून तुला त्याच्याकडे पाठवलं. पण त्याला तुझी योग्यता कळली नाही. आतां मी तुला अग्निदेवतेच्या स्वाधीन करीत आहे. गाईनं वासराला नेऊन वाघाच्या गुहेंत बांधावं तशी माझी ही निर्दय करणी आहे. पण वेल्हाळे, माझ्यावर रागावूं नकोस.' असें म्हणून भूर्जपत्रांचा तो एक गठ्ठा त्यानें जळत्या आगींत टाकून दिला. एका क्षणांत त्याला अग्निज्वालांनीं लपेटलें व खाऊन टाकलें." (त्यागराज पृष्ठ ६१)

ही शैली स्वतंत्र व कांहींशी प्रौढभाषी असूनहि मुलाना एकदम आवडणारी नाहीं कां? भाषेचा प्रगल्भपणा कोठें कोठें कुमारांच्या आटोक्याबाहेर जातो आहेसें वाटतें, पण एकंदरींत कथनाचें रंजकत्व त्यामुळें कमी होत नाहीं.

अगदीं याच पद्धतीच्या काश्मीरच्या पुराणकालीन इतिहासांतील प्रख्यात व्यक्तींच्या जीवनासंबंधीं माहिती देणाऱ्या चरित्रकथा डॉ. सुमति क्षेत्रमाडे यांनींहि लिहिल्या आहेत. त्यांच्या 'माणिदीप' या पुस्तकांत चंद्रापीड, मातृगुप्त, प्रवरसेन

इत्यादि पूर्वकालातले राजे व त्याच्या गोष्टी सुबोध पद्धतीनें देण्यात आल्या आहेत व त्याहि वाचनीय व उद्बोधक आहेत. श्री. गो. नी. दांडेकरानींहि या चरित्र प्रकारात चांगल्या तऱ्हेची भर घातली आहे. त्यानीं काहीं संतांचींहि जीवनचित्रें रेखली तींहि सरलभाषी व रंजनाबरोबरच उद्बोधन करणारी ठरतील. त्यात संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम, संत एकनाथ, संत रामदास इत्यादि चरित्रें आहेत. अर्थात् त्याना चरित्रें म्हणायचें, पण परिवेष दीर्घकथेचा व कथन अगदीं कथेइतकेंच दर प्रकरणा तून चटकदार झालेलें आहे. बालमनावर सद्गुणसंस्कार करण्याची प्रवृत्ति आणि प्रवचनकारासारखी ऐकणाराला संबोधून रसाळपणें कथा सांगण्याची रसवती दोन्हीमुळें या कथांचें वैशिष्टय उमटून दिसतें. उदाहरणार्थ, एकनाथाची गोष्ट सुरू करण्याची पद्धत पाहा—

"आता दुसरी गोष्ट नरें का! या गोष्टीसारखीच पण येवढी जुनी नाहीं. हिला झालीं तीनशें साडेतीनशें वर्षे. पैठण माहीत आहे का तुम्हाला? कुणाकुणाला माहीत असेल कुणी म्हणतील, हें पैठण नाहीं बुवा आपल्याला माहीत. आमची आई नेसते ती पैठणी आहे माहीत पैठणी का माहीत असेना? त्या पैठण्या पूर्वी जिथें विणल्या जात त्या गावचें नाव पैठण. त्या पैठणचा एकनाथ तर तुम्हापैकीं काहीं जणाना माहीत असेलच. त्या एकनाथाची गोष्ट आहे."

श्री. गो. नी. दांडेकराच्या पुस्तकाचा आणखी एक विशेष म्हणजे मुलाच्या मेळाव्यात बसून त्याना समक्षच एखादी गोष्ट सांगितल्याप्रमाणें बालवाचकाना उद्देशून या कथा सांगण्याची त्याची एक विशिष्ट कथनशैली आहे. या शैलीत बालाशीं अधिक जवळीक असल्याचें प्रत्यतर येतें या सर्वच कथा सरस आहेत असें म्हणता येणार नाहीं हें खरें, पण तसा चांगुलपणाचा निर्वाळा आजच्या एकदर साहित्याबद्दल – आजच्या कथाकादंबरीबद्दल – तरी देता येईल काय? बाजारात सर्वच तऱ्हेचा माल येतो. त्यातून सरसनिरसतेची पारख करणें हें जाणकारांचें काम आहे. या गंगोत्रींतून अनेक प्रवाह निघाले आणि ते महाराष्ट्रभर पसरले. त्यातले काहीं खरोखरच जीवनदायी होते व आहेत, पण काहीं समीक्षकानीं त्या सर्वांनाच एकदम 'बालवाङ्मयाचें' गुणधर्म अभावानेंच जाणवत असल्याचा प्रतिकूल अभिप्राय द्यावा याचें आश्चर्य वाटतें.[१] चांगल्या लेखनाचे अनेक पैलू मला याहि विभागात आढळले आहेत. त्याचें काहींसें दिग्दर्शन वरील विवेचनात आलेलें आहेच. अशा धर्तीच्या छोट्यामोठ्या पुष्कळच चरित्रकथा प्रसिद्ध होऊन बालाना रिझविण्याचें कार्य आज करताना दिसतात. पुराणकालीन महाकवि, धर्मप्रसारक नेते, जसे विख्यात होते तसे इतिहासाच्या प्रारंभकालातहि काही होऊन गेलेच. अलौकिक

---

[१] बालवाङ्मय (देवीदास व गूळ) —पृष्ठ ८६

व्यक्तींचा लाभ दरेक कालखंडाला व्हावा असें जणूं दैवी वरदानच आहेसें दिसतें. या कालांत गुप्तसम्राट्, चाणक्य, विक्रमादित्य, भगवान् बुद्ध, अशोक, हर्ष इत्यादि नामवंत राजकारणी पुरुषांचा उदय झाला. त्याचप्रमाणें कालिदास, भारवी, माघ, दंडी, बाण, भास इत्यादि महाकवि व नाटककारहि आपल्या प्रतिभेनें चमकून गेले. शिवाय पाणिनीसारखे व्याकरणकार, गुणाढ्यासारखे कथाकार, यांच्याहि अपूर्व बुद्धिविलासाचा हाच काल. याला सुवर्णयुग म्हटलें जातें तें उगीच नाहीं! एकेक सोन्याच्या मोलाचीं माणसें यांत कीर्तीनें झळकतांना दिसतील. यांचीहि चरित्रें अनेकांनीं प्रसिद्ध केली. कोणी दोनचार पानांच्या छोट्या छोट्या चरित्रकथा लिहिल्या, तर कोणी विस्तारानें लिहिल्या इतकेंच. त्यांत प्रा. चीरकर यांचें संस्कृत कविश्रेष्ठ व डॉ. के. ना. वाटवे यांचें पंडित कवि हीं पुस्तकें मुलांना खरोखरच आवडणारीं झालीं आहेत.

या दृष्टीनें अनेकानीं सुंदर चरित्रें लिहिलीं आहेत. प्राचीन भारतीय सम्राटांची एक चरित्रमाला लेखक अभिराग यांनीं लिहिली आहे. त्यांतून चंद्रगुप्त मौर्य, अशोक, गुप्तसम्राट, हर्ष इत्यादींच्या जीवनकथा आल्या आहेत. अशीच एक चरित्रमाला के. रा. जोशी नांवाच्या लेखकांनीहि लिहायला घेतली आहे. अर्थात् चरित्र तेंच असलें तरी लेखक भिन्न असल्यामुळें शैलींत फरक तर पडतोच, पण चरित्रलेखातले महत्त्वाचे प्रसंग निवडतांनाहि लेखकांच्या वृत्तीची पृथगात्मकता उठून दिसणें स्वाभाविकच आहे हर्ष चरित्र या दोघांनींहि लिहिलें. त्यांत जोशी यांनीं हर्षाची माता यशोमती पतीबरोबर सती गेल्याचें वर्णन आवेशपूर्णतेनें लिहिलें, तर अभिरागानीं त्याचा निसटता उल्लेखसुद्धां केलेला नाही! एकानें भावनाप्रधान लिहिलें, तर दुसऱ्यानें घटनाप्रधान. अर्थात् हे दोन्ही दृष्टिकोन भिन्न असले तरी सारख्याच तोलामोलाचे आहेत व म्हणून हीं दोन्ही चरित्रें मुलांना सारखींच आवडावीत अशीच आहेत.

एकाच व्यक्तीवर अनेकांनीं चरित्रकथा लिहिली तर त्यांत आणखीहि कांहीं वैशिष्ट्यें उमटून दिसतात. कोणी लेखक प्रौढ भाषेंत कथा 'वर्णनसुंदर' करील, तर कोणी बालांसाठीं मुलायम हितगुजाची भाषा वापरून चरित्र रंजनप्रधान करील. या विधानाची सत्यता बुद्धचरित्राचीं दोन भिन्न पुस्तकें पटवूं शकतील. हें चरित्र काशीनाथ पोतदार व श्री. गोपीनाथ तळवलकर या दोन्ही लेखनकुशल व्यक्तींनीं लिहिलें, व दोन्ही पुस्तकें आपापल्या परीनें आकर्षक झालीं आहेत. श्री. पोतदारांची वर्णनशैली काव्यमय आहे व त्यात नाट्यगुणसुद्धां सांपडतील! गौतमाच्या जन्माचें हें खालिल सुभग वर्णनच त्यांच्या लेखनशैलीची साक्ष देऊं शकेल.

'हिमालयाचीं धवल शिखरें आरशाप्रमाणें लकाकलीं. निर्झरांनीं गिरिकंदरांतून बेहोषपणें उड्या मारल्या. सूर्यकिरणांनीं चराचर सृष्टीवर सोनेरी रंगाचा कुंचला

फिरविला. वृक्षलता डोलूं लागल्या. सृष्टी धनधान्यांनीं व फुलाफळांनीं बहरली. पक्ष्यांनी सामवेदगान सुरू केलें. वाऱ्यानें क्षणांत राजपुत्राच्या जन्माची वार्ता सर्वत्र पोंचविली. मंदिरांतून प्रार्थना सुरू झाल्या. लोकांनीं गुढ्यातोरणें उभारलीं. राजाराणी आणि प्रजाजन या सर्वांच्याच अनेक दिवसांच्या आशाआकांक्षाची पूर्ति झाल्यानें मुलाचें नांव "सिद्धार्थ' ठेवण्यांत आलें. सृष्टी धन्य झाली!" पृष्ट–१–२.

अशी सुरेख वर्णनें चरित्रकथांना खुलवूं लागली तर इतिहासप्रसिद्ध रुक्षता तेथें वासवाऱ्यालासुद्धा उभी राहवयाची नाहीं! आणि श्री. तळवलकर यांच्या 'बुद्धदेवा'नें आणखी एक वेगळा सौंदर्यपैलू स्पष्ट केला आहे. तो म्हणजे सचित्र व सुंदर सजावटीचा! बौद्धधर्म अतिपूर्वेकडेहि पसरलेला. जावा, कंबोज, सयाम, जपान वगैरेंत बुद्धमूर्ति वेगवेगळ्या तऱ्हांच्या आहेत. सिलोनमध्यें हें दर्शन अगदीं आगळ्या प्रकृतीचें व अजंठा शिल्पांत तर त्यांची शतरूप भिन्नभिन्न शिलारेखांनी साकार झालेली. या वेगवेगळ्या शिल्पबुद्धांचीं मनोहर रेखाकनें यांत आलीं आहेत व त्यामुळें सर्व वर्णनाना प्राच्यतेची एक सुसंगत साथ मिळालेली दिसते. यांतील भाषाहि पोतदाराच्या भाषेहून वेगळी, पण तशीच वेधक आहे. जणु एकच रागांतील दोन भिन्न गीतेंच कोणी कलावंतानें गावीं तशी साम्यता यांत दिसते. महापुरुषांबद्दल हजारों कथा नंतर पसरत जातात. त्यातील काहीं कल्पित, कांहीं चमत्कृतिपूर्ण, काहीं सत्याश्रयी असतात. अशा वैविध्यानें नटलेलीं चरित्रें हाहि एक जुन्या वाङ्मयाचा विशेषच मानणें जरूर आहे.

इतिहास हा भूगोलाचा भाऊच म्हटला तरी चालेल. अभ्यास शिकवणारा आणि थोड्या पानात शतकांच्या घटना घाईघाईनें सांगणारा तो एकच पृष्टावर संपूर्ण साम्राज्याचा उदयास्त लीलेनें रेखणारा कालप्रवासी आहे. त्याच्याकडून रंजक विषय भावोन्मेषानें कथन केले जातील ही अपेक्षाच खोटी! वृत्तपत्रीय बातमीदारांचेंच कार्य इतिहास करीत असतो. फक्त कालातीत हकिकती तो एकत्र व थोडक्यांत वृत्तरूपानें देतो एवढाच फरक! पण म्हणून या विषयांतील रंजक सत्यें कमी योग्यतेचीं अगर निष्प्रभ म्हणतां येतील काय?

आणि तसें पाहिलें तर इतिहास हा अभ्यासविषय ठरल्यानेंच मुलांचा नावडता झाला असेल कदाचित्. पण त्यातील सर्वच उपायन कंटाळवाणें असतें असें मुळींच नाहीं! भावशद्बांनीं पूजा बांधावी असे कितीतरी प्रसंग त्यांत असतात. त्यांतील कांहीं व्यक्तिरेखेंत असे तेजस्वी व मोहक रंग भरलेले दिसतात कीं मन स्मिमितच व्हावें! एकेका प्रसिद्ध व्यक्तीचें उभें चरित्र पाहिलें तर त्यांत कथा कादंबरीला लाजवणाऱ्या वैचित्र्यपूर्ण घटनाहि आढळतात. सत्य हेंच कल्पिताहून अनेकदां विचित्र, विलक्षण असतें असें म्हटलें जातें. त्याचा प्रत्यय येतो तो अशा इतिहासांतच. मुलाचा जन्म ही साधीसुधी व घरोघरीं घडणारी गोष्ट!

पण कांहीं वेळां इतिहासाला फिरवून टाकणाऱ्या घडामोडींचें बीज त्यांत लपलेलें असतें. नूरजहान या ख्यातनाम मोंगल सम्राज्ञीचा जन्म काबूल कंदाहारच्या वाटेवर एका झाडाखालीं झाला. तर जिजाबाईला शत्रुसैन्य मागें लागलें असतां वाटेंत शिवनेरीला बाळजन्मासाठीं थांबावें लागलें. सवाई माधवरावाच्या जन्माकडे साऱ्या पेशवाईचे डोळे चातकासारखे लागलेले; त्याचा जन्म हें महाराष्ट्राला केवढें वरदान वाटलें! इतिहासात अशा रोमहर्षक प्रसंगांची वाण नाहीं, व त्यामुळेंच ऐतिहासिक कथाकादंबरीप्रमाणें त्यांतील व्यक्तिचित्रणें व चरित्रेंहि स्फूर्तिप्रद व उद्बोधक ठरूं शकतात. ऐतिहासिक कालांत शिवाजीच्या जन्मकालापासूनचा महाराष्ट्र वीरश्रीनें प्रसन्न दिसतो व त्या कालखंडांतल्या अनेक स्त्री–पुरुषांचीं चरित्रें मुलांना विशेष आवडतात—बहुधा शिवछत्रपतीबद्दलची प्रत्येक महाराष्ट्रीयाला वाटणारी पूज्य भावना व आदर हेंच त्याचें कारण असावें—या सदरात अनेक चरित्रें येतील. राजाशिवाजी हें रियासतकार सरदेसाई यांनीं लिहिलेलें सुंदर शिवचरित्र या सर्वांत अग्रपूजेचा मान घेईल. इतिहास हेंच सर्वस्व मानणाऱ्या या मान्यवर लेखकानें हें खास बालांसाठीं केलेलें लेखन त्यामुळें तें गंभीर असेल, अशी कोणाला शंका येईल तर त्यानें रियासतकारांचें पुढील मनोगत जरा वाचून पहावें—

"शिवाजीच्या मोठेपणांतील पराक्रमाइतकेंच त्याचें बालपणहि मनोरम आहे हें मला या अनुभवानें कळून आलें. आईचें गर्भारपण, या मुलाचा जन्म, बालपण व लहानपणचें शिक्षण हे विषय मी कालानुक्रमानें तपासूं लागलों. तत्संबंधीं जेवढे म्हणून उल्लेख ठिकठिकाणीं विखुरलेले मला आढळले ते सर्व एकत्र पाहतां मला सहज कळून आलें कीं त्याच्या मोठेपणांतील पराक्रमाचें व जीवनाचें मुख्य बीज त्याच्या या प्रथमावस्थेंतच पूर्णपणें सजलें. या दृष्टीनें त्याच्या बालपणचा अभ्यास सर्वांनीं लक्ष्यांत घेण्याजोगा आहे."

अशा सुबोध भाषेंत विशिष्ट दृष्टिकोनानें लिहिलेल्या या इतिहासवजा गोष्टी केवळ बालप्रियच नव्हे तर सर्वप्रिय ठरतील!

म. श्री. दीक्षितांचे जिजामाता हें चरित्र असेंच उद्बोधकच आहे. यांत चरित्रकथा आकर्षक होण्यासाठीं कांहीं प्रसंग कल्पित आहेत व कांहीं पोवाडे, बखरींतले उतारे, कविता इत्यादि उपयोग करून घेतल्यानें चरित्रास लालित्यहि प्राप्त झालें आहे. पेशवेकालीन घडामोडीवर लिहिलेलें 'तीन पिढ्यांचा दाजी' (ना. रा. रानडे) व पहिला पेशवा (दा. पां. रानडे) हींहि चरित्रें छोटीशीं पण सुरेख झालीं आहेत.

पावनखिंडीचा रणझुंझार या मा. द्वा. कारखानीस यांच्या पुस्तकांत बाजी प्रभूचें सुसंगत चरित्रवर्णन आहे. डॉ. चारुशीला गुप्ते यांनीं कांहीं छोटीं चरित्रें

लिहिलें त्यातहि बाजी प्रभु देशपांडे यांचें वर्णन आलें आहे. या सदर्भात चित्रशाळेनें प्रसिद्ध केलेल्या अनेक गोष्टीवजा चरित्रें आहेत. त्यांचा इतिहासकथांत परिचय आलेला आहेच इतिहासांत चरित्र व कथा यांच्या सीमा पुष्कळदा ओळखू न येण्याजोग्या एकमेकांत मिसळलेल्या दिसतात. त्यामुळें ऐतिहासिक गोष्टींतूनहि अनेकदा चरित्रकथाच डोकावून पाहताना दिसतात.

*पण या ऐतिहासिक कालखंडावर एक नजर टाकली तर चटकन् ध्यानी* येणारी एक गोष्ट अशी कीं, शिवचरित्र पूर्वकाल ते पेशवाई अखेरपर्यंतच्या कालात अनेकानेक घडामोडी झाल्या, राज्यपरिवर्तनें झालीं, आणि कित्येक महत्त्वपूर्ण व्यक्तींनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें इतिहास घडविला, पण त्यांचीं चरित्रें असावीं तेवढा नाहींत, अर्थात् प्रौढ वाचकांसाठीं अशा पुष्कळच चरित्रें आहेत, पण छोट्यांसाठीं ती आवर्जून लिहिलेलीं नाहींत.

विजयनगरच्या साम्राज्याचा उदयास्त झाला, बहामनी राज्य आलें व पांच तुकड्यांत भंगलें. दिल्लीवर अनेक यवन स्वाऱ्या झाल्या व रजपूत राजे चमकून गेले या भारतांतून अनेक तेजस्वी नररत्नें उदयाला आलेलीं नाहींत काय ? पण त्यांच्या चरित्रकथांचें बालदालन अजून उपेक्षितच भासत आहे. त्या मानानें पौराणिक काल, सुवर्णयुग आणि अलिकडचा राजकीय व शैक्षणिक सुधारणांचा कालखंड हाच अधिकच समृद्ध भासतो.

पौराणिक व ऐतिहासिकांचा उंबरा ओलांडून कालगणना वर्तमानाच्या प्रांगणांत आल्यावर इतर साहित्यप्रमाणेंच चरित्रदालनांतहि वर्णनाविषय व व्यक्तिमाहात्म्य यांत विविधता व नावीन्य यांचा आढळ व्हावा हें साहजिकच. पूर्वी भक्त, संत, दैवतें, देव यांच्या चरित्रांनीं भक्ति व सद्गुण शिकविलें. ऐतिहासिक चरित्रांनीं स्वाभिमान, वीरश्री, कर्तृत्व यांचा कुमारमनावर योग्य संस्कार केला. या नव्या कालखंडांत जीवनमूल्यें बदललीं. राहणीची घडाडीहि आमूलाग्र बदलली. पाश्चात्य शोध व संशोधन यांनीं ज्ञानकक्षेत विलक्षण वाढ झाली. ही एक विकसित वैज्ञानिक जीवनाची साक्ष, तर राष्ट्रीय मनोवृत्तीचा विलक्षण विकास हें दुसरें भारती यांच्या मानसिक प्रगतीचें मानचिन्ह. अर्थात् या दोन्ही दृष्टींनीं ज्यांनीं आदर्श कार्य केलें, त्यांचीं चरित्रें मुलांपुढें आज आवर्जून येत असावीं यांत नवल नाहीं. या चरित्रदर्शनाला आणखीहि एक स्वतंत्र पैलू आहेच, व तो म्हणजे महाराष्ट्राच्या सामाजिक व शैक्षणिक प्रगतीचाहि आलेख आज नमूद करण्यासारख्या वेगानें जनदृष्टीसमोर मूर्त होत आहे.

या सामाजिक प्रगतीला ज्यांनी मन पूर्वक हातभार लावला, त्यासाठी कष्ट सोसले त्यांचींहि चरित्रें आज बुद्धिवादी कुमाराला नवें कांहीं चैतन्य देऊ शकणारीं

ठरतील. प्रि. आगरकर, चिपळूणकर, ज्योतिबा फुले, रमाबाई रानडे, पंडिता रमाबाई अशांचीं चरित्रें सामाजिक प्रगतीचे टप्पे दर्शवणारीं. स्त्रीदास्यविमोचन व दुष्ट केशवपनादि रूढींवर प्रहार करण्याचें कार्य या विभूतींनीं केलें. ज्योतिबा फुले, रमाबाई, पंडिता रमाबाई यांनीं स्त्रीशिक्षणसंस्था काढल्या. अस्पृश्यतानिवारणार्थ फुल्यांनीं प्रयत्न केले. या सर्वांचीं चरित्रें स्फूर्तिप्रद आहेत, तशीच उद्बोधकहि आहेत. मूळ वर्णनीय व्यक्तिच अशी गुणसमृद्ध असल्यामुळें लेखकांच्याहि भाषाशैलीला नवे पैलू पडून ती चरित्राभोंवतीं सुंदर कोंदणासारखी शोभूं लागावी यांत आश्चर्य नाहीं. श्री. दा. न. शिखरे यांच्या वर्णनशैलीचा एक नमुना पुराणकथांत आलेला आहे तो संवादरूप आहे. पण कथनरूप भाषेचें स्वरूपहि तेवढेच आल्हाददायक भासतें. वा. दा. गोखले यांनीं " मराठी भाषेचे शिवाजी मालाकार चिपळूणकर " यांचेंहि चरित्र असेंच सुटसुटीत व वेधक शैलीनें लिहिलें आहे. याहि बाबतींत चित्रशाळेनें एक अनुकरणीय आदर्श इतर प्रकाशनसंस्थांना घालून दिला आहे. या चित्रशाळेतर्फे जवळजवळ पंचवीस चरित्रपुस्तकांची एक मालाच प्रसिद्ध झाली आहे. त्यांत आजकालच्या अनेक राजकीय व सामाजिक आणि वैज्ञानिक क्षेत्रातल्या व्यक्तींच्या जीवनकथा आलेल्या आहेत. लाला लजपतराय, मदनमोहन मालवीय, वल्लभभाई पटेल, रवींद्रनाथ टागोर, देशबंधू दास, डॉ. राजेंद्रप्रसाद, कस्तुरबा इत्यादि अनेक सुप्रसिद्ध व्यक्तींचीं चरित्रें सुटसुटीत भाषेत व मुलांना रंजक वाटतील अशा प्रकारें सांगण्यांत आलीं आहेत.

अशीच ढवळ्यांतर्फे प्रकाशित झालेली छोटी बारा पुस्तकाची एक माला महाराष्ट्राचे संजीवक म्हणून प्रसिद्ध झाली आहे. लोकमान्य टिळक, न्यायमूर्ति रानडे, काळकर्ते परांजपे, इत्यादींचीं चरित्रें थोडक्यांत व रंजक पद्धतीनें त्यांतून आलेलीं आहेत.

चरित्रविभागांत मूळचीं मोठमोठीं चरित्रें संक्षपानें लिहून विद्यार्थ्यांसाठीं उपयुक्त करण्याची आजकाल नवी पद्धत रूढ होऊं लागली आहे. आत्मवृत्तेंहि याला अपवाद नाहींत. न. चि. केळकर, धोंडो केशव कर्वे, लक्ष्मीबाई टिळक, अशीं नामवंत आत्मवृत्तें मुळांत फार चांगलीं असलीं तरी त्यांची व्याप्ति फार म्हणजे ३००–४००, क्वचित ५०० देखील पृष्ठांइतकी असल्यानें ती विद्यार्थ्यांच्या बुद्धीला व धारणाशक्तीला भारी ठरणारीच. म्हणून अशा प्रचंड चरित्राचा संक्षेप करून तीं पुस्तकें बालवाचनासाठीं सिद्ध केलीं जातात. अशा चरित्रांत 'नरसिंह केळकर' (संक्षेपक–विश्वंभर उद्धवराव वैद्य) व कर्व्यांचें संक्षिप्त आत्मवृत्त यांचा समावेश होतो. पैकीं केळकरांचें आत्मचरित्र 'चरित्रांत' रूपांतरित झालें असून कर्व्यांचें मात्र आत्मचरित्रच आहे व ९–१०–११ या इयत्तांसाठीं त्याचें लेखन आहे. कर्वे थोर समाजसेवक होते, परंतु कुशल लेखक नव्हते; त्यामुळें या चरित्रांत रोमहर्षक

घटना असूनहि त्या रंगवून लिहिलेल्या आढळत नाहींत. तथापि जाणाऱ्या कालाचें एक सुसंगत समाजदर्शन त्यातून घडतें व अनेक थोरांचें लहानपण कसें हालाखीचें असतें याचाहि विद्यार्थ्यांना बोध मिळून त्यातून वर आलेल्या आदर्श व्यक्तीबद्दल आदर उत्पन्न होतो त्या मानानें केळकरांचें चरित्रचित्र अधिक रेखीव व भाषासुंदरतेनें सुशोभित झालेले वाटतें. विद्यार्थ्यांना कर्तृत्वाचें आवाहन सहजी यातून घडतें. शिवाय तें विशेषच उमटूनहि दिसतें. उदाहरणार्थ, पुढील परिच्छेद पाहा–

'सामान्य दर्जाचे विद्यार्थीच बहुसंख्य असतात. केळकरहि आपल्यासारखे सामान्य विद्यार्थी होते. पण ते केवढ्या थोर पदवीला चढले ? अणूएवढ्या बीतून केवढा विस्तीर्ण, असंख्याना छायासुख देणारा, मार्गदर्शक नि आल्हाददायक वटवृक्ष निर्माण झाला ! मग आपल्यालाहि केवढा भविष्यकाळ आहे ! मग चला, पुढें चला, "रुकना तेरा काम नहि" असं जर ते विद्यार्थी म्हणू लागले व केळकरचरित्राचा पुढील भाग वाचण्यास अधीर झाले तर त्यात नवल तें काय ? (पृष्ठ–३०) श्री. यदुनाथ थत्ते यांनी लिहिलेलें सानेगुरूजींचें चरित्रहि असेंच सुरेख झालें आहे

राजकारणी व्यक्तींची चरित्रें या सुधारक व्यक्तींपेक्षा अनेक पटीनें लिहिली जात आहेत. कारण, केव्हाहि समाजसुधारक व्यक्ति दुर्मिळतेनेंच आढळायच्या ! पण राजकारण हा मुळी अनेकांच्या बुद्धीनें खेळला जाणारा बुद्धिबळाचा डाव ! तेथें बहुविधता असल्यास आश्चर्य नाही. या दृष्टीनें लोकमान्य टिळक, महात्मा गांधी यांपासून अद्यावत् राजकीय क्षेत्रातच चमकणारे पं. नेहरू, यशवंतराव चव्हाण इत्यादि अनेकांची चरित्रें लहानमोठ्या स्वरूपात प्रसिद्ध झाली. पैकी गांधी व नेहरू यांची चरित्रें तर सर्व वयाच्या मुलांना उपयुक्त ठरावीं अशी निरनिराळ्या शैलीनें लिहिली गेली आहेत. आज स्वराज्य आलें, पण त्याची पायाभरणी कित्येक वर्षांपासून होत होती व त्यासाठी अनेकांना क्रांतिवीर होऊन कारावास सोसला वा देहार्पणहि केलें. त्या स्वातंत्र्यवीरांच्या हकिकती किती स्फूर्तिप्रद व जीवन किती जळत्या स्वदेशप्रीतीचें ! अशा वीरांच्या जीवनकथाहि मुलांसमोर येत आहेत. यांत तात्या टोपे, मदनलाल धिंग्रा, वासुदेव बळवंत, सावरकर वगैरे अनेक दीप्तिमान किरण चमकतात. या संदर्भांत वि. श्री. जोशी यांचे चाफेकर बंधु यांचें चरित्र प्रसिद्ध झालें होतें. या जोशांना तर स्वदेशप्रेमी व नामवंत देशभक्तांच्या चरित्रांची एक मालाच गुंफली होती. तात्या टोपे, खुदीराम बोस, मदनलाल धिंग्रा, ऊधमसिंग, भगतसिंग ह्यांच्या ह्या जीवनकथा. लेखनांत लालित्याची थोडी उणीव भासते, पण कथनांत जोष आणि स्वाभिमानाचा जो प्रत्यय येतो तो फार मनोज्ञ आहे चरित्रांचें दालन बालसाहित्यप्रांतात यानंतर हळूहळू विकसत चाललें व त्यांत पौराणिक, ऐतिहासिक, राष्ट्रीय, सामाजिक असे स्थूल वर्गीकरणहि दिसू लागलें. आजकाल तर

या सर्वच शाखांना बहर येत असलेला दृष्टीस पडतो. त्यांत मर्दानी झांशीवाली (श्री. विद्याधर गोखले), नेताजी सुभाष (श्री. टिल्लू व श्री. रायकर), स्वातंत्र्यवीर सावरकर (श्री. दा. न. शिखरे), देशबंधु दास, वासुदेव बळवंत (डॉ. चारुशीला गुप्ते) इत्यादि अनेक सुरेख पुस्तकें आहेत.

आधुनिक राष्ट्रपुरुषांचीं किंवा राष्ट्रीय वृत्तीच्या व्यक्तींचीं चरित्रें पुष्कळच लिहिलीं जातात व त्यांतहि लेखनप्रकारांची विविधता दिसून येते. कांहीं मोठ्या व्यक्तींनीं आत्मचरित्रें लिहिलेलीं आहेत. त्यांची मुलांना आवडेल अशी संक्षिप्तरूप आवृत्ति काढली जाते व तीहि उद्बोधक ठरते. 'नेहरूंच्या शब्दांत नेहरू' हें पुस्तक त्या दृष्टीनें घोरपडे व गोधळेकर यांनीं फारच काळजीपूर्वक संक्षिप्त केलें आहे. यांतली भाषा व प्रसंग–त्यांचा सुटसुटीत आकार लक्ष्यांत घेऊन–मुलांना अतिशय आवडतील असेच आहेत. पंडितजींच्या लिखाणांत गांभीर्याबरोबरच थोडासा विनोदहि डोकावतो.

"१९१२ सालीं मी बॅरिस्टर झालों आणि त्याच वर्षाच्या हेमन्तऋतूंत हिंदुस्थानला परत आलों. इंग्लंडांत मी सात वर्षे घालवलीं.

मुंबईच्या धक्क्यावर मी पाय ठेवला तेव्हां आठवते, खारेपणाखेरीज माझ्याजवळ वाखाणण्यासारखें कांहीं नव्हतें, असें मला वाटतें!" (पृष्ठ २७)

तसेंच यांत राजकीय भावनांइतक्याच कौटुंबिक जिव्हाळ्याचेंहि दर्शन वाचकाला घडतें. हे सर्व गुण या संक्षिप्तावृत्तींत उतरलेले दिसतात. उदाहरणार्थ, वडिलांबद्दलचें पुढील वर्णन पाहा—

"आमच्यावर वडिलांचें अतोनात प्रेम होतें. प्रेमाचा बाजार त्यांनीं कधींच भरवला नाहीं. पण त्यांच्या संयमाच्या पापुद्र्याखालीं वात्सल्याचा खोल सांठा भरलेला होता! मला मागाहून समजलें कीं, प्रत्यक्ष अनुभव असावा म्हणून वडिलांनीं जमिनीवर निजूनहि पाहिलें. त्यांना वाटे कीं, तुरुंगांत मला जमिनीवरच निजावें लागणार!" (पृष्ठ–३५)

पं. नेहरू व महात्मा गांधी यांच्याबद्दलच्या बाल व कुमारवयीन मुलांसाठीं चरित्रकथा वैपुल्यानें लिहिल्या गेल्या आहेत. 'आनंदभुवन' ह्या श्री. गोपीनाथ तळवलकरांच्या पुस्तकांत नेहरूंचें राजकीय व वैयक्तिक जीवन सांगोपांग मांडलें आहे व हें पुस्तक कुमारांना आवडेल अशा प्रौढ सुंदर भाषेंत आहे. पं. नेहरूंशीं संबंधित अशा राजकारणाचाहि यांत जो परिचय आला आहे, तो कुमारांचें ज्ञानवर्धन करणारा ठरेल. कै. सानेगुरुजी व श्री. यदुनाथ थत्ते यांनीं लिहिलेलें 'गोष्टीरूप गांधीजी' लहानांनाच नव्हे तर मोठ्यांनाहि आवडेल.

या चरित्रकथाचा आणखी एक विशेष लेखनप्रकार म्हणजे यातल्या विद्यमान व्यक्तींच्या समक्ष भेटी घेऊन त्या त्या व्यक्तींचें आत्मनिवेदन मुलाखतरूप लिहिणें. यात अभिनवता तर आहेच, पण त्या एवढीच आत्मीयताहि प्रकट होणें सहजच असतें. या प्रकारात श्री. य. गो नित्सुरे याच्या 'भारताचे सुपुत्र' या पुस्तकाचा आवर्जून उल्लेख करावासा वाटतो कारण, त्यांनी कुमारमनाची जाणीव ठेवून या मुलाखतीतील बाल्यकाल्च अधिक उठावदारपणें लिहिला आहे. प्रौढावस्थेंत या थोर मडळींच्या कर्तृत्वानें डोळे दिपतात, पण त्या कर्तृत्वाच्याच परिचयानें कुमाराना जरूर तें मार्गदर्शन होतें, म्हणून 'पायाभरणी'च्या म्हणजे कर्तृत्वपूर्वकालाच्या हकिकती त्यांनी अधिक आत्मीयतेनें वर्णिल्या. म. म. दत्तो वामन पोतदार याच्या बालकालातील हें वर्णन पाहा —

" (इतिहासाचार्य) राजवाडे जो रस्ता चालत गेले तोच आपण स्वत साठाहि मुक्रर करावा असें दत्तूनें ठरविलें असावें. राजवाड्याचें लिखाण मननपूर्वक वाचण्याची दत्तूला प्रेरणा होऊ लागली. जा जा तो राजवाड्याचें लिखाण वाचू लागला तों तों हे गृहस्थ आपल्याच मनातले विचार शब्दरूप करीत आहेत असा अनुभव त्याला येऊ लागला. कॉलेज शिक्षणासबधीं राजवाड्याच्या मनात विशेष प्रीति नव्हती दत्तूला हा विचार साहजिकच आवडला. "

चरित्र हें माध्यमच मुळात गभीर प्रकृतीचें. पण तें मुलासाठी देताना त्याचें तें गाभीर्य माहून टाकलें तर तें कथारूपात किंवा मुख्या प्रसगरूपात तेवढे प्रत्ययकारी ठरत नाही. अनेक छोटीं कथाचरित्रें अशी निष्प्रभ व कशीतरी लिहिल्यासारखी दिसतात ! 'ही पाहा मोठीं माणसें' (श. रा देवळे), 'बाल गोपाल कृष्ण' (भालचद्र वैद्य) इत्यादि पुस्तकातून याचे प्रत्यतर येईल. या उलट 'मानवतेचे पुजारी' हे ना. ध. पाटलाचे चरित्रलेख इतके रजक आहेत की त्याच्या अनेक आवृत्त्या निघत आहेत.

असें हें चरित्राचें चरित्र मुलाचें चारित्र्य घडवण्याचें, त्याजपुढें आदर्श ठेवण्याचें, व राष्ट्राबद्दलचा अभिमान सजग करण्याचें कार्य चरित्रें करतात हें तर खरेंच, पण ती रजनप्रधान असतील तर कर्तव्यसदेशाबरोबरच ती इतिहासाची आवडहि उत्पन्न करू शकतील ! वरील विवेचनातील कित्येक चरित्रपुस्तकें या कसोटीस उतरणारीं आहेत.

बालसाहित्याला आणखी एका नव्या लेखनप्रकाराची जोड श्री गोपीनाथ तळवलकर याच्या गृहरत्नें व नवीं गृहरत्नें या पुस्तकानें दिलेली दिसते. ती म्हणजे बालकाची शब्दचित्रें लिहिणें ही होय. मोठ्या माणसाची व्यक्तिचित्रणात्मक पुस्तकें मराठी वाङ्मयाला परिचित आहेतच, परतु केवळ बालाचें शब्दरूप दर्शन घडवण्याचा

हा प्रयत्न अभिनव होता. श्री. तळवलकरांच्या पुस्तकांतून निरनिराळ्या प्रवृत्तीच्या बालकांचीं अशीं रेखीव व रम्य शब्दचित्रें संकलित झालीं आहेत. एकाद्या चित्रकारानें दोनचार बोलक्या रेषांत एकाद्याचें रूपविशेष प्रकट करावें तशीं यांतील मुलें या शब्दांच्या आधारानें जणु दृष्टीसमोर प्रकट होतात असें वाटतें; आणि हीं वर्णनें किती उत्कटतेनें केलीं आहेत, ते खालील वर्णनावरून दिसून येणारें आहे.

" कुठलाहि पोशाख घातला तरी मनमोहनच्या रूपाचा एक निराळाच पैलू तुम्हाला दिसेल. रुपेरी ढगांच्या वेढ्यांत शोभणारा चंद्र, हिरव्या पानांच्या दाटींत तरारलेला मोगरा, काळया खडकांतून उडी घेणारा शुभ्र झरा अशी अनेक सुंदर दृश्यें पाहिल्याचा आनंद तुम्हास होतो. "

आणि हें खालील एका छोट्या बालिकेचेंहि वर्णन तसेंच वत्सलभावनेचें—

" एखादा लहानसा पांढरा संगमरवरी सुंदर देवदूताचा पुतळा सचेतन झाला आणि तुमच्या अंगणात उड्या मारूं लागला तर किती हर्ष होईल ? तुम्हांला मीना इकडे तिकडे बागडत असता अगदी तसाच हर्ष होतो. "

काव्यात्मता हाहि या शब्दचित्राच्या भाषेचा एक विशेष आहे. व त्यानें या वर्णनांना एक निराळी सुरेख झिलई चढलेली दिसते. अशी सुंदर पुस्तकें इतकीं कमी असावीत हीच तक्रार करावीशी वाटते ! अगदीं अशाच प्रकारचें एक पुस्तक कमलाबाई देशपांडे यांनीं 'चिमण्या ' या नांवानें प्रसिद्ध केलें आहे. यांतहि ५ ते १५ वर्षांपर्यंतच्या मुलींची स्वभावचित्रें कांहींशा विस्तारानें रेखली आहेत. मात्र यांत त्यांचें शालेय जीवन व त्या परिसरांतली वागणूक यांचें वर्णन अधिकांश आहे. लिहिण्याची पद्धत गंभीर व सौम्य आहे. पण अशी ही बालजगतातील व्यक्तींची शब्दचित्रात्मक पुस्तकें एक दोनच ! या उपेक्षित पण सुंदर लेखनप्रकाराकडे लेखकांनीं ज्यास्त आस्थापूर्वक लक्ष दिलें पाहिजे.

## मुलांचे छंद व तत्संबंधीं वाङ्मय

शाळेंत अभ्यास करतांकरतांच कित्येक विद्यार्थी इतरहि कलागुण अभ्यासित असतात. कोणाला बांसरी चांगली येते तर कोणी उत्कृष्ट खेळाडू होतो. कोणी विद्यार्थी लेख व काव्य लिहूं लागतात तर कोणी चित्रकला, शिल्प, गायन यात नैपुण्य मिळवून दाखवितात. अभ्यासक्रमाबाहेरील हे जे कलाविषय मुलांच्या जीवनात यावेळीं प्रवेश करतात, त्यामध्यें पुष्कळदां त्यांच्या भावी उत्कर्षाचीं बीजेंहि असतात. आजकाल या छंदविषयांना उत्तेजन देण्याची नव्या शिक्षणपद्धतीतच योजना असल्यामुळें शालेय जीवनांतच मुलांच्या नैसर्गिक कलागुणांना वाव मिळतो व वक्तृत्व, नाट्याभिनय, कागदकाम, यंत्रकाम इत्यादि अनेक कलाविषयांत मुलें नांव

साहण्यामारखी प्रगति दर्शवितात. नृत्य, भरतकाम, शिवणकाम, चित्रकाम, फ़ुला कुसरीची कामें, खगोळाचा यात विशेषेकरून विद्यार्थिनींच्या बुद्धीची चमक दिसून येते.

पण अशा या छंदांना पूरक अशी पुस्तकें खास मुलांसाठीं फारशी लिहिलीं गेलेलीं नाहीत. जी काय चारदोन आहेत त्यांतील काहीं पाठ्यपुस्तकें म्हणून शाळेंत लावलीं गेलीं आहेत. पुष्ठकाम व हस्तव्यवसाय या पुस्तकाचे ४७ छोटे भाग (लेखक द. श. गलांडे) हें याचें एक उदाहरण ठरेल. भाऊ खरे यांचें 'व्यावहारिक चित्रकला' हें अभ्यासक्रमास पूरक ठरणारेंच पुस्तक. जादुगार रघुवीर यांना 'जादूतील जमतीगमती' 'जादूची पोतडी' इत्यादि पुस्तकें मुलांसाठीं लिहिलीं, तीं तो छंद असणाऱ्यांना उपयोगी आहेत. लेखनाचा छंद पुष्कळांना असतो. 'तुम्हाला लेखक व्हायचय् का?' हें ना. कृ. गलगलीचें एक चांगलें मार्गदर्शनपर पुस्तक आहे. छंदांना पूरक असें श्री. अ. ज. घारे यांचें कागदाचा खेळणीं हें पुस्तक विशेष विचारांत घेण्यासारखें आहे असें म्हटल्यास अयोग्य होणार नाहीं. यांशिवाय हें दालन रितेंच आहे. खास विद्यार्थिनींसाठीं तर कलापुस्तक, छोट्या खगोळ्याची पुस्तकें अपवाद वजा जाता लिहिलें गेलेलींच नाहींत. परदेशांत ही पुस्तकें वैपुल्यानें आहेत, एवढेंच नव्हे तर Hobbies Weekly नावाचीं खास साप्ताहिकें देखील तिकडे प्रसिद्ध होतात! त्या तुलनेनें या क्षेत्रांतली उणीव अधिकच जाणवावी एवढी मोठी आहे.

## हितगुजात्मक पुस्तकें

पत्रात्मक पुस्तकांना प्रौढ साहित्याप्रमाणेंच बालसाहित्यातहि मानाची खुर्ची मिळविलेली आहे. पत्र म्हटलें कीं तेथें हितगुज धाव घेऊन आलेंच! कथा कादंबरीप्रमाणें कथानक जुळवण्याची खटपट नाहीं कीं प्रसंगरचना, संवाद इत्यादींचें बंधन नाहीं. आत्माविष्कार करणारी हीं पत्रें म्हणजे लघुनिबंधाचें धाकटें भावंडच जणु.

हीं पत्रें दोन तऱ्हेचीं. एक खुद्द कोणातरी बालाला उद्देशून लिहिलेलीं, म्हणून तीं अधिक आत्मीयता व जवळीक दर्शवणारीं व्यक्तिविषयक अशीं आणि दुसरीं म्हणजे बालासाठीं लिहिलेलीं हीं पत्रें एकाद्या मुलामुलीला उद्देशून लिहिलेलीं खरीं, पण त्या त्या व्यक्तीला बालपिढीचा प्रतिनिधी कल्पून त्याच्या वयाच्या अनेक बालवाचकांनाहि उद्बोधक ठरणारीं. पहिल्या प्रकारांत भावनिक जिव्हाळा व आत्मप्रकटन यांचें आधिक्य, तर दुसऱ्या प्रकारांत सामाजिक हिताचा दृष्टिकोन व ज्ञानवर्धनाचा हेतु स्पष्ट असतो.

प्रौढसाहित्यात अनेक पुस्तकें पत्ररूप आहेत. बालसाहित्यातहि ती प्रथा यावी यांत नवल नाहीं. अनेकांना विचार प्रकटनाचें हें माध्यम आवडलेलें दिसतें. रूप तर

निबंधाचें, पण त्यांतली क्लिष्टता नाहीं. विषयाचें विवेचन खरें, पण त्याला तंत्र चौकट नाहीं. भाषेचे स्वरूप घरगुती व आत्मविचारांनाहि प्रसंगोपात्त वाव देण्याची यांत नकळत सोय झालेली! तेव्हां उगवत्या पिढीसाठीं अनेक लेखकांनीं हीं पत्रें लिहिलीं. त्यांत 'सुंदर पत्रें' (सानेगुरुजी), 'करवंदे' (गोरे), 'इंदिरेस पत्रें' (पं. नेहरू) 'जेव्हां मुलगी शिकत असते' (इसबनीस) इत्यादि पुस्तकें उल्लेखनीय ठरतील. या सर्वांत एक गमतीचें साम्य दिसतें तें म्हणजे हीं सर्व पुस्तकें बालवयीन मुलींनाच लिहिलीं गेलीं आहेत. अर्थात् अनेकांनीं एकाच वस्तूचें दर्शनचित्र काढलें तरी त्यांतून जसें व्यक्तिगत कलेचें वेगळेपण उठून दिसावें तद्वत् प्रत्येक पत्रलेखकाची लेखनप्रवृत्ती वेगळी आणि वर्णनशैली व विचारभूमि हीहि अगदींच भिन्नरूप आहेत. इंदिरेस पत्रें हें सर्वस्वी शास्त्रीय माहितीचें पुस्तक पत्रात्मक खरें, पण अगदींच वेगळ्या वाणाचें. त्यात घरगुती मजकुराची एक ओळसुद्धां नाही. मात्र भाषा व विवेचनपद्धति सोपी व बालसुलभ आहे.

बालांसाठीं पत्रात्मक वाङ्मय लिहिलें गेलें त्या सर्वांत 'सुंदर पत्रें' हें कै. सानेगुरुजींचें पुस्तक गुणाधिक्यांत अग्रमान घेणारें ठरेल. ही पत्रें गुरुजींनी सुधा नांवाच्या एका छोट्या मुलीला लिहिलीं व दर आठवड्यास एक याप्रमाणें तीं साधनेंतून प्रसिद्ध झालीं. पण सान्यांचाहि हेतू एकट्या सुधेशींच हितगुज करण्याचा नव्हताच. प्रस्तावनेंत श्री. ना. ग. गोरे म्हणतात—

"(सुधा), दर शनिवारचें पत्र रात्रीं बेरात्रीं, भल्या पहाटे बसून लिहून काढावयाचें. तुला डोळ्यासमोर ठेवून ते अवघ्या बालमहाराष्ट्राशीं गुजगोष्टी करावयाचें."

आणि हें हितगुज बालमहाराष्ट्राच्या खरोखरच कितीतरी मनास आलें! या पत्रांत गुरुजींचा बालांबद्दलचा जिव्हाळा तर पानोपानीं प्रकटला आहेच, पण इतरहि कांहीं गुणांनीं तीं लक्षणीय झालीं आहेत. कै. सानेगुरुजी निसर्गप्रेमी होते. मृदुमनानें ते सृष्टीचे सारे फेरफार पाहायचे. धरणीवरील छोट्या फुलापासून गगनांतील संध्यारागापर्यंत सर्व गोष्टींबद्दल त्यांचे सौंदर्यलक्षी मन विचार करायचें. त्यांचीं हीं पत्रें म्हणजे त्यांनीं सुधेप्रमाणेंच निसर्गाशीहि केलेलें जणूं हितगुजच! परमेश्वराच्या मनोहर सृष्टीकडे कौतुकाबरोबरच तात्त्विक भूमिकेनें शोधक दृष्टीनें कसें पाहावें हेंच जणुं त्यांनीं सुधाला शिकवलेलें दिसून येतें. पुढील परिच्छेद याची साक्ष देऊं शकेल.

"हे लहानसे मृगाचे किडे! आठ दिवस दिसतात नि पुन्हां नाहींसे होतात. कोठें असतात त्यांची बारीक अंडीं? मातींतील तीं अंडीं उन्हांत, थंडींत, मरत कशीं नाहींत? कां एकदम हे किडे कोठून जन्म घेतात? काय आहे हा प्रकार! साध्या क्षुद्र मातींतून हे नयनमनोहर किडे कोठून आले!"

अनुमानानुसार अशीं पत्यप्राण्यांची, झाडाफुलांचीं अगणित उल्लेखवर्णनें या पत्रांतून आढळतात, तीं मुलांची सृष्टिप्रीति वाढवणारींच आहेत. दुसरा या पत्रांतला विशेष म्हणजे प्रादेशिकतेचा. कोंकण हा प्रान्त हवामान, पिकें, फुलें, फळें, लोकजीवन या सान्याच दृष्टीनें भिन्न. तेथल्या या सर्व गोष्टींचीं रसाळ वर्णनें लेखनौघांत आलीं असल्यानें या पत्रांना एक निराळीच सुंदर झिलई चढली आहे. हें एक पत्र ह्या वर्णनांनेंच किती वेगळे भासतें—

"अननसाच्या फुलांना चांगलाच बहर आला आहे. अननसाला तितकासा वास नसतो, पण कसें घवघवीत दिसतें फूल. बटमोगऱ्यासहि फुलें लागू लागलीं. फणसाच्या झाडावरून बटमोगरीचे वेल गेलेले, आणि रघुनानाकडे एक मोगरा आहे, पण केवढें त्याचें फूल! पाढऱ्या गुलाबासारखें दिसतें, आणि वासहि मधुर. तेरडे आता चांगलेच फुलू लागले आहेत. अजून कचोळ्यांचीं फुलें दिसू लागलीं नाहींत."

कोंकणातलीं फुलेंहि निराळीं अन् ओळखहि नाविन्यपूर्ण!

पण गुरुजींचीं हीं पत्रें केवळ अशा प्रादेशिक वर्णनांनीच वेधक झालीं आहेत असें मात्र नव्हे. सुधाच्या निमित्तानें त्यांनीं एकंदर मराठी बालपिढीला अनेक तऱ्हेची मौलिक शिकवण दिली आहे. त्याचें महत्त्व याहून अधिक मानलें पाहिजे. सेवानतांचें हें आवाहनच किती चिंतनीय आहे पाहा —

"सुधा! तू पुढें घेशील अशा जीवनाला वाहून? शीक, डॉक्टरी ज्ञान मिळव आणि कारखान जा आणि गरीब आयाबायांची सेवा कर. नदी ज्याप्रमाणें ओलावा देत वाहत राते त्याप्रमाणें तुझी जीवनसरिता सर्वांच्या जीवनाला ओलावा देत वाहत राहो."

अशीं ही भावमय पत्रें, मुलांनाच काय मोठ्यानांहि पुन्हापुन्हा वाचावींशीं वाटतील!

कै. सानेगुरुजीप्रमाणेंच श्री. ना. ग. गोरे यांनीं शुभा नावाच्या आपल्या कन्येला उद्देशून अशींच सुबोध पत्रें लिहिलीं, तीं 'करवंदे' या संग्रहांत समाविष्ट झालीं आहेत. लेखनपद्धत पुष्कळशी 'सुंदर पत्रां'सारखीच, परंतु प्रत्येक लेखकाचें वैशिष्ट्य अशा साम्यांतूनहि उठून दिसणारच. श्री. गोऱ्यांनीं खूप प्रवास केला व त्या प्रवासांतून बातली काहीं पत्रें लिहिलीं. अर्थात त्यांत प्रादेशिक वेधक वर्णनें तर आहेतच, पण तीं अगदीं भिन्नभिन्न प्रदेशांचीं व त्यांतल्या तऱ्हेदार रितीरिवाजांचीं आहेत. 'धुमकुडिया,' किंवा 'चिनागदेचें माहेर,' हीं सुंदर वर्णनांनीं नटलेलीं प्रकरणें पाहावीं. जिज्ञास्यापेक्षाहि गोऱ्यांच्या भाषेंत शोधकता, निरीक्षण व ज्ञानवर्धन यांचीच शिकवण प्रभावी झाली आहे. वर्णनशैलीहि रम्य व आकर्षक आहे. मणि

पूर्वचें हें शब्दचित्र पाहा, म्हणजे श्री. गोरे यांच्या पत्रलेखन शैलींतील संदर्भखुमारी वाचकांच्या लक्षांत येऊं शकेल.

" तीन चार वाजले कीं इथें संध्याकाळ होऊं लागते. मग दिवसभर विणलेलें कापड गवताच्या बुट्टयांत घालून बायका बाजारांत जातात. शुभा, इंफालच्या बाजाराची शोभा मी कधी विसरणार नाही. सगळा बाजार चालवतात बायका. बांगड्या, मणि, फूल, नारळाच्या करवंटीचे नक्षीदार हुक्के, अगरु धूप, भाजीपाला यांची छोटीछोटीं दुकानें हारीनें लागलेली असतात. पण खरी शोभा पाहावी तर ती कापडबाजाराची. किती तऱ्हेचें कापड बायकांनीं आणलेलें असतें म्हणून सांगूं ! येथील बायकांना विणण्याचें, धुलाईचें व कशिदाकामाचें कसब पूर्णपणें अवगत झालेलें आहे. त्याच्या हातांत काय जादू आहे नकळे, पण त्यांनी बनवलेले, कोळ्याच्या जाळ्यासारख्या झिरझिरीत कापडाचे एकाहून एक सरस नमुने पाहिले कीं डोळे निवतात. " ( करवंद - पृष्ठ १०० )

अशा पत्राचा कोणाला तरी कंटाळा येईल काय ?

सौ. शांता हसबनीस यांनी लिहिलेली 'जेव्हां मुलगी शिकत असते' हींहि पत्रेंच. मात्र यांतला फक्त पूर्वार्धच बालिकावयाला उचित असून त्यांतहि कन्येचें कौतुक व बालपणच्या आठवणी यावरच अधिक भर देण्यांत आला आहे. उपदेशाचीहि जी एकसारखी साखळी दिसते तीहि नाजूक पत्रसौंदर्याला उचित ठरणारी नव्हे, तथापि मुली या वयांत अभ्यास, खेळ, छंद व प्रवृत्ति यांजबद्दलचें विवेचन मात्र अत्यंत शोधक दृष्टीनें व मार्गदर्शनपर करण्यात आलें आहे. मात्र यांत वैयक्तिकेतला अधिक महत्त्व दिसतें. हीं पत्रें आईनें मुलीला लिहिलेलीं, तेव्हां जिव्हाळा व घरगुती भाषा याचा लक्षात येण्यासारखा विशेष आढळ यांतून व्हावा हें साहजिकच; आणि त्या दृष्टीनें हें पुस्तक सरस झालें आहे.

अगदीं अलिकडे एक छोटेंसे सुंदर 'पत्र - वाचन' प्रसिद्ध झालें आहे. त्याचें नांव 'पोपटास पत्रें'. पोपट हा अवघा अडीच वर्षांचा बालक. *येवढ्या* चिमुरड्या वयांत त्याला त्याचे वडील श्री. मधु लिमये यांनीं हितगुजात्मक पत्रें लिहावी हीच कल्पना आधी नवलाईची. या छोटुकल्या पोपटला लिहितां वाचतां येत नाहीं; परंतु त्याला वाचून दाखवलें तरी कळतें व अशाच दृष्टीनें यांतली पत्रभाषा योजली आहे. श्री. मधु लिमये गोवा चळवळींत तुरुंगांत होते. तेथून त्यांनीं हीं पत्रें लिहिलीं. वत्सलता आणि प्रेम हीं हातांत हात घालून यांतून विहरतांना दिसतात हें तर खरेंच, परंतु एवढ्या चिमण्या बालमनाला कोणत्या गोष्टीची आवड वाटते याचाहि योग्य विचार यांत झाला आहे हें विशेष. तुरुंगांत हकिकती त्या काय असणार ! मुलाला त्या काय रुचणार ! पण पाऊस, झाडें, समुद्र, पांखरें, मनी मोत्या, काजवे

इत्यादि बालवृत्तीचे मोजती तेथेंहि लिमयाना मेटर्लें व त्याचेच उद्गेग फार बालबोध व रजक भाषेंत आले आहेत एका पत्रातील हें शिशुरंजन पाहा—

"समोर समुद्र पसरलाय. आज कि नाही तो फार फार रागावलाय. त्याच्या मोठ्या थोरल्या फेसाळ लाटा लपलपत करीत सरसावत आहेत. इतके रागवायला त्याला काय झालं कोण जाणे! त्याच्या आईनं बहुधा त्याला चॉकोलेट दिलं नसावं! पण खरच त्याला चॉकोलेट कुठ आवडत? त्याला आवडत तें खारट मीठ. तेव्हा कदाचित् त्याच्या आईन त्याला भुर न नेल्यामुळेंच तो रुसला असेल नाहीतर त्या वाईट वाऱ्यान त्याला उगाच मारल्याझोडल्यामुळेंच तो सकाळपासून भितीवर जोरानें हातपाय आपटीत असेल. तू रागावलास की असच त्या वेड्या समुद्रासारख करतोस का रे?"

बालसुलभ कल्पनाचा अविष्कार या हितगुजातून किती चागल्या प्रकारें व्यक्त झाला आहे!

हितगुजात्मक पुस्तकाना फक्त पत्रमाध्यमच अपेक्षित असतें असें नाहे. निबंधरूपानेंहि हितगुज होऊ शकते

बालमासिकाच्या सपादकानी ही नवी पद्धत सपादकीय स्फुटातून पूर्वी प्रकट केली होतीच. त्याचा अवलब करून कै. हरी नारायण आपटे यानी प्रथम मुलासाठी काही बोधप्रद व्याख्यानाचा साराश 'मुलास थोडा उपदेश' या नावानें प्रसिद्ध केला मुळात हा सारा प्रत्यक्ष झालेली भाषणेंच होती व ती नूतन मराठी विद्यालयाच्या प्रथेनुसार शालान्तवर्गाच्या हाती छापील पत्रकाच्या रूपानें दिली जात असत. त्यामुळें नमन काही असताहून मागानें तसा वडिलधाऱ्याचा जिव्हाळा (व धाकहि!) त्यातून जाटळतो सामुदायिक विद्यार्थीमनाला उद्देशून केलेला हा उपदेश! त्यात खेळकरपणा या विनोद याचें वावडें असल्यास आश्चर्य नव्हे पण प्रकट बालहितगुजाची ही प्रथा या पुस्तकानें ४०-५० वर्षांपूर्वी नव्याने सुरू केली आहे हें मान्य केलें पाहिजे.

या पुस्तकाप्रमाणेंच मुलाच्या मेळाव्यात बसून आपण भाषण करीत आहोत, या कल्पनेनें लिहिलेलें श्री. गोपीनाथ तळवलकराचें कुमारमित्रानो' व म. म द. वा. पोतदाराचें 'बालमित्रानो' हीहि पुस्तकें हितगुजात्मक वेगळी पद्धत स्पष्ट करतात. अशा पद्धतींत लेखक व वाचक यातलें अतर तुटतें व लेखक बालवाचकाच्या अतरातच जाऊन जणु हृद्गत सागतात! अर्थात् सर्वच मुलाचा हा वाचनविषय नसतो. कारण गोष्टीपेक्षा यात गाभीर्य, उपदेश ज्यास्त आणि रजन कमी असतें. पण विद्यार्थी जीवनातहि एक वैचारिक वातीचा काळ येतो, त्यावेळी एखाद्या प्रेमळ सन्मित्राप्रमाणें हीं पुस्तकें त्याना प्रिय होतात. या दोन्ही पुस्तकातील लेख

पत्ररूपानें प्रसिद्ध होण्यापूर्वी विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष सांगितले गेले आहेत. 'माझ्या बालमित्रांनो 'मध्यें तर पोतदारांनी हरिभाऊंचीच भूमिका कायम ठेवून छात्रगणाशीं गुजगोष्टी केलेल्या दिसतात; परंतु त्यांतहि एक नवा दृष्टिकोन आहेच. वाचनाबद्दल उपदेश करतांना ते म्हणतात—

" छापील पुस्तकें जरी तुम्हांला मिळाली नाहींत तरीसुद्धा तुम्ही निराश होऊं नका. मुलांनो, हें सगळें जग हें एक मोठें थोरले पुस्तकच आहे. होय, खचित सांगतों, मुलांनो, तुमच्यासमोर दिसणारें जग हें एक भलें जंगी पुस्तकच उघडलेलें आहे. नीट पाहा, म्हणजे तुम्हांस तें पुस्तक आपोआप दिसेल. रात्रीं तुम्ही कधीं आकाश पाहिलें आहे काय ? ते आकाशाचे निळे, भव्य आणि मैलोमैल पसरलेलें छत आणि त्यांत लुकलुकणारे ते तेजस्वी तारे तुम्ही नीट पाहा म्हणजे तुम्हाला कळेल कीं, निळ्या कागदावर पांढऱ्या शाईनें लिहिलेलीं हीं अक्षरें आहेत. तुम्ही पांढऱ्या कागदावर निळ्या मोरपंखी शाईनें लिहिता आणि हीं ताऱ्यांची अक्षरें निळ्या कागदावर पांढऱ्या सूर्यपंखी चमकणाऱ्या शाईनें लिहिलेलीं आहेत. पाहातां पाहातां पुढें हीं ताऱ्यांचीं अक्षरें तुम्हांस ओळखतां येऊं लागतील व मग तुम्हास मृग, रोहिणी, अगस्ति, ध्रुव अशीं यांचीं नांवें ठाऊक होतील. या सृष्टीच्या पुस्तकांतील निळ्या कागदावरील पांढऱ्या अक्षरांचें हें एकच पहिलें पान वाचण्यास तुम्हांस कितीतरी वर्षे लागतील !"

प्रत्यक्ष संभाषण याहून काय वेगळें असतें थोडेंच ?

'कुमारमित्रांनो ' हें असेंच या मालिकेंतलें एक पुष्प पण वेगळ्या वासाचें, वेगळ्या रूपाचें. हींहि मूळ शिक्षण संस्थांतून विद्यार्थ्यांना उद्देशून केलेलीं भाषणेंच असल्यानें प्रत्यक्ष संभाषणपद्धत यांत सर्व ठिकाणीं दिसावी व भाषा सामुदायिक कुमारमनाला आवाहन करणारी आढळावी हेंहि क्रमप्राप्तच. श्री. तळवलकर प्रस्तावनेंत म्हणतात —

*"कुठल्याहि शिक्षणसंस्थेंत भाषण करतांना समोर लहानसा कुमारवृंद* दिसत असला तरी माझ्या अंतःचक्षूपुढें आजची व उद्यांची सर्व कुमारसृष्टीच नेहमीं दिसत असते. "

या व्यापक भूमिकेवरून केलेलें हें हितगुज, तें सर्वच कुमारांना प्रिय व्हावें यांत नवल कोठलें ? मात्र शालेय विद्यार्थी म्हणजे केवळ अभ्यास, अभ्यास आणि अभ्यासच असें समीकरण या बोधप्रदतेंत तळवलकरानीं नजरेसमोर ठेवलेलें नाहीं. भारताचे राजकीय प्रकृतिमान व त्यांतले भिन्न भिन्न विचारप्रवाह हेहि विद्यार्थ्यांच्या बहुश्रुतपणास अवश्य आहेत व कला, साहित्य, छंद यांचीहि जोपासना कुमारवयांतच आवश्यक आहे हेंहि त्यांनीं वारंवार आवर्जून सांगितलें आहे. आणि हें सर्व

मागताना त्याची भूमिका वडिलधाऱ्याची नसून पुस्तकाचे नावात ध्वनित झालेल्या मित्रत्वाच्या नात्याचीच दिसते.

प्रत्यक्ष संभाषणें लेखनबद्ध करून देण्यापेक्षा काहींशी वेगळी अशी एक हितगुज पद्धति आहे व ती म्हणजे निबंधपद्धतीनें, पण मुलामुलींना उद्देशून आपले विचार ग्रथित (व ग्रंथबद्धहि) करावयाचे. याहि तऱ्हेनें काही चांगली हितगुजात्मक पुस्तकें बाल व कुमारासाठीं प्रसिद्ध झाली आहेत. अर्थात् बालवय हें फार मोठा उपदेश ग्रहण करण्यास कंटाळणारें असल्यानें बालहितगुजाची पुस्तकें कमी असावी यात नवल नाही. तथापि या प्रकारातील पुस्तकें संख्येनें कमी असला तरी गुणमूल्यानें ती अधिक मौलिक ठरणारी आहेत. श्री. य. गो. नित्सुरे यांचें 'कुमाराच्या सोबती,' कै. पिरोज आनंदकर यांचें 'इंद्रधनूचा पूल,' श्री. गो. रा. चोळकर यांचें 'बालसुहृद्,' सौ. मालती दांडेकर यांचें 'उद्याची कन्या,' व 'कन्येस प्रेमभेट,' अशी काही ठळक नावें यात दिसतात. कुमारवयासाठीं आवर्जून लिहिण्यात आलेल्या "कुमाराचा सोबती" (श्री. य. गो. नित्सुरे) व "इन्द्रधनूचा पूल" (कै. पिरोज आनंदकर) या दोन्ही पुस्तकांनी या हितगुजशाखेत फार मोलाची व महत्त्वाची भर टाकली आहे. 'कुमाराचा सोबती' हें नावच मुळी विषयाला व्यक्तरूप देणारें. विवेचनशैली सुबोध, पण गंभीर असून तात्त्विक पद्धतीची आहे. चांगल्या सवयी, सुदृढ शरीर, पवित्र मन, बहुश्रुतता अशा अनेक विषयांवर यातलें विचारपूर्ण मार्गदर्शन कुमारांना हितप्रदच ठरणारें आहे. कुमारांसाठी इतरहि या धर्तीची पुस्तकें प्रसिद्ध झाली आहेत. त्यातून हीच कथनपद्धति अधिक दूर दृष्टीची व कुमाराच्या सर्वांगीण वर्धनास पोषक ठरणारी आहे. श्री. गो. रा. चोळकर यांचें 'बालसुहृद्' हेंहि या हितगुजप्रकारात मोडणारें पुस्तक. मात्र यांचें रूप केवळ निबंधात्मक नाही. संवादातून वा प्रसंगचित्रणातून त्यांनी मुलांना मार्गदर्शन केलेलें आहे. त्यात वक्तृत्व, सृष्टिसौंदर्य, उद्यानरचना, रत्नाकर इत्यादि अन्य विषयांकडेहि बालांनी कशा सौंदर्यशोधक दृष्टीनें पाहावें हा भाग आला आहे, तो वैशिष्ट्यपूर्ण वाटतो. तथापि हें कथन लेखकर नसून प्रौढतेच्या आवरणातच आहे

'कन्येस प्रेमभेट' हें लेखिकेचें पुस्तक याच प्रकारचें आहे व सरासरी ८ ते १२ वर्षांच्या मुलींना यातून निबंध, संवाद, कथा, पत्रें इत्यादि अनेक माध्यमांतून सद्वर्तनाची शिकवणूक दिली आहे. मुलांशीं हें असें हितगुज अनेकांनी केलें आहे व त्या सर्व पुस्तकांतून रसाळपणा व वेधक शैली याचा कमीअधिक प्रमाणात आढळ होतो. मात्र ह्या गुणाची उपेक्षा झाली तर अशी पुस्तकें किती कंटाळवाणी होतात याची साक्ष देणारेंहि एक प्रकाशन 'मुलांचा मित्र' (ले. ग. रा. साने) या नावानें प्रसिद्ध आहे. उपदेश खरा पण, तो क्लिष्टभाषी व नीरस शैलींत असला तर कोणाच्या लक्षात राहणार? पुढील मजकूर तसाच—

" मुलांनो, लक्षांत ठेवा कीं तुम्ही विद्यार्थी आहांत व विद्या ही एक तपश्चर्या आहे. हें एक योगसाधन आहे. अर्थात् तिच्यापासून त्या तपश्चर्येचें सात्त्विक सुखच तुम्हांस मिळेल. इतर जगाच्या राजस व तामस सुखाचा तुम्हाला त्यागच करावा लागेल व असा त्याग केलात तरच ती विद्या तुमच्या हातीं लागेल. "

प्रयत्न करूनहि हा मजकूर मुलाच्या मनांत राहणें कठीण. त्याना तर रंजनभाषेनेंच उपायन हवें असतें! शिवाय यात पानोपानीं संस्कृत दाखले व काव्यवचनें आलीं आहेत. त्यामीहि सहजोद्याला प्रतिबंध होऊन नीरसतेंत वाट झाली आहे. ज्याच्यासाठींच हें उद्बोधन त्या कुमारांचें वय व ग्रहणशक्ति लक्षांत न घेऊन कसें चालेल?

या सर्व विवेचनांत एक मजेदार विरोधहि दिसून येईल. हितगुजपत्रें मुलापेक्षा मुलींसाठींच ज्यास्त लिहिली गेलीं, तर प्रत्यक्ष निबंधरूप उद्बोधन मुलींपेक्षा मुलासाठीं अधिक प्रमाणात प्रसिद्ध झालें आहे. खरें म्हटलें तर मुलींशीं अशा प्रकारचें हितगुज हें स्त्रीजनांकडून जास्त अपेक्षित आहे; पण या क्षेत्रातहि दोनतीन लेखिकाच्या खेरीज फारशी नावें दिसत नाहीत. मागल्या काळीं मुलींचीं लग्नें लवकर होत असल्यानें ' सगुणाबाईंचीं आपल्या मुलीस पत्रें ' ( कै. ह. ना. आपटे ) सारखे लेख प्रसिद्ध झालेले असले तरी ती एकप्रकारें ' मासरची पाठवणी 'च ठरण्याजोगीं असत. आजघडीची सामाजिक राहणी, शिक्षण विचारकेंद्रें यानीं मुलींच्या लग्नपूर्वजीवनांत व राहणींत जो नवा बदल केला आहे त्यातून मार्गदर्शन करणारी व जिव्हाळ्याची शिकवण देणारी पुस्तकें आज बहुसंख्य हवींच आहेत व ही एकप्रकारची ह्या हितगुज विभागात वाणच आहे म्हटलें तरी चालेल.

मुलींशी हितगुज करणारी पुस्तकें म्हटली तर विशेषशी नाहीत. लेखिकेचें ' उद्यांची कन्या ' हें पुस्तक अशा धर्तीचें आहे व त्यांत कन्याजीवनाला अवश्य असलेल्या अनेक विषयाची माहिती आली आहे. पण त्याहूनहि मुलींना अधिक विश्वासांत घेऊन अत्यंत महत्त्वाचें हितगुज कोणी केलें असेल तर तें कै. पिरोज आनंदकरानीं ! त्यांनीं आपल्या ' इंद्रधनूच्या पूल ' या पुस्तकांत मुलींच्या वयाच्या १३ ते १९ या कालखंडाचा सर्वांगीण विचार केला आहे. एक वैशिष्ट्य म्हणजे वयांत आलेल्या मुलींसाठीं या पुस्तकांत ' कशावरून ग मी मोठी झालें ? ' आणि ' आतां थोडं मुलाविषयीं ' ह्या दोन प्रकरणात मुलींना स्त्रीपुरुषांची शरीररचना, लैंगिक माहिती व त्या वयांत उद्भवणाऱ्या वैषयिक प्रवृत्ति याचीहि ओळख मोकळेपणीं व सद्हेतूनें करून देण्यांत आली आहे व ती देतांना सावधतेचा इशाराहि जागोजाग आहे. 'कुमारांचा सोबती' या पुस्तकांतहि मुलांना सागोपांग ही माहिती दिली आहे. पण तुलनेनें पाहतां त्याहून या पुस्तकांत माहिती सांगतांना बराच संयम पाळला गेला आहे तो इष्ट वाटतो व आवश्यकहि आहे. कै. पिरोज

आनंदकरांच्या या लेखनाचे आणखी गुण म्हणजे कथनशैली व खेळकर भाषा. निरपुस्तकांतून ती नेहमीं अभावानेंच जाणवते पुढील परिच्छेद या भाषेची कल्पना देईल.

"तुम्ही गोष्टी ऐकता. एक होता राजा. त्याला एक सुंदर कन्या होती. चंद्रामारखं तिचं तोंड. तान्यासारखे टुकटुकणारे तिचे डोळे. चंद्रकोरीप्रमाणे हनुवटी गुलाबासारखे गाल. चाफ्यासारखं नाक.. शालू नेसली होती ती. हिऱ्यामोत्याचे दागिने घातले होते तिनें. सोनकळी तिचं नाव. सोनेरी रथातून राजा चालला होता—बरोबर सोनकळीहि होती.

तुम्हाला वाटतं, आपण राजकन्या असतो तर? मग तुमच्या दिवास्वप्नाला होते सुरुवात. तुम्ही होता सोनकळी तिला मिळालेल्या भाग्याच्या तुम्ही वाटेकरी होता. शालू नेसता दागदागिने घालता. राजाबरोबर रथातून हिंडता. शिकारीला जाता. मग भेटतो एक राजपुत्र. फार सुंदर असतो तो. शूरपण असतो! मग...!...

या सगळ्या गोष्टी तुम्ही कल्पनेच्या साह्यानं अनुभवीत असता. त्यात तुम्हाला सुख वाटतं. अशा कित्येक ऐकलेल्या वाचलेल्या कथांच्या तुम्ही नायिका बनता. कोणाला कळत नसतं तुमच्या मनात काय चाललं तें. कोणी टीका करूं शकत नाहीं त्यामुळं तुम्हाला दिवास्वप्नं फार आवडतात. आयुष्यातल्या तुम्हाला आवडणाऱ्या कित्येक गोष्टी तुम्ही मनानं अनुभवता. पैसा नको अडका नको, फुकटची मौज!

तुमचीं दिवास्वप्नं जर तुम्ही कोणाला सांगितलींत तर तुमचा स्वभाव त्यावरून सहज अजमावता येतो. ज्या गोष्टी तुमच्या सदसद्विवेकबुद्धीला पटत नाहींत त्या गोष्टी तुम्ही कल्पनेनं जर अनुभवूं लागलांत तर तिथं धोका आहे. अशीं दिवास्वप्नं तुम्ही कोणाला उघड सांगूं शकणार नाहीं. तीं सांगण्यात तुम्हाला लाज वाटेल! अशी जेव्हा लाज वाटते तेव्हा तुमच्या स्वभावात दोष आहे असं समजण्यास हरकत नाहीं. असे दोष कसे दूर करता येतील इकडे तुम्ही लक्ष पुरवलं पाहिजे."

आनंदकरांनीं सारें जीवन स्त्रीशिक्षणक्षेत्रात व कन्याविश्वातच घालवल्यानें अवघड प्रश्न सोपें करून जिज्ञासूंचे सांगण्याचें हें तंत्र त्यांना साध्य झालें असावें!

बालहितगुजात्मक पुस्तकें अशा प्रकारें चांगलीं ठरत असलीं तरी तीं हातावोटावर मोजता यावीं एवढीच त्यांची व्याप्ति दिसते. कारण ललित कथा, अद्भुतरम्यता, विनोद, नाट्य या सर्व बालप्रिय उपायनापासून हितगुजें दूरदूर नसतात काय? लहान मुलांच्या क्रीडेकडे मोठ्यांनीं दुरून कौतुकानें पाहावें तशी या हितगुजाची प्रवृत्ति प्रौढ व वृत्ति गंभीर असते. अर्थात् वाङ्मयीन आवडीनिवडी

वयानुरूप पुष्कळदां बदलत असल्यानें विद्यार्थीजीवनांत जेव्हां वैचारिक क्रांतिचा एक समंजस काल येतो, तेव्हां एकाद्या प्रेमळ सन्मित्राप्रमाणें हींच पुस्तकें त्यांना अधिक आवडूं लागतात व त्यामुळें या पुस्तकांचें प्रमाण साहित्यप्रांतांत उंबराच्या फुलाप्रमाणें कमी असलें तरीहि त्यांचें स्वागत आदरानें केलें जातें !

वर दिलेल्या बहुतेक सर्व लेखनप्रकारांचा अवलंब करून बालसाहित्य लिहिलें गेलें आहे हें खरें, परंतु लघुनिबंध वा गुजगोष्टी हा प्रकार फारसा विकसित झालेला नाहीं. कांहीं थोडे प्रयत्न यांत दिसतात. त्यांत श्री. गोपीनाथ तळवलकरांचीं पुस्तकें नमूद करण्यासारखीं आहेत. 'रुपेरी मनोरा' हें त्यांचें छोटेसें पुस्तक पाहा. यातले विषय पाहावे तर अगदीं साधे, मोराचें पीस, खेळाची गाडी, पाऊस आला असे चिमण्या जगांतलेच; पण त्यासंबंधीं छोटेसे निबंध लिहिले गेले ते मोठे रंजक आहेत. आणि वैशिष्ट्य हें कीं अगदीं लहान मुलांसाठीं हे लिहिले गेले आहेत. 'मोराचें पीस' या वस्तूबद्दलचें हें प्रकट चिंतन पाहा:—"हें मोराचें पीस ! किती सुंदर आहे ! काय रंग, काय चकाकी, किती मऊपणा ! किती किती मजेदार छटा दिसतात रंगांत ! कोणती छटा कशांत मिसळली आहे, कळतच नाहीं. सूर्याचे किरणसुद्धां मजेदार दिसूं लागतात." अशा प्रकारें लहानसान वस्तुवरून सुचणारे हे विचारतरंग लहान मुलांना भोंवतीच्या परिसराबद्दलची सौंदर्यदृष्टी शिकवणारे आहेत. हे सर्व लेखनप्रकार सुंदर असले तरी अजून ते बालवाङ्मयांत एकाकी प्रवाशांप्रमाणें भासतात. त्यांचे सोबती व समानगुणी अनुयायी येथें येतील तेव्हा त्या त्या प्रकारास स्थैर्य व मूल्य येईल. तोंपर्यंत नव्या प्रथा म्हणून कौतुकानें व अपेक्षेनें त्यांचें स्वागत करावयाचें, हेंच रसिकाचें सध्यांचें कर्तव्य ! ●●●

## विद्यार्थी वाङ्मय

शालेय वाङमय व ललित बालसाहित्य याची गेल्या शतकाच्या प्रारंभीं जरी जुळ्या भावडासारखी स्थिति होती, तरी १८५५ सालीं पहिलीं क्रमिक पुस्तकें निघालीं व हें जुळेपण सपून या प्रत्येक शाखेचें काम व अपेक्षा यात भिन्नत्व आलें. आज दुय्यम शाळातून 'पुरवणीवाचन' म्हणून जें पुस्तकाचें स्थान आहे तें या दोन विभक्त बधूना परत जोडणान्या प्रेमदुव्यासारखें ठरेल! शाळातलीं बाल वाचनालयें पाहिलीं तर त्यात कित्येक ललित बालपुस्तकें आढळतात तशी अभ्यासूहि बरोबरीनें असतात. फुटकळ ग्राहकापेक्षा अशा शाळा व अभ्यासू विद्यार्थी हेच या अभ्यासू पुस्तकाचें मोठे गिऱ्हाईक असल्यानें प्रकाशनातहि धदेवाईक दृष्टिकोन आल्यावाचून कसा राहणार? आणि म्हणूनच शाळेंतून जो अभ्यासक्रम निश्चित झालेला असतो त्याला पूरक ठरतील अशीं पुस्तकें बालसाहित्यालयात अधिकाधिक सख्येनें दिसू लागलीं आहेत अर्थात् इयत्तावार क्रमिक पुस्तकाचा विचार ललित बालसाहित्याच्या या प्रातात प्रस्तुत नाहीं परतु या शालेय क्रमिकाना ज्ञानाची जोड देणारीं अशीं जीं पुरवणी पुस्तकें आहेत – व जीं बहुसख्य व विविध विषयावर आहेत – त्याचाच विचार येथें विद्यार्थीवाङ्मयाच्या दृष्टीनें करावयाचा आहे

या पुरवणी पुस्तकाची सख्याहि आज भूमिती श्रेढीनें वाढत आहे शाळेंतून भूगोल, खगोल, रसायन, पदार्थविज्ञान, सृष्टिविज्ञान, जीवशास्त्र असे कित्येक विषय शिकविले जातात त्या त्या विषयाना मदतशील होणारीं पुस्तकें आज मुद्दाम लिहिलीं जात आहेत मात्र अशा पुस्तकावर आखीव अभ्यासक्रमाचें बधन आलें कीं मूळ लेखनसौंदर्याला व लालित्याला थोडा बहुत बाध येतोच असें दिसतें स्वेच्छेनें लिहिलेले लेख जसे सहजिकतेनें शोभतात, तसे परीक्षेच्या दृष्टिकोनातून मुद्दाम लिहिलेले लेख कसे असतील! त्या त्या वर्गाना पेलणारी शब्दसपदा,

वाङ्मयालंकार व धारणाशक्ति यांचाहि विचार या रचनेंत लेखकाला अवश्य करावा लागतो. ह्या आंखीव अभ्यास चौकटींत बसवावयाचें लेखनचित्र, मुक्तहस्त चित्र-कलेसारखें मोकळेपणानें कधीं रेखतां येत नाहीं. शिवाय एकाच विषयाचे इयत्तावार तुकडे पाडावे लागत असल्यानें मूळ लेखनांतली एकसूत्रताहि कायम राहात नाहीं, हाहि दोष ध्यानीं घेण्यासारखा आहे.

कांहीं वेळेला असें पाहण्यांत येतें कीं, पौराणिक कथा, लोककथा, रंजनकथा, प्राणिकथा यांनाहि एक स्वाध्याय अगर अभ्यास शेवटीं जोडलेला दिसतो ! हे पाठ, पुरवणी, व्याकरण, लेखन इत्यादि दरेक गोष्टीच्या अखेरीस देण्यानें त्या त्या पुस्तकाचा अभ्यासवर्ग व हेतू स्पष्ट होत असला तरी त्यामुळें ह्या पुस्तकांचें वाचन केवळ अभ्यासदृष्टीनें होणारें आहे ही कल्पना बालवाचकांना सतत जाणवत राहून त्यांतील सौंदर्य व रसास्वादाचा भाव त्यांचे मनांतून उणा होतो. अर्थात् शालेय पुरवणीवाङ्मयहि दोन तऱ्हेचें असतेंच. एक कांहींतरी शिकविणारें. बहुतेक शालीय पुस्तकें व ज्ञानमाहितीची पुस्तकें याच सदरांत येतील. दुसरा प्रकार रिझवणाऱ्या पुस्तकांचा. यांत तेच शास्त्रीय विषय सोपे करून सांगितलेले किंवा एकाद्या कथा-सूत्रांत गोवून त्यांत रंजकता निर्माण केलेले किंवा कहाणी, प्रवासवर्णन, गोष्ट, शब्दचित्र, आत्मचरित्र, चरित्र, प्रसंगदर्शन अशा आकर्षक माध्यमांतून अधिक लालित्यपूर्ण भाषेनें कुमारांसमोर येणारे. आपल्या विषयाच्या दृष्टीनें प्रामुख्यानें विचार करावयाचा आहे तो या अशा रिझवणाऱ्या वाङमयाचाच. या दृष्टीनें शास्त्रीय विषयहि अनेकांनीं सोप्या व ललित भाषेंत लिहून बालवाचकांना ज्ञान-वर्धनाचा एक नवा मार्ग खुला केला आहे. अर्थात् अशीं पुस्तकें थोडीशींच; पण तीं तेवढ्याच महत्त्वाचीं ठरणारीं. या प्रकरणांत त्यांचें विवेचन क्रमवार करण्याचें योजिलें आहे.

## भाषाशास्त्र—

भाषा ही मानवाच्या उत्पत्तिबरोबरच निर्माण झालेली महत्त्वाची शक्ति. तेव्हां तिचा उद्गम, विकसन व प्रगति यांबद्दल अनेकविध वाङ्मय असावें यांत मुळींच आश्चर्य नाहीं. नवल आहे तें इतकेंच कीं मोठ्या मान्यवर व्यक्तींनीं यासंबंधीं अनेकानेक ज्ञानपूर्ण पुस्तकें प्रौढांसाठीं लिहिलीं असलीं तरी कुमार-वाचकांसाठीं मात्र तीं अल्पसंख्य आढळतात ! एक प्रा. ना. गो. नांदापूरकर यांचें 'मायबोलीची कहाणी,' दुसरें दत्तो रामचंद्र कानेगांवकर यांचें 'मराठीचिये नगरी,' तिसरें वि. कृ. नेरूरकर यांचें 'श्रीसरस्वतीचा प्रसाद' हें पुस्तक आणि दा. न. शिखरे यांची 'मराठीचा परिमल' ही चरित्रमाला. मात्र हीं पुस्तकें संख्येनें कमी असलीं तरी गुणाधिक्यानें महत्त्वाचीं ठरणारीं आहेत. पैकीं 'श्रीसरस्वतीचा

प्रसाद' हें पुस्तक १९३२ सालीं प्रसिद्ध झालें. त्यांत एका अभिनव कल्पनेचा आविष्कार आहे. सरस्वतीच्या वीणेच्या तारा तुटल्या होत्या. एका ऋषीनें त्या घेऊन एकेक अक्षराची रचना करावी व त्यानुसार मूक पक्षी, प्राणि यांनीं तेथें येऊन त्या अक्षराचा उच्चार शिकावा अशी ही ऋषीची योजना होती. कावळ्यानें क मधून काव शब्द घेतला, भुंग्यानें ग मधून गुं गुं नाद घेतला. सर्व अक्षरें व स्वर लिपी याप्रकारें त्या ऋषीनें तयार केली, शिष्यांनीं तिचा प्रसार केला आणि मग वाणीच्या शब्दरूपांतून वाचा, भाषणें, गायन इत्यादि विविध परिणत रूपें पृथ्वीवर प्रसृत झालीं. असा हा सरस्वतीचा प्रसाद. मराठी लिपीबद्दल इतकी रंजक गोष्ट बहुधा ही एकच असेल !

१९४१ सालीं कानेगांवकरांचें 'मराठीचिये नगरी' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. यांतहि संवादरूप कथामाध्यमच घेतलें आहे. एक हजार वर्षांपूर्वी म्हैसूरमधील गोमतेश्वराच्या पुतळ्याखालीं मराठींत खोदलेले "श्री चामुंडरायें सुत्तालें करवियलें" हे शब्द आढळले ती मराठीची सुरुवात. या प्रारंभिक मराठीला ऊर्जितकाल आणणारे हेमाडपंत, चक्रधरस्वामी, महदंबा, ज्ञानेश्वर, नामदेव इत्यादि भाषाप्रभु व इतर संत यांचें वृत्तांत यांत आहेत व ते अगदीं सोप्या व घरगुती प्रसंगांतून स्पष्ट केले आहेत. हें पुस्तक चांगलें रंजक व माहितीपर झालें आहे. 'मायबोलीची कहाणी' हें अगदीं वेगळ्या घडाईचें लेणें जणुं भाषेचा, कलाकुसरीचा कशिदा काढलेली शालच, नांदापूरकरांनीं मायबोलीला पांघुरविलेली आहे ! भाषेची जडणं घडण कहाणी पद्धतीची व म्हणूनच वेगळी आगळी. तिचा पुढील नमुना पाहण्यालायक ठरेल.

"नव्या मनूची पहांट झाली. नव्या दमानें आली. जुनें सोनें अंगावर घाली. नवीं पेवें उघडी केलीं. महाराष्ट्रीनें दोरा भरला, प्राकृताची अंगी ल्याली. अपभ्रंशाची कुंची घाली. कानडीचे कसे केले. तेलंगीचे गोंडे लावले. संस्कृताचे वाळसें अंगावर खेळतें. संस्कृतीचे वारे मनांत घोळते. दिसामासा वाढूं लागली एकेक गुण काढूं लागली. लोकांचें मन ओढूं लागली. पोर आतां उफाड्याची दिसूं लागली. साऱ्या महाराष्ट्राची हिनें अंगण ओसरी केली."

ही अशी भाषेची साद्यन्त कहाणी. त्यांतूनच गोरख, मछिंदर, गोपीचंद, मुकुंदराज, चक्रधर, महींद्रभट, केशवराव सूरी इत्यादिकांनीं प्राथमिक मराठीचें कसें पोषण केलें व नंतर ज्ञानेश्वरादि संतांनीं तिला कसें तेजस्वी रूप आणलें हा इतिहास वर्णिला आहे. एक लेखनाची आगळी पद्धत असली कीं वर्ण्य विषयांत केवढें वैचित्र्य व आकर्षकता उत्पन्न होते याचीच ही साक्ष ! दा. न. शिखरे यांच्या 'मराठीचा परिमल'मध्यें जुन्या लेखकांपासून विद्यमान लेखकांपर्यंत सर्वांचेच भाषा-

समृद्धिचे प्रयत्न विस्तारानें व अनेक भागांत मिळून दिले आहेत. हींहि पुस्तकें ज्ञानवर्धक व रंजनप्रधान झालीं आहेत. कथनशैली विशेषच आकर्षक आहे.

मराठी भाषा व साहित्य ज्यांनीं आपल्या प्रतिभेनें व प्रयत्नानें संपन्न केलें, त्या भाषाप्रभूंची माहिती व साहित्यसेवा याबद्दल शिखऱ्यांनीं एक सुंदर मालाच गुंफली. त्यांत ज्ञानेश्वरापासून आधुनिक कविलेखकापर्यंत सर्वांची वाङ्मयीन व व्यक्तिविषयक ओळख करून दिली आहे. निवेदनशैली अतिशय रसिक वृत्तिची द्योतक असून सर्व वर्णनरेखा संपन्न आणि ओजस्वी भाषेनें मनोहर झालेली आहे. भाषाशास्त्राच्या इतिहासांत शिखऱ्यांची ही कामगिरी अवश्य नमूद करण्याजोगी आहे.

## शरीरशास्त्र—

क्रमिक पुस्तकांखरीज शरीरशास्त्रावर फारशीं रंजक बालपुस्तकें आढळत नाहींत.[1] प्रा. भा. धों. कर्वे यांचें 'मी कसा झालों,' हें जीवनिर्मितीच्या अवस्था स्पष्टपणें सांगणारें असें एकच पुस्तक त्यांत उल्लेखनीय आहे. छोट्या मुलाच्या कमालीच्या चौकस बुद्धीला एवढ्या लहान वयांत मानवनिर्मितीचें कोडें सर्वस्वी असें उलगडून दाखवणें इष्ट कीं अनिष्ट हा अजूनहि एक विवाद्य प्रश्न आहे. त्यांतला वाद बाजूस ठेवून म्हणावयाचें तर याची भाषा सुबोध आहे; परंतु कांहीं स्पष्ट लेखन कटाक्षानें टाळतां येणें शक्य होतें. तसा यांत प्रयत्न झालेला नाहीं हें मान्य केलें पाहिजे.

श्री. य. गो. नित्सुरे यांचें 'कुमारांचा नवा सोबती' हें एक पुस्तक या दृष्टीनें कुमारवयांतील मुलांना अवश्य त्या शारीरिक, मानसिक फेरबदलांची उघड, स्पष्ट व शास्त्रीय माहिती देणारें आहे. त्यांत लैंगिक माहितीहि पुष्कळ आहे व ती वाचणाऱ्या कुमारांचें वयहि तारुण्यसीमेजवळचें गृहीत धरण्यांत आलेलें आहे. त्यामुळें ही माहिती देण्यांत एक प्रकारचें औचित्यहि साधलें आहे. लेखकाचा दृष्टिकोन या सर्व लेखनांत कुमारहितैषी असाच दिसून येत असल्यानें या पुस्तकाचें कुमारजगांत स्वागत झालेलें दिसतें.

## भूगोलशास्त्र—

भूगोल हा बोजडनचावडून अभ्यासाचा विषय. यांत कसलें रंजकत्व आणि तें कसलें बालवाङ्मय असाहि प्रश्न उपस्थित होण्याजोगा आहे. पण सुबोध कथनशैली

---

[1] विष्णु अमृत ठोंबरे यांचें "शरीरांतील आश्चर्यकारक भाग" या नांवाचें शरीरशास्त्रावरील एक उपयुक्त पुस्तक सुमारें ४० वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालें होतें व तेंहि बालवाङ्मय मालेनर्फे. माहिती अर्थातच शालोपयोगी होती व तिचें स्वरूप फारसें रंजक नव्हतें.

व उचित आशय यानीं कोठल्याहि विषयाची जडता उणावत जाऊन त्यात रजकता भरू लागते हा लेखनविषयातला नित्याचा अनुभव, भूगोल त्याला अपवाद नाहीं.

वास्तविक भूगोलविषयक पुस्तकें मुलाना अभ्यासजड वाटू नयेत. कारण त्यात देशविदेशाचें वैचित्र्य व भिन्नवर्गीय लोकजीवनाचें वर्णन असतें. पण त्या एकेक देशाच्या अनेकानेक नद्या, त्याचे उगम, काठचीं नदरें, तेथली पिकें, मोठीं शहरें आणि तेथले पर्वत याच्या नावाची एकेक जत्री सुरू झाली की, मुलाचाच काय मोठ्याचा देखील जीव गुदमरू लागतो. भौगोलिक जत्र्याची ही माळ सपत नसल्यानें पाठातराला अवघड होऊन बसलेला हा इतिहासाचा सख्खा भाऊ बालकुमाराना तसाच नावडता होऊ लागलेला दिसतो. पण यातील रुक्षता घालवून यालाहि बालरजनक्षम बनवण्याचे प्रयत्न कांहीं लेखकानीं आवर्जून केलें आहेत व ते बऱ्याच अशीं साधलेलेहि दिसतात. अशा लेखकात वि. आ. मोडक याची भूगोलावरील 'साहसी प्रवासी', 'भारतीय बाधवाचे भूप्रदेश' इत्यादि पुस्तकांचा जरूर नामनिर्देश करावा लागेल. हीं पुस्तकें सुमारें २५–३० वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालीं. पैकीं भारतीय बाधवाचे भूप्रदेश, यात काश्मीर, नेपाळ, आसाम, सिंध इत्यादि प्रातांचीं माहिती आहे व ती शालेय भूगोलाप्रमाणेंच ठराविक वर्णनाची व एकसूत्री झाली आहे. त्यात रजकता व बालाकर्षक खेळकर भाषा नाहीं, तथापि ज्यावेळीं मुलासाठीं भूगोलासबधीं क्रमिक पुस्तकाखेरीज इतर कोठलींच पुस्तकें नव्हतीं, त्या काळात याच पुस्तकानीं रजनाचें कार्य थोडेबहुत केलें आहे हीच महत्त्वाची गोष्ट

नतर पद्म प्रकाशन या सस्थेनें 'भूगोलमाला' नावाची एक पुस्तकमालाच काढली व त्यातून डॉ. श्री. ना. वाळिंबे यानीं 'जगाच्या जगलात,' 'जगावरील मानवी जीवन' इत्यादि पुस्तकें प्रकाशित केलीं, पण या पुस्तकाची भाषा शाळेंत लावल्या जाणाऱ्या भूगोल पुस्तकाप्रमाणें रुक्ष माहितीची असल्यानें हींहि पुस्तकें बालाच्या मनास येण्यासारखी नव्हतींच. पुरवणीवाचन एवढाच त्याचा उपयोग. प्रा. ना. म. पटवर्धन याचीं दोनतीन चागलीं पुस्तकें या सदर्भात उल्लेखनीय ठरतील. 'आमची दिवाळी,' 'जगातील मौजा' व 'जगातलीं मुलें' पैकीं आमची दिवाळी हें सुमारें तीस वर्षांपूर्वी (१९३० साली) प्रसिद्ध झालें होतें. विषयात रजकता उत्पन्न व्हावी म्हणून लेखकानें या पुस्तकात एक छोटें कथासूत्रहि घेतलें होतें. दिवाळीनिमित्त दोन कुटुबें एकत्र येतात, त्यातली काही मडळी जगप्रवास करून आलेली असतात व त्याच्या बोलण्यातून प्रत्येकवेळीं दरेक वस्तुसबधानें भौगोलिक व प्रादेशिक माहिती येते. ज्ञानवर्धन या दृष्टीनें कदाचित् हीं समापणें थोडीशीं गप्प्य ठरतील, परंतु गोष्टींतील दोन व्यक्ति तर साध्या बोलण्यातून एक

सारखी माहितीच देऊं लागतात, हें कथातंत्राला फार अस्वाभाविक वाटतें. कथेच्या मानानें पात्रें . फार-झाल्यामुळें या संवादांत कंटाळवाणेपणाचाहि दोष उद्भवला आहे. या पुस्तकांत इतर देशाच्या दैनंदिन राहणींतील अनेक चालीरीतींचा उल्लेख आला आहे तो मात्र भौगोलिक माहितींत जरूर भर टाकणारा ठरेल. या पुस्तकाहून 'जगांतील मौजा' हें त्यांचें पुस्तक अधिक रंजक व भाषादृष्टीनेंहि फार वेधक ठरेल. त्यांतलीं निरनिराळीं वर्णनें फारच सुंदर आहेत. उदाहरणार्थ, सहारांतून प्रवास करणाऱ्या कांहीं प्रवाशांचा अनुभव मोठा आकर्षक व वाचनीय उतरला आहे.

कथनशैलीच्या दृष्टीनें १९३३ सालीं प्रसिद्ध झालेलें 'नाना देशचे नाना लोक' हें श्री. वि. द. घाटे यांचें पुस्तक विशेष आकर्षक भासतें. त्यांत भूगोलांतील रुक्षता कोठें नांवाला सुद्धां आढळत नाहीं. उलट रंजकता मात्र माहितीरूपानें प्रकट झाली आहे. भाषाहि अगदीं सोपी व बालवाचकांना विश्वासांत घेऊन लिहिलेली आहे. सहाराचेंच हें वर्णन पाहा—

"चला, आपण सहारा वाळवंटांतल्या एका ओयासिसला भेट देऊं. तीं पाहा दुरून वाळवंटांत एकाच ठिकाणीं झाडें दाट उगवलेलीं दिसत आहेत. तीं खजुरीचीं झाडें. लांबून हीं झाडें दिसलीं कीं समजावें, आलें ओयासिस. कारण इतर ठिकाणीं पाऊस नाहीं, विहिरी नाहींत, तेथें झाडें कोठून उगवणार!"

हीं सारीं वर्णनें एकाद्या कादंबरींतल्या प्रसंग दर्शनाप्रमाणेंच मुलांना चित्तवेधक वाटावीं यांत नवल नाहीं. हीच प्रथा आणखीहि कांहीं नामवंत लेखकांनीं चालू ठेवली. 'भूगोलावरील भ्रमण' हें कै. पिरोज आनंदकरांचें पुस्तक प्रवासवर्णनात्मक आहे हें स्पष्ट होतें. तथापि केवळ काल्पनिक प्रवास एवढेंच याचें रूप नाहीं, तर भौगोलिक सांगोपांग माहिती देणें हेंच याचें खरें उद्दिष्ट. यांत भूगोलाचे अज्ञात प्रदेश शोधणारांची माहिती आली आहे व आफ्रिका, अमेरिका, न्यूझीलंड आणि ऑस्ट्रेलिया अशी या कल्पनाप्रवासाची मार्गरेषा आहे. शिवाय दरेक देशाचें हवामान, पावसाळी प्रदेश, उत्पन्न वगैरेची कल्पना दरेक विभागाच्या शेवटीं आहे. त्यामुळें यास रंजक भूगोलाचें स्वरूप आलें आहे. कोणाला खरोखर प्रवास करायचा असेल तर यांतील कांहीं महत्त्वपूर्ण स्थलवर्णनें त्या दृष्टीनें साह्यकारी ठरतील. आफ्रिकन मुलें व चिनी मुलें ही मेरी एँटविसल यांच्या इंग्रजी पुस्तकांची रूपांतरेंहि रंजक व माहितीपर अशीं लिहिलीं गेलीं होतीं.

लहान मुलांचें वयोमान लक्षांत घेऊन यांहूनहि छोटींछोटीं व अधिक रंजक भूगोल पुस्तकें लिहिण्याचे कांहीं यशस्वी प्रयत्न झाले आहेत. त्यांत शं. भा. गोधळेकरांची 'जगांतील मुलांच्या मौजा' ही पुस्तकमाला स्वागतार्ह ठरेल. या मालेंतून

'आशियातील मुलें,' 'युरोपातील मुलें' इत्यादि स्वतंत्र पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. सौ. माल्ती दांडेकर यांचें 'जगातील जमती' हेंहि पुस्तक असेंच पृथ्वीवरील भिन्न लोक, त्यांची राहणी व चालीरीति याबद्दल मजेदार माहिती देणारें आहे.

परदेशातील लोकजीवनापेक्षा बालजीवनच मुलांना अधिक आपुलकीचें वाटावें हें साहजिकच. यातील धड्यांचीं शीर्षकें देखील वैचित्र्यपूर्ण आहेत. बुरख्यातील इराणी मुली, गोंदून घेणारीं न्यूझी मुलें, तरत्या घरात राहणारीं सयामी मुलें, हीं नावेंच अशीं गमतीचीं कीं मुलांचें कुतूहल जागें व्हावें! वर्णनातहि बंदरें, शहरें, उद्योगधंदे यावर भर नसून मुलाशीं संबंधित अशा गोष्टी व त्यांना गमत वाटेल अशीच माहिती त्यात आली आहे. पुढील परिच्छेद पहा:—

"काळ्या रंगाचे हत्ती सर्कशींत तुम्ही पाहिलेत पण सयाममध्यें पांढऱ्या रंगाचे हत्ती आहेत. यांचा रंग पांढरा शुभ्र नसून मळकट पांढरा असतो. सयामी लोकांत अशी समजूत आहे कीं हे पांढरे हत्ती म्हणजे पूर्वीच्या जन्मींचे राजेच, आणि म्हणून यांना राजाप्रमाणें वागवण्यात येतें. तुम्हाला आश्चर्य वाटेल, या हत्तींचें पाणी पिण्याचें भांडें सोन्याचें असतें! त्यांची ते पूजा करितात, त्यांना उंची वस्त्रांनीं सजवितात आणि उत्तमोत्तम पदार्थ खायला घालतात."

असें हें वर्णन मुलांना आवडल्यावाचून कसें राहील? परदेशातील मुलांचें जीवन हा मुलामुलींच्या उत्सुक जिज्ञासेतलाच एक विषय. त्यामुळें या विषयाबद्दल पुष्कळ लेखकांनीं गोंधळेकराप्रमाणें पुस्तकें लिहिलीं. त्यात ना. म. पटवर्धन यांचें 'जगातील मुलें' हें विशेष वर्णनशैलीनें अलंकृत आहे. दरेक देशाची अल्पवयी मुलें घेऊन त्यांची दिनचर्या, खेळ, अन्न वगैरे माहिती कथेसारख्या रंजकतेनें यात सांगितलेली आहे. या विभागात 'जगातील मुलें' (देवळे—गोडबोले कृत), देशोदेशींचे सौंगडी (सौ. कुमुदिनी रांगणेकर) व सौ. माल्ती दांडेकर यांचे 'मीनाच्या मैत्रिणी' या पुस्तकाचाहि समावेश होतो. देसाई व सहस्रबुद्धे यांनीं मिळून अगदीं छोट्या, प्राथमिक शाळेंतल्या मुलांसाठीं म्हणून 'मुलांचें जग' भाग १–२ हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांची भाषा अगदीं सोपी व वैशिष्ट्य असें कीं 'मुलांचें जग'मधलीं हीं सारीं मुलें भारतीय आहेत. धड्यांची व्याप्तीहि दोन पानांहून अधिक नाहीं. जुन्या जगात हें श. रा. देवळ्यांचेंहि पुस्तक, मनुष्य अश्मयुगापासून कोठल्या भौगोलिक परिस्थितींत राहत होता व हळूहळू तो कसा सुधारला, हें सांगणारें आहे. या पुस्तकांपैकीं 'मीनाच्या मैत्रिणींत' एक कथासूत्र घेतलें आहे. एका महाराष्ट्रीय मुलीला वाढदिवसाच्या दिवशीं स्वप्न पडून त्यात २०–२२ देशांच्या मुली भेटायला येतात व स्वप्नातील संभाषणातून देशविदेशाच्या मुलामुलींचें जीवन, त्यांचे खेळ, सणे, कपडे, चालीरीति, सण इत्यादि स्पष्ट होतें असा हा कथाभाग असल्यामुळें हें पुस्तक माहितीपर असूनहि रंजक झालें आहे.

या स्वप्नकथेचेंच माध्यम घेऊन श्री. दि. बा. मोकाशी यांनीं 'जगाच्या कोलांट्या' ही एक मजेदार भौगोलिक काल्पनिका लिहिली आहे. अजित नांवाच्या मुलाला मामानें पृथ्वीचा गोल आणून दिला होता. झोपेंत हा गोल हलला, स्टँडमधून निसटला व उत्तर ध्रुवाचें टोंक काश्मीर जवळ आलें व मग एकंदर हिंदुस्थानांतच उत्तर ध्रुवाचें राज्य सुरू झालें, असा हा कथाभाग जेवढा कल्पकतेचा तेवढाच आगळ्या वर्णनाचा. हें स्वप्न मुलांना आवडावें असेंच आहे. त्यांना अशी 'माहितीपर स्वप्नें' पडतील तेवढीं हवींच आहेत.

भूगोल हा विषय एवढा व्यापक कीं त्यावर किती लिहिलें जाईल तेवढें थोडेंच. कांहीं छोट्या पुस्तकांतून या विषयांतील मजेदार गोष्टी तेवढ्या वेंचून बालवाचकांपुढें मांडण्याचाहि प्रयत्न बऱ्याच लेखकांनीं केला आहे. 'ज्ञान व मौज' या गोंधळेकरांच्या पुस्तकमालेंतलें बारावें पुष्प 'इतिहासभूगोलांतील जमती' या नांवाचें आहे. अनाथ विद्यार्थीगृहाच्या स्वाध्यायमालेंतहि, सिकीम व मलबारमधले लोक, उत्तर भारतांतले लोक, राजपुताना व गंगाखोरें यांतले लोक, अशी माहिती सौ. लीला भागवत यांनीं दिली आहे. तर लोकजीवनाऐवजीं याच स्वाध्यायमालेंतून स्थलवर्णनात्मक पुस्तिकाहि प्रसिद्ध झाल्या आहेत. नालंदा (श्री. श्री. रा. टिकेकर), पाटलीपुत्र (प्रा. द. गो. कोपरकर), बद्रीकेदारचा प्रवास, इत्यादि पुस्तकें या दृष्टीनें पाहावीं. मात्र हीं संकलनें अगदीं एवढीशी भासतात. त्यांनीं मुलांचें ज्ञानवर्धन होत असलें तरी त्यांची पुरी तहान शमवण्यास त्यांना भूगोल विषयाचें वाचनक्षेत्र कितीतरी विस्तृत करावें लागेल.

जगांतल्या लोकराहणींत वैचित्र्य व विविधता असल्यानें केवळ अशा लोकविलक्षण बाबतींचें संकलन देखील भूगोलविषयक माहितींत भर घालून मुलांचें ज्ञानवर्धन करतें हें ओळखून अशींहि पुस्तकें तयार होतात तीं भौगोलिक सदरांतच मोडतात. 'प्राचीन व अर्वाचीन आश्चर्यें' हें न. रा. पारसनीस यांचें अनुवादित पुस्तक याच पद्धतीचें. यांत जगांतली प्रसिद्ध सात आश्चर्यें तर आहेतच, पण एवढीच या पुस्तकाची व्याप्ति असती तर याचें स्वरूप निर्भेळ भौगोलिक म्हणतां आलें असतें. याच्या कांहीं प्रकरणांतून कागद, मुद्रणकला, वैद्यकशास्त्रांतील आश्चर्यें, सिनेमा इत्यादि शास्त्रीय आश्चर्येंहि आलीं व त्यामुळें हें पुस्तक शास्त्रीय माहितीचें झालें आहे!

इतिहासविषयाची रुक्षता जशी कथाकादंबरींत उपयोगिलेल्या लालित्यानें पळून जाते तद्वत् भूगोलाची कंटाळा आणणारी माहिती प्रवासवर्णनांत नव्याच रंगानें व आगळ्या रंजकतेनें खुलूं लागते. प्रवास हा भूगोलाचा स्नेहीसोबतीच; पण तो त्याबद्दल केवळ रुक्ष माहिती सांगणारा, शिकवणारा नव्हे, तर स्वतांच सारा

भूगोल हिंडून साक्षात् त्याचें दर्शन घेणारा व इतरांना माहितीरूपानें त्या दर्शनाचा प्रत्यय घडवणारा हा मित्र! मुलांना हा भूगोलाहूनहि अधिक खेळकर व आवडता वाटतो.

प्रवासवर्णनांचीं पुस्तकें बालसाहित्यांत फारशीं नाहींत. पण जीं आहेत त्यांत भूगोलाच्या अज्ञात प्रदेशाचा शोध लावणाऱ्या प्रवाशाच्या हकिकतीच अधिक सांपडतील. मा. गो. काटदरे यांचें 'जगाचे शोधक', जगताप यांचें 'धाडसी प्रवासी', कै. श्री. म. माटे यांचें 'जगाचे प्रवासी–भाग ३', श्रीकांत राय यांचें 'दक्षिण ध्रुवाचीं क्षितिजें', इत्यादि अनेक पुस्तकें या संशोधन मोहिमावर आधारलेलीं आहेत, त्यामुळेंच त्यांत धाडससाहसाइतकाच रंजकपणाहि उत्पन्न झालेला आहे.

भूगोलांतील अज्ञात प्रदेश शोधणारे प्रवासी सर्वांच्या माहितीचे आहेत. मंगोपार्क, लिव्हिंगस्टन्, कोलंबस, वास्को ड गामा, मार्को पोलो हीं नांवें विद्यार्थ्यांच्या कानावरून कित्येकदां गेलेलीं, तेव्हां वरील सर्व पुस्तकांतलें वर्णनक्षेत्र व व्यक्ति आणि प्रवासमार्ग या सर्व गोष्टी एकरूपच असाव्या यांत नवल नाहीं. एकाच व्यक्तीचे जसे वेगवेगळ्या तऱ्हेचे फोटो घ्यावे तसाच प्रकार. मात्र काटदरे यांनीं आपल्या पुस्तकांतलें हें कथन प्रवासी स्वतःच हा वृत्तांत सांगत असल्याचें कल्पून गोष्टीरूप केल्यानें तें अधिक रंजनप्रधान झालें आहे. तक्रार एवढीच कीं, या पुस्तकाचें स्वरूप अगदीं त्रोटक आहे. जगाचे शोधक आणखीहि पुष्कळ आहेत; त्यासाठीं त्यांनीं पुढले भाग लिहावयास हवे होते; आणि हीच अपेक्षा कै. श्री. म माटे यांनीं 'जगाचे प्रवासी' या पुस्तकाच्या तीन्ही भागांत पुरी केली आहे. यामध्ये ध्रुवप्रदेश शोधणाऱ्या अमुंडसेनापासून तों धर्मपर्यटन करणाऱ्या ह्युएत्संगापर्यंत अनेकांचे प्रवास आहेत. त्यातील हालविपत्तींचे व यशाचेंहि सुरेख वर्णन आहे. कै. माटे यांची भाषा गंभीर असूनहि वेधक, त्यामुळें हींहि पुस्तकें चांगली झाली आहेत. मात्र ही कथनपद्धत निबंधात्मक आहे.

दक्षिणध्रुव शोधणारांची संख्याहि कांहीं कमी नाहीं. स्कॉट, शॅकल्टन, अमुंडसेन, मॉसन आणि बायर्ड हिलरी असे अनेक साहसी प्रवासी प्राणाची पर्वा न करितां दक्षिण ध्रुवाकडील निर्मनुष्य बर्फमय प्रदेशाचा संशोधक वृत्तीनें प्रवास करणारे. त्या सर्वांची एकत्र व एकसूत्री माहिती श्रीकांत राय यांनीं 'दक्षिण ध्रुवाचीं क्षितिजें' या पुस्तकांत दिलेली मोठी वाचनीय व ज्ञानवर्धक ठरावी. या प्रवासांत संकटें होतींच, पण तीं गोठणाऱ्या बर्फाची होती; हिमवादळांची होती; हिमदऱ्या तर होत्याच; स्कर्व्ही दंतरोगानें त्यांना छळलेंच व अत्यंत विषम हवामान व बर्फ प्रदेशातल्या थंडीनेंहि हैराण केलें! या सर्वांच्या रोमहर्षक घटना व यांतूनहि दक्षिण ध्रुव व अंटार्क्टिका खंडाचा शोध लावणाऱ्यांची स्फूर्तिदायक चरित्रें यांत आलीं

आहेत. वि. श्री. मोडक यांनींहि भूगोलावरील 'साहसी प्रवासी' भाग १-२ हीं पुस्तकें १९३९ सालीं लिहिलीं. त्यांतूनहि दक्षिणध्रुव संशोधकांचा रोमहर्षक इतिहास आलेला आहे. तेनसिंग हें नांव माहीत नसलेला विद्यार्थी आज सांपडणार नाहीं. तेनसिंगाच्या यशस्वी गिर्यारोहणापासून भौगोलिक पुस्तकांत याहि एका नव्या विषयाचा समावेश झाला आहे.

श्रीकान्त राय यांनीं याच विषयावर 'विषयाच्या कळसावर', 'गगनचुंबन' 'पर्वताची हांक', व 'गगनाला गवसणी' इत्यादि माहितीपर पुस्तकें लिहिलीं. *स्वतः लेखक हे हिमालयमंडळ, पुणें, या संस्थेचे सदस्य असल्यानें त्यांनीं आपल्या* अत्यंत आवडत्या विषयावर हें लेखन केलेलें असून त्यांत भाषाहि प्रभावी; तेव्हां हीं सर्व पुस्तकें कुमारमनांतील धाडसी प्रवृत्तीला आवाहन करणारीं व त्याबरोबर एका अवघड साहसी कलेचें ज्ञान देणारीं झालेलीं आहेत. 'एव्हरेस्टवर आरोहण', हें दा. सी. देसाई यांनीं सर जॉन हंटच्या पुस्तकावरून अनुवादित केलेलें पुस्तकहि गिर्यारोहणाची माहिती व अनुभव सांगणारेंच आहे.

केवळ धाडसाच्याच हकीकती नसल्या तरी परदेशचे आचारविचार व लोकजीवन हे ज्ञानवर्धनाच्याहि दृष्टीनें उपयुक्त ठरतातच हें जाणून पाटणकर यांनीं 'विलायतची डाक' हें एक पत्रपुस्तक लिहिलें त्यांत युरोपियन लोकांची वैशिष्ट्यें व राहणी ही फार रंजक तऱ्हेनें वर्णिली आहे; आणि विशेष म्हणजे हीं पत्रें त्यांनीं *आपल्या धाकट्या बहिणीला लिहिलीं आहेत.* तेव्हां इतर विद्यार्थीवर्गालाहि ती उपयुक्त ठरणारीं आहेत. भाषा खेळकर व वृत्ति ज्ञानग्रहणाची अशी असल्यानें हीं पत्रें सरस झालीं आहेत.

खास मुलांसाठीं साक्षेपानें भारत प्रवासाचीं वर्णनें लिहिण्याचा एक प्रयत्न अगदीं अलिकडे झाला आहे तो जरूर उल्लेखनीय ठरेल. श्री. श्रीपाद जोशी यांनीं लोकयात्रा या नांवाचें एक सुंदर पुस्तक लिहिलें आहे. तें मुलांसाठीं लिहिलें असून अर्पणहि कुमारमित्रांनाच केलेलें आहे! याचें वैशिष्ट्य असें कीं, भारतांतील राजकीय परिस्थितीनें जे प्रांत मुलांच्या आर्धाच अप्रत्यक्ष माहितीचे झालेले असतात *त्यांची पूर्ण माहिती–राजकीय, भौगोलिक व सांस्कृतिक–अशी यांत आली* आहे व त्या दृष्टीनें केरळ, सौराष्ट्र, उत्कल इत्यादि प्रकरणें फार रोचक झालीं आहेत. मात्र या सर्वच लेखनावर प्रौढ कथनाचें सावट आहे. पद्धत निबंधरूप आहे व त्या मानानें रंजकत्व उणावलें आहे.

पं. महादेवशास्त्री जोशी यांचें 'महाराष्ट्राचीं धारातीर्थें,' व 'तीर्थरूप महाराष्ट्र' *हीं दोन्हीं पुस्तकें अशीं तीर्थक्षेत्रांच्या प्रवासाचीं;* पण त्यांत दैवतकथा, स्थलमाहात्म्य व तेथलें निसर्गसौंदर्य या सर्वांचाच असा सुंदर मिलाफ झाला आहे कीं, हीं

प्रवासवर्णनें वाचून प्रत्यक्ष यात्रा करीत असल्याचें मानससौख्य वाचकांना मिळेल. दृकप्रत्ययाचें, साक्षात् देशदर्शनाचें भाग्य सर्वांना प्राप्त न झालें तर वर्णनचित्रांनी ती तहान थोडीबहुत शमविण्याचें कार्य तरी अशीं पुस्तकें करूं शकतातच ना ! झालें तर ! त्या दृष्टीनें कांहीं चांगलीं प्रवासवर्णनें खास मुलांसाठीं लिहिलीं गेलीं आहेत. उदाहरणार्थ, 'काश्मिरी करंडी' हें प्रा. चारुशीला गुप्ते यांचें पुस्तक पाहा. यांतहि एका मुलाला स्वप्नच पडतें व काश्मिरी करंडीत बसून तो सर्व काश्मीर हिंडून येतो असें दर्शविलें आहे. या क्षेपांची हकिकत कोठल्याहि मुलाला काश्मीरचें अप्रत्यक्ष दर्शन शब्दरूपांत घडवूं शकणारी, मोठी मजेदार आहे. आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे ही हकिकत मुलानेंच सांगितलेली असल्यामुळें त्यामुळें त्यांत अधिकच रंजकता आली आहे.

आजकाल नव्यानें कांहीं पुस्तकें या प्रवासविभागांत लिहिली जातात, तींहि उल्लेखनीय आहेत. व्होरा आणि कंपनीनें 'सांस्कृतिक महाराष्ट्र दर्शनमाला' हीं आठ पुस्तकें प्रसिद्ध केलीं. त्यांतहि प्रांतीय व प्रादेशिक भिन्नत्व दर्शवण्यासाठीं 'विदर्भपरिसर' हा स्वतंत्र विभाग दर्शवून तेथल्या संस्कृतिकेंद्राचा ऊर्फ तीर्थांचा परिचय घडविला आहे. लिहिण्याची पद्धत अशी कीं दरेक स्थलाचें अप्रत्यक्ष दर्शनच लेखक वाचकाना घडवीत आहे व तेथली पुराणकथा, स्थलमाहात्म्य व ऐतिहासिक पार्श्वभूमि समजावून सांगत आहे. 'इथें टेकले श्रीराम,' 'विदर्भपंढरी,' वगैरे पुस्तकें चांगलीं साधलीं आहेत. मात्र ह्या मालेचीं पुष्पें फारच चिमुकलीं असतात व माहितीच्या दृष्टीनें तीं अपुरींच वाटतात हें मनांत आल्यावांचून राहत नाहीं.

भूगोल हें शास्त्र त्याच्या नावाप्रमाणेंच प्रचंड; पण त्यावर बालोचित लिखित ग्रंथनिर्मिती किती अत्यल्प आहे हें आपण पाहिलेंच. अर्थात्, पूर्वीं हें प्रमाण जवळजवळ शून्यांशावर होतें. आतां भाग्य मानावयाचें तें एवढेंच कीं, विसाव्या शतकांत हीं पुस्तकें निर्माण तरी होऊं लागलीं आहेत ! शिवाय त्यांत विविधतेचा आढळ व्हावा ही तर अधिकच आशाजनक बाब आहे असें म्हणावेंसे वाटतें !

## खगोलशास्त्र

शास्त्रीय विषयांतील या कांहीं पुस्तकांतून आकाशमंडळ व ग्रहगोल यांची माहिती आलेली आहे. कारण भूगोलासारखेंच खगोलशास्त्र हेंहि महत्त्वाचें व आजकाल तर तें रॉकेट, आकाशयान, रडार, स्पुटनिक इत्यादि साधनांनीं अधिक परिचयाचें होऊं लागलेलें. तथापि या शास्त्रावर स्वतंत्र अशीं बालपुस्तकें अजून

उपलब्ध नाहींत. वि. आ. मोडक यांचें ' *गगनातील गोष्टी,* ' *अ. बा. मराठे* यांचें ' अंतरिक्षातील अकरा ग्रह, ' अशीं एकदोनच ठळक नांवें या क्षेत्रांत दिसतील.

पूर्वकालीं आकाशांतील तारे माणसाला दिशादर्शन करायचे. त्या वेळीं ज्या अनेकानेक पुराणकथा उदयाला आल्या, त्याचा खरेखोटेपणा सिद्ध करणें कठिणच; *पण या सर्व गोष्टींत बुध, गुरू, मंगळ, शनि, ध्रुव इत्यादि तारे मनुष्य वा देवरूप* घेऊन वावरतात व सूर्यचंद्रभ्रमण, आकाशांतले ग्रह व त्याची कक्षा, आकाशगंगा, उषा, अरुण यांवरहि हजारों रूपकें आधारलेलीं असतात हें मान्य करावे लागतें. लोककथांतल्या कितीतरी गोष्टींत सूर्यचंद्र, शनि इत्यादि मानवरूप आढळतात. ध्रुवाचें अढळस्थान हा तर वाङ्मयांतला एक मान्यता पावलेला संकेतच झाला आहे. अशा या तारकांवर आधारलेल्या जुन्या दंतकथांचें वा पुराणकथांचें एकत्रीकरण वि. आ. मोडकांनीं ' *गगनातील गोष्टी*'मध्यें केलें आहे.

या पुस्तकाची बैठक कौटुंबिक संवादाची आहे. तसेंच कथनपद्धति सोपी व गोष्टीरूप; *यामुळें यांत कोठेंहि रुक्षता आलेली नाहीं. व्याध व मृगनक्षत्राची कथा,* ध्रुवतारा इत्यादि गोष्टी पाहाव्या. आणखी एक विशेष म्हणजे दरेक तारकापुंजाबद्दल पाश्चात्य ग्रीक पुराणांतहि ज्या कथा आहेत, त्यांचाहि परिचय देण्यानें नवें ज्ञानवर्धन व आगळेपणा या दोहोंचाहि वाचकाला लाभ होतो. या दृष्टीनें व्याघनक्षत्राला ' राक्षसाचा डोळा ' हें नांव त्यांनीं दिलें त्याची कथा पाहावी. यांत तऱ्हेतऱ्हेच्या आकृतीहि दिल्या आहेत. त्यानें ग्रहसमजूत अधिक स्पष्ट होते. शेवटीं स्वाध्यायप्रश्न वगैरे आहेत, त्यामुळें शिक्षणक्षेत्रांतलें हें पुस्तक असल्याचें सिद्ध होतें.

अ. वा. मराठ्यांचें पुस्तक याहून वेगळ्या प्रकारचें आहे. ग्रहांचें देवत्त्व तर त्यांनीं मान्य केलेलें आहेच, पण त्यापेक्षांहि तत्संबंधीं शास्त्रशुद्ध माहितीच अधिकांश यांत आलेली आहे. ग्रह, त्यांचें पृथ्वीपासूनचें अंतर, त्यांची कक्षा, त्यांचें दर्शन व त्यासंबंधींचे शोध या सर्वच गोष्टींचें या पुस्तकांत विवेचन आहे. शिवाय नवीन उदयास आलेले तारे युरेनस व नेपच्यून यांचेंहि ( प्रजापति व वरुण अशीं नांवें या नव्या ग्रहांना कै. जनार्दनपंत मोडक यांनीं दिलीं होती तीं मान्य करून ) वर्णन करण्यांत आलें आहे. पौराणिक कथाप्रवाहहि यासंबंधीं जे प्रचलित आहेत, ते थोडक्यांत दिले गेले आहेत. मोडकांच्या पुस्तकाहून याचें स्वरूप अधिक शास्त्रीय व माहितीचें आहे. याहि पुस्तकांत शेवटीं अभ्यास प्रश्न आहेतच.

या विषयाचीं पुस्तकें अगदीं कमी असलीं तरी ती उणीव भरून काढणाऱ्या एका फार विस्तृत व उत्कृष्ट ग्रंथाची त्यास अगदीं अलिकडेच जोड मिळाली आहे. तो ग्रंथ म्हणजे किशोरकुमारांचा संदर्भ ग्रंथ ज्ञान-पारिजात. याचें पहिलें पुष्प " मी अनंत विश्वाचा रहिवासी " हें होय. आधीं मुलांसाठीं संदर्भग्रंथ कोश वगैरे

नाहींतच. नाहीं म्हणायला नुकतेंच निघालेलें 'अमरकुमार विश्वकोश' हें २०० पृष्ठांचें पुस्तक आहे; पण त्याची छपाई नीट नाहीं. माहिती अपुरी व चित्रें सामान्यच अशा दृष्टीनें तो 'कोश' म्हणून शोभणारा नव्हे. त्या पार्श्वभूमीवर हा सुंदर व अद्यावत् माहितीचा कोश आपल्या नाविन्यानें व सजावटीनें उठून दिसावा यांत नवल नाहीं. यांत अंतराळसंबंधीं ज्ञानाचें मौलिक विवेचन आहे. सूर्य, चंद्र, पृथ्वी, त्याचे ग्रह, उपग्रह व कक्षा, निरनिराळे तारे, त्यांचें भ्रमण, शेंडेनक्षत्र इत्यादि सर्व प्रकारची सांगोपांग शास्त्रशुद्ध माहिती या पहिल्या पुष्पांत आली आहे व कोश असला तरी याची भाषा खेळकर व वाचनाभिमुख करणारी अशी चटकदार आहे. कालव्यांचे गूढ निर्मिणारा नारिंगी मंगळ, गुरु-वसुधामाईचा अगडबंब बडादादा, भास्कराचीं भटकीं पोरें, हीं शीर्षकेंच पाहाना किती नवलपूर्ण व आकर्षक आहेत तीं! लेखनपद्धतीहि अशीच वाचकांना विश्वासांत घेऊन लिहिलेली आहे. शिवाय हा कोष सचित्रहि आहे. अंतराळ-नक्षत्रें यासंबंधींचें इतकें सुंदर व एकत्र वर्णन बालसाहित्यांत क्वचित्च कोठें असेल! ●●●

## सृष्टिज्ञान व प्राणिशास्त्र

वनस्पतिजीवनाबद्दल मोठ्यांसाठीं बरींच पुस्तकें लिहिलीं गेली आहेत. परंतु मुलांकरितां लिहिलेल्या पुस्तकांची संख्या अत्यल्प दिसते. डॉ. श्री. ना. वाळिंबे यांनीं 'जगाच्या जंगलांत' या नांवाचें एक पुस्तक बऱ्याच वर्षांपूर्वीं लिहिलें होतें. या पुस्तकाची भाषा क्रमिकाप्रमाणें रुक्ष माहितीची होती व त्यामुळें तें बालप्रिय झालें नसावें. वि. श्री. मोडक यांनींहि 'भूगोलावरील वनस्पतींचे प्रदेश' हें पुस्तक लिहिलें. हीं दोन्हीं पुस्तकें सृष्टिशास्त्राबद्दल असूनहि भूगोलाच्या अभ्यासांत दाखल होण्याजोग्या परिभाषेंत लिहिलीं गेलीं आहेत. हींच प्रारंभिक वनस्पति पुस्तकें! ३०-४० वर्षांपूर्वीं लॉंगमन्स आणि कंपनीतर्फे 'सायन्समाला' म्हणून कांहीं पुस्तकें शाळांतून दाखल झालीं होतीं. त्यांत कांहीं झाडाची व फुलांची माहिती अतिशयच खेळकर भाषेंत व मोठ्या टाईपांत दिली होती. तीं फार सरस पुस्तकें होतीं व त्यांना 'शालेय' हें नांव मिळालें तरी तीं अत्यंत रजकहि होतीं.

श्री. वि. ना. गोखले यांनीं या विभागांत मुलांसाठीं बरीच उल्लेखनीय कामगिरी केली आहे. त्यांनीं वनस्पतिजीवन व सृष्टिनिरीक्षण असे दोन ग्रंथ सर्व झाडांची माहिती देणारे असे लिहिले. त्यांत वनस्पतींचे प्रकार, वाढ व स्वरूप असें सांगोपांग विवेचन केलेलें दिसून येतें. या दोन्ही पुस्तकांचा विशेष हा कीं, मुलांना केवळ थोडीशी रंजक माहिती सांगण्याचा हेतू नसून विद्यार्थ्यांना उपयोगी पडावी अशी यांत सोपपत्तिक माहिती विस्तारानें दिली आहे व शास्त्रीय दृष्टिकोनानें सर्व पुस्तक लिहिण्यांत आलें आहे.

अगदीं अलिकडे काहीं चांगलीं पुस्तकें या विषयावर लिहिलीं गेलीं आहेत. देवीदास बागूल यांचें 'मोहोरणारीं झाडें' हें त्यांपैकींच एक. बागूल यांनीं आंब्याचा मोहोर, गुलमोहोर, निंबोणीचें झाड, शिरीष, पारिजातक अशा

काहीं निवडक वृक्षाची ओळख करून दिली आहे; आणि तीहि हितगुज पद्धतीनें. म्हणून या पुस्तकाची आवश्यकता वरीच वाढली आहे. शास्त्रीय विषयात ललित हितगुज पाहिलें कीं फळबागेंत सुंदर फुलेंहि फुलल्यासारखें प्रसन्न वाटतें! बागूलाची भाषा वनस्पति जीवनाचें सूक्ष्म निरीक्षण करणारी तर आहेच, पण त्याच्या जोडीला ती काव्यमयतेनेंहि नटलेली दिसते. उदाहरणादाखल शिरीषवृक्षाचें पुढील वर्णन मननीय ठरावें

"रातराणी येते वर्षाऋतूत. पण शिरीष मात्र वसतच्या चाहुलीनेंच जागा होतो. एकाद्या काळ्या ओबडधोबड कातळातून गोड पाण्याचा झरा सळसळत वाहू लागावा त्याप्रमाणें ह्याच्या राठराठ फांद्यातून कोवळीं फुलें तरारून वर येतात. सकाळीं उमलतात. दोन दोन दिवस झाडावर राहून भोंवतालचें वातावरण सुगंधित करतात, आणि अखेर वृक्षाच्या पायावर गळून पडतात मला तर वसंताचें श्रेष्ठपण पटतें तें हीं शिरीषाचीं फुलें त्याच्याजवळ आहेत म्हणूनच. तुम्हीसुद्धा हीं फुलें पाहिलींच पाहिजेत. त्याशिवाय वसंतऋतूचें सौंदर्य श्रेष्ठ का, हें पूर्णपणें समजणार नाहीं" पृष्ठ १८–१९

अशा भाषेनें वनस्पतींचा हळुवार व सौंदर्यलक्षी परिचय मुलाना करून देणारें हें छोटें पुस्तक आणखी मोठें पाहिजे होतें असेंच कोणीहि म्हणेल!

नुकतींच सरकारी प्रकाशन संस्थेतर्फे 'निसर्गदर्शन' नावाची पाचसहा पुस्तकें १९५७ सालीं प्रसिद्ध झालीं आहेत. त्यातहि वनस्पति परिचय घडवणारी माधव राऊत याचीं काहीं छोटीं पुस्तकें आहेत 'आपल्या पावसाळी वनस्पति,' 'आपले सुंदर वृक्ष' अशीं त्यांची नावें आहेत. यातहि पांगारा, वहावा, पलाश, इत्यादि वेगळ्या वृक्षाचा परिचय इतक्या चागल्या प्रकारें देण्यात आला आहे कीं, ही वृक्षमाहिती मोठ्यानाहि उद्बोधक वाटेल. हीं पुस्तकें सचित्रहि आहेत.

या विभागातलीं पुस्तकें अशीं थोडीशींच. खरें म्हणजे निसर्गरम्यता वाढविण्याचें कार्य वनस्पति करतात व फुलाचें स्थान आपल्या जीवनातहि सौंदर्यवर्धक व पूज्य मानलें जातें. घरोघर छोटा बागबगीचा करण्यात येतो. फळाच्या समृद्धीची साक्ष तर रोजच्या दिनक्रमात वारवार पटते. तरीहि फळें, फुलें, वनस्पतींचें राज्य, त्याचे विविध उपयोग, त्याचें दर्शनसौंदर्य इत्यादि विषयावर ललितलेखन फारसें दिसत नाहीं. अर्थात शालेय वाङ्मय या विषयावर वरेंच आहे, मोठ्यासाठींहि आहे. परतु खास कुमारासाठीं या विषयावर पुस्तकें अगदीं कमी आहेत हें मान्य केलें पाहिजे. इग्रजी बालवाङ्मयातील याची समृद्धि पाहिली कीं ही गोष्ट विशेषच खटकते. मोठेमोठे सचित्र व मोठ्या टाईपात छापलेले सृष्टिशास्त्र-ग्रंथ यावर 'खास मुलासाठीं' लिहिलें गेलेलें पाहण्यात येतें. वाटतें, कीं केवळ याच्या

अनुकरणानेंहि ही शाखा फुलेल व फळाला येईल. पण हें काम एकट्याचें नाहीं, वा सर्वसामान्य लेखकाचेंहि नाहीं. ह्या विषयांतल्या तज्ज्ञ लोकांनीं बालांसाठीं असे ललितलेखं लिहिण्याचें मनांत आणलें तरच हे सृष्टिसौंदर्याचे मूर्त आलेख शब्दरूप होऊन मुलांना रिझवितील !

सृष्टिविज्ञानांत प्राणिजीवनहि येतें. ह्या विभागासंबंधीं मात्र बरींच कुमारोपयोगी माहिती पुस्तकें लिहिलेलीं दिसतात. सुमारें २५–३० वर्षांपूर्वी वि. आ. मोडक यांचें 'भूगोलवरील कांहीं विचित्र प्राणी ' हें एक छानदार पुस्तक प्रसिद्ध झालें. एकाद्या कुटुंबांतली लहानथोर मंडळी एकत्र गप्पा मारीत असावी व त्यापैकींच एका विद्वान् व्यक्तीनें प्रश्नोत्तररूपानें सर्वांना निरनिराळ्या विषयासंबंधीं माहिती द्यावी या कल्पनेनें 'आमची दिवाळी,' 'मुलांचें शंकासमाधान,' 'गगनांतील गोष्टी ' अशीं कित्येक पुस्तकें त्यावेळीं लिहिली गेलीं. हें पुस्तकहि त्याच पद्धतीचें. यांत खरोखरच पृथ्वीवर पसरलेल्या लोकविलक्षण प्राण्यांची माहिती आहे व ती सचित्र देखील आहे !

वि. आ. मोडकांनीं उपयुक्त माहिती पुस्तकाची अशी सुरुवात केल्यानंतर याच पद्धतीचीं अनेक पुस्तकें लिहिलीं गेलीं. विष्णु नारायण गोखले व वासुदेव गणेश देशपांडे या दोघांनीं मिळून "पशु, पक्षी व इतर प्राणी " या नांवाचें एक विस्तृत माहितीपूर्ण व अभ्यासक्रमाला मदतशील होईल असें पुस्तक लिहिलें. त्याचा उद्देश प्रस्तावनेंतून स्पष्ट झाला आहे. तो असा—

"मराठी वाङ्मयांत शास्त्रीय विषयांसंबंधीं माहिती देणारे ग्रंथ फारसे नाहींत. त्यामुळें ते विषय शाळांतून शिकविण्यास फार अडचण पडते. प्राणिशास्त्र या विषयावर सचित्र, सुलभ व भरपूर माहिती देणारें पुस्तक उपलब्ध नसल्यानें तसें एखादें पुस्तक लिहून ती अडचण अंशतः तरी दूर करावी म्हणून हा आमचा अल्पसा प्रयत्न आहे."

पुस्तक शालेय दृष्ट्या पुरवणीवाचन ठरावें या हेतूनें लिहिलें असलें तरी त्याचें लेखन मुळींच क्लिष्ट नाहीं. उलट, यांत कोठें कोठें संवादरूपानेंहि माहिती दिली आहे. जेथें कथनरूपानें दिली आहे तेथेंहि रुक्षतेऐवजीं लालित्य आढळतें. उदाहरणार्थ, साळू ( Hedge-hog ) बद्दलची माहिती पाहा.

"आपल्या टेबलावरील पिनूकुशनची कल्पना या प्राण्यावरूनच निघाली असावी. शत्रूच्या भीतीनें हा प्राणी आपलें तोंड व पाय पोटाशीं घेऊन आपल्या शरिराचा जवळजवळ चेंडूच बनवितो. त्याच्या अंगावरील कांटे अशा वेळीं पिनूकुशनवर टोंचलेल्या टांचण्याप्रमाणें दिसतात. ह्या प्राण्यास आत्मसंरक्षणाचें दुसरें साधन नसल्यानें हा वरील प्रकारची क्लृप्ति लढवून आपला बचाव करूं शकतो.

शत्रू काऱ्याचा गोळा आहे असें समजून निघून जातो. किंवा एखादा वास घेण्यास जवळ गेलाच तर त्याचे नाकास काटे बोचतात ! " ( पृष्ठ ३४–३५ )

पक्षी विभागातहि अशा मजेदार वर्णनाचीं उदाहरणें खूप आहेत. या सर्व वर्णनात काहीं लोकविलक्षण प्राण्याचीहि माहिती आली आहे. चष्मेवाला ( white eye ), हुप्पी, बाया, कोळमा इत्यादि पक्ष्याची व रोही, चितळ, भेकर इत्यादि पशूची माहिती नाविन्यपूर्ण आहे शिवाय पक्षी व पशुजीवनाचे बारकावे, वर्गभेद, खाद्य, घरटीं, सवयी इत्यादींचें वर्गीकरणहि अभ्यासू वृत्तीनें केलेलें दिसून येतें. यात सरपटणारे प्राणी, मासे व कीटक याचाहि परिचय आहे व एका दृष्टीनें जीवशास्त्रावरील हें पुस्तक पुष्कळच माहितीपूर्ण झालें आहे.

वि. ना. गोखले याच्याप्रमाणेंच ज. श. मेढेकर यानींहि या विभागात चागली कामगिरी केली आहे. त्यानी १९३० सालीं ' कीटकपरिचय ', १९३२ साली ' पक्ष्याची ओळख ' व १९३६ साली ' लवगी फटाके ' अशीं याच शास्त्रीय विभागातील वर्णनाचीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. पहिल्या पुस्तकात डास, पिसवा, झुरळ, ऊ, ढेकूण, माशी इत्यादि उपद्रवी कीटकाची सचित्र माहिती व त्यापासून सरक्षणाचे उपाय याच निवेदन आहे. ' पक्ष्याची ओळख ' हें जनार्दन श. मेढेकर व दिनकर विनायक शेंडे या दोघानी मिळून खास बालवाचकासाठीं लिहिलेलें पुस्तक. यात घार, कोंबडी, कबूतर, बदक, इत्यादि नित्यपरिचित पक्षी आहेत मेढेकर याची लेखनशैली सोपी व बालाना आवडेल अशी दिसून येईल. उदाहरणार्थ, घारीबद्दल हा प्रारभिक परिचय पाहा —

" तुमच्यापैकीं पुष्कळानी घार पाहिली आहे. घारी आकाशात उच भराऱ्या मारतात. अशा भराऱ्या मारताना पुष्कळ वेळा तीरासारख्या एकदम खाली येऊन डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंवर जमिनीवरचा पदार्थ आपल्या पायानें उचलून घेऊन दूर जातात. " ( पृष्ट १४ )

'लवगी फटाके ' हें पुस्तक मात्र थोडे वेगळ्या प्रकृतीचें आहे. यात कीटक, सरपटणारे प्राणी वगैरेंची माहिती मिळावी अशा प्रकारच्या लहान गोष्टी आहेत. नागोबा, ढेकूणवाडीचा पाटील वगैरे गोष्टी कथा म्हणून अर्थातच सरस झालेल्या नाहींत. शास्त्रीय माहितीला कथामाध्यम फारच कुशलतेनें वापरावें लागतें. कथागुण व माहितीगुण एकोप्यानें नादणें म्हणजे सासुसून यानी समान अधिकारानें घरात राहण्यासारखेंच कठीण काम ! त्यापेक्षा शास्त्रीय माहिती निबध–माध्यमातच खुलतें आणि यामुळेंच मेढेकराच्या पहिल्या दोन पुस्तकाचें महत्त्व अधिकच उठून दिसतें.

अलिकडे काहीं चागलें प्रयत्न याहि क्षेत्रात दिसतात. ठिगळेबधूनीं प्राण्या बद्दल, ' जगली प्राणी ', ' पाळीव प्राणी ', ' शिकारी प्राणी ' व ' देशोदेशींचे प्राणी '

अशीं चार पुस्तकें लिहिलीं. हीं छोटीं पुस्तकें बालविद्यार्थ्यांसाठींच आहेत. माहिती सुबोध आहे व ती संवाद, आत्मवृत्त इत्यादि रूपानें दिली आहे. कोठेकोठें छोटें कथासूत्रहि घेतलेलें दिसतें. नवीन अभ्यासक्रमास उपयोगी पडावी अशीच याची रचना, म्हणून शेवटीं प्रश्नहि आहेत. यांतहि पौश्या, कुक्कुटकुंभा इत्यादि वेगळ्या पक्ष्यांची माहिती आली आहे.

नुकतीच 'विचित्र ही वसुंधरा' नावानें दोन छोटीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांत समुद्रावरील पक्षी व आफ्रिकेंतील वानरजाती याबद्दल माहिती आहे. ती संकलनात्मक टिपणांच्या रूपांत आहे. सौ. मालती दांडेकर यांनीं 'दुनियेंतील मौज' हें एक असेंच माहिती पुस्तक लिहिलें आहे. त्यांत तऱ्हेतऱ्हेचे मासे, लोकविलक्षण पक्षी, अद्‌भुत सरडे, जलराज्याचे मानकरी वगैरे विविध माहिती मुलांसाठी दिलेली आहे. ती चित्रांकित आहे. भाषा मुलांशीं हितगुज करण्याच्या पद्धतीचीच आहे. उदाहरणार्थ —

"हें पाहा एक प्रचंड फुलझाड ! जणु एकाद्या टोपलींत कोणी सूर्यफुलांप्रमाणें छानदार रंगीत फुलेंच ठेवलीं आहेत ! पण हें देखील खरें फुलझाड नव्हे हो ! हा एक भयंकर जलचर आहे. याचें नाव ॲनिमोन. या ज्या असंख्य बारीक पाकळ्या वाटतात, त्याहि पाकळ्या नसून छोटे अवयवच आहेत. या मायावी रूपाला भुलून बिचारे छोटेमोठे मासे ही वनस्पति समजून ती खाण्याच्या इच्छेनें याच्याजवळ येतात. मग काय विचारतां ! प्रत्येक छोट्या पाकळींतून एकदम विषारी तंतू निघून त्या दुर्दैवी प्राण्याला बांधून टाकतात व मग या देखाव्याआड असलेल्या पोटांत हें भक्ष्य घालायला ॲनिमोनला उशीर लागत नाहीं. आपल्या पुराणांत पूर्वी राक्षस मायावी रूपें घेऊन लोकाना फसवीत असें वर्णन आहे, तसलाच हा मोहक राक्षस नाहीं कां ?"

या दृष्टीनें अलिकडचीं कांहीं नवीन पुस्तकें स्वागतार्ह ठरतील. सरकारी प्रकाशनांतील निसर्गदर्शन मालेंत माधव राऊत यांनीं 'आपले पक्षी,' आपले वन्य पशु' इत्यादि पुस्तकें आकर्षक शैलीनें लिहिलीं आहेत. त्यांत इंग्रजी नांवाबरोबरच सफेद ठिपकी, पॅंखा, नाचण, कवड्या सुतार, शिखाधारी सर्प गरूड, इत्यादि छानदार मराठी नांवेंहि *दिलीं आहेत व चित्रांनीं हीं पुस्तकें* साजूतहि दिसतात. फक्त तीं छोटीं आहेत एवढाच आक्षेप ! छपाई सुंदर आहे.

प्रि. सुमेरजी यांनीं शास्त्रीय स्वरूपाचीं कांहीं छोटीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. यांत 'प्राण्यांच्या जगांत 'वगैरे एकदोन पुस्तिका प्राणीजीवनाबद्दल आहेत.

याच प्रकारचें आणखी एक चांगलें पुस्तक 'विज्ञानाचें नवलपरीचें जग' नांवानें दोन वर्षापूर्वी प्रसिद्ध झालें आहे. हें 'द वंडर वर्ल्ड ऑफ सायन्स' या

इंग्रजी पुस्तकाचें मराठी भाषांतर मीना कर्णिक यांना केलें आहे. पुस्तकाची छपाई, दर्शन, मुखपृष्ठ, कागद, विपुल रंगीत चित्रें या सर्व बाह्य सजावटीनें हें पुस्तक इंग्रजी सुंदर पुस्तकाच्या तोडीचें झालें आहे खरें, परंतु मराठी भाषांतर मात्र तितक्या कसोशीनें केलें गेलें नसल्याचें वारंवार जाणवतें. उदाहरणार्थ, जंगलात राहणारे व मनुष्याश्रयी चतुष्पाद प्राणी असतात. त्यांना पशू म्हणणें योग्य आहे, पण "*काही पशू पाण्यात राहतात, काहीं पशू झाडावर राहतात...*" (पृष्ठ १४) हें भाषांतर किती सदोष वाटतें ! जलचर, पक्षी असे वेगळे अर्थसूचक शब्द मराठींत असून व भाषांतरकर्ती मराठी असूनहि ही सदोषता राहावी याचें आश्चर्य वाटतें. विषय मात्र मुळातच लहान वाक्यें व भरपूर चित्रें यांनीं शिशु व बालवाचकांना अतीव सोपा व सुबोध केलेला आहे व हें वैशिष्ट्य नाकारता येणारें नाहीं

कथासूत्राचें व शास्त्रीय विवेचनाचें सूत जमत नाहीं असें मी मागं म्हटलें आहे, पण त्या नियमाला अपवादरूप होणारें या विभागातलें एक पुस्तक आहे. त्याची माहिती पूर्णविरामाप्रमाणेंच या विवेचनाला पूर्णत्व देईल. तें म्हणजे "जंगलातली शाळा आणि जंगली जनावरें" हें होय. ह्यातल काहीं लेख स्कूल इन द वुड्स' या अमेरिकन पुस्तकातले असून काहीं 'जुने बालबोधमेवा' मासिकांतून घेतलेले आहेत व बहुतांशी देवदत्त टिळक यांनी ते लिहिलेले आहेत. वन्य पशूंचें जीवन निरीक्षण कसें करावें, त्यांच्या सवयी व स्वभाव कशाप्रकारें व्यक्त होतो, हें सर्व यात हसत खेळत सांगितलें आहे असलीं पुस्तकें जेवढी रंजक तेवढीं ज्ञानवर्धकहि असतात. ●●●

अशी चार पुस्तकें लिहिलीं. हीं छोटीं पुस्तके बालविद्यार्थ्यांसाठींच आहेत. माहिती सुबोध आहे व ती संवाद, आत्मवृत्त इत्यादि रूपानें दिली आहे. कोठेंकोठें छोटे कथासूत्रहि घेतलेलें दिसतें. नवीन अभ्यासक्रमास उपयोगी पडावी अशीच याची रचना, म्हणून शेवटीं प्रश्नहि आहेत. यांतहि पोपया, कुक्कुटकुंभा इत्यादि वेगळ्या पक्ष्यांची माहिती आली आहे.

नुकतीच ' विचित्र ही वसुंधरा ' नावाने दोन छोटीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांत समुद्रावरील पक्षी व आफ्रिकेतील वानरजाती याबद्दल माहिती आहे. ती संकलनात्मक टिपणांच्या रूपांत आहे. सौ. मालती दांडेकर यांनीं 'दुनियेंतील मौज' हें एक असेंच माहिती पुस्तक लिहिलें आहे. त्यांत तऱ्हेतऱ्हेचे मासे, लोकविलक्षण पक्षी, अद्भुत सरडे, जलराज्याचे मानकरी वगैरे विविध माहिती मुलांसाठीं दिलेली आहे. ती चित्रांकित आहे. भाषा मुलांशीं हितगुज करण्याच्या पद्धतीचीच आहे. उदाहरणार्थ —

" हें पाहा एक प्रचंड फुलझाड ! जणु एकाद्या टोपलींत कोणी सूर्यफुलांप्रमाणें छानदार रंगीत फुलेंच ठेवलीं आहेत ! पण हें देखील खरें फुलझाड नव्हे हो ! हा एक भयंकर जलचर आहे. याचे नाव ॲनिमोन. या ज्या असंख्य बारीक पाकळ्या वाटतात, त्याहि पाकळ्या नसून छोटे अवयवच आहेत. या मायावी रूपाला भुलन बिचारे छोटेमोठे मासे ही वनस्पति समजून ती खाण्याच्या इच्छेने याच्याजवळ येतात. मग काय विचारतां ? प्रत्येक छोट्या पाकळींतून एकदम विषारी तंतू निघून त्या दुर्दैवी प्राण्याला बांधून टाकतात व मग या देखाव्याआड असलेल्या पोटांत हें भक्ष्य घालायला ॲनिमोनला उशीर लागत नाही. आपल्या पुराणात पूर्वी राक्षस मायावी रूपें घेऊन लोकांना फसवीत असें वर्णन आहे, तसलाच हा मोहक राक्षस नाहीं कां ? "

या दृष्टीनें अलिकडच्यी कांहीं नवीन पुस्तकें स्वागतार्ह ठरतील. सरकारी प्रकाशनांतील निसर्गदर्शन मालेंत माधव राऊत यांनीं 'आपले पक्षी, ' आपले वन्य पशु ' इत्यादि पुस्तकें आकर्षक शैलीनें लिहिलीं आहेत. त्यांत इंग्रजी नांवाबरोबरच सफेद ठिपकी, पॅंखा, नाचण, कवड्या सुतार, शिखाधारी सर्प गरूड, इत्यादि छानदार मराठी नांवेंहि दिलीं आहेत व चित्रांनीं हीं पुस्तकें साजूनहि दिसतात. फक्त तीं छोटीं आहेत एवढाच आक्षेप ! छपाई सुंदर आहे.

प्रि. सुमेरजी यांनीं शास्त्रीय स्वरूपाचीं कांहीं छोटीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. यांत *'प्राण्यांच्या जगांत '*वगैरे एकदोन पुस्तिका प्राणीजीवनाबद्दल आहेत.

याच प्रकारचें आणखी एक चागलें पुस्तक ' विज्ञानाचें नवलपरीचें जग ' नांवानें दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालें आहे. हें ' द वंडर वर्ल्ड ऑफ सायन्स ' या

इंग्रजी पुस्तकाचें मराठी भाषांतर मीना कर्णिक यांनीं केले आहे. पुस्तकाची छपाई, दर्शन, मुखपृष्ठ, कागद, विपुल रंगीत चित्रें या सर्व बाह्य सजावटीनें हें पुस्तक इंग्रजी सुंदर पुस्तकांच्या तोडीचें झालें आहे खरें, परंतु मराठी भाषांतर मात्र तितक्या कसोशीनें केलें गेलें नसल्याचें वारंवार जाणवतें. उदाहरणार्थ, जंगलात राहणारे व मनुष्याश्रयी चतुष्पाद प्राणी असतात. त्यांना पशू म्हणणें योग्य आहे; पण " कांहीं पशू पाण्यांत राहतात, कांहीं पशू झाडावर राहतात..." (पृष्ठ १४) हें भाषांतर किती सदोष वाटतें ! जलचर, पक्षी असे वेगळे अर्थसूचक शब्द मराठींत असून व भाषांतरकर्ती मराठी असूनहि ही सदोषता राहावी याचें आश्चर्य वाटतें. विषय मात्र मुळांतच लहान वाक्यें व भरपूर चित्रें यांनीं शिशु व बालवाचकांना अतीव सोपा व सुबोध केलेला आहे व हें वैशिष्टय नाकारतां येणारें नाहीं.

कथासूत्राचें व शास्त्रीय विवेचनाचें सूत जमत नाही असें मी मागे म्हटलें आहे, पण त्या नियमाला अपवादरूप होणारें या विभागांतलें एक पुस्तक आहे. त्याची माहिती पूर्णविरामाप्रमाणेंच या विवेचनाला पूर्णत्व देईल. तें म्हणजे "जंगलातली शाळा आणि जंगली जनावरें " हें होय. ह्यातले कांहीं लेख स्कूल इन् द वुड्स ' या अमेरिकन पुस्तकांतले असून कांहीं 'जुने बालबोधमेवा' मासिकातून घेतलेलें आहेत, व बहुतांशीं देवदत्त टिळक यानी ते लिहिलेले आहेत. वन्य पशूंचें जीवन निरीक्षण कसें करावें, त्यांच्या संवयी व स्वभाव कशाप्रकारें व्यक्त होतो, हें सर्व यांत हंसत खेळत सांगितलें आहे. असलीं पुस्तकें जेवढीं रंजक तेवढीं ज्ञानवर्धकहि असतात. ●●●

## शास्त्रीय पुस्तकें

मुलांना रंजनप्रधान कथासाहित्याएवढेंच ज्ञानवर्धक व बुद्धिनिष्ठ साहित्य देणें अवश्य आहे, हें पटून रसायन व पदार्थविज्ञान यांवर शास्त्रीय विवेचन करणारी पुस्तकें अगदीं वि. कों. ओक यांच्या वेळेपासूनच लिहिलीं गेलेली दिसतात. जेम्स फॅरिश नांवाच्या एका सरकारी शिक्षणाधिकाऱ्यानें यांत विशेष लक्ष घातलें असें जुन्या शैक्षणिक अहवालांत नमूद आहे. खेडेगांवांतील विद्यार्थ्यांसाठीं बटाटे, आरारूट, ऊस, कापूस इत्यादि विषयांवर रंजक संवाद हवे असे त्याचें म्हणणें होतें व याबद्दलची त्या त्या विषयाची एक यादीहि त्यानें १८३८ सालीं प्रसिद्ध केलेली दिसते. [१]

या विषयाला सुरुवात झाली ती वि. कों. ओकांच्या 'कठिण शास्त्रांतील सोप्या गोष्टी' या एका माहितीपर पुस्तकापासूनच! हें पुस्तक १८९३ सालीं प्रसिद्ध झालें होतें. त्यांत शास्त्रविज्ञानांतील अनेक गोष्टींची माहिती एकत्र केलेली दिसते. या पुस्तकांत मिठाबद्दल लेख आहे. त्याचप्रमाणें मनुष्याच्या नेत्राची रचना हाहि आरोग्यविषयक लेख आहे. लोहचुंबक ह्या वस्तूची माहितीहि आहे तशीच 'युरेनस' या नव्या ताऱ्याबद्दलहि त्यांत माहिती दिलेली आहे. अशा अनेक विषयांचें शास्त्रीय विवेचन सुलभ भाषेंत यांत आलें आहे. मात्र हें पुस्तक केवळ बालांसाठींच लिहिण्यांत आलेलें नव्हतें असें दिसतें.

शास्त्रीय सूत्रें खरीं, पण तीं जर एखाद्या विस्तृत कथानकाभोंवतीं गुंफलीं व त्यांत प्रश्नोत्तरें योजून या विषयासंबंधीं माहिती सोप्या भाषेंत मुलांना सांगितली तर ती त्यांना अधिक आवडेल, हें जाणून, वा. गो. आपटे या बालमानस जाणणाऱ्या हौशी लेखकानें १९१२ सालीं 'एक दिवसाच्या मुदतींत' नांवाची एक दीर्घकथा

१ आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति—पृष्ठ ४२

पुस्तकरूपात प्रसिद्ध केली मुलाना शास्त्रीय विषयाची माहिती ललित परिवेषातून देणारें हें पहिलेंच पुस्तक असावें. नेहमींच पहिल्या प्रयत्नात उत्साह व नाविन्य दिसून येतें, तसेंच काहीं दोषहि अवश्य राहतात. या पुस्तकाची भाषा बालसुलभ व प्रसग घरगुती आहेत.

यातील नायकहि बाल्वयीच कल्पिलेला आहे. त्यामुळें निवेदनशैलीहि बालाना आवडणारीच आहे. परतु या गुणाबरोबरच यातील माहितींची भाषणें दोनदोन तीनतीन पृष्ठें सलग व्याख्यानें दिल्यासारखीं भासतात! वडील मडळींचे इतकें लाब लाब भाषण कथानायकाप्रमाणें वाचकानाहि कटाळा आणणारेंच ठरायचा सभव फार. दुसरी गोष्ट या माहितींत एकसूत्रता व सुसगतपणा याचाहि अभाव दिसतो. उदाहरणार्थ कथानायक रामू हा दहा वर्षांचा एक चिकित्सक व जिज्ञासू मुलगा व त्याला निरनिराळ्या शास्त्रीय गोष्टी प्रसगाप्रसगानें समजावून देण्याची लेखकाची भूमिका. रामू बाईनें जेवला, तेव्हा अन्नपचनक्रियेची नीट माहिती त्याला वडिलानीं दिली. मग त्यानें चहा घेतला, तेव्हा चहाचे दुष्परिणाम त्याला सागितले. पुढें तो काच कारखाना पाहयला गेला तेव्हा जाताना दिसलेले रेल्वेरूळ आणि प्लॅटफॉर्म व नतर काच याची माहिती, नतर भूगोलविषयक व शेवटी थर्मामीटर व पारा याची माहिती देऊन पुस्तक सपलें आहे.

या सर्व विषयाचें क्षेत्र एकच नाहीं. अन्नपचन, काच, रेल्वेरूळ, फिल्टर हे विषय परस्पराशीं किती विसगत आहेत! यापेक्षा काच, आरसा, तदनुषगें पारा, काचकारखान्यातला मुलगा, त्याचे श्रम व धोक्याचें जीवन, काचेच्या गोळ्यातलीं फुलें इत्यादि माहिती भिन्न प्रसग योजून दिली असती तर या पुस्तकाची एकसूत्रता कायम राहून मौलिकता वर्धित झाली असती. अर्थात् पन्नास वर्षापूर्वी या विषयावर लालित्यपूर्ण पुस्तकें नव्हतींच, तेथें तीं अवतीर्ण होणें हेंच अधिक महत्वाचें मानाव यास हवें.

आपट्यानीं शास्त्रीय विषयावर कथा लिहिली त्याप्रमाणें मुलाच्या जिज्ञासेची पूर्तता करण्याचे उद्देशानें काहीं सवादात्मक पुस्तकेंहि त्यानीं प्रसिद्ध केलीं. दैनदिन जीवनात मुलाच्या जिज्ञासेला वारवार चेतना मिळते. पाऊस सुरू झाला म्हणजे वीज का व कशी चमकते? ढग तर वाफेचे, मग ते एकमेकावर आपटून गर्जना कशी होते? उन्हानें कपड्याचे रग का विटावे? असे हजारो प्रश्न चौकस बालवृत्तीला सुचतात. अगदीं साध्या गोष्टी रस्त्या, पण या प्रत्येकास शास्त्रीय कारण असतें व तें समजल्यास मुलाचें समाधान होऊन त्याच्या ज्ञानात व माहितींत भर पडते हें जाणून, 'का व कसें' हीं छोटीं पुस्तकें आपट्यानीं चार भागात प्रसिद्ध केलीं. सवादरूप शास्त्रीय विवेचनाची ही पद्धत बरीच चागली होती म्हणून त्या दिशेनें या सुमारास आणखी काहीं उल्लेखनीय

प्रयत्न झालेले दिसतात. १९१३ सालीं ना. कृ. भावे यांचें. 'लहान मुलांकरितां शास्त्रीय पाठ' हें एक पुस्तक प्रसिद्ध झालें. तेंहि संवादरूपच होतें. त्यांत घन पदार्थ, सच्छिद्र पदार्थ, वनस्पति इत्यादि संबंधी वस्तुपाठ सोप्या भाषेंत दिलेले होते. सयाजी ग्रंथमालेतर्फे र. ब. फळणीकर यांचीं कांहीं या विषयावरील पुस्तकें याच सुमारास प्रसिद्ध झालेलीं दिसतात.

१९२१ सालीं या पुस्तकांना आणखी एक तन्हेची नवी चालना मिळाली. पुण्याला 'बालवाङ्मयप्रसारक मंडळ' नांवाची एक संस्था स्थापन झाली व तिनें 'बालवाङ्मयमाला' नांवाच्या मालेंतून मुद्दाम कांहीं शास्त्रीय पुस्तकें प्रसिद्ध केलीं. हवेंतील चमत्कार ( ले. विष्णु अमृत ठोंबरे ), तेजोनिधी सूर्य ( सर्वोत्तम वासुदेव देशपांडे ) इत्यादि त्यांतली कांहीं प्रकाशनें या दृष्टीनें पुष्कळच सुबोध व बालसुलभ ठरणारीं होतीं. मंडळाचा उद्देश तर फारच चांगला होता. या पुस्तकांतील निवेदनांतून तो पुढीलप्रमाणें प्रकट झाला आहे.

"लहान मुलांमध्यें शास्त्रीय विषयाबद्दल आवड उत्पन्न करण्यासाठीं, त्यांच्या मनस्थितीस पटतील अशीं पुस्तकें रचण्याची व त्यासाठीं मुद्दाम शास्त्रीय विषयांवर व्याख्यानें देवविण्याची वहिवाट पाश्चात्य देशांत रूढ झाली आहे, आणि याच धर्तीवर सरळ व सोप्या पण चित्ताकर्षक भाषेंत पुस्तकें रचण्याचा हा प्रयत्न आहे."

परंतु हा उद्देश व ही माला चांगली असूनहि दीर्घायुषी ठरली नाहीं. तथापि हाच उद्देश दृष्टीसमोर ठेवून नव्यानें कोणी हा उपक्रम पुन्हा चालू केला तर तो याहि काळात स्वागतार्ह ठरणारा आहे. १९२३-२४ च्या सुमारास न. ग. वाडदेकरांचीं कांहीं सुंदर शास्त्रीय पुस्तकें प्रसिद्ध झालीं, तीं या संदर्भात उल्लेखनीय ठरतील. रसायनशास्त्राचें नांव देखील आजवर ललित बालसाहित्यांत नव्हतें, तीं उणीव यांच्या 'औद्योगिक करमणूक', 'व्यवहारांतील शास्त्रीय गोष्टी' इत्यादि पुस्तकांनीं भरून काढली. यांची भाषा बालसुलभ व विवेचन खेळकर आहे. विशेष असा कीं, हींहि पुस्तकें संवादरूप आहेत व यांत आम्ल व अल्क वगैरेंची नुसतीच माहिती नाहीं तर सप्रयोग वर्णन आहे. वाडदेकरांनीं एक नवी दिशा या वाङ्मयाला लावली यांत शंका नाहीं. वा. गो. आपट्यांच्या प्रश्नोत्तररूप लेखनाचें माध्यम बालजिज्ञासेची पूर्तता करणारें व थोड्या वेळांत यथायोग्य माहिती देणारें होतें हें जाणून आजहि त्याच पद्धतीचा अवलंब केला जात आहे. 'ज्ञान आणि मनोरंजन' ( भा. रा. भागवतकृत ) 'मुलांचें व्यावहारिक ज्ञान व माहिती' ( गोंधळेकर ), 'हसत खेळत ज्ञानविकास' इत्यादि अनेक पुस्तकें या अनुकरणाची साक्ष देतील. मात्र एखाद्या पुस्तकाची नवी आवृत्ति काढतांना कांहीं उपयुक्त नवी सुधारणा दिसावी त्याप्रमाणें कालमानुसार या विज्ञानशाखेंतहि अनेक तन्हेची महत्त्वाची, मोलाची माहिती जमा होत आहे. नव्या शास्त्रीय शोधाचें

विविध विस्तारत आहे, त्यामुळें त्याहि प्रकारच्या अनेक प्रश्नउपप्रश्नांची उत्तरे यात दाखल करावी लागत आहेत. म्हणून अणुशक्ति म्हणजे काय, टेलिफोनमधून आवाज कसा जातो, इत्यादि प्रश्न कुमारजिज्ञासेला आवाहन करणारेच आहेत त्यांचेंहि विवेचन भागवताच्या पुस्तकातून आढळतें. इंग्रजींत 'जनरल नॉलेज' चें मकरन्द मुलांसाठी अनेक रूपात पाहयला मिळतेंच, त्याचीच ही मराठी प्रतिकृति पण ल्हान प्रमाणात एवढेंच. अशी पुस्तकें निघतील तेवढी हवी आहेत. शास्त्रीय पुस्तकाच्या संदर्भात आणखी एका चांगल्या पुस्तकाचा अवश्य उल्लेख करावा लागेल, तो पं. नेहरूंच्या 'इंदिरेस पत्र' या पुस्तकाचा. ही पत्रें त्यांची कन्या इंदिरा दहा वर्षांची असताना तिला लिहिलेली आहेत. पत्र हें लेखनमाध्यम घरगुती प्रेमळ स्वरूपाचें व ल्युनिग्रथाप्रमाणें आत्मभावप्रकट करणारें मानलें जातें. पण पंडितजींची हा पत्रें अशीं मुळीच नाहींत. त्यांनीं ही पृथ्वी कशी तयार झाली याचा सोपपत्तिक पण सोपा इतिहासच इंदिरेस (व पर्यायानें तिच्या वयाच्या बालपिढीस) सांगितलेला दिसतो. निसर्गाचा ग्रंथ, प्राण्यांची उत्पत्ति, पहिला मानववंश, प्राचीन संस्कृति व सुधारणा इत्यादि कांहीं प्रकरणांचीं शीर्षकें पाहिलीं तरी या लेखन विषयाची कल्पना येईल. मानवी जीवनाचा प्रारंभ व विकास, सृष्टिनिर्मिती इत्यादि विषय दहा वर्षांच्या मुलांना समजण्यास कितीतरी अवघड व क्लिष्ट. परंतु पंडितजींची विवेचनपद्धति रंजक व मांडणी सुंदर असल्यानें हें पुस्तक ज्ञानवर्धक असूनहि मनोरंजक झालें आहे. भाषाहि किती सुबोध सोपी वापरली आहे तें पुढील परिच्छेदावरून ध्यानीं येते'—

"इंदिरे, तू कदाचित म्हणशील की, मनुष्य व इतर असंख्य सजीव प्राणि हीच जीवसृष्टी ! पण मग झाडेंझुडपें, वनस्पति व फुलें यांचें काय ? त्यांना सुद्धा जीव आहे हें खचित. तीं आपणासारखीच वाढतात, पाणी पितात, हवा घेतात व शेवटीं मरतात. इतर सजीव प्राणि व झाडें यांच्यातील मुख्य फरक हा कीं, झाडें इकडेतिकडे हालचाल करू शकत नाहींत. लंडनमध्यें असताना क्यू नावाच्या उद्यानात मी तुला काहीं झुडपें दाखवलीं तीं तुला आठवतात का ? इंदिरे, तीं ऑर्चिड व पिचर नावाचीं झुडपें तर प्रत्यक्ष जिवंत माशांना खातात. तसेंच स्पंज मारखे काहीं प्राणि समुद्राच्या तळाशीं राहतात पण ते हालचाल मात्र मुळींच करीत नाहींत कधींकधीं एखादा पदार्थ प्राणि आहे कीं वनस्पति हें सांगणें फारच कठीण जातें. तू जेव्हा वनस्पतिशास्त्राचा व प्राणिशास्त्राचा अभ्यास करशील तेव्हा धड प्राणि नव्हेत व धड वनस्पति नव्हेत असे कांहीं विचित्र पदार्थ तुझ्या पाहण्यात येतील !" (इंदिरेस पत्रें-पहिली सजीव सृष्टि-पृष्ठ १३-१४)

हें पुस्तक मूळ हिंदींत होतें, त्याचा मराठी अनुवाद १९२८ सालीं वि. ल. वोडस यांनीं केला व मराठी बालपुस्तकाच्या शास्त्रीय विवेचनधारेंत एक महत्त्वाची भर घातली.

शास्त्रीय सिद्धांत सांगण्याकरितां कथामाध्यमाचाहि उपयोग फारसा झालेला दिसत नाहीं. कारण त्या एकपरीनें रूपककथाच होतात. तशा कथा सोप्या शब्दांत लिहिणें सोपें नव्हे; लेखकाचे ठायीं त्या त्या शास्त्राचें पूर्ण ज्ञान तर हवेंच, परंतु तें बालसुलभ भाषेंत रंजकतेनें मांडण्याचें कसब तर त्याहूनहि श्रेष्ठ प्रतीचें पाहिजे. हा संगम एकंदरींत अल्पप्रमाणांत आढळतो. तथापि अशाहि पद्धतीच्या कांहीं दुर्मिळ पण सुंदर बालकथा पाहण्यांत आहेत. व त्यांचीहि सुरुवात सुमारें शंभर वर्षांपूर्वीच झालेली दिसते. १८५५ मध्यें पहिली मराठी क्रमिक पुस्तकें प्रसिद्ध झालीं. त्यांतील पांचव्या पुस्तकांत 'तीन राक्षस' नांवाची एक सुंदर रूपककथा (पाणी, वारा आणि वाफ या संबंधीची) प्रसिद्ध झाली आहे ती आजहि मुलांना उद्‌बोधक व रंजक वाटेल. शास्त्रीय सत्यांवर आधारित अशा कांहीं कुमारोपयोगी कल्पित कथा कोणीकोणी लिहिलेल्या आहेत. 'शुक्रावरचा माणूस' हें भा. द. खेरांच्या गोष्टींचें पुस्तक याच सदरांत येईल.

दुसऱ्याहि एका दिशेनें या सुबोध शास्त्रीय माहितीचें बालोपयोगी संकलन करतां येण्यासारखें आहे. तें म्हणजे जुन्या बालमासिकांतले असे लेख वा निबंध निवडून काढून त्यांचे संग्रह पुस्तकरूपानें काढावयाचे. उदाहरणार्थ, खेळगडीमध्यें एक 'विडा' हा विषय घेतला तर चुना, कात, सुपारी, लवंग, वेलदोडा, जायपत्री व पान इतक्याबद्दलची शास्त्रशुद्ध माहिती दिलेली असावयाची. अशा पद्धतीच्या अनेक लेखांचें पुनर्मुद्रण कोणी साक्षेपानें केलें तर ती शास्त्रीय बालसाहित्यांत निःसंशय एक चांगली भर पडूं शकेल. जुनीं बाल मासिकें पुष्कळ होतीं; त्यांतील अनेक दीर्घायुहि होतीं; त्यांतून अशा धर्तीचे लेख अनेकानेक आलेले पाहण्यांत येतात; त्यांचा उपयोग करण्याजोगा आहे.

अगदीं छोट्या मुलानांहि शास्त्रीय विषय समजावून देण्याचे प्रयत्न कांहीं झाले, पण ते अगदीं दुर्मिळ आहेत. लीला रेळे यांचें 'जरा अवती भवती' हें पुस्तक अशा प्रकारचें आहे. अग्नि, आरसा, नारळ, चहा, कॉफी, अशा रोज नजरेसमोर दिसणाऱ्या कांहीं वस्तूंची माहिती यांत सोप्या व हितगुजात्मक भाषेंत दिली आहे. शिवाय त्यांत छानदार चित्रेंहि आहेत. पण एकतर यांतील वर्णनवस्तूंतहि आपट्यांच्या 'एक दिवसाच्या मुदतींत' या पुस्तकाप्रमाणेंच एकसूत्रतेचा अभाव जाणवतो. उदाहरणार्थ, आरसा व नारळ यांत कोठला संवादित्वाचा धागा आहे? थोड्याशा दुसऱ्या वस्तु योजून तो सहज निर्माण करतां आला असता. तथापि अगदीं लहानांसाठीं माहितीचें असें हें एकाद दुसरेंच पुस्तक दिसतें. तेवढ्यानें त्यांची जिज्ञासा पुरी होणारी नव्हे, या दृष्टीनें आणखी याचे भाग निघाले तर बरें होईल.

शास्त्रीय विषयांना कादंबरीचें माध्यम फारसें उपयुक्त ठरत नाहीं. कारण शास्त्रशुद्ध माहिती वरचेवर त्यांतून टोकावणारच व ती कथानकाच्या सहजगतीला

मारक ठरणारी असते. 'एक दिवसाच्या मुठींत' या उत्तम कादंबरीनें या माध्यमास सुरुवात केली. तिचा अवलंब आजहि कांहीं लेखकांनीं अगत्यानें केलेला दिसतो. परंतु त्या यशस्वी कादंबऱ्या म्हणता येणाऱ्या नव्हत्या. रंजकता हें त्यांचें प्रमुख सूत्र व त्या अधिक वाचल्या जातात हेंच त्यांचें वैशिष्ट्य. अशा पुस्तकांत 'सोन्याचें हरीण' (ले. वसंत पटवर्धन) हें अग्रमान घेऊं शकणारें एक शास्त्रीय पुस्तक आहे. यांत एक छोटें कथासूत्र तर आहेच, पण त्याची छपाई व यांतील चित्रें इतकी छानदार आहेत कीं याचें आकर्षकत्व कितीतरी पट वर्धित झाल्याप्रमाणें भासतें! शास्त्रीय पुस्तकांनाहि बाह्य सजावटीनें नवी आकर्षकता उत्पन्न करण्याचा हा प्रयत्न बाल-दृष्टीनें विशेष अगत्याचा व स्वागतार्हच म्हटला पाहिजे. 'सोन्याचें हरीण' हें अर्थ-शास्त्रावरील अत्यंत रंजक पुस्तक आहे व विषय हसत खेळत सोपा करून सांगण्याचें तंत्र विशेष उल्लेखनीय आहे.

शास्त्रीय कथनच, पण तें आणखी एका वेगळ्या माध्यमांतून देण्याचाहि कांहीं लेखकांनीं प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, तऱ्हेतऱ्हेचे वैज्ञानिक शोध आजवर लागले व प्रतिदिनी लागत आहेतहि. हे शोध लावणाऱ्या शास्त्रज्ञांचीं चरित्रेंहि या विषयाला पूरकच ठरणारीं व तीं सांगतांना त्या त्या शोधाची पूर्वपीठिकाहि आपो-आपच मनांत ठसणारी, अशा या चरित्रमाध्यमाचा यशस्वी उपक्रम प्रा. प्र. न. जोशी यांच्या विज्ञानकथांच्या तीनहि भागांत करण्यांत आला आहे. प्रस्तावनेंत जोशी म्हणतात—

"विद्यार्थ्यांना प्रथमदर्शनीं रुक्ष वाटणाऱ्या या शास्त्रीय ज्ञानाबद्दल गोडी वाटावी, त्यासंबंधींची त्यांची जिज्ञासा जागृत व्हावी म्हणून विज्ञानकथा या एका अभिनव प्रयोगाची योजना आहे जगाचें स्वरूप बदलून टाकणारे जे महत्त्वाचे शोध आतापर्यंत लागले त्यांचा वृत्तांत गोष्टींच्या रूपानें निवेदन करण्याचा हा प्रयत्न आहे. अनेक सुरस हकिकती, मनोरंजक घटना, अलौकिक प्रसंग प्रत्येक महत्त्वाच्या शोधाभोंवती आपणास सांपडतात. प्रत्यक्ष विज्ञानाचें विवरण, त्यांतील समीकरणें, त्यांतील प्रयोग या गोष्टी पाठ्य पुस्तकांत असतात, पण शास्त्रीय शोधाच्या जन्मकथा मात्र बहुधा आर्किमिडीज, न्यूटन, गॅलिलियो इत्यादि विख्यात शास्त्रज्ञ सोडून दिल्यास आपणास वाचावयास मिळत नाहींत. तेव्हां अशा मनोरंजक वृत्तांतास कथेच्या रूपानें एकत्र करण्याचा प्रयत्न विज्ञानकथांतून केला आहे."

आणि ह्या सर्व कथा वरील हेतूशीं सुसंगत राहतील अशा रंजक भाषेत, शोधांना महत्त्वपूर्ण स्थान देऊन लिहिण्यांत आलेल्या आहेत. दुसरें असें चांगलें पुस्तक म्हणजे कै. श्री. म. माटे यांचें 'नवा शास्त्रज्ञ' हें होय व यांतहि कोपर्निकस, मादाम क्यूरी, लुई पाश्चर वगैरे नामांकित शास्त्रज्ञांचें जीवन व जीवनकार्य सुबोध तऱ्हेनें वर्णिलें आहे. श्री यदुनाथ थत्ते यांचें 'भारतीय वैज्ञानिक' हें पुस्तक कांहींसें अधिक

वैशिष्ट्यपूर्ण ठरेल. यांत फक्त विज्ञानक्षेत्रांत मान्यवर ठरलेल्या अशा फक्त भारतांतील व्यक्ति घेतल्या आहेत. वनस्पतींना बोलके करणारे विख्यात शास्त्रज्ञ जगदीशचंद्र बसू आणि नोबेल प्राइझ मिळविणारे सी. व्ही. रामनहि भारतीयच आहेत. अशा तेरा लोकांचीं चरित्रें प्रौढ सुबोध भाषेंत यत्यांनीं दिली आहेत व तो प्रयत्न जाणत्या कुमारांचें ज्ञानवर्धन करण्यांत उपयुक्त ठरेल !

या विज्ञानविषयांत एका नवलपूर्ण चरित्राचा उल्लेख करणें जरूर आहे. तो म्हणजे श्री. ग. वि. अकोलकर यांचें 'मादाम मेरी क्यूरी' हें पुस्तक होय. मेरी क्यूरीनें महत्त्वपूर्ण रेडियमचा शोध लावला. तिचें चरित्र तिच्या मुलीनें फ्रेंचमध्यें लिहिलें होतें त्यावरून हें मराठी पुस्तक तयार झालें आहे. चरित्र खरें पण त्याला लेखक मिळाले ते रसपूर्णतेनें लिहिणारे; तेव्हां सुंदर लेखनशैलीनें यांतहि आकर्षकता उत्पन्न झाली आहे. पुढील परिच्छेद या भाषेची कल्पना देऊं शकेल.

"थोड्याच वेळांत त्या जीर्णशीर्ण पर्णकुटींतील प्रयोगशाळेपाशीं तें जोडपें येऊन दाखल झालें. पिएरनीं कुलूप उघडलें, दिव्याचें बटन ते दाबणार तोंच मेरीनें त्यांना हळूच म्हटलें–"थांबा, थांबा, दिवा लावूं नका."

तिनें भिंतीवर ठेवलेल्या फळ्यावरील काचेच्या बरण्यांकडे पिएरचें लक्ष वेधलें. तिनें म्हटलें, "बघा, तुम्हांला सुंदर रंग हवा होता ना !"

"निळसर रंगाचे इवलाले असंख्य इंद्रनील जणु अधांतरी चमकत होते. रेडियम मूर्त स्वरूप धारण करून त्याच्या जनकजननीस नितांत आल्हाद देत होते. मेरी जागचेजागीं थबकली. गूढ संवेदनांनी तिचें अंतःकरण भारलें गेलें होतें. रेडियमच्या सिद्धतेचें स्वप्न आज साकार झालें. तिच्या जीवनांतील तो अविस्मरणीय दिवस होता."

(मादाम मेरी क्यूरी–पृष्ठ ९७–९८)

मात्र चरित्रपुस्तकाची ही शाखा अशा दोनचार पुष्पांनीच काय ती अलंकृत झालेली आहे एवढीच तक्रार, अर्थात् कथा, संवाद, कादंबरी, चरित्र हीं विज्ञान ज्ञानदर्शनाची रंजक माध्यमें ठरूं शकली तरी या सर्वाहून प्रभावी असें एक माध्यम आहे तें म्हणजे निबंधाचें. शास्त्रीय पुस्तकांच्या परिभाषेला, गांभीर्याला व स्पष्टीकरणाला हेंच माध्यम अधिक सुसंगत ठरणारें असल्यानें याचाच अवलंब करून आजकाल अनेक चांगलीं शास्त्रीय पुस्तकें लिहिली जात आहेत. आनंदकार्यालयातर्फे विज्ञानरंजनमाला या नांवाची एक शास्त्रीय पुस्तकमाला खास विद्यार्थ्यांसाठीं निघाली आहे. त्यांतून प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें गोष्टीरूप नसलीं तरी माहितीरूप आहेत. मात्र ही माहिती बऱ्याच आकर्षक भाषेंत सांगितली गेली आहे एवढेंच नव्हे तर त्या त्या विषयांतील तंत्रज्ञ व अभ्यासू मंडळीकडूनच हीं पुस्तकें लिहून

घेण्यांत आलीं आहेत. जीवनाधार पाणी, मानवमित्र अग्निदेव (डॉ. म. वि. आपटे), आपले मानवतेवर मित्र (प्रा. ज. नी. कर्वे), चाक व वाहनें (प्रा. ना. वा. कोगेकर), इत्यादि नांवावरून त्यांचें स्वरुप समजेल. मांडणी सुबोध, कथन हितगुजपद्धतीचें व ज्ञान आमूलाग्र अशी ही माला शास्त्रीय बालपुस्तकांत मोठी उपयुक्त भर टाकणारीच ठरेल.

या मालेला एक वेगळा दृष्टिकोन व स्वतंत्र आखीव योजनाहि आहे. सृष्टीच्या एकेक शक्तीची प्रथमपासूनची ओळख या मालेतर्फे करून देण्याचा प्रयत्न केला आहे; व अग्नि, पाणी, वाहनें, सूर्यकुल, भूगर्भ, संदेशवाहन, पशुपक्षी, फुलेंफळें असे आठ विषय नामवंत लेखकांनीं या मालेंत लिहिले आहेत; आणि ते चांगले साधले आहेत. ही सर्व माला शाळकरी विद्यार्थ्यांसाठींच लिहिली गेली आहे. तेव्हां विषय सोपा करून मांडण्याकडे या सर्व लेखकांची प्रवृत्ति आढळावी हें साहजिकच. सर्व माहिती अद्यावत्, शास्त्रशुद्ध असून शिवाय हीं पुस्तकें सचित्रहि आहेत. भाषा गंभीर आहे व सर्व धड्यांतून शास्त्रीय परिभाषाहि आढळते. आणि निबंधरूप शास्त्रीय ज्ञानाला ही प्रौढताच खरोखर अधिक शोभून दिसते. या सर्व पुस्तकांचे वाचक, तारुण्याच्या देहलीवर उभे राहणारे जाणते कुमारच कल्पिलेले दिसतात— जे लवकरच विश्वविद्यालयांत प्रवेशणार आहेत व यांतले विषय अध्ययनाला घेणार आहेत असे विचारशील कुमार त्यामुळें त्या दृष्टीनें त्यांच्या मनाची पार्श्वभूमि अशा अवघड विषयाला अभ्यासानुकूल करण्याचे कार्य हीं पुस्तकें फार चांगल्या प्रकारें करूं शकणारीं आहेत.

विज्ञानाची सुबोध समजूत देणारीं आणखीं कांहीं चांगलीं पुस्तकें गेल्या दशकांत प्रसिद्ध झाली आहेत. तीं भाषादृष्टयाहि रंजक असल्यानें विद्यार्थ्यांना व जिज्ञासूंना उपयुक्त ठरणारीं व आवडणारी अशी आहेत. यांत परशुराम म. बर्वे यांची 'विज्ञानशोभा' व 'विज्ञानसौंदर्य' व 'विज्ञानविलास' हीं तीन पुस्तकें, रा. वि. सोवनी यांचें 'विज्ञानाशीं हितगुज', प्रा. द. के. केळकर यांचें 'भूमंडळ नि नभोमंडळ' इत्यादि पुस्तकें आपल्या वैशिष्ट्यानें नजरेंत भरणारीं आहेत. नांवावरूनच त्यांची जात ध्यानांत भरेल. बोलूनचालून हें सर्वच विज्ञानाशीं हितगुज. त्यांतली भाषा प्रौढ आणि विवेचन बुद्धिनिष्ठ व तर्कशुद्ध असावें हें तर स्वाभाविकच. 'विज्ञानाशीं हितगुज' याच नांवाच्या पुस्तकांत परमाणुशक्ति व रडार, अग्निबाण, टेलिव्हिजन इत्यादि अत्याधुनिक शोध, त्यांची निर्मिति व निर्माते, व या शास्त्रीय उपकरण-साधनांची रचना इत्यादि सर्व सुबोध माहिती आहे. विषय अर्थातच क्लिष्ट आहे. इतका कीं याहून सोपा करून मांडणेंहि कठीण जावें! तथापि या विषयाची आवड असणाऱ्या कुमारांना निश्चित् उद्बोधक माहिती देणारें हें पुस्तक आहे. बर्वे यांच्या पुस्तकांतून कांहींसे वेगळे विषय आले आलेत खरें, पण तेहि शास्त्रीय बैठकींतलेच

आहेत. प्रयोगशाळेतील कांचपात्रें सूर्याच्या डोळयाची किंचित् उघडझाप, एक अमर द्रव्यराख, आधुनिक अगस्त्यमुनि इत्यादि विषय भिन्न धर्मीय पण शास्त्रीय तत्त्वांचें विशदीकरण करणारे आहेत. वर्च्यांचें विवेचन अधिक खेळकर आहे. त्यामुळें या लेखांत रंजकताहि भरपूर आलेली आहे. उदाहरणार्थ, कांचेबद्दलची शास्त्रीय माहिती सांगतांना एकाद्या लघुनिबंधाप्रमाणें किती आकर्षक भाषेत तिची प्रारंभिक ओळख दिली आहे पहा—

"काचं मणिं कांचनमेकसूत्रम्
मूढा निबध्नाति किमत्र चित्रम् !

ह्या श्लोकार्थामध्यें एका जुन्या कवीनें यकश्चित् कांचमणि व सुवर्णमणि दोन्यामध्यें ओवणाराला अगदींच मूर्खांत काढलें आहे. आधुनिक शास्त्रसुद्धां, कांच व सोनें एकाच मालिकेत बसविणाऱ्याला, हीच पदवी बहाल करील. परंतु तें मात्र अगदीं उलट अर्थानें. कांचेचें सौंदर्य, कांचेची उपयुक्तता, आपल्या दररोजच्या जीवनात कांचेचें महत्त्व आणि विज्ञानामधील कांचेची थोरवी या सर्व गुणांचा विचार करता कांचेचें श्रेष्ठत्व निर्विवाद आहे. कांचेच्या या मातबर गुणापुढें सोन्याचे गुण पासंगाला सुद्धां पुरणार नाहींत !"

अशी ही लेखनशैली कठीण विषयांतलाहि आशय सोपा आणि रंजक करून सांगणारीच. त्यामुळें वर्च्यांचीं पुस्तकें विद्वज्जनांएवढीच विद्यार्थ्यांना व कुमारांनाहि आवडणारीं झालीं आहेत. अंतराळांतील ग्रहविज्ञान हें एक नवें शोधाचें क्षेत्र दिवसेंदिवस वेगानें विस्तारत आहे व त्यासंबंधीं माहितीलाहि एक नवे महत्त्व प्राप्त होत आहे. तदनुषंगिक विवेचनाचीं हीं पुस्तकें आज विज्ञानशाखेंत प्रवेश करीत आहेत. प्रा. केळकरांचें पुस्तक या नवविज्ञानाचें ज्ञान देणारें आहे. पृथ्वीचे उपग्रह आकाशाची कड, सूर्यनारायणाचीं गहनगूढें इत्यादि प्रकरणें त्याची कल्पना देतील.

शास्त्रीय ज्ञानाला मदत करणारें आणखी एक छानदार पुस्तक स. शं. देसाई यांनीं अनुवादित केलें आहे. त्याचें नांव 'मानवी इतिहासांतील महान क्षण.' नांवावरून तें ऐतिहासिक वाटलें तरी हा इतिहास प्रामुख्यानें तारायंत्र, दक्षिण-ध्रुवावरील स्वारी, प्रशांत महासागराचा शोध, सोन्याचा देश इत्यादि अद्भुत शोधाचाच दिसेल. नाहीं म्हणायला या नांवाशीं सुसंगत ठरणारें 'वॉटर्लूची लढाई' हें एक प्रकरण मात्र यांत आहे. स्टीफन झ्वाइग हा याचा मूळ लेखक असल्यानें यांतील भाषा गंभीर निवेदनाची व निबंधरूप आहे.

प्र. न. जोशी यांनीं विज्ञानकथा लिहिल्या होत्याच, पण त्याहून कांहींसे वेगळे असें 'नव विज्ञानकथा' हें त्यांचें पुस्तक. हेलिकॉप्टर, जेट् विमान, रडार, रॉकेट, ट्रॅक्टर, प्लॅस्टिक, इत्यादि महान् शोध, त्या शोधांचा इतिहास व तें लावणारांची

चरित्रें यांत आहेत. विज्ञानाला मदत करणाऱ्या अशा कथा लिहिल्या जातील तेवढ्या थोड्याच !

विशिष्ट विषयाला वाहिलेल्या शास्त्रीय बालपुस्तकाचें हें दालन, ललित बालपुस्तकांच्या तुलनेनें अल्पसंख्य भासत असलें तरी तें प्रगतीच्या मार्गावर आहे हें मान्य करायला हवें. मुलासाठीं शास्त्रीय विषय ललित भूमिकेंतून सांगण्याचा उपक्रम ओक, आपटे इत्यादि लेखकांनीं सुरू केला, तो अलिकडे नवनव्या शैलीनें अधिकाधिक रूपमनोहर होत आहे व त्याची बालप्रियता वाढत आहे. अर्थात् शास्त्रें कितीहि लालित्यपूर्ण भाषेंत सांगावयाचीं म्हटलीं तरी त्याची मूलभूत तत्त्वें, त्यांचे शोध, विकसन, दृश्यरूप हा सर्व भाग माहितीस्वरूपच होणें आणि असणें अपरिहार्यच असतें व अशा दृष्टीनेंच या नवपल्लवित बालवाङ्मयशाखेचें रसिकांनीं स्वागत केलें पाहिजे.

अशा हा बालसाहित्याचा गेल्या सव्वाशें वर्षांतला एकंदर इतिहास. यांत शिशु, बाल व कुमार या बाल्यकालच्या तिन्ही अवस्थांना उपयुक्त ठरेल अशा प्रकारच्या अनेक पुस्तकाचें विवेचन आलें आहे. जुन्याकाळच्या धुळपाटीवर बाराखडी रेखणाऱ्या, शतकापूर्वीच्या विद्यार्थ्यापासून आजच्या बहुश्रुत कुमारांपर्यंत सर्व बाल श्रेणींच्या वाचकवर्गाचा यांत विचार झालेला आहे. शालेय बालवाचनानें सुरू झालेल्या बालसाहित्यानें आज वाङ्मयाच्या सर्व शाखांत प्रगति करून अभिमानास्पद यश मिळवलें. त्या एकंदर वाटचालीची ही कथा, जेवढी उद्‍बोधक तेवढीच रंजक ! बालसाहित्य आहेच कोठें एवढें; व जें आहे तें ग्रंथ लिहिण्याएवढ्या महत्त्वाचें खरेंच आहे काय, अशीहि शंका अनेकांच्या शब्दांतून आजवर ध्वनित झालेली आहे. त्याची सर्व उत्तरेंहि बहुधा या समालोचनातून मिळतीलसें वाटतें. बालसाहित्याच्या या सर्व यशस्वी उर्जितावस्थेचे श्रेय बालसाहित्यप्रेमी लेखक आणि उत्सुक बालवाचक यांना आहे तसेंच चित्रकार व प्रकाशक याचाहि त्या यशात फार मोठा वाटा आहे हें आपण वेळोवेळीं पाहिलेंच ! जनतेचें व सरकारचेंहि लक्ष आतां बालसाहित्यनिर्मितीकडे वेधलेलें दिसावें हेंहि कमी भाग्याचें नव्हे !

आतांपर्यंतच्या विवेचनांत बालसाहित्यांतील सुरुवातीपासून ते आतांपर्यंतची भिन्नभिन्न परिवर्तनें आपण पाहिलीं. नवे वाङ्मयीन प्रवाह व नवे लेखनप्रचार

यांचीहि ओळख पटवून घेतली. बालसाहित्य प्रारंभीं कसें होतें व आतां कसें आहे, याची स्पष्ट कल्पना देणारा हा नकाशा. आगामी बालसाहित्य नित्य नव्यानें निर्माण होणार, त्यांत प्रामुख्यानें कोणत्या इष्ट योजना असाव्यात याचेंहि कल्पनाचित्र वेळोवेळीं मी लेखनौघांत सूचित केलें आहेच. बालसाहित्य प्रकाशनाचें वर्तुळ दिवसानुदिवस विस्तारत आहे. पण मनांत येतें तें हें कीं, पुस्तकांची आज उमाप वाढ होत आहे व ती सजावटीनें, आकर्षकतेनें मनांतहि भरत आहे, हें खरें, पण तिचें अंतरंगहि अधिकाधिक सुधारत आहे काय? या प्रांतातहि बऱ्यावाईटाची सरमिसळ आहेच. कित्येक गुण आहेत तसे कांहीं लेखनदोषहि वाढत आहेत. बागेंत फुलांबरोबर कांटेहि रुजू पहाताहेत आणि त्यासंबंधीहि जागरूकता हवी आहे, अगदीं अवश्य हवी आहे! लेखकांना तर ती असावीच लागते; पण त्यापेक्षांहि मुलांचे हित पाहणाऱ्या जाणत्या पालकांना आणि साहित्याकडे चोखंदळपणें पाहणाऱ्या विचारशील वाचकांनाहि ती अगत्यानें हवी आहे. अशा दूरदर्शी दृष्टीनें यापुढें बालसाहित्य निर्माण झाले तर त्याचा भाग्यकाल दूर नाहीं!

०१०

## लेखकसूचि


अकोल्कर ग. नि. १८३, २६६.
अदिया वीरेन्द्र ५१,
अत्रे प्र. के १३३, १४३, १४४, १४५, १६०.
अनंतफंदी १४७.
आजगावकर ज. रा. २१९.
आठवले शांताराम १६६, १६७
आनंदकर फिरोज १२९, १३०, १९९, २१०, २३७, २३८, २३९, २४६.
आपटे उषा ९३, १९१, १९६.
आपटे दत्त १९१, १९४, १९५.
आपटे द. वि. १२१
आपटे ना. ह. १८३
आपटे म. वि. २६७
आपटे वासुदेव गोविंद ४५, ९०, १०१, ११०, १११, १२३, १४३, १४५, २१७, २१८, २६०, २६१, २६४.
आपटे शि. श. (डॉ. संपूर्णानंद) १८९.
आपटे हरि नारायण १८०. १८१, १८२, १८३, २१२, २२५.
इनामदार प्रभाकर १०६, १०८.
उपासनी र. ल. १२२, १२३.
ओक विनायक कोंडदेव २१, ३०, ३१, ३२, ३३, ३४, ३९, ४३, ९०, २१६, २१७, २६०.
करंदीकर विंदा १६९, १७०, १७३, १७४.
करमरकर सुधा १५०, १५२, १५८.
कर्णिक मीना २५९.
कँडी मेजर टी. १०, २१, २९, ३०.
कर्वे कावेरी ८४, १०३, १२९, २०६.
कर्वे ज. नी २६७.
कर्वे भा. धों. २४४.
कैंव वि. धों. १०१
काटदरे मा. गो. २४९.
काटदरे मा. के. ८५, ११५.
काणेकर अनंत १५०, १५५.
कानिटकर बा. मो. १०४.
कानेगावकर दत्तो रामचंद्र २४२, २४३,
कारखानीस म. का. ८०, १०१, १०२, १३७, १४८, १६६, १७५.
कारखानीस मा. द्वा. २२४.
किनरे कृष्णाजी गोविंद २१७.
किरात १४३.
किशोरकुमार २५२, २७३
कुळकर्णी अनंत अ. १८३, २१२
कुळकर्णी गोपाळराव १२०.
कुळकर्णी पंडित अनंत ५१
कुळकर्णी नि. म. १६६, १६८, १६९.
केळकर द. के. २६७, २६८.
केळकर मालती १५८.

मराठे अ. या. २६२.
मराठे संजीवनी १६६, १६९.
महाजन वा. प. २१९.
महेश २१२.
माटे श्री. म. २४९, २६५.
माडखोलकर ग. त्र्यं. २१२.
मायदेव वा. गो. १६६.
मिसाळ पारूजी नारायण ५५, १४५.
मेढेकर ज. शं. २५७.
मेबल १७०.
मुंडले चिं. आ. १४५.
मोकाशी दि. बा. २१०, २४८.
मोगरे १६०.
मोगलगिद्दीकर, १४५.
मोडक ताराबाई ८३, ८४, १०३.
मोडक वि. आ. २४५, २५२, २५६.
मोडक वि. श्री. २५०, २५४.
मोहाडीकर प्रकाश ५४.
मंगळवेढेकर राजा ८१, १६९, १७०, १७३.
यशवंत (कवि) १०६, १०७, १३३, १६४, १६५.
रघुवीर जादुगार २३१.
राऊत माधव २५५, २५८.
रानडे श्री. बा. ८७, १२९.
रानडे ज. वा. १८५.
रानडे दा. पां. ४८, २२४.
रानडे ना. रा. १२४, २२४.
रानडे भालचंद्र २०५.
रामतनय ८१, १११, ११२.
राय श्रीरांत २४९, २५०.
रांगणेकर कुमुदिनी (प्रभावळकर) ११३, १४५, १४७, १५०, १९९, २४३.
रेगे सदानंद १६९, १७१, १७६.
रेळे लीला २६४.
लिमये ना. गं. १६६, १६७.
लिमये मधु २३४, २३५.
लेले पु. रा. १३७, १३८, १३९.
लेले वि. गं. १२४.
लैंभे १६०.
लेंडे १६०.
वष्ट बलवंत. १२३.
वाघोलीकर, ह. भा. ९१, १९१.
वाटवे के. ना. १११, ११३, ११५, ११८, २२२.
वाडदेकर न. ग. २६२.
वाळिंबे श्री. ना. २४५, २५४.
वीरकर १४५, २२२.
वैजनाथशास्त्री २, ३, ८.
वैद्य ग. म. ९५, १०३. ११३, १२०, २१८.
वैद्य भालचंद्र. ७६, २२९.
वैद्य विश्वंभर उद्धवराव २२६, २२७.
वैशंपायन तारा. १६९.
शिखरे दा. न. ११३, ११४, १३९, २२६, २२८, २४२, २४३, २४४.
शिखरे मा. पं. १९७.
शिदोरे श्रीमती १६७.
शिरके शि. स. १०४.
शिरगोपीकर १४३.
शिरवाडकर वि. वा. (ऊर्फ कुसुमाग्रज) ५५, १६६.
शुक्ल ना. गो. १६९, १७०, १७२, १७४.

कोगेकर ना. धा. २६७.
कोचरेकर नाना १४७.
कोपरकर द. गो. २४८.
खरे भाऊ २३१.
खरे भा. द १२०, १२५, १२८, १२९, २६४.
खरे वासुदेवशास्त्री १६०.
खंडाळीकर व्यं. रा. ९३.
खानविलकर २०४.
खांडेकर वि. स. १३३, १४०.
खांटेकर सूर्यकांत १६७.
गडकरी राम गणेश १४३, १६३.
गलगली बा. कृ. २३१.
गलांडे द. शं. २३१.
गवाणकर आशा १६७.
गवाणकर वि. स. ८५, ८६.
गाडगीळ अमरेन्द्र ५५, १०६, १०७, ११२, ११३.
गाडगीळ गंगाधर १५६, १९१, १९२.
गाडगीळ नारायण ८३.
गांगल बा. द. १३६.
गुर्ले चारुशीला १०३, २२४, २२५, २२८, २५१.
गेस्फोर्ड ७, २१.
गोखले बा. दा. २२६.
गोखले विद्याधर २२८.
गोखले वि. ना. २५४, २५६, २५७.
गोखले ह. म. १६६.
गोडबोले २४७,
गोडबोले गणेश महादेव ३६
गोरे ना. ग. ९४, ९५, २३२, २३३, २३४.
गोरे भा. म. १९६.
गोंधळेकर २२८, २४६, २४७, २६२.
घाटे वि. द. १४५, २४६.
घारपुरे रत्नप्रभा २०६.
घारे अं. ज. २३१.
घोरपडे २२८.
चिपळूणकर कृष्णशास्त्री ४७, १०१.
चिपळूणकर गो. वि. १११, १२३.
चिपळूणकर विष्णुशास्त्री ४०
चोरघडे वामन १०२, १०३, १०९,
चोळकर गो. रा. २३७.
चौगुले रामजी गणोजी ३६.
छत्रे सदाशिव काशिनाथ २१, २८, २९, १४१.
जगताप २४९.
जांभेकर बाळशास्त्री ७, २२, २८, २९.
जोगळेकर अरुण १५८.
जोशी श्रीपाद २५०.
जोशी के. रा. २२२.
जोशी प्रभावती १०४.
जोशी प्र. न. २६५, २६८.
जोशी प्र. शं. ११३, ११५.
जोशी महादेवशास्त्री १०३, ११३, ११५, ११९, २१९, २२०, २५०.
जोशी रं. म. १०३.
जोशी रा. स. १३७,
जोशी वामन मल्हार २१३, २१४.
जोशी वि. श्री. २२७.
जोशी शांताबाई १६९.
टाउनसेंड ४.
टिकेकर श्री. रा. २४८.
टिल्ट व शायफर २२८.
टिळक देवदत्त नारायण ४३, १२९, १९१, १९३, २५९.

मराठे अ. बा. २६२.
मराठे संजीवनी १६६, १६९.
महाजन वा. न. २१९.
महेश २१२.
माटे श्री. म. २४९, २६५.
माडखोलकर ग. त्र्यं. २१२.
मादेव वा. गो. १६६.
मिराळ पारूबी नारायण ५५, १४५.
मेढेकर ज. शं. २५७.
मेवल १७०.
मुंडले चिं. आ. १४९.
मोकाशी दि. बा. २१०, २४८.
मोगरे १६०.
मोगलगिद्दीकर, १४५.
मोडक ताराबाई ८२, ८८, १०३.
मोडक वि. आ. २४९, २५२, २५६.
मोडक वि. श्री. २५०, २५४.
मोहाडीकर प्रकाश ५४.
मंगळवेढेकर राजा ८१, १६९, १७०, १७३.
यशवंत (कवि) १०६, १०७, १३३, १६४, १६५.
रघुवीर जादुगार २३१.
राऊत माधव २५५, २५८.
रानडे श्री. बा. ८७, १२९.
रानडे ज. वा. १८५.
रानडे दा. पां. ४८, २२४.
रानडे ना. य. १२४, २२४.
रानडे भालचंद्र २०५.
रामतनय ८१, १११, ११३.
राय श्रीकांत २४९, २५०.
रांगणेकर कुमुदिनी (प्रभावळकर) ११३, १४५, १४७, १५०, १९९, २४७.
रेगे सदानंद १६९, १७१, १७५.
रेळे लीला २६४.
लिमये ना. गं. १६६, १६७.
लिमये मधु २३४, २३५.
लेले पु. रा. १३७, १३८, १३९.
लेले वि. गं. १२४.
लेंभे १६०.
लोंढे १६०.
वट बलवंत. १२३.
वामोलीकर, ह. मा. ९१, १९१.
वाडवे के. ना. १११, ११२. ११५, ११८, २२२.
वाडदेकर न. ग. २६२.
वाळिंबे श्री. ना. २४९. २५४.
वीरकर १४५, २२२.
वैद्यनाथशास्त्री २, ३, ८.
वैद्य ग. म. ९५, १०३ ११३, १२०, २१८.
वैद्य भालचंद्र. ७६, २२९.
वैद्य विश्वंभर उद्धवराव २२६, २२७.
वैशंपायन तारा. १६९.
शिरूरे दा. न. ११३, ११४, १२९, २२६, २२८, २४२, २४३, २४४.
शिखरे मा. पं. १९७.
शिदोरे श्रीमती १६७.
शिरके शि. स. १०४.
शिरगोपीकर १४३.
शिरवाडकर वि. वा. (ऊर्फ कुसुमाग्रज) ५५, १६६.
शुक्ल ना. गो. १६९, १७०, १७२, १७४.

परब्र १८३.
परभृत सुशील १९१
परांजपे ता. १६९.
परांजपे भा. श्री. ११५, १३२, २१८, २१९.
परांजपे सई (सौ. जोगळेकर) १५० १५४, १५५, १५८.
परांजपे ल. गो. ९५.
पंडित के. गो. १४५, १४७.
पंडित भवानीशंकर १३७, १६६, १६८, १६९.
पागनीस ३८.
पाटणकर २५०.
पाटील ग. ह. १६३. १६६. १६८, १६९.
पाटील ना. ध. २२९.
पाटील ह. रा. ८७.
पाठारे हरी केशवजी १०. २२, २३.
पाडगांवकर मंगेश १२३.
पायगावकर सुमति ७९, ८१, ९३, १६९.
पारसनीस न. रा. २४८.
पालवणकर का. रा. ४९.
पाळंदे भास्कर दा. १६०.
पुनर्वसू अनिरुद्ध १६९, १७१, १७२
पुनर्वसू शशीकांत १२९, १३०.
पेठकर २०४.
पोतदार काशिनाथ २२२.
पोतदार दत्तो वामन २३५, २३६.
फडके कमल १३०, २१२.
फडके ना. सि. १३०, २१२.
फपे दा. वि. ९३.
फळणीकर र. च. २६२.
फाटक बा. वा. १०३
फाटक वि. ग. १९४.
बर्वे २६७, २६८.
बर्वे द. के. १०७, १०८, १२९, १८५ १९६.
बर्वे परशुराम म. २६७.
बलवंत २१०.
बागुल देवीदास २५४, २५५.
बापट गोविंदशास्त्री ३८, २००.
बापट विष्णुशास्त्री ८, ९, २१, ३६.
बाबर शारदिनी १०३.
बाबर सरोजिनी १०३, १२९.
*ब्रिसेल एमिली ४२.*
बेहेरे ना. के. १६३.
बोकील वि. वि. १३२, २०२, २०३, २०६, २१०.
बोडस वि. ल. २३२, २६३.
भडारी शांतिलाल २०४.
भागवत चारुमती ११६, ११७, १३६.
भागवत दुर्गा ५५, १०४, ११२.
भागवत भा. रा. ५०, ५३, १२७, १२८. १२९. १८८, १९१, १९३. १९५, १९७, १९९, २६२, २६३.
भागवत लीलाबाई ८४. १६९, १७१, २४८.
भालचंद्र (कर्वा) १६७.
भालेराव आशा ९२.
भावे ना. कृ. २६२.
भावे वा. कृ. ५४, २१९,
भिडे भालचंद्र १५०, १५१, १५२,
भिसे व. का. ८६.
भोसले म. भा. १४८.
मतकरी रत्नाकर १५०, १५२.

